महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका, वर्ष ५ वें ( शके १८५४ )

# विषयानुक्रमणिका

लघुकथा



शंका, चर्चा इत्यादि



साभार पोच



सामाजिक



---

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका वर्ष ५ वें ( शके १८५४ )

# लेखकानुक्रमणिका

प्राथमिक व दुय्यम शाळांतील वाचनालयांकरिता मुंबई सरकारने मंजूर केलेली

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष ५ वें, अंक १ ला

## अनुक्रमणिका

## महाराष्ट्र–साहित्य–परिषद्

१ ५० रुपये देऊन महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे तहाह्यात सभासद होतां येतें.
२ म. सा. परिषदेच्या सभासदत्वाची वर्गणी रुपये ३.
३ सभासदांना महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेकरता निराळी वर्गणी द्यावी लागत नाही. फक्त टपाल खर्च ८ आणे द्यावे लागतात.

---

## वर्गणीदारांस सूचना.

नवीन वर्षाचा पहिला अंक आज रवाना होत आहे. अद्याप ज्या वर्गणीदारांकडून वर्गणी आली नाही त्यांनी ती सत्वर पाठविण्याची कृपा करावी.

---

## चुकीची दुरुस्ती

वर्ष ४ अंक ४ या. पृष्ठ २८२ "कुडाळी-मराठी-भाषा" या लेखांत इतिहास-संशोधक व इतर वाङ्मय निर्माण केलेल्या गृहस्थांचे यादींत खालील दोन गृहस्थांचीं नांवें चुकून राहिलीं आहेत तीं:— कृ. अ. केळूसकर व गं. दे. खानोलकर.

---

## परिषदेची हानि

म. सा. परिषदेची फार मोठी हानी परिषदेचे एक सन्मान्य व विद्वान असे सभासद रा. वामन दामोदर तळवळकर ह्यांच्या मृत्यूने झाली. वामनरावजींचा परिषदेशीं संबंध फार दिवसाचा व अत्यंत जिव्हाळ्याचा होता. त्यांचें वाङ्मयासंबंधी संशोधन पत्रिकेच्या वाचकांच्या परिचयाचें आहे. पुराणकथावरील भारूडाचें अवगुंठन काढून सत्य दाखविणारे संशोधक विरळा आणि वामनरावजी तशापैकी एक संशोधक होते. ईश्वराजवळ वाङ्मयसायुज्यतेचा लाभ त्यांना होवो.

---

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे एक आस्थेवाईक सभासद व भोर येथील प्रसिद्ध वकील रा. रा. गणेश लक्ष्मण गपचूप हे यंदाचें सालीं कैलासवासी झाले हें कळवितांस खेद वाटतो.

कुणबी पात्राने कुणबाऊ घाटी बोलीचे फुटाणे उडविणें, तेलंगी अय्याने लिंगवचनांचा वावळा गोंधळ माजविणें, व मारवाडी शेटजींनी मारवाडी, गुजराती व मराठी यांचें तीनपेडी चऱ्हाट वळणें, इत्यादि प्रकार उपरिनिर्दिष्ट हेतूनेच ग्रंथांत घुसलेले आढळतात. अशा विशिष्ट हेतूंवांचून ते ग्रंथभाषेंत येऊंच शकत नाहीत, आणि हेंच त्यांच्या अशिष्टत्वाचें खात्रीलायक प्रमाण आहे. मराठी नाटककादंबऱ्यांत आजमितीस जो प्रकार आढळतो, तोच इ. स. पहिल्या शतकाच्या सुमारास प्रथमच रचिलेल्या संस्कृत नाटकांत आढळतो. शिष्ट संस्कृताच्या जोडीने ज्या अशिष्ट अपसृष्ट बोली त्यावेळीं समाजाच्या निरनिराळ्या वर्गांत प्रचलित होत्या, त्या वर निर्दिष्ट केलेल्या स्वभावोक्तीच्या व विनोदाच्या हेतूस्तव योग्य पात्रांच्या तोंडीं घातलेल्या आढळतात, व हे भाषांचे नमुने, पुढे शिष्टत्वाला पोचून ग्रंथभाषा बनलेल्या प्राकृतांचें अशिष्टपणांतील स्वरूप दाखवितात व यामुळे त्यांस भाषांच्या इतिहासांत महत्त्व आलेलें आहे.

१० आता एकाद्या अभियुक्त व नागर भाषेचीं रूपान्तरें कोणकोणत्या कारणांनी होतात, यांचा त्रोटक विचार करून हें प्रास्ताविक प्रकरण आटोपतें घेऊं.

शब्दोच्चार व वर्णोच्चार यांचे भेद भाषेच्या रूपान्तरांचें प्रमुख कारण आहेत. कित्येकांच्या मतें उच्चार सोपे, नरम, अगर कमी श्रमाचे, करण्याकडे जनतेची सामान्यतः प्रवृत्ति असते. परंतु उच्चाराचा सोपेपणा अगर अवघडपणा तात्विकदृष्ट्या निश्चित करणें जवळ जवळ अशक्य आहे. स्वरनाड्या, जीभ, ओठ, वगैरे मुखावयवांच्या यथायोग्य व प्रमाणशीर चलनवलनाने व श्वासनाड्यांच्या नियमनाने निरनिराळ्या स्वरव्यंजनांचे उच्चार होतात. तेव्हा हें चलनवलन जितकें कमी होईल तितकें कमी करण्याकडे सामान्य जनतेची सहज प्रवृत्ति असावी, असें तत्त्वदृष्टीला भासण्याचा संभव आहे. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत याच्या अगदी उलट अनुभव वारंवार येतो. 'स्टेशन्' शब्दाचा 'टेशन्' अगर 'ठेसन्' असा अपभ्रंश करणें म्हणजे श्रमाची कांहीतरी बचत करणें आहे, असें मानितां येईल. परंतु त्याचा 'इस्टेषण्' असा उच्चार करणें म्हणजे उघड उघड श्रम वाढविणें आहे; तरी पण हे जादा श्रम आपखुषीने घेणारांची संख्या थोडीथोडकी आहे असे नाही; किंबहुना त्या जादा श्रमांचें त्यांस भानच नसतें, व कमी श्रमांचे उच्चार करूं गेल्यास त्यांस अधिक मेहनत पडते. व बरेच वेळां ते उच्चार नीट साधतहि नाहीत! एकंदरींत शब्दोच्चार व वर्णोच्चार यांचे बाबतींत लोक श्रमांचें तात्विक न्यूनाधिक्य लक्ष्यांत घेत नाहीत. सोय व संवय यांच्याच धोरणाने ते सरधोपट चालतात. चालतांना छाती बाहेर काढणें, पाठीचा कणा वाकविणें, हात घोळणें, खांदे उडविणें, माना हेलकावणें, पावलें टपटप किंवा ओढीत, वाकडी अगर सरळ टाकणें, इत्यादि अनेक लकबा व्यक्तीव्यक्तींत आढळून येतात. यांत कमी अधिक श्रमाचा विचार नुसता भासमानसुद्धा होत नाही. ज्याला जी सवय कांहीं कारणाने जडली तींतच त्याला सोय व मोकळेपणा वाटतो, आणि त्याला ती बदलण्यास सांगितलें असतां तें अवघड वाटून तो आखडल्यासारखा होतो व त्रासतो. जी गोष्ट गमनक्रियेची, तीच शब्दवर्णोच्चाराची. उच्चाराच्या लकबा ज्या अनेक कारणांनी जडतात, त्यांपैकी एक संगतिगुण हें होय. आईबाप, वडीलभावंडें, व शेजारीपाजारी जशी भाषा बोलत असतील, तशीच भाषा बोलण्यास मूल शिकतें, आणि बाळपणांत शब्दवर्णो-

च्चाराच्या ज्या सर्व अंगीं लागतात, त्या मोठेपणीं मोडणें फार मुष्किलीचें होतें. यामुळे उच्चार परंपरा पिढ्यान्‌पिढ्या अस्खलित उतरत जाऊन, निरनिराळ्या जमायतींत निरनिराळ्या उच्चाररूपानें भाषा वावरत राहते. शिवाय, भाषा हें साधन व व्यवहार हें साध्य आहे. तेव्हा, व्यवहार सुरळीत पार पडला, म्हणजे त्यापलीकडे भाषेच्या व वर्णोच्चाराच्या शुद्धीबद्दल सामान्यजनता फारशी पर्वा करीत नाही व चिकित्सकपणा दाखवीत नाही. शिवाय, कित्येक व्यक्तींची बोलण्याच्या लपेटीची लटपट व शब्दवर्णोच्चाराची अस्पष्टता, आणि त्याप्रमाणेच ऐकणाराचे श्रुतिदोष व अज्ञान, यांनीही उच्चारविकृतींत भर पडण्याचा जबरदस्त संभव असतो. एवंप्रकारें उद्भवलेल्या उच्चाराच्या लकबी किंवा विकृति अनुकरणानें फैलावून त्या त्या जमायतींत कालगतीनें खिळून जातात, व तेणेंकरून एकच भाषा बोलणाऱ्या समाजाच्या पोट-वर्गांत भाषेचें रूपवैचित्र्य खेळत राहतें.

उच्चारभेदाचें दुसरें कारण वर्णोच्चारक मुखावयवांचें स्वभावजात दोष हें होय. कित्येक लोकांना कांही वर्णांचे उच्चार साधतच नाहीत. बऱ्याच मारवाडी शेटजींना 'च'च्या ऐवजीं 'स' उच्चारतांना आपण ऐकतों. 'व' बद्दल 'ब' तर बंगालकरांच्या जिव्हाग्रींच पुजला आहे. चिनी व जपानी लोक 'र'चा उच्चार 'ल' सारखा करितात. बंगाली बाबूंच्या तोंडीं 'अ' वर्ण 'ऑ' अगर 'ओ' यांची खुलावट दाखवितो. 'वंगभंग' म्हणावयाचें असतां, ते 'बॉंगभॉंग' किंवा 'बोंगभोंग' असें उच्चारतात.[1] मराठीप्रांतांतील अशिष्ट वर्ग 'नड,' 'गाडी,' 'मडकें,' इत्यादि शब्द 'नर,' 'गारी,' 'मरकें' असें उच्चारतांना आढळांत येतात. कित्येक लोक न-ण, ल–ळ, र–ल, त–ट, इत्यादि जोड्यांतील वर्णांची बहुशः नियमानेच उलटापालट करितात. हे उच्चारांतील अपभ्रंश या लोकांत सामान्यतः स्वरोत्पादक नाड्यांच्या स्वभावदोषानें उद्भवतात, हें खरें; परंतु कित्येक वेळां ह्या नाड्यांतील दोष प्रकृतिजात नसून, सवयीनें व सरावानें जडलेला असतो, आणि असें असल्यास रसनादि स्वरोत्पादक मुखावयवांना शिक्षणानें योग्य वळण देतां येतें व तेणेंकरून शिष्टोपदिष्ट उच्चार साधणें शक्य होतें. परंतु उच्चार करण्याच्या नाड्यांतच कांही साहजिक उणीवा ज्या लोकांत आढळतात त्यांस शिष्टोच्चाराचें नीट वळण कित्येक पिढ्यांपर्यंत तरी लागणें संभवनीय दिसत नाही. या मुद्यासंबंधें रा. वि. का. राजवाडे लिहितात[2] की, "सर्वांत अत्यन्त अपभ्रंश हिंदुसमाजांत येऊन राहिलेले दैत्य, असुर, शक, पल्हव, यवन, मुसलमान, यहुदी वगैरे जातिबाह्य लोक, यांच्या हांतून पराकाष्ठेचा होतो. उच्चार लिंग, वचन या सर्वांचा हे म्लेंच्छ लोक दुरुपयोग करितात. पारशी, यहुदी, अरब, इंग्रज, फ्रेंच, मोंगल, जपानी, वगैरे म्लेंच्छ लोक संस्कृत, गुजराथी, मराठी, वगैरे भाषांचा उच्चार व प्रयोग किती अशुद्ध व अपभ्रष्ट करितात हें पाहिलें म्हणजे अपभ्रंशोत्पत्तीचें खरें कारण ध्यानांत येऊं लागतें. ह्या लोकांच्या उच्चार करण्याच्या नाड्याच तिरके उच्चार करण्याला लायक अशा जन्मसिद्ध असतात. 'अ'चा 'ॲ,' 'ए'चा 'ॲ,' 'स'चा 'र,' वगैरे उच्चार म्लेंच्छ लोकांच्या बोलण्यांत फार येतात. असले तोंड वाकडे वासून झालेले उच्चार शूद्रादि वर्णांच्या

१ डॉ. गुणेकृत भाषाशास्त्र (विस्तार–निबंधसंग्रह, पृ. ९५–९६).

२ ज्ञानेश्वरीची प्रस्तावना, पृ. १.

अपभ्रंशांत आवळत नाहीत. बोलणारांची छिन्न व्यंजनें व कठोर व्यंजनांची मृदु व्यंजनें करण्याकडे बालशूद्रांची प्रवृत्ति विशेष असते. बालशूद्रादिकृत अपभ्रंश लोकमान्य नसल्यामुळे भिन्न भाषात्वाला कारण समजणें सर्वथा अयुक्त होय. हाच नियम म्लेंच्छादिकृत अपभ्रंशाला लागू करणें वाजवी आहे." वरील उताऱ्याच्या पूर्वार्धांतील विधान विचाराच्या कसोटीस जसें उतरतें, तसें उत्तरार्धांतील विधान उतरूं शकत नाही. 'गोड, तुकडा, मार्गशीर्ष, स्त्री, वेस, होय, तोंड, दिलें,' इत्यादि अनेक शब्दांचे उच्चार शूद्रादि वर्गांत 'ग्वाड, टुकरा, मशीर, आस्तुरी, ब्येस, व्हय, त्वाँड, दिन्लें,' इत्यादि स्वरूपांनी हरहमेश कानावर आदळतात, व त्यांत 'तोंड वाकडें वासण्याचा' वराच प्रसंग येतो, हें अनुभवसिद्ध आहे. परंतु असें तोंड वाकडें वासण्याचे प्रसंग शूद्रादिकांच्या अपभ्रंशांत म्लेंच्छांपेक्षा कमी येतात, हें कदाचित् कबूल करितां येईल, पण शूद्रादिकांचे अपभ्रंश 'भिन्नभाषात्वाला कारण समजतां येत नाहीत,' हा सिद्धान्त मात्र मुळींच टिकण्याजोगा नाही. रा. राजवाडेच इतरत्र सांगतात[1] की, "संस्कृत बोलणाऱ्या आर्यांची सर्व संस्कृति त्यांच्याजवळ असून, फक्त संस्कृत–महाराष्ट्री–अपभ्रंश, ह्यांचा अपभ्रंश जी मराठी, ती बोलण्याचा नवीन क्रम महाराष्ट्रांतील बालशूद्रांनी पत्करला इतकेंच कायतें......हेमाद्रि, बोपदेव संस्कृतांत लिहीत आहेत, व ज्ञानेश्वर स्त्रीशूद्रांकरितां मराठींत लिहीत आहेत..." या विधानावरून असें फलित होतें की, स्त्रीशूद्रांच्या अपभ्रंशामुळेच मराठी भाषा अस्तित्वांत आली व शिष्टांनी तिचा कारणपरत्वें अंगीकार करून तिला अभियुक्त ग्रंथभाषा बनविली, अशी रा. राजवाडे विनशर्त कबूली देतात. स्त्रीशूद्रादिकांचे अशिष्ट अपभ्रंश आपल्या अंगच्या चिकटपणाने नित्यव्यवहाराला डकून जातात, व कालक्रमाने त्यांचा सहवास अंगवळणीं पडून ते शिष्टांच्या तोंडीं व्यवहारांत व नंतर ग्रंथभाषेंतहि घुसूं लागतात, आणि अखेर पंक्तिपावन होऊन शिष्टत्व संपादतात. अशाप्रकारें शिष्टत्वाप्रत पोंचलेले अशिष्ट प्रयोगच भाषेच्या रूपान्तराला व कालगतीने 'भिन्नभाषात्वाला' मुख्य कारण होतात.

भाषेचें रूपान्तर घडवून आणणारें तिसरें मातबर कारण व्युत्पत्तीचें अज्ञान व साम्यभ्रम हें होय. उपसर्ग, प्रत्यय, स्वरव्यंजनांचे आदेश इत्यादिकांच्या योगाने व्याकरणक्रिया घडून जे शब्दप्रयोग तयार होतात व जी भाषेची अन्तर्घटना बनते, त्यामध्ये एकसूत्रीपणा आणण्याची ढोबळ प्रवृत्ति सामान्य जनतेंत दृष्टीस पडते. या बाबतींत असंस्कृत वर्गांची स्थिति बहुतांशीं लहान[2] मुलांसारखीच असते. स्मरणशक्तीचा कमजोरपणा, व्यवहाराचें अज्ञान, अनुकरणाची सहज प्रवृत्ति, व साम्याने पडणारी भूल, या कारणसमवयाने लहान मुलांच्या भाषेंत विकार उत्पन्न होतो. 'चरलें, घरलें,' या प्रयोगांच्या धर्तीवर 'मरलें, करलें,' इत्यादि अपप्रयोग मुलें साधितात. बऱ्याच भाषांत वाढणारी एकटीच बहीण चांगली समजुतींत येईपर्यंत, "मी जातों, खेळतों." अशी अशुद्ध भाषा बोलते. आईबाप वगैरे वडील माणसेंहि लहान मुलांच्या या प्रवृत्तींचें प्रेमपूर्वक कौतुक करून, त्यांच्याच विकृत बोबड्या बालभाषेंत त्यांच्याशीं मोठ्या उत्साहोत्साने संभाषण करितात. पापी, भाता, दुधू, अंगा, नतो, तोतो, काबू, हम्मा, माऊ,

---

१ भा. इ. सं. मं. षाण्मासिकवृत्त, श. १८३४, भाग २, पृ. ११९–२.

२, Dr. Sir R. G. Bhandarkar's Philological Lectures, p. 12.

अंगाई, पापा, मंम,' इत्यादि शब्दांचा एका स्वतंत्र बालकोशाचा उपयोग आपण लहान मुलांबरोबरच्या संभाषणांत करितों. अशिष्ट व अशिक्षित लोकांच्या बाबतींतहि हाचप्रकार मोठ्या प्रमाणावर घडत असतो, व तो वर्षानुवर्षे लौकिक व्यवहारांत चालत राहून व कालान्तराने त्याचे परिणाम जुळत जाऊन, त्यांचें अखेर पर्यवसान शिष्टभाषेच्या रूपांतरांत होतें. याच परंपरेने एकाकाळीं शिष्ट गणलेले शब्द, रूपें व वाक्प्रचार, कालगतीने अशिष्ट बनतात व अशिष्ट शिष्ट पदवीला चढतात; म्हणजे भाषेच्या रूपान्तरासंबंधें परस्परविरुद्ध अशा दोन क्रिया अव्याहत चालू असतात, व त्यांच्या प्रवाहांत सांपडून शिष्टवर्गहि कमीजास्त वेगाने वाहून जात असतो.

भाषेचें रूपान्तर होण्याचें चवथें महत्वाचें कारण भिन्न भाषा बोलणाऱ्यांचें सान्निध्य व संघर्षण हें होय. या कारणाचा परिणाम बहुशः भाषेच्या बाह्य स्वरुपावर होतो; म्हणजे तिच्या शब्दकोशांत व वाक्प्रचारांत परकी मिसळण फार होतें. परंतु तिची आंतर रचना म्हणजे नाम-धातु-विभक्तींची घटना बहुधा कायमच राहते. जेथे दोन भाषांचे प्रान्त एके ठिकाणीं मिळतात अशा सरहद्दीवर ही मिश्रणक्रिया सामान्य जनतेंत अतिरिक्त प्रमाणांत घडते व अशा मिश्र भाषांना त्या त्या प्रांतीं तोंडीं व्यवहारांत शिष्टत्वहि लाभतें. परंतु त्यांचा ग्रंथभाषेंत सहसा प्रवेश होत नाही; म्हणजे अशा रांगडी भाषाच्या पदरीं सर्वमान्य शिष्टत्व पडूं शकत नाही. परकी भाषेचें सार्वत्रिक अध्ययन व तिचा व्यवहारांत बऱ्याच प्रमाणावर उपयोग शिष्टवर्गाकडून होऊं लागल्यास, भाषेचा शब्दकोश व वाक्संप्रदाय यांत त्या परभाषेची खिचडी होण्यास तें बलवत्तर कारण होतें. जेव्हा एखादा देश परस्थ जेत्यांच्या मगरमिठींत जातो, तेव्हा त्या परस्थ राज्यकर्त्यांची भाषाहि जितांच्या भाषेवर अम्मल चालवूं लागते, आणि राजसत्तेच्या जोरावर परकी भाषा सर्व दरबारी व्यवहारांत वावरूं लागून, देशभाषेची अगदीच गळचेपी होते. दरबाराबाहेरहि जेत्यांच्या भाषेचा खेळ, बाजारहाट, व्यापारउदीम, कलाकौशल्य सामाजिक व्यवहार, वगैरे प्रांतांत तिच्या मगदुराप्रमाणे व परिस्थितीच्या धोरणाने चालू होतो. तशांत राज्यकर्त्यांची भाषा जर चांगली कमावलेली, कणखर व हरतऱ्हेच्या विपुल ग्रंथसंपत्तीने मंडित झालेली असली, तर तिचा बडेजाव व फैलाव जारीनें वाढतो, तिची मोहनी जितांवर जबरदस्त रीतीने लागू होते, व तिच्या रीतसर अध्ययनाचीहि प्रथा शिष्टवर्गांत सुरू होते. अर्थात्च अशा कारणांनी देशभाषेंतील शब्दकोश, शब्दवर्णोच्चार, वाक्संप्रदाय, वगैरे सर्व बाह्यस्वरूपरंगावर जेत्यांच्या परकी भाषेचा जबर परिणाम होतो. परंतु हा परिणाम देशभाषांना नेहमी मारकच होतो असें नाही; तर तो कधीकधी पोषकहि होतो. जेत्यांची भाषा देशभाषांना पोषक अगर नाशक होणें, हें जसें देशभाषांसंबंधीं जेत्यांच्या उदार अगर अनुदार धोरणावर अवलंबून असतें, तसेंच किंबहुना त्याहूनहि अधिक, तें जितराष्ट्रांतील शिष्टवर्गांच्या मायभाषेबद्दलच्या प्रेमावर, अभिमानावर व बाणेदारपणावर, अगर औदासीन्यावर व नेभळटपणावर अवलंबून असतें.

सारांश, कोणत्याहि देशाच्या राष्ट्रभाषेचीं रूपान्तरें होण्याचीं मुख्य कारणें पांच आढळतात. (१) सोईप्रमाणे व सवयीप्रमाणे शब्दवर्णोच्चार करण्याची प्रवृत्ति. (२) स्वरोत्पादक अवयवांचे स्वभावदोष. (३) सामान्य जनतेचें अज्ञान व साम्यभ्रम. (४) परप्रांतीय भाषांशीं सान्निध्य व संघर्षण. (५) राजकीय परिस्थितीने घडणारा परभाषेचा व्यवहार, फैलाव व अभ्यास.

## प्रकरण दुसरें

# मराठीची देशव्याप्ति

१ मराठी भाषा ही मराठ लोकांत उदय पावलेली मराठ देशांतील भाषा होय, हें उघड आहे. परंतु भाषेची व्याप्ति ही नेहमी तिच्या जन्मस्थानाच्या सरहद्दीनेच मर्यादित राहते, असें नाही. भाषेच्या देशव्याप्तीचा विस्तार अगर संकोच अनेक कारणांनी घडतो. ही कारणें धार्मिक, राजकीय, सामाजिक, किंवा औद्योगिक स्थित्यन्तरें होत. अशा स्थित्यन्तरांनी एखादी भाषा आपल्या जन्मस्थानाच्या मर्यादा ओलांडून आसपासच्या प्रदेशांत फैलावून, तिची देशव्याप्ति वाढते; तर कित्येक प्रसंगीं तिची स्वदेशांतच गळेचेपी होऊन ती संकोच पावते, इतकेंच नव्हे, तर नष्टहि होऊं शकते. वाढत्या, चढत्या, पराक्रमी व साहसी राष्ट्राची भाषा दूर दूरच्या प्रदेशांत वसाहती करते व तद्देशीयांच्या मूळ भाषेचा नायनाट करण्यासहि कारण होते. एकंदरींत प्रतिपाद्य मुद्दा इतकाच की, एखाद्या भाषेचा एखाद्या विविक्षित कालीं अमुक एका सलग प्रांतांत प्रचार आहे, म्हणून तोच सर्व प्रांत तिचा मूळचा जन्मदेश होय, असें म्हणणें युक्त होणार नाही.

२ मराठी भाषा आजकाल ज्या सलग प्रदेशांत व्यावहारिक रूपानें नांदत आहे, त्या प्रदेशाच्या चतुःसीमा पुढे लिहिल्याप्रमाणे आढळतातः–उत्तर सीमेस दमणपासून आरंभ होऊन, नाशिक व खानदेश[1] यांच्या पश्चिम सरहद्दीच्या रोखानें उत्तरेस चढून, नंतर ती बहुतेक सरळ रेषेनें पूर्वेकडे, बैतूल, छिंदवाडा, शिवणी यांवरून जात जात नागपूरच्या ईशान्य कोनास पोंचते. या ठिकाणाहून पूर्वसीमेला आरंभ होतो. नागपूरच्या पूर्वहद्दीवरून दक्षिणेस उतरत उतरत, ही सीमा चांद्याला वळसा घालते व नंतर पाइनगंगेच्या अनुरोधानें पश्चिमेकडे झुकते. यापुढे ती पुन्हा दक्षिणाभिमुख होऊन निजामसरकारच्या राज्यांत गोदावरीस ओलांडून, वांकणें घेतघेत सोलापूरच्या सुद्दानें सरसावते. नंतर ती सोलापूर व विजापूर यांच्या पूर्वहद्दीला धरून कृष्णानदी गांठते. यापुढे धारवाडची पूर्व सरहद्द व बल्लारीचें वायव्य टोंक हीं जेथे भिडतात, तेथे ही पूर्व सीमा संपते, आणि दक्षिण सीमेला सुरवात होते. ही दक्षिण सीमा वांकणें घेत घेत, कारवारच्या उत्तरभागाचा बराचसा चाट घेऊन पश्चिमसमुद्राच्या किनाऱ्यावर गोमांतकाच्या दक्षिणेस येते. पश्चिम सीमा गोव्यापासून सरळ किनाऱ्यानें उत्तरेस दमणला भिडते. या चतुःसीमेंतील सर्व प्रदेशांत मराठीभाषा वहिवाटत आहे, परंतु तेवढ्यावरून या सर्व प्रदेशास मराठीचें जन्मस्थान म्हणजे 'महाराष्ट्र' म्हणतां येईल असें वाटत नाही.

---

१ डॉ. ग्रीयर्सन् यांच्या मतें खानदेशी भाषा अन्तर्रचनेंत गुजरातीसारखी आहे व तिचें मूळ शौरसेनी प्राकृतांत आहे, म्हणून खानदेशाचा समावेश मराठी प्रांतांत करूं नये. Linguistic survey of India, Vol. VII, p. 1. पण रा. ब. वैद्य यांस हें मत ग्राह्य आहे, असें वाटत नाही. ( निबंध आणि भाषणें पृष्ठ १३ )

३. प्रसिद्ध व्याकरणकार पाणिनि इ. स. पूर्व सातव्या[१] शतकाच्यामागे केव्हातरी होऊन गेला, हें बहुमान्य आहे. पाणिनीच्या अष्टाध्यायींत विंध्याच्या दक्षिणेकडील आर्यदेशांचा किंवा भाषांचा मुळीच उल्लेख नाही. परंतु यावरून फार तर इतकेंच अनुमान काढतां येईल की, पाणिनीच्या वेळीं शिष्ट आर्यभाषेवर व्याकरणदृष्ट्या ज्यांच्या आर्यभाषाभेदांचा परिणाम होऊं शकता, अशा महत्त्वाच्या व विस्तृत आर्यवसाहती दक्षिणेस झाल्या नव्हत्या. परंतु पाणिनीच्या पूर्वी बरींच वर्षें आर्यांचा दक्षिणेंत घुसून रहिवास करण्याचा प्रयत्न चालू होता, यांत शंका नाही. रामायण, महाभारत व कित्येक पुराणें, हीं इ. स. पूर्व चवथ्या[२] शतकांत जवळ जवळ हल्लींच्या स्वरुपांतच सर्वमान्य होतीं, पण त्यांच्या पुरातन मूळसंहिता[३] व्यासांनी ब्राह्मणोपनिषत्कालांत तयार केल्या होत्या, असें आता सिद्ध झालें आहे. ब्राह्मणोपनिषत्काल इ. पूर्वी १८०० ते ८०० पर्यंत मानण्यांत येतो; म्हणजे पुराणेतिहासांच्या पुरातन संहितांचा काळ पाणिनीपूर्वी जातो. या काळांत झालेल्या ऱ्याच ऐतिहासिक व्यक्तींना जरी पुढे कालांतराने देवतास्वरूप येऊन पुराणांत अनेक अलौकिक, अद्भुत, असंभाव्य, व असंबद्ध गोष्टींची अपरंपार भर पडली तरी कित्येक गोष्टी या मूळच्या पुराणेतिहास वाङ्मय आराखड्याला इतक्या अवश्य आहेत की, त्या मूळ पुराणसंहिताकाळातीलच गणणें प्राप्त आहे. दाशरथी रामापूर्वीच परशुरामाने क्षात्रांचा अनेक वेळां समाचार घेऊन, आर्यावर्ताचें राज्य ब्राह्मणाच्या हवालीं केलें, व तो स्वतः दक्षिणेस येऊन पूर्व घाटांत महेन्द्राचलावर आश्रम बांधून राहिला होता. त्यानेच कोंकणांत आर्यवसाहती करून तेथे आर्यसंस्कृतीचें बीजारोपण केलें. रामापूर्वी अनेक वर्षें होऊन गेलेल्या नलराजाची राणी दमयन्ती, व रामाचा आजा अज याची राणी इन्दुमती, या वैदर्भी ( म्हणजे वऱ्हाडच्या ) राजकन्या होत्या. स्वतः रामचंद्र चतुर्दशवार्षिक वनवासाला निघाले, ते विंध्याटवी ओलांडून दण्डकारण्याच्या सीमेवरच अत्रिऋषींच्या आश्रमांत आले. नंतर अरण्यांतील पायवाटांची चौकशी करीत ते दण्डकाटवींतील शरभंगऋषींच्या तपोवनांत दाखल झाले. तेथून माग काढीत काढीत त्यांनी सुतीक्ष्णऋषींची रहाटी गाठली. त्यानंतर एकापासून दुसऱ्याची व दुसऱ्यापासून तिसऱ्याची माहिती मिळवीत मिळवीत, रामचंद्रांनी त्या महाकान्तारांत इतस्ततः पसरलेल्या लहान मोठ्या सर्व ऋषींचे आश्रम पाहिले व अखेर ते अगस्तिमुनींच्या आश्रमास पोंचले. यानंतर रामचंद्रांनी सीतालक्ष्मणांसह गोदातटीं रहिवास केला. यावरून हें स्पष्टच होतें की, रामकालीं दण्डका हें महाकान्तार होतें, त्यांत राक्षस, वानर, ऋक्ष, नाग वगैरे वनेचरांची वस्ति होती, व मधून मधून एकान्तप्रिय, तपोनिष्ठ, सद्धर्मरत, व शीलवन्त आर्य ऋषींच्या तुरळक रहाट्या होत्या. श्रीकृष्णाची पट्टमहिषी रुक्मिणी ही विदर्भराजकन्या होती. राजसूयज्ञा-पूर्वी धर्मराजाचा धाकटा भाऊ सहदेव हा दक्षिणदिशेला दिग्विजयाकरिता निघाला. त्याच्या स्वारीच्या वर्णनांत विदर्भ ( वऱ्हाड ), पांड्यदेश ( मदुरा ), किष्किंधा ( बल्लारी ), माहिष्मती ( म्हैसूर ), सुराष्ट्र ( सोरठ ), शूर्पारक ( सोपारें—उत्तर कोंकण ), कोलगिरी, केरल, बनवासी

१. Belvalkar's Systems of Sanskrit Grammer, pp. 13-18.
२. V. A. Smith's Early History of India, p. 23.
३. Muzumdar's Hindu History, pp. 23-25 and 271.

इत्यादि दक्षिणेकडील प्रांतांचा उल्लेख आहे. याचा निष्कर्ष इतकाच की, पाणिनीच्या काळापूर्वीच आर्यांचें दक्षिणेशीं दळणवळण होतें, आणि वऱ्हाड प्रांत त्यानी वसविला असून त्यावर एक भारदस्त क्षत्रिय घराणें अंमल चालवीत होतें. कोंकणपट्टीमध्येहि आर्यांची वसति नांदत होती. परंतु पूर्वेकडील विदर्भदेश, दक्षिणेकडील द्रविडांचीं राज्यें, पश्चिमेकडील दर्याकिनारींची कोंकणपट्टी, व उत्तरेकडील विंध्याचलाची रांग या चतुःसीमांनी आखलेल्या मध्यवर्ती विशाल टापूमध्ये महाकान्तार होतें. महाराष्ट्र हें नांवहि कोठे आढळत नाही, पण या महाकान्तारांत आर्य ऋषींचे तुरळक आश्रम व तपोवनाभोग होते. हे आर्यऋषींनी वसविलेले लहान लहान टापू अद्याप वसाहती किंवा राष्ट्रें ( Colonies ) या प्रौढ नांवाला पात्र झाले नव्हते व त्यांच्या भाषेचा आर्यावर्तांतील शिष्ट भाषांवर पाणिनीच्या काळीं म्हणण्यासारखा परिणाम झाला नसल्यामुळे, त्यांचा उल्लेख पाणिनीच्या व्याकरणांत[१] नसणें अगदी सरळच आहे.

४ पाणिनी इ. पूर्व सातव्या शतकाच्या पूर्वी होऊन गेला, हें वर नमूद केलेंच आहे. इ. पूर्व सहाव्या शतकापासून तों इ. स. चवथ्या शतकापर्यंतच्या काळास 'पौराणिक युग' म्हणतां येईल. या कालांत पुराण वाङ्मयाला अपूर्व रंग चढला व त्याचा विलक्षण विस्तार व फैलाव झाला. शाक्यमुनि गौतमबुद्धाचा अवतार इ. पूर्व सहाव्या शतकांत झाला. तरी पण जशा या कालापूर्वीच अनेक शतकापासून पुराणेतिहासाच्या मूळ संहिता रचण्यांत येऊन पुराणिकांचा व ऐतिहासिकांचा संप्रदाय अस्तित्वांत आला होता, तसाच परिव्राजकांचाहि पंथ उत्पन्न झाला होता. पाणिनीपूर्वी होऊन गेलेल्या निरुक्तकार यास्काचार्यांनी ऐतिहासिकांचा तसाच परिव्राजकांचाहि उल्लेख केलेला आहे. गौतमबुद्धापूर्वी अनेक बुद्ध होऊन गेले होते. प्रत्यक्ष[२] गौतमबुद्धाच्या वेळींहि त्याचा मेव्हणा देवदत्त याने पूर्वींच्या बुद्धांच्या परंपरेस धरून स्वतंत्र मठस्थापना केली होती व या गौतमबुद्धाच्या व देवदत्ताच्या[३] संप्रदायांत विळ्याभोंपळ्या एवढे सख्य होतें. असो, गौतमबुद्धाची चळवळ बऱ्याच मोठ्या प्रमाणावर होती. त्याने आपल्या पंथाचा उपदेश सामान्य जनांस त्यांच्याच भाषेंत केला व वैदिक धर्माविरुद्ध व वर्णाश्रमसंस्थेस विनाशक असें बंड पुकारलें. या चळवळीला जोड म्हणून पौराणिक वाङ्मय या कालांत अवाढव्य प्रमाणावर तयार होऊं लागलें. पौराणिक वाङ्मयाच्या विस्ताराचें धोरण असें आहे की, वेदासंबंधीं आदर व प्रामाण्यबुद्धि कायम राखून, द्वैत न अद्वैत यांचें कसेंबसें भिर्डे बसवून, आणि पौराणिक व ऐतिहासिक विभूतींना अद्भुताच्या साहाय्याने देवतास्थानापन्न करून, कर्मसंगी, भावार्थी, व विभूतिपूजालोलुप, अशा सामान्य जनांचीं अन्तःकरणें कबजांत आणावयाचीं. या हेतूने श्रौतस्मार्तपुराणोक्त धर्माची खिचडी श्रद्धाप्रवण जनतेस भरविण्यांत आली व ती तिला रुचून व पचून अंगींहि लागली. बुद्धपंथाची[४] डाळ दक्षिण हिंदुस्थानांत कधीच

१ अष्टाध्यायींत दक्षिणेकडील आर्यराष्ट्रांचा व त्यांच्या भाषांचा उल्लेख नाही, तरी चवथ्या अध्यायांत 'अश्मक' व 'कलिंग' या दोन दक्षिणेकडील देशांचीं नांवें आढळतात. अर्थात् 'पाणिनीच्या वेळीं दक्षिण प्रदेश आर्यांना अगदीं अज्ञात होता,' हा पक्ष लंगडा पडतो.

२ ग्रंथमाला-ऐतिहासिक विविध विषय; भाग पहिला, पृ. ३२१-२४

३. Smith's Early History of India, p. 32 and foot-note.

४. Muzumdar's Hindu History, pp. 702-3.

चांगलीशी शिजली नाही. राजाश्रयाच्या ऐन उकळींतहि ती अर्धकच्चीच राहिली, व त्या उकळीचा कढ उतास गेल्यावर, ती हिंदुधर्मांच्या विरणांत कोठच्या कोठेच पार जिरून[1] गेली. वास्तविक स्थिति अशी आहे की, हिंदुस्थानांत बौद्धधर्माला स्वतंत्र धर्मपंथ म्हणून गणतांच येत नाही. हिंदुधर्मात जशीं अनेक दर्शनें, पंथ, संप्रदाय, मार्ग, इत्यादि आहेत, तसाच हा एक होता, आणि यास विपुल राजाश्रय मिळाला नसता, तर या पंथाचा इतका गलबला व बोलबालाहि ऐकण्यांत आला नसता. तेव्हा पाणिनी नंतरच्या म्हणजे इ० पू. ६०० ते इ० स० ४०० पर्यंतच्या काळाला 'बुद्धयुग' न म्हणतां, 'पौराणिक युग' म्हणणें बरेंच सयुक्तिक आहे. या काळांत पुराणेतिहासांच्या मूळसंहितांचे प्रचंड विस्तार झाले, आणि हे विस्तार करणारांनी आपापल्या वेळच्या गोष्टी त्यांत घुसडून दिल्या. रामायण, महाभारत व वायुमत्स्यादि पुराणें हीं हल्ली ज्या स्वरुपांत आढळतात, तें स्वरूप त्यांना उपरिनिर्दिष्ट हजार वर्षांच्या कालमर्यादेंत मिळालें, असा संशोधकांनी सिद्धान्त बांधलेला आहे. महाभारताचें अंतिम संस्करण इ० पू. चवथ्या शतकांत झालें असावें, असें रा. ब. वैद्य यांनी सिद्ध केलें आहे. महाभारताच्या भीष्मपर्वांतील (अ. ९) दक्षिण हिंदुस्थानांतील लोकांच्या उत्तरेकडील यादींत विदर्भ, रूपवाहिक, अश्मक, पांडुराष्ट्र, गोपराष्ट्र व महाराष्ट्र, यांचा उल्लेख आहे. शिवाय[2] कित्येक शिलालेखांतहि दक्षिणपथांतील देवराष्ट्र, कर्मराष्ट्र, पूर्वराष्ट्र व गोपराष्ट्र, यांचा निर्देश आढळतो. यावरून असें फलित होतें की, पाणिनिपूर्वकालीं म्हणजे पुराणाच्या मूळसंहितांच्या काळांत ज्या महाकान्तारांत आर्यऋषींचे लहान लहान फुटकळ आश्रमप्रदेश होते, त्याच कान्तारांत आता त्या लहान राहाट्या वाढून, 'राष्ट्र' या पोक्त व प्रौढ नावास चढत होत्या. या वसाहती अगर राष्ट्रें महाकान्तारांतीलच असलीं पाहिजेत, कारण या नवीन प्रांतांच्या बरोबरच महाकान्ताराभोंवतालच्या प्राचीन शूर्पारक, कोंकण, वैदर्भ इत्यादि देशांचीं नांवें आहेतच व त्यांच्या मर्यादाहि बऱ्याच स्पष्टपणें ठरवितां येतात. अर्थात्, वर उल्लेखलेलीं नवीं 'राष्ट्रें' या पूर्व-कालीन प्रान्तांच्या मध्यंतरीं असलेल्या दण्डकाटवींतच कोठे तरी उदयास आलीं असलीं पाहिजेत, हें उघड आहे. या राष्ट्रांत आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष चांगला होऊन त्यांच्यांत आर्यभाषेचें वाङ्मयहि तयार होऊं लागलें होतें. कारण, जरी पाणिनि त्यांचा व त्यांच्या भाषेचा उल्लेख करीत नाही, तरी पाणिनीनंतर सुमारें ४०० वर्षांनी झालेल्या वार्तिककार कात्यायनाने दक्षिणेकडील आर्यांचा निर्देश केला आहे. कात्यायनामागून सुमारें अडीचशें वर्षांनी झालेला पतंजली[3] आपल्या पाणिनीवरील महाभाष्यांत दक्षिणेकडील आर्यांचा स्पष्ट निर्देश करून, त्यांच्या भाषेसंबंधीं कांही विशेष त्याने नमूद केले आहेत. उदा०—'दक्षिणपथेहि महन्ति सरांसि सरस्य इति उच्यन्ते।' यावरून असें सरळ अनुमान निघतें की, इ. पू. १५० च्या सुमारास दक्षिणेकडील आर्यांच्या भाषाविशेषांचा प्रवेश विंध्यगिरीच्या पार आर्यावर्तांत होऊन त्यांस शिष्टभाषेंत समाविष्ट करणें जरूर झालें होतें. याच काळच्या सुमारास म्हणजे इ. पू. तिसऱ्या शतकांत अशोक[4] चक्रवर्ती

१. Smith's Early History of India, pp. 301-2.

२. Ancient Geography and Civilization by P. V. Kane, pp. 15-16,

३ 'काञ्चीपुर,' केरल,' 'माहिष्मती,' नासिक्य,' व 'वैदर्भ,' यांचा पातंजल भाष्यांत उल्लेख आहे.

४ इ. पू. २७३–२३२.

# और्ध्वदेहिक



( लेखकः— ना. गो. चापेकर )

प्रेत पुरण्याची चाल ही प्रेत दहन करण्याच्या चालीच्या अगोदरची असली पाहिजे. त्याच्याहि आधीची चाल पशुपक्ष्यांकडून तें खावविण्याची असावी. ह्या चालीना धार्मिक स्वरूप आल्यामुळे अत्यंत सुधारलेल्या लोकांतहि असंस्कृत स्थितींतील प्राथमिक समाजाची प्रेताची निरवानिरव करण्याची पद्धति अद्यापि रूढ असल्याचा विलक्षण देखावा दृष्टीस पडतो. अनार्य अशा शूद्रांना चातुर्वर्ण्यांत घेऊन वैदिक आर्यांनी त्यांना सुधारणेच्या मार्गाला कसें लावलें ह्याचें प्रत्यंतर प्रेतदहनकर्मांत आढळतें. प्रेताला अग्निसंस्कार देऊन तें दग्ध करणें ही वैदिक आर्यांची रीत. तीच त्यांनी शूद्रांना ग्रहण करण्यास लाविली. महार, चांभार, ठाकूर, हपसाणी-बुरूड व गुरव एवढ्या जाती खेरीज करून सर्व हिंदु जातींत प्रेत दहन करण्याची चाल दृष्टो-त्पत्तीस येते. पैकी हपसाणी, गुरव व बुरूड ह्यांच्यांत लिंगायती धर्माचा अवशेष असल्या-कारणाने पुरण्याची चाल आहे ती योग्यच आहे. पुरण्यांत पुनः आडवा पुरणें व बसलेला पुरणें असे दोन प्रकार आहेत. बसलेल्या स्थितींत पुरण्याच्या क्रियेला बसती क्रिया म्हणतात. वरील तीनहि जातींत हीच क्रिया आहे. संन्यासी मेला असतां हीच क्रिया करावी लागते. संन्याशाने अंथरुणावर पडून मरूं नये; त्याचें प्राणोत्क्रमण समाधिस्थितींत झालें पाहिजे; ह्या कल्पनेला अनुसरून संन्याशाला बसलेल्या अवस्थेंत पुरीत असले पाहिजेत. संन्याशाला जलांत सोडावें अगर पुरावें असा विधि सांगितला आहे. संन्याशाला अग्नि नसतो, त्यामुळे दहनाचा विधि सांगितला नसेल. ब्रह्मचाऱ्याचें प्रेत कपालनामक अग्नीने, शूद्राचें प्रेत क्रव्याद नामक अग्नीने व गृहस्थाचें प्रेत औपासनाग्नीने दहन करावयाचें असतें. ह्या औपासनाग्नीला क्रव्याद हीच संज्ञा आहे. किंवा दहनाला पैसा लागतो ती अडचण यतीच्या कामीं नडूं नये म्हणून तर हा पुरण्याचा आचार पडला नसेल ना? शूद्रांत गरिबीमुळे प्रेतदहनाचा खर्च ज्यांना करवत नाही ते प्रेतें पुरतात. ही चाल ह्या गांवांत आगरी, शिंदे, कुंभार, तिलोरी, न्हावी, परीट, भोई, कोळी इत्यादि शूद्र जातींत दिसून येते. 'कुटीचकातिरेकेण न दहेद्यतिनं क्वचित्' अशा विधीचें प्रयोजन समजत नाही. अज्ञानाने सवलतीचें रूपांतर विधींत होण्याचाहि संभव आहे. ब्रह्मचारी, वानप्रस्थ व संन्यासी ह्यांचे प्रेतसंस्कार कसे करावेत ह्याबद्दल स्मृतिकारांची मुग्धता बुचकळ्यांत पाडणारी आहे. सर्व स्मृति गृहस्थाश्रम्यांच्या धर्मांनीच भरल्या आहेत.

हिंदूंव्यतिरिक्त सर्व जग प्रेतें पुरणारें आहे. दहनक्रियेची उत्कृष्ट चाल फक्त हिंदूंचीच असून ती आजकालचीहि नाही. बौद्ध व लिंगायत हेहि ह्या देशांत प्रेतें पुरणारेच आहेत. बौद्धांनंतर संन्यासाश्रमाचा प्रचार जारीने सुरू झाला तेव्हा कदाचित् बौद्धांचेंच अनुकरण संन्यासी करूं लागले असावे. ब्राह्मणग्रंथांत संन्यासी ऋषींचें उदाहरण क्वचितच आढळेल.

रामायणातहि नाहीच. महाभारतात सन्यासाश्रमाचा उल्लेख आहे. संन्याश्याला त्या वेळीं भिक्षु म्हणत व संन्यासाला भैक्ष्यचर्य म्हणत. ह्यावरून चतुर्थाश्रमांतील भिक्षेलाच महत्त्व दिलें गेलें असें दिसतें. भारतांतहि कोणत्याहि मोठ्या माणसानें संन्यास घेतल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाही. भीष्म किती महिने तरी मृत्यूची वाट पहात स्वस्थ पडला होता. तथापि संन्यास घेण्याचा विचारहि त्याच्या मनात आला नाही. युधिष्ठिरासारखा धर्ममूर्ति पण तिने भगवीं वस्त्रे धारण केलीं नाहीत. क्षत्रिय संन्यासाश्रमाचे अधिकारी नव्हते ह्यास आणखी पुरावा कोणता पाहिजे ? पुराणानी तर कलियुगांत संन्यासाश्रम वर्ज्यच ठरविला. तात्पर्य, शंकराचार्यांच्या पूर्वी चतुर्थाश्रमाचा प्रसार म्हणण्यासारखा नव्हता. औपनिषद ऋषि स्मृत्युक्त संन्यासी होते असें म्हणतां येणार नाही. कोणताहि मोठा माणूस सन्यासी असल्याचे वर्णन नाही. वानप्रस्थ आढळतात पण संन्यासी आढळत नाहीत. आज उलट प्रकार दिसून येतो. वानप्रस्थाश्रमाला काट मिळून सन्यासाश्रम पुढे सरकला. ‘ आश्रमादाश्रमं गत्वा ’ ह्या वाक्याला हरताळ फासला गेला आणि गृहस्थाश्रमांतून एकदम सन्यासाश्रमांत घुसण्याचा पायंडा पडला. असो. वैदिक आर्यांत पुरण्याची अवैदिक वहिवाट कशी पडली हें समजून घेण्याकरता एवढा ऊहापोह करावा लागला.

गुरव, बुरूड व हपसाणी ह्यांच्यांत उत्तरकार्य जंगम करतो म्हणून हे लोक प्रेतें पुरतात हें स्वाभाविक आहे. ह्या तीनहि जाती मिश्रधर्मी आहेत, म्हणजे ह्याच्यात हिंदूंचे व लिंगायतांचे आचार रूढ आहेत. गुरव हे तर लिंग धारण करतात व त्याच्या लग्नालाहि जंगम लागतो. ते खरेखुरे लिंगायत आहेत असें म्हणावयास हरकत नाही. बुरूड पूर्वी लिंग धारण करीत असत; आता त्यानी तें सोडलें आहे. ह्याच्यात जंगमाच्या ऐवजी ब्राह्मण लग्न लावतो. हे मूळचे लिंगायत असावे. इकडे आल्यावर जंगम मिळण्याच्या अडचणीमुळे त्यानी ‘ ब्राह्मणी ’ धर्माचा अंगीकार केला असावा. हपसाण्यांपैकी कांही कुटुंबात उत्तरक्रियेला जंगम लागतो. एवढ्यापुरतेच ते लिंगायत होत. बुरूड लिंगायताचे स्मार्त बनले तर हपसाणी मराठे स्मार्तांचे मरणोत्तर कर्मापुरते लिंगायत बनले. एकंदरींत गुरव, बुरूड व हपसाण्यांपैकी कांही कुटुंबें लिंगायती धर्माखाली सर्वस्वी अगर अंशतः असल्यामुळे त्यांच्यांत पुरण्याची चाल घुसली. पण महार, चांभार आणि ठाकूर ह्या जाती लिंगायती धर्माखाली गेलेल्या नाहीत असें असून त्याच्यांतून पुरण्याच्या चालीचा अद्यापि नायनाट झालेला नाही. महारांत ‘ ब्राह्मण ’ धर्माचें वर्चस्व नाही. ती अगदी स्वतंत्र जात आहे. त्या जातींत ब्राह्मणाचा शिरकाव नाही. म्हणून पुरण्याची चाल त्यानी सोडली नसावी. महारांत फक्त ‘माळ जाधवा’कडे दहनाची क्रिया असते. चांभारांत ब्राह्मणाचा प्रवेश झाला आहे. तथापि उत्तरक्रियेला ब्राह्मण न जातां कुंभार जातो. ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही की, ब्राह्मण व पांचाल ह्यांच्या व्यतिरिक्त कोणत्याहि शूद्र जातींत और्ध्वदेहिकाला ब्राह्मण बोलावण्याची चाल नाही. कोकणी मराठ्यांत दहनाला ब्राह्मण लागतो हें खरें; पण कोकणी मराठे हे रत्नागिरीकडील. रत्नागिरी जिल्ह्यांतले मराठे ह्यांच्यावर वैदिक धर्माची छाप चांगलीच बसली आहे. ब्राह्मणपांचालेतर जातींत एक विवाहसंस्कार काय तो ब्राह्मणाकडून होतो. ह्या कारणाने अवैदिक चाली ह्या जातींत अद्यापि पूर्ववत् राहिल्या आहेत. कातकरी व ठाकूर ह्या दोनहि वन्य जाती असून कातकऱ्यात दहनाची चाल आहे पण ठाकरांत नाही. इतर बाबतींत ठाकूर हे

वैदिक धर्माच्या कक्षेत आले आहेत. कातकरी मात्र मुळीच आले नाहीत. ह्यावरून सर्व अनार्यांत दहनाची चाल नव्हती हें म्हणणें धाडसाचें होईल.

सर्व हिंदूंत सामान्यतः प्रेतदहनाची चाल असली तरी शिंपी, वाणी आणि सर्व कुणबी ह्यांच्यांत देवींनी मनुष्य मेलें असता त्यास पुरण्याचीच वहिवाट आहे. ह्याला शास्त्रांत कांही आधार दिसत नाही. ब्राह्मणांतहि ही चाल आहे. ह्यावरून लोक स्वतः शास्त्र कसें बनवतात तें पाहण्यासारखें आहे. देवींनी मेलेला मनुष्य जाळला असतां देवी चेतावते व सांथ अधिकच फैलावते असा समज आहे. प्रेतात देवीचें अस्तित्व असते अशा समजुतीने प्रेत दग्ध करण्यास लोक कचरतात असें वाटतें. गुजराथेंतसुद्धा देवींनें मेलेल्या माणसाला पुरण्याचाच संप्रदाय सर्व जातींत आहे. ह्यावरून विचारैक्य कसें असतें तें समजेल. देवीना आयाच म्हणतात. देवी हा रोग नसून देवता अंगात येते अशी समजूत आहे. देवीचे फोड अंगावर स्पष्ट दिसू लागले म्हणजे देवींचाच ताप आहे अशी खात्री होते. खातरी होऊन ती गोष्ट कबूल करणें ह्यास नांव ठेवणें म्हणतात. नांव ठेवल्यावर सकाळ संध्याकाळ दररोज धूपदीप दाखवतात. देवींचें नांव ठेवल्यापासून नवव्या दिवशी देवींना पाणी घालतात. हें स्नानाचें पडलेलें पाणी देवींचें तीर्थ समजत असल्यामुळे तें सर्व संभाळून तुळशीला घालतात; भलत्याच ठिकाणीं टाकीत नाहीत. एवढ्याकरता देवीच्या मुलाला परातींत स्नान घालतात; त्यामुळे स्नानाचें पाणी परातींत पडतें, पायांखालीं तुडवलें जात नाही. नांव ठेवणें तें बहुधा तिसऱ्या प्रहरानंतर उतरती वेळ झाली म्हणजे ठेवतात. हळदीकुंकवाच्या सवाष्णी सात असतात; पण त्यांत बाहेरच्या पांच, देवी आलेला मुलगा किंवा मुलगी सहावी आणि सातवी सवाशीण म्हणजे मुंज न झालेला एक मुलगा असतो. ह्यास गवळा म्हणतात. त्याला मुलीप्रमाणेच हळदकुंकू लावतात. पहिल्या दिवशीं सुकें कुंकू लावतात. न्हाणानंतर ओलें कुंकू देतात. दुसऱ्या खेपेला पांच, सात अशा विषम खिरापती असतात. देवी चांगल्या उठूं लागल्या म्हणजे दररोज सात सात असे तीन दिवस हरभरे भिजत घालतात. हे हरभरे पुढे सवाष्णींना वाटतात; हरभरे फुगले म्हणजे देवी फुगतात व बऱ्या होतात असें म्हणतात. एक दिवस सवाशणीस जेवूं घालतात, सर्व सोवळ्याने जेवतात, जेवावयाच्या पाटावरच त्यांच्या ओट्या भरतात. हळदीकुंकू देण्याचा व ओट्या भरण्याचा क्रम असा. प्रथम देवी आलेले माणूस, नंतर गवळा आणि मग दुसऱ्या सवाशणी. प्रथम ज्या सवाशणी बोलावल्या असतील त्यांनाच पुढे प्रत्येक खेपेला बोलवाव्या लागतात. सवाशणी जेवल्यानंतर पुढच्या दाराने जातात. मागून त्यांच्या मार्गावर दूधतूप टाकीत आई किंवा दुसरें कोणीतरी जाते. सवाशणींचा जाण्याचा क्रमहि वर सांगितल्याप्रमाणेच असतो. म्हणजे पुढे देवी आलेलें माणूस, पाठीमागून गवळा आणि त्याच्या मागून बाकीच्या सवाशणी. देवीचें मूल नंतर पाठी मागल्या दाराने परत घरांत येतें. जेवण्याच्या पूर्वी सवाशणींची आरती करतात. घरांत दुसरें मूल देवी येण्यासारखें असल्यास त्याला देवी येईपर्यंत सवाशणींना भोजनाला बोलावीत नाहीत. २१ दिवसांची मर्यादा आहे; म्हणजे २१ दिवस वाट बघतात. ह्या काळांत दुसऱ्या कोणास देवी न आल्यास सवाशणींची जेवणावळ घालतात. ह्या सवाशणी शक्य तों आपल्या जातीच्याच सांगतात. म्हणजे कोकणस्थांना कोकणस्थ, देशस्थांना देशस्थ व कऱ्हाड्यांना कऱ्हाड्या सवाशणी.

कांही निमित्ताने सवाशणी सांगावयाच्या राहिल्यास त्या नदी येण्याच्या पूर्वी सांगाव्या असा निर्बंध आहे. पावसाळ्यांत नदीला पूर आला तर 'बायाना' नदीपलीकडे जातां येणार नाही अशी भीति वाटत असावी. ह्यावरून सवाशणींना जेवू घालणें म्हणजे त्यांची पाठवणूक करणें होय. सात, नऊ ह्या विषम दिवशीं देवींचें कृत्य करतात. विषम दिवस हा बायकांचा व सम दिवस पुरुषाचा असा समज असावा. स्त्री ऋतुस्नात झाल्यावर सम दिवशी स्त्रीसमागम केल्यास पुत्र होतो व विषम दिवशीं केल्यास कन्या होते असा लोकविश्वास आहेच. ब्राह्मणेतरांत देवींची पाठवणूक नदीपर्यंत जाऊन करतात; म्हणजे घटासकट सर्व सवाशणी नदीवर जाऊन नदींत घटाचें विसर्जन करतात. पुढे दिलेल्या गाण्यावरून वर उल्लेखलेला गवळा हा कान्हा ऊर्फ कृष्ण होय. ह्या गाण्यांतील कृष्ण, मथुरा, नदी, सरोवर, यमुना, गाई, दूध, दहीं इत्यादि शब्दांवरून 'बाया' म्हणजे कृष्णाच्या गोपी तर नसतीलना असा संशय येतो. गोस्तन देवींची कल्पना तर ह्या संप्रदायाच्या मुळाशीं नसेलना ? कोणी सांगावें ? मात्र एवढें खरें की, देवींचा हा संप्रदाय उत्तर हिंदुस्थानातील आहे. गुजराथी व रजपूत जातींतहि देवींचें पूजन आहे. ९ व्या दिवशी ते लोक भिंतीवर शेणाचीं ९ चित्रें काढतात; त्यांत ८ बायकांचीं व १ मुलाचें असतें. ह्या जातींत ८ वे दिवशीं रानातून वाळलेली शेणाची गोवरी आणतात. ही कोणाला दिसणार नाही अशा रीतीने आणावयाची असते. ही गोवरी जाळून तिची राख देवींना ९ वे दिवशीं लावतात. आमच्याइकडेहि रानशेणीची राख अगर भस्म लावण्याची वहिवाट आहेच मात्र ह्या रजपूत जातींत बायांना सय्यड देव, बळोपा किंवा बापजी ह्या नावाने संबोधितात.

शीतला देवीला जाऊन तिचें दर्शन घेण्याचा प्रघात आहे. येथेच केले असतील ते नवस फेडतात. बदलापुरांत डोक्यावर वहाण ठेवून घरोघर जोगवा अथवा भिक्षा मागतांना स्त्रियांना मी पाहिलें आहे. असाच त्यांनी नवस केला होता. कोणी लोटांगण घालीत भिक्षा मागतात. असे नानाप्रकारचे नवस देवींनिमित्त लोक करीत असतात. मोठ्या देवी आल्या म्हणजे खेळे नाचविण्याचा नवस काही गुजराथी जातींत करण्याचा रिवाज आहे. हा नाच देवींच्यापुढे करतात व देवी शंकराच्या देवळांत असतात. देवींचे मुखवटे दगडाचे असतात. शंकराचे गुरव—ज्यांना तिकडे तपोधन म्हणतात—त्यांच्यापैकी एक कृष्ण होतो व दुसरा गोपी होतो. अशा रीतीने गोपी कृष्णांचा नाच देवीपुढे होतो. ह्यावरूनहि देवींचा संबंध गोपी-कृष्णाशीं आहे हें स्पष्ट दिसतें. गुजराथी ब्राह्मणांत देवी आल्या म्हणजे बभ्रुवाहनाचें आख्यान म्हणण्याची व ऐकण्याची चाल आहे.

ह्या देवी आणि पटकीची देवता जी महामारी ह्या अगदी निराळ्या जातीच्या देवी आहेत. महामारीच्या देवीची शांत सांगितली आहे तशी अंगच्या देवींची नाही. ह्या देवींचा सन्मान करण्यांत येतो, महामारीचा तिटकारा करतात. अंगच्या देवी आल्या असतां घरांत कलह होऊं नये व आनंद असावा ह्याविषयी दक्षता बाळगतात. अमंगलाचा स्पर्श होऊं देत नाहीत. घरांतील स्त्री अस्पृश्य झाली असतां तिला घराबाहेर रहावें लागतें. नांव ठेवल्यापासून घरांत तळण बंद ठेवतात. फोडणीहि पदार्थाला देत नाहीत. चुलीवर तवा ठेवीत नाहीत

त्यामुळे भाकरी, पोळी घरांत होत नाही. कांही ठिकाणीं तर वाटीतसुद्धा नाहीत. देवी आले-ल्याची आई वेणीफणी करीत नाही; काळें लुगडें नेसत नाही; पारोश्याने देवीच्या मुलाला शिवत नाही. स्वतः विषयसेवन करीत नाहीच पण शिवाय विषयसेवन करणाऱ्या दुसऱ्या मुलींनाहि त्या स्नान केल्याशिवाय शिवत नाही. तसेंच घराबाहेर पडत नाही. देवी आलेला माणूस जे कांही मागेल तें देवीने मागितलें असें समजून त्याची इच्छा तृप्त करण्याचा प्रयत्न घरांतील माणसें करतात. देवी आलेल्या माणसांत दैवी सामर्थ्य आलेलें असतें असें लोक म्हणतात आणि हें सिद्ध करण्याकरता अनेक उदाहरणें देतात. एका इसमाने आश्विन महिन्यांत आंबे मागितले. ते कोठे मिळतील म्हणून विचारतां दुसऱ्या गांवांतील इसमाचें त्याने नाव सांगितलें. त्याच्या घरीं आंब्याचें झाड आहे. त्यावर दोन आंबे आहेत ते आणा अशी देवीची आज्ञा झाल्यावर त्याप्रमाणे आंबे आणण्यास मंडळी गेली. खरोखरच त्या झाडावर दोन आंबे होते. ह्या झाडाला पूर्वी कधीहि आंबा आला नव्हता. अशा तऱ्हेच्या पुष्कळ गोष्टी येथे प्रचलित आहेत. देवींचें नांव ठेवल्यानंतर कितीहि लहान मूल असलें तरी त्याला अरे तुरे करीत नाहीत. अहो जाहो ह्या शब्दांनी संबोधितात. घरांत कोणालाहि देवी आल्या तर दरवाजांत गोमूत्राने भरलेलें मडकें व निंबाचा अथवा तो न मिळाल्यास वणईचा टहाळ ठेवतात. घरांत येणारा इसम अंगापायांवर गो त्र शिंपडून मग आंत पाऊल टाकतो. कुणबी लोकांत देवी आलेल्या माणसाच्या बिछान्यावर एक टोपलीचें शिंकें करून टांगून ठेवतात. ह्या टोपलींत गंध, फुलें व पाणी घातलेला तांब्या असतो. रात्रभर गाणीं म्हणून देवींना जागवतात. हें शिंकें घटादाखल असतें. घटस्थापना हें देवींचें अंगभूत कर्म आहे. देवी आलेल्या घरांत मांसाहार बंद असतो.

कुष्ट्याला पुरावें अगर जलसमाधि द्यावी असें शास्त्र आहे. परंतु हें सर्वत्र पाळलें जातें असें नाही.

देवी आल्या असतां गाणीं म्हणतात त्यांपैकी कांही येथे देतों.

## गाणें १

हातीं घेतल्या करंडाफणी । बाया गेल्या तुळशीवृंदावनीं । झणी घाला बायांची वेणी । शेवंती गुंफावी कानोकानीं । बायांहीं कशाचा छंद घेतला । बायांहीं शेवंतीचा छंद घेतला । बायांहीं कशाचा छंद घेतला । तोड्यांचा छंद घेतला । तोडे आणून देतें तुला । धंदा करूं दे मला । कापरानी तबक भरूं । छंदाला पुऱ्या पडूं ॥ १ ॥

## गाणें २

बाई जमनाबाई यमना उपवासी, तान्हुला बाळासाठी केली होती काशी, काशीचे लोक मोठे विश्वासी, पाणी तिथे मासे तळपती, गोकुळीच्या वाटे कान्हा कारे येरीस्याशीं, सोड माझा पदर जाऊं दे घराशीं, घरीं आहे माझा तान्हा बाळ उपवासी, पाजीन त्याला दूध मग येईन तुम्हापाशी, मग जाईन मथुरेशीं, मथुरेचें दही दूध बायांच्या चरणाशीं ॥

## गाणें ३

चंदा नवयली आली बायांच्या दारावरशीं, लेकराची गाई निजली जागी केली, बायांच्या अजंली उभी राहिली, बायांच्या नवमाना पावली, ताशाचे मेल आले, बायांना आहेर आले ॥

## गाणें ४

घेतल्या कुऱ्हाडी, घतल्या तामन्या, बाळ पर्वतीस नेला ॥ पार्वती रानाला चंदन तोडला ॥ पहिला घाव घातला, चंदन थरथरा कापला, दुसरा घाव घातला, चंदन डुलाया लागला, तिसरा घाव घातला, चंदन खदखदा हासला, चवथा घाव घातला, चंदन पानफुल धवधवला, पांचवा घाव घातला, चंदन धरणीं पडला, खालचा बुध खाली टाकिला, वरांचा शेंडा वर टाकिला, मधिलल्या वस्याचा पावा बनला तोही वडा नेला, सुताराच्या घरीं, सुतार मैतर बायाच्या सजनाबाई यांना पावा तासून द्यावा, तासून देईन बायांना, मजला काही द्याल, बारा वर्षे होतील, सुतारा सपनीं तुझ्या येऊ, सपनीं तुझ्या येऊ तुझ्या बाळाला शिका ( शिक्षा ? ) देऊ, तुझी बाळ उगवूनी घेऊ, पान फुलावली केरा गवरावरी.

## गाणें ५

उंबराच्या बुडाखाली राम कनियेला, टाकिला मोतियाचा झेला, मोती बाई पानी, वनीची वनमोरा पानी पियाला उतरली, पानी पिऊनी संतोष झाले, तेथून मोर कूरण केला, गेले नारीये बनाला, नारलीचे नारळ बन देवा, कशांनी केमिळी आम्हा घरा बाया, पाहुन्या त्याच्या सरवराला नेल्या.

## गाणें ६

जिधदानचे डोंगरीं कान्हा उडवे बावडी ग, बायांच आगणी दोरा फिरवे गगनीं ग, कमरे जडित करदोरा मुखांत रंगला विडा, पायीं रेशमाचा जोडा कपाळीं कस्तुरीचा टिळा, मुखांत रंगला विडा कानीं चौकडा ग, कान्हा तुझी गायरे वोढाळ हिंडते रानोमाळ, तिला शोधिता का धुंडिता झाली मध्यान्ह रात्र, पिवळा पितांबर दिसतो सांवळा कान्हा, चला जाऊंरे मथुरेला, गवळ्याच्या आळीला, दह्या दुधाच्या शोभाला, दही दुध घेऊ रे बा हातावरी, बाया घेऊं कडेवरी, बाया आमच्या रुखमीणी काय पद्मीणी गरिबाच्या केवारिणी.

## गाणें ७

कवलारी बाजार भरतो मथुरेचा, तेथे नादतो कृष्ण द्वारकेचा ॥ साडेतीनशे गवळणी कोण ग मुख्य राणी, चंद्रावळी बाळे, मुख्यावळी बाळे, देव कोठे गेले पाण्यावरी, पाण्याच्या पाणकरणी, आमच्या बायांच्या वंसा, वंसा घेऊनी काय बाळे, मागे बायाचा कान्हा गवळा ॥ जन्मावरी मागे पिंपळ उगवला, निर्मळ जागा त्याची साऊली आकाशीं पसरली ॥ त्याखालीं गोठविल्या राम गोविंदाच्या गायी, दूध काढितो बायाचा कान्हा ॥ कान्हाच्या खांद्यावरी दह्या दुधाच्या कावडी, बायाच्या हातावरी सोन्याचे गोळे ॥ बाया आमच्या चालती पायीं, पैंजण वाजती, पैंजण वाजती लंगर शोभती, लंगर शोभती जोडवी उपदेती ॥

## गाणें ८

अबा बाई लावणीचा ग लावणीचा, काय वर्णू मौजेचा ॥ कलम आणिलें बाई गोव्या-हूनी, लावलेंग माळीयानी ॥ बाग बाई बायाचा काय दादांचा, दरवाजा सोनीयाचा ॥ कुम घातलें हीऱ्याचें, आत मांडव मोत्याचे ॥ पाळणे लावले त्या मांडवाला, बाया बसल्या खेळाला ॥ खेळ मांडला सोकट्यांचा, पण आहे घाकटाचा ॥ आज बाई हरवीन ग हरवीन, कांकण जिंकीन ॥ हिरे जोडले त्या काकणाला, पाच जोडले हाराला ॥ हार बाई काचूचा, काय नीचूचा निळा घोडा दादाचा ॥ दादा निघाले बाई स्वारीला, कोंकणांत जायाला ॥ तिथे एक नायकीण काय पद्मीण, अगाध तीचे लेणं ॥ लेणं दिलंसे बायांही, वनवास दूर केला ॥

## गाणें ९

प्रथम नमिल्या आया माऊल्या देवी हो ॥ आयाचा देवींचा करंडा हा कोणीं घडविला हो ॥ त्याही करंड्यात माझ्या देवींचा लेना हो ॥ बायांचा लेना फूल मोगऱ्या तोगळ बाळ्या हो ॥ माथ्याला कल्ल्या वेणीला चोंरी गोंडे हो ॥ कानी काय बुगड्या देतीत झोक हो ॥ नाकीं नथ वर हिऱ्याची टीक हो ॥ गळ्या गाठीं पाचूनी हार कंठीं हो ॥ दंडी वेळा वळावर तोळबंधा हो ॥ हाती पाटल्या पुढे नागमोडी बांगड्या हो ॥ नेसल्या साड्या वर कंबरपट्टा शोभे हो ॥ पायीं तोडे तोडयावर घुगूरवाळे हो ॥ बोटीं मासोळ्या अंगठ्या फेर जाडवी हो ॥ शितळा देवी आई नवस केला तुजला हो ॥ सवा शेराचा नेवद वाहीन तुजला हो ॥ कृष्णासारखा बाळ उतरुन द्यावा मजला हो ॥

## गाणें १०

घाटावर पिकले राळू कोंकणीं पिकला सोना काय हो ॥ कोंकणीं पिकला सोना बायाच्या कोंकणी पिकला सोना हो ॥ वेणीला चवरी गोंडे बायाच्या वेणीला चवरे काय हो ॥ अशा गळ्यात मोहनमाळा काय हो ॥ गळ्यात मोहन बायांच्या माळा हो ॥ कानात कापसा खळ्या हो ॥ नाकाला नथ सर्जाची हो ॥ अशा दंडीका बाजीबंदी वेळा बायांच्या अशा दंडीका बाजीबंद वेळा हो ॥ अशा हातीका गोठ पाटल्या काय हो ॥ अशा बोटिंका हस अगळा हो ॥ अशा कंबरेला कंबरपट्टा हो ॥ असे पायींका वाळे तोडे हो ॥ अशा पायांत रेसमी जोडा बायांच्या पायांत रेसमी जोडा हो ॥ असा मुखांत रंगला विडा काय हो ॥ असा बसाया धवला घोडा काय हो ॥ अशी अगावर हिरवी शाल हो ॥

## गाणें ११

सकाळच्या पारी सूर्यदेव उगवनी उगवला हो ॥ सूर्य उगवला मावळला गेला सूर्यदेव कंबलाच्या देटी हो ॥ कंबळाच्या फुलाच्या वाचा फुटली हो ॥ एवढ्या रात्रीच्या बांधवा कुठ जातो पावणाहो ॥ मी तरी जातों मी तरी जातों गिरजा बहिणीला मूळ हो ॥ ऊन पडल्या साद बंधवा बहिणी कोमेजल्या जाई हो ॥ बहिणी कोमेजल्या जाई बायाच्या अंगीं खडूच्या चोळ्या हो ॥ अंगीं खडूच्या चोळ्या बायांच्या गळीं फुलाच्या माला हो ॥ गळीं फुलांच्या माळा बायांच्या खांद्यावर विणा टाळ बायाच्या हो ॥ खांद्यावर विणा टाळ बाया कथेला चालल्या

बहिणी कथेला चालल्या हो ॥ कथेला चालल्या बाया शंभूच्या देवळीं बाया रामाच्या देवळीं ॥ बारा वर्षे झाली शंभू देव नाही त्या देवळांत हो ॥ आणिल्या आणिल्या बायांनी नारळीचे बुतारे हो ॥ झाडिली झाडिली शंभूची देवळा बायांनी रामाची देवळा हो ॥ मेळविली मेळविली बायांनी गायत्रीची शेना हो ॥ आणिली आणिली बायांनी गंगेची पाण्या हो ॥ सारविली सारविली बायांनी शंभूची देवळा बायांनी रामाची देवळा हो ॥ वर काढिले गुलालाचे कणे हो ॥ वरका ठेविले बायानी चंदनाचे पाट हो ॥ वरका सोडिली बायांनी पोथीची पुराण हो ॥ राम वाची पोथी सीता ऐके पार्वती हो ॥ सीता काय बोले लक्ष्मण दीरा हो ॥ शिवावी शिवावी मला मृगयाची चोळी बाई मृगयाची चोळी हो ॥

## आरती

धूप दावा धूप दावा धूपारीच्या देवाग ॥ आधीं धूप दावियेला कान्होजी गवळ्या ग ॥ कान्होजीने बाया नेल्या गंगेच्या तिरीग ॥ ईश्वरपार्वती बसली नंदीवरी ग ॥ झाळा झुळझुळा उजळा पंच आरती ॥ आया माऊल्यांना होते कापूरआरती ॥ दादा गवळ्यांना होते धूप आरती ॥ दिव्यांत घाला सकाळिक ज्योती ॥ बायांचा सरवर भरला जागूं सारी रात्र हो ॥

ब्राह्मणाखेरीज बाकीच्या प्रत्येक जातींत ( देवज्ञ ब्राह्मणसुद्धा ) प्रेताला स्नान घालण्याच्या पूर्वी तेल, तूप, खोबरें किंवा हळद लावण्याची वहिवाट आहे. मुसलमानसुद्धा ह्याला अपवाद नाहीत. ह्या कृत्याला शास्त्राचा आधार आहे. कात्यायनस्मृतींत 'घृतेनाभ्यक्तमाप्लाव्य सवस्त्र-मुपवीतिनम् । चन्दनोक्षितसर्वाङ्गं सुमनोभिर्विभूषितम्' असें सांगितलेलें आहे. पूर्वीच्या स्मृतींत हा अभ्यंगस्नानाचा विधि सांगितलेला आढळत नाही. मूल उपजतांच त्याला न्हाऊं घालतात त्याचप्रमाणे मनुष्य मेल्यावर न्हाऊं घालणें अवश्य आहे अशी समजूत होणें स्वाभाविक आहे. पुढे प्रेताला अभ्यंगस्नान घालण्याचा परिपाठ पडल्यावर ह्या रूढीला कात्यायनानें शास्त्राचें स्वरूप दिलें असावें. आमच्या इकडे ब्राह्मणांत ही चाल नाही ह्यावरून वरील अनुमानास दृढता येते.

शिंपी जातींत प्रेताला सोवळ्याचें वस्त्र नेसवून तें तिरडीवर ठेवतात. सोवळ्याने प्रेत दहन करण्याची चाल इतर जातींत दिसत नाही. ब्राह्मणांत फक्त विधवा विकेशा स्त्रियांस मुकटा नेसवून दहन करतात. ह्या चालीलाहि कात्यायनाचाच आधार असावा; तो असाः— 'दुर्बलं स्नापयित्वा तु शुद्धचैलाभिसंवृतम् । दक्षिणाशिरसं भूमौ बर्हिष्मत्यां निवेशयेत् ।' मनुष्य लवकरच मरणार असे वाटल्यावर त्याला स्नान घालून शुद्ध वस्त्र नेसवून दक्षिणेकडे डोकें करून जमिनी-वर दर्भ अंथरून त्यांच्यावर निजवावें. ही चाल ब्राह्मणांतून नष्ट होत चालली आहे. विधवा स्त्रियांपुरतीच राहिलेली दिसते. शुद्ध वस्त्र म्हणजे सोवळ्याचें वस्त्र होय. शिंप्यांतच ही सोवळें नेसविण्याची चाल अद्यापि तग धरून राहिली कशी हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. गुजराथी ब्राह्मणांत मात्र वरील रूढि आजहि प्रचलित आहे. गुजराथी संस्कृत शिकलेला ब्राह्मण मरावयास टेकला की, त्याची श्मश्रू करून स्नान घालतात व सोवळें नेसवितात. स्मशानांत तसेंच प्रेत नेतात. दक्षिणेकडे डोकें करून जमिनीवर मुमूर्षूला ठेवावें असें स्मृतिकार सांगत

असतां आचार त्याच्या उलट आहे. ह्याचें कारण केवळ अज्ञान होय. पितरांची दिशा दक्षिण. मेल्यावर मनुष्य दक्षिणेस जातो ह्या समजुतीने प्रेताला दक्षिणेकडे पाय करून ठेवण्याची चाल पडली असावी. तसेंच प्रेताची श्मश्रू करण्याचा प्रघात या बाजूला तरी नाही. ह्या बाबतींत शास्त्र मागे पडून लोकांच्या बदललेल्या विचारांना रुचेल असा आचार पुढे आला. 'प्रेतस्य केशश्मश्र्वादि वापयित्वाथ दाहयेत्' असें मदनरत्नांत गालव म्हणत असल्याचें शूद्र-कमलाकरकार लिहितात. कदाचित् उत्तर हिंदुस्थानात ही चाल असेल असें वर गुजराथी ब्राह्मणाचे उदाहरण दिलें आहे त्यावरून अनुमान करता येते. प्रेताच्या क्षौर करण्याविषयी स्मृतिकार शब्दहि उच्चारीत नाहीत. मदनरत्नकारांनी हा विधि कशांतून उचलला तें सांगणे कठीण आहे. तात्पर्य रूढी-वरून शास्त्र बनलें अथवा शास्त्रावरून रूढि निर्माण झाली हे निश्चित करणें अवघड आहे.

अविवाहित थोर वयाच्या ब्रह्मचाऱ्याला लंगोटी नेसवून जाळण्याची वहिवाट कांही जातींत आढळते. कारण ब्रह्मचाऱ्याने लंगोटी नेसावी असा निर्बंध आहे. पुष्कळ वेळा ब्राह्म-णांत विवाहिताल़ाहि लंगोटीच नेसवतात. नग्न स्थितींत मनुष्य जन्मास आला तसाच तो जावा ही कल्पना ह्या चालीच्या बुडाशीं असावी.

शास्त्रांत न सांगितलेली अशी दुसरी रूढि म्हणजे प्रेतापुढे सुपांत वरी, नागली, साळ्या इ. धान्य घेऊन तें रस्त्याने उडवीत जाणें ही होय. वयातीत मनुष्य मेल्यास त्याच्या प्रेतापुढे भात, ज्वारी, द्रव्य उधळतात. ही चाल वरील चालीहून अगदी भिन्न स्वरूपाची आहे. पहिल्या चालीचा उगम पिशाचबाधेच्या भीतींत आहे तर दुसरी चाल आनंद व कृतार्थता दर्शविते. राजाच्या प्रेतापुढे द्रव्य उधळतात. हा एक धर्मादायाचा प्रकार आहे. वऱ्या, नागली फेकीत जाण्याचा प्रघात सर्व जातींत आहे. फक्त ब्राह्मणात नाही. तथापि ब्राह्मणांतहि एखाद्याचा हेतु राहिला असेल तर वऱ्या उधळीत जाण्याची वहिवाट आहेच. ज्याचा हेतु राहतो तो पिशाच होऊन उपद्रव देतो. तेव्हा नेलेल्या माणसाने पिशाच होऊन परत येऊं नये म्हणून वाटेने धान्य उडवावयाचे असतें. धान्याला पिशाच भितं अशी समजूत आहे. मांत्रिक पिशाच घालविण्या-करता तांदुळांचा उपयोग करतो हें पुष्कळांना माहीत असेल. पहिलं मूल मागे टाकून एखादी बाळंतीण मयत झाली तर तिच्या प्रेतापुढे वऱ्या फेकण्याचा प्रघात सर्व जातींत आहे. असें केलें असता मुलाला भूतबाधा होत नाही असा समज आहे.

प्रेताचें तोंड वस्त्राच्छादित असावें असा नियम असूनहि तोंड उघडें ठेवून प्रेत नेण्याची वहिवाट आहे. बहुधा पुरुषाचें व सवाष्णीचें तोंड उघडें ठेवतात आणि विधवेचें झाकतात. निपुत्रिकाचें प्रेतहि झाकलेल्या तोंडानेच नेतात. उघड्या तोंडाने स्मशानांत जातां येणें हें पुरुषार्थाचें लक्षण मानलें जातें. परंतु धर्मसिंधूत 'शवं प्रच्छादितमुखं प्राक्शिरसं दाहदेशं नयेयुः' असा दंडक घातला आहे. कात्यायनहि तसेंच सांगतो. 'मुखेऽप्यथापिधायैनं निर्हरेयुःसुतादयः' शास्त्राच्या विरुद्ध आचार ! अशा विरोधाचें कारण उघड आहे. निबंधकार किंवा स्मृतिकार आचाराचें शास्त्र बनवतात. अनेक कारणानी आचारांत बदल होत जातो आणि मग 'शास्त्राचारयोर्विरोधः' असा देखावा निर्माण होतो. नंतर दुसरा एखादा

निबंधकार ह्या बदललेल्या आचाराला शास्त्रांत समाविष्ट करून घेतो ! गुजराथेंत मुखाच्छादित शव असतें असें समजतें.

जिवंतपणीं क्रिया होते तिच्या उलट मेल्यानंतर करावी अशा समजुतीने कित्येक चाली पडलेल्या असाव्या. उदाहरणार्थ स्नानांत अंगाला खालून वर हळद, उटणें, तेल वगैरे लावतात, पण मेल्यावर हेच पदार्थ वरून खालीं लावीत येतात. तेल लावल्यावर थंड पाण्याने स्नान करूं नये; ऊन पाण्यानेच करावें असा नियम आहे. प्रेताला थंड पाण्याचें स्नान घालतात. जिवंतपणीं दक्षिणेकडे पाय करून निजत नाहीत. मेल्यावर दक्षिणेकडेच पाय करून मनुष्याला ठेवतात. मरण ही जिवंतपणाच्या विरुद्ध क्रिया आहे, म्हणून मरणोत्तरचे आचार जिवंतपणाच्या आचारांच्या विरुद्ध असावेत. दक्षिणेकडे ज्योत करून समई कधी ठेवीत नाहीत, परंतु मनुष्य मेल्यावर त्याच्या जागीं जी समई अथवा पणती लावून ठेवतात तिची वात दक्षिणेकडे केलेली असते. समई ठेवणें हा एक आचार आहे. सोनारात पायरीवर प्रेताला बसवून तेथे स्नान वगैरे घालतात व त्या शेजारी जळती समई असते ती प्रेत तिरडीवर ठेवण्याकरता उचललें म्हणजे आडवी पाडतात. समई विझवणें किंवा मालवणें हें प्राण गेल्याचें निदर्शक आहे. अशा तऱ्हेचे कित्येक संकेत अथवा सूचक चाली आपणांस मिळतील.

---

# कुलाचार

( लेखक :- रामचंद्र राजाराम जोशी, औंध. )

**देऊळगांव व गिरी येथील देव व्यंकटेश उर्फ लक्ष्मीनारायण या देवासंबंधी असलेला कुलाचार :—**

श्रावणमास लागतांच शुक्रवारचा उपास करण्यास सुरवात करून तो एकादशीप्रमाणे सर्व दिवसभर उपास करणं व त्या दिवसापासून ब्राह्मणाचें तीर्थ, चित्रान्न उर्फ खिचडी, वडा आणि कढी या पदार्थांचा त्याग करणें, हे सर्व नियम मार्गशीर्ष मासामध्ये गिरीवरून एक काठी येत असते व ती सर्व देशामध्ये ज्या ज्या गांवीं हा देव असेल त्या त्या गांवीं जाऊन ज्यांच्या घरीं हा देव असेल त्यांनी काठी आल्यानंतर त्या देवाचें पारणें म्हणून करावयाचें असतें. त्या पारण्याच्या वेळीं वर लिहिलेले सर्व पदार्थ देवाच्या नैवेद्यांत घालून एक सुवासीण सांगून, पांच अगर यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालून, वरील सोडलेले सर्व पदार्थ वाढून या देवाची पूजा व पंचामृत अभिषेक करून, पूजेमध्ये मनोहर म्हणून तांदूळ भिजवून, वाटून, त्यांत गूळ तूप घालून हा नैवेद्य समर्पण करावा. नंतर श्रीफल व काणगी म्हणून या देवास दक्षिणा एक रुपाया ठेवून, प्रत्येक पिढीस त्या रुपयाचा निम्मा, चौथा व आठवा भाग अशा तऱ्हेने ती काणगी चढवावी लागते; व ही काणगी त्या काठीबरोबर अगर आपण देवास जाऊं त्या वेळीं दोन, चार, पाच, दहा वर्षांनी त्या काणगीचे रुपये त्या देवास पोहोचविणें. ते पोहोचविणेच्या वेळीं कमीजास्त ज्याप्रमाणे पैसे असतील त्याप्रमाणें त्या देवाच्या खर्चांतून खण, लुगडें, पागोटें वगैरे प्रसाद मिळतो. याच देवाच्या पूजेच्या वेळीं तांदळाचा उर्फ मनोहराचा नैवेद्य समर्पण केल्यानंतर स्वैपाकांतील महानैवेद्य समर्पण करावा. नंतर आरती करावयाची ती पुराणाच्या आरत्या करून याच देवाची म्हणजे व्यंकटेशाची आरती म्हणावी. या देवाची व ब्राह्मणाची आरती म्हणून जाहल्यावर ब्राह्मण सुवासिनींचें भोजनाचें उदक सोडावयाच्या वेळीं नित्य ज्याप्रमाणे आपण 'पार्वतीपते हरहर महादेव' म्हणतों तसें न म्हणतां 'लक्ष्मीनारायण गोविंदा' असें म्हणावें. ब्राह्मणांनी भोजनास बसण्याच्या वेळीं ब्राह्मणास विडा-दक्षिणा देऊन आपल्या घरांतील जे कोणी स्त्रीपुरुष, ज्यांनी शुक्रवारादि वरील नियम पाळिले असतील त्यांनी ब्राह्मणाची आरती करून ब्राह्मणाचें तीर्थ घ्यावयाचें. नंतर आपण भोजन करावयाचें. भोजन करावयाच्या आधी देवाचें तीर्थ ब्राह्मणांनी व घरांतील सर्व मंडळींनी घेऊन मनोहर प्रसाद घ्यावा.

ज्यांनी शुक्रवारचा उपोषणाचा नियम धरला असेल त्यांनी चारदोन उपवास ओळीने आल्यास अगर दुसऱ्या एखादे कारणामुळे उपोषण करण्याचें नसेल तर

त्या दिवशीं त्या देवास गुळाचा नैवेद्य समर्पण करून तो गूळ घरांतील सर्व मंडळींना वाटून देवाची आरती करावी व त्या शुक्रवारीं भोजन करावें. हा कुलाचार शुक्रवारींच करावा. असा हा कुलाचार आहे.

## तुळजापुरच्या देवीसंबंधाने असणारा कुलाचार :—

या देवीचा काकड्या गोंधळ म्हणून लग्नाच्या व मुंजीच्या वेळीं करावयाचा असतो. त्याचा विधी म्हणजे लग्नमुंजीसंबंधीं नांदीश्राद्धांत पुण्याहवाचन जाहल्या-नंतर या देवीची पूजा करून या देवीपुढे सात पानें मांडून, त्यांवर स्वैपाकांतील सर्व जिन्नस घालून, प्रत्येक नैवेद्यावर एक पुरणाची पोळी, त्या पोळीवर एक पुरणाचा दिवा लावावा. एक एक पैसा व सुपारी ठेवून त्या सुपारीची पंचोपचार पूजा करून तो नैवेद्य समर्पण करावा. सहा ब्राह्मण बोलावून त्यांच्या हातांत तुपांत भिजविलेले सात काकडे पेटवून, त्यापैकीं सहा काकडे प्रत्येकास द्यावे. सातवा काकडा ज्या मुलाचें अगर मुलीचें कार्य असेल त्याच्या हातांत द्यावा. मालकानें स्वतःच्या हातांत पुरणाची आरती धरून आरती करावी. नैवेद्याच्या वेळीं एक वाटीभर दूध समर्पण करावें. आरती जाहल्यानंतर त्या दुधांत पेटविलेले काकडे टाकावयाचे असतात. त्या दुधाचें तीर्थ ज्या मुलामुलींचें कार्य असेल त्यास व घरांतील सर्व मंडळीस द्यावें. कार्याच्या वेळीं हा कुलाचार करून नित्य बारा महिने चैत्र शु॥ १५, श्रावण शु॥ १५, कार्तिक शु॥ १५, पौष शु॥ १५ ह्या सर्व पौर्णिमांना पुरण घालून एक सवाशिण ब्राह्मण भोजनास सांगून पुरणाच्या दिव्याने आरती करणें. एक वर्षाआड अगर तीन वर्षांनी या देवीचा मारग मळणें तो असा :— आपल्या गांवापासून ज्या दिशेला हें देवीचें गांव असेल त्या दिशेला अगर कोणत्याहि दिशेला गांवाच्या बाहेर रानामध्ये जाऊन त्या ठिकाणीं आपल्या घरांतील देवी नेऊन पूजा करावी. तेथें सैपाक करून पांच सवाशिणी व पांच ब्राह्मण सांगून भोजनास घालणें. या सैपाकांत चपात्या, भाकरी वगैरे पदार्थ करावयाचें असतात. भोजनाचा विधी उरकून सायंकाळीं घरीं येणें असा आहे. यामध्ये सुद्धा पूजेच्या वेळीं आरती करून खणानारळाने ओटी भरून सुवासिनीस हळदकुंकू देऊन ब्राह्मणसुवासिनीस भोजनदक्षिणा देणें. असा हा कुलाचार आहे.

———

# वासुदेवगीतें

( लेखकः—अ. य. देशपांडे, )

'परि प्रभुहि संग्रहीं सकळ वस्तुला ठेविती ।' —मोरोपंत.

लेखाच्या शीर्षकावरून 'वासुदेवगीतें' म्हणजे 'श्रीकृष्णासंबंधीचीं गीतें' असाच अर्थ येथे अभिप्रेत आहे, अशी सर्व सामान्य वाचकांची सकृत्‌दर्शनी समजूत होणें साहजिक आहे. परंतु "नामैक्यें समता चुन्यास अमृता येईल कैशी तरी" असें एका सुप्रसिद्ध कवीने म्हटलें आहे, तें त्रिवार सत्य आहे. याच अनुभवसिद्ध न्यायाने 'वासुदेव' म्हणजे 'त्रैलोक्याधिपति' व ग्रन्थरत्नशिरोमणी श्रीमद्भगवद्गीता या राष्ट्रसंजीवन ग्रन्थाचा प्रणेता भगवान् 'श्रीकृष्ण' आणि 'वासुदेव' म्हणजे मोरांच्या पिसाची शंकाकृति उंच टोपी घालून दारोदार भिक्षा मागत हिंडणारा व स्वतः तोंडाने नित्य नेमाने पाठ म्हणत असलेल्या गीताचा किंवा गाण्याचा यत्किंचित्‌हि अर्थ न उमगणारा भिक्षेकरी या उभयतांची बरोबरी कालांतरी तरी होईल काय ? अर्थात् नाही. तरीसुद्धा आम्ही प्रस्तुत लेखांत याच वासुदेवांच्या गीतांकडे साहित्यभक्तांचें लक्ष वेधण्याचें धार्ष्ट्य करीत आहो. तरी त्याबद्दल साहित्यसेवक क्षमा करतील अशी बळकट आशा आहे.

आपल्याला आज पद्य किंवा काव्य यांत अंतर्भूत होण्यासारख्या विवक्षित गीतांचें दिग्दर्शन करावयाचें असल्याने प्रथम काव्याचें थोडक्यांत सिंहावलोकन करूं.

संस्कृतसाहित्यशास्त्रकारांनी काव्यग्रहणाच्या दृष्टीने 'श्राव्यकाव्य' 'दृश्यकाव्य' असें वर्गीकरण केलें आहे. दुसऱ्या एका दृष्टीने 'महाकाव्य' 'खण्डकाव्य', व 'कोष-काव्य' म्हणजे स्फुट कविता असेंहि वर्गीकरण केलेलें आहे. तद्वतच दृश्यकाव्यांतहि 'नाटक' 'नाटिका,' 'प्रहसन' वगैरे अनेक पोटभेद केले आहेत. मानसिक भावना वगैरे इतर अनेक दृष्टांनेहि त्यांचे पोटभेद पाडलेले आहेत.

तद्वतच इंग्रजींतहि काव्याचे Subjective व Objective असे दोन मुख्य प्रकार असून त्याचे ग्रामगीतें, वर्णनात्मक कविता, कथनात्मक कविता, महाकाव्य, अद्‌भुतकाव्य, जुनी शाहिरी कवनें, उपदेशपर कविता, विचारात्मक कविता, स्तोत्रें, शोकगीतें, नाट्यगीतें, सुनीतें, व्यंगकाव्य, वीणाकाव्य, गूढकाव्य वगैरे विविध व विशिष्ट पोटभेद आहेत. या उपभेदांपैकी अनेक प्रकार आधुनिक मराठी काव्यांत अलीकडे रूपाव्याने येऊं लागले असून त्यांची संख्या गणितश्रेढीने वाढत आहे.

आम्हांस या लेखांत वासुदेव-गीतांचाच विचार कर्तव्य आहे व त्याचें कारणहि असें आहे की, हल्ली वाङ्मयसंग्रहाकडे शारदोपासकांचें लक्ष लागलें असून ते आपल्या-

इकडील स्त्रियांचीं गाणीं ( स्त्रीगीतें ), जुन्या कवींच्या लावण्या, गतकालीन शाहीरांचे पोवाडे, मोंडल्याचीं गाणीं इत्यादि संग्रहित करण्याच्या खटपटीस लागले आहेत. इतकेंच काय पण ते वाक्प्रचार व म्हणींचाहि संग्रह करीत आहेत. अशा स्थितींत त्यांना मदत करणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे व त्या दृष्टीने ज्याला जें शक्य असेल तें प्रत्येकाने अवश्य करावें. विशेषत: वरच्या वर्गांतील विद्यार्थ्यांनी आपल्या देशभगिनी व माता यांना पाठ येत असलेल्या गाण्यांचा संग्रह करावा व तो वाङ्मयभक्ताकडे द्यावा. मुख्यत: वृद्ध स्त्रियांना येणारीं जुनीं गाणीं तात्काळ लिहून घ्यावींत. कारण "न कश्चिदपि जानाति किं कस्य श्वो भविष्यति। अत:श्व:करणीयानि कुर्यादद्यैव बुद्धिमान्"॥

भैदिक गाण्यांचाहि संग्रह त्यांनी जरुर करावा. तसेंच फिरत्या लोकांच्या म्हणण्यांत येणाऱ्या गाण्यांचाहि संग्रह करणें तितकेंच आवश्यक व महत्त्वाचें आहे. त्यांत प्रामुख्यानें कोंकेवाले, कानफाटे, वासुदेव इत्यादि भिक्षावृत्तीचा अवलंब करणाऱ्या जातींचा व लोकांचा अंतर्भाव होतो. पैकी कोंकेवाल्यांचें नांव निघतांच किंवा त्यांच्या कोक्याचा कर्णमधुर नाद कानीं पडतांच 'गोपीचंद' राजाचें स्मरण झाल्यावांचून राहत नाही. तीच गोष्ट कानफाट्यांची. त्यांच्या वाद्याचा ध्वनि कानावर येतांच अनेक प्रकारचे पाळणे एकसमयावच्छेदेंकरून कर्णरंध्रांत घुमत असल्याचा भास होतो. त्यांचे ते पाळणे अत्यंत गोड असतात. तद्वतच वासुदेवाचें नुसतें नांव देखील जरी उच्चारलें गेलें किंवा सकाळच्या प्रशान्त अशा रामप्रहरांत त्याच्या हातांतील टाळाचा छुनुक छुनुक असा मधुर व ठेकेदार निनाद आपल्या कर्णपथावर येऊन आदळला की, ती मूर्ति आपल्यासमोर प्रत्यक्ष उभी राहण्यापूर्वीच आपल्या मनश्चक्षूंपुढे शंकूच्या आकाराची भली उंचच्या उंच मोराच्या पिसांनी आच्छादलेली तांबडी लाल टोपी डोक्यावर घातलेली व अंगांत पायघोळ अशा पेशवाई थाटाचा बंददार अंगरखा परिधान करून पायांतील चाळांच्या व हातांतील चिपळ्यांच्या अगर टाळांच्या नादांत प्रभाने रंगून जाऊन श्रोत्यांस अगदी अल्पावधींत घरबसल्या अनेक यात्रा केल्याचें पुण्य पदरीं बांधण्याची सुवर्णसंधी आणून देणारी व्यक्ति एकदम उभी राहते. नंतर ती व्यक्ति आपल्या सन्निध येतांच प्रत्येक क्षेत्रांतील देवतांच्या नामावलीचा पाढा आपल्यापुढें वाचते व तितक्या देवतांना 'दान पावल्याची' पावती आपण दान करण्यापूर्वीच आपल्या तोंडावर जणों काय फेकून देत असते! कारण तो एका मागून एक अशा सर्व क्षेत्रांची नांवें घेऊन 'पालीच्या खंडोबाला–दान पावलं' 'पंढरीच्या विठोबाला–दान पावलं' असें मोठ्या ऐटीने ठेक्यांत म्हणत असतो व प्रेमाने नाचतहि असतो. परंतु पुष्कळ वेळां ते जोडीजोडीने फिरत असतात. व त्यापैकी एकजण खरोखरच की काय श्रमविभागाच्या तत्त्वावर आपल्या आबालवृद्धांच्या मुखीं झालेल्या सर्वश्रुत व सुप्रसिद्ध अशा बोलांपैकी पूर्वार्ध म्हणतो व सदर बोलांतील उत्तरार्ध आपल्या साथीदारावर सोपवितो. उत्तरार्ध तर आबालवृद्ध स्त्रीपुरुषांच्या इतक्या परिचयाचे झालेलें आहे की, त्यावरुनहि अनेक वेळां ते लोक आपल्या इकडे

ओळखले जातात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ते 'दान पावलं' या नांवानेंहि संबोधिले जातात.

याशिवाय त्यांना अनेक गोड गाणींहि येतात. ती विविध विषयांवर असली तरी त्यांत मुख्यतः पौराणिक गाण्यांचाच विशेष भरणा असतो. ते 'वासुदेव' असल्यामुळे कृष्णाचीं, पांडवांचीं वगैरे गाणीं मोठ्या प्रेमानें म्हणत असतात. असलीं गीतें ते केवळ चिपळ्यांच्या अथवा टाळांच्या किंवा दोहोंच्या ठेक्यावर म्हणत असल्याकारणानें म्हणण्यास अत्यंत साधीं व सोपीं असतात. त्यांची रचना केव्हां झाली आहे हें त्यांचें त्यांसच माहीत नसतें, मग इतरांस तें कळण्यास मार्ग काय? वास्तविक हीं गीतें कोठेंहि लिहिलेलीं किंवा छपून प्रकाशित झालेलीं असण्याचा संभव नाही. कारण हे लोक आज अनेक शतकें पिढ्यानपिढ्या वंशपरंपरेनें तीं गाणीं वरचेवर ऐकून ऐकून म्हणूं लागलेले असतात व त्यांचा पुढेंहि त्याच पद्धतीनें तीं शिकत असून त्यांचा हा क्रम असाच अखंड सुरू राहण्याचा संभव आहे. तरी पण दिवसेंदिवस लोकांची पठणशक्ति कमी कमी होत चालली असून जुन्या लोकांस हीं गीतें जितकीं पाठ येतात तितकीं आधुनिक तरुणांना येत नाहीत, असा स्पष्ट कबुली जबाब त्यांच्याचपैकी एका तरुण वासुदेवानें प्रस्तुत लेखकापुढेंहि नुकताच दिला असून ती गोष्ट अगदी सत्य व साहजिक असणें संभवनीय आहे. कारण आज सर्वत्रच 'ताकापुरतें रामायण' किंवा कामचलावू विद्या संपादन करून तेवढ्यावरच पाट भरत राहण्याची प्रवृत्ति दिसून येते. मग त्या गोष्टीस 'वासुदेवच' तेवढे कसे अपवाद राहूं शकतील? अर्थात् अशा परिस्थितींत त्यांच्यांतील वृद्ध लोकांस येणारीं अनेक गाणीं नष्ट होण्याचा संभव आहे. व तीं उघड्या डोळ्यांनी पाहतां पाहतां नष्ट होऊं न देणें सरस्वतीच्या उपासकांचें आद्य कर्तव्य आहे. याच कारणास्तव त्यांचें लक्ष या विषयाकडे वेधण्याचा हा अल्प प्रयत्न आहे.

आतां मागें जे काव्याचे अनेक भेदोपभेद या लेखांत निर्दिष्ट केले आहेत त्यांपैकी इंग्रजी पद्धतीनें केलेल्या वर्गीकरणांपैकी Pastoral अथवा 'ग्रामगीतें' हा जो प्रकार आहे त्यांत वासुदेव-गीतांपैकी कांहीं गीतें मोडण्यासारखीं आहेत. कारण ग्रामगीतांत खेडेगांवातल्या म्हणजे धनगर, गुराखी, शेतकरी, मेंढपाळ इ. गांवढळ लोकांच्या तोंडीं असलेलीं किंवा त्यांच्या आयुष्यक्रमाचें वर्णन करणारीं गीतें येतात. तसेंच कांहीं गीतें वर्णनात्मक कवितेंत येण्यासारखीं आहेत. कारण या प्रकारांत कवीचें अंतर्याम व्यक्त करणें हा हेतु नसून केवळ बाह्य सृष्टीच्या भिन्न भिन्न ऋतूंतील स्वरूपाचें, स्थळाचें, लढाईचें किंवा व्यक्तीच्या जीवनांतल्या विशिष्ट घटनेच्या केवळ बाह्य स्वरूपाचें वर्णन असतें. त्याचप्रमाणें कांहीं कल्पनात्मक या सदरांत समाविष्ट होण्यासारखीं आहेत. कारण या प्रकारांत एक किंवा अनेक कथा पद्यरूपानें सांगितलेल्या असतात. त्यांत कवीची अंतर्दृष्टि क्वचित् असते. कथाभाग कांहीं विशिष्ट प्रकारें चटकदार पद्धतीनें वर्णन करून सांगणें एवढाच या कवितेचा उद्देश असतो.

याखेरीज इतर कांही प्रकारांत त्यांतील कित्येक गीतांचा अंतर्भाव होईल. पण तीं सर्व गीतें लेखकापाशीं संग्रहित नसल्याने त्याबद्दल आज चर्चा करून त्यांचें वर्गीकरण करणें शक्य नाही.

आता काव्यदृष्ट्या त्यांचा थोडा विचार करूं. काव्याचें मुख्य लक्षण 'रसात्मकता' हें होय. तें ज्यांत असेल त्यास काव्य म्हटलें जातें. मग ती रचना गद्यमय असो किंवा पद्यमय असो. तसेंच छंदःशास्त्रांत 'प्रसाद' म्हणून एक काव्याचा प्रकार वर्णिला आहे. 'प्रसाद' ही संज्ञा छंदःशास्त्रांत अर्थासंबंधीची असंदिग्धता किंवा काव्य श्रवण करतांच (प्रतीतिसुभगं वचः) श्रोत्यांच्या मनांत अपूर्व भाव जागृत करण्याची शक्ति हिच्या संबंधाने योजलेली आहे. हे दोन्ही गुण म्हणजे 'रसात्मकता' व 'प्रसाद' हीं त्यांच्या अनेक गीतांत दिसून येतात.

आता ज्या वासुदेवांच्या गीतांसंबंधी हा लेख लिहिण्यांत आला आहे. त्यांची थोडी माहिती आम्ही आमच्या वाचकांस प्रथम सादर करतों; व नंतर नमुन्यादाखल एक ग्रामगीत व मकरसंक्रांतीस अत्यंत समयोचित असें त्यांचें एक कथनात्मक गीत हीं आमच्या वाचकांस सादर करून हा लेख संपवितों. ज्ञानकोशकार ज्ञानकोशाचा विभाग विसावा यांत १८३ व्या पृष्ठावर लिहितातः— "वासुदेव"— ही भीक मागणाऱ्या व भटक्या लोकांची एक जात आहे. लोकसंख्या सुमारें ८०००. वऱ्हाड-मध्यप्रांत व हैद्राबाद संस्थान यांतून यांची वस्ती आहे. हे स्वतःला सनाढ्य किंवा सव्हैरिया ब्राह्मण म्हणवितात. हे वसुदेवापासून आपली उत्पत्ति झाल्याचें सांगतात. यांना अंतर्वेदिन कापडिया म्हणतात. कारण हे बहुरुप्याप्रमाणे लवकर कपडे बदलतात. यांना हरबोल किंवा जागा कापडीहि म्हणतात. त्यांच्या गंगापुत्री, पडुवा अशा जाती आहेत. हे लोक जरी ब्राह्मणाशिवाय इतरांस जातींत घेत नाहीत असे म्हणतात, तरी त्यांच्यांत बरेंच मिश्रण झालेलें दिसतें. विवाहाच्या वेळीं ब्राह्मण यांना जानवें घालण्यास देतो. विधवांचीं लग्नें विधुराबरोबर करतात. घटस्फोट रूढ आहेत. मराठी जिल्ह्यांतून हे डोकींत मोराचें एक पीस खोंवतात आणि सागरकडे हे लोक 'मटक' नांवाचें भांडें डोकीवर घालतात. त्यास एक भालेदार टोंक असून त्यांत आंब्याचीं पानें टोंचतात आणि रामलक्ष्मणाच्या चित्राचें वस्त्र गुंडाळतात. भीक मागण्यास त्यांस एक करताळ व घुंगुर पुरतें. हे सरवन (श्रावण!) व कर्णाची पूजा करितात. हरबोला लोक सकाळीं झाडावर चढून भीक मागतात. उत्तरेकडील जिल्ह्यांत हे गुरें विकतात. हे म्हशीला फार पवित्र समजतात. मद्यमांस यांस वर्ज्य नाही; हे फक्त डुकराचें मांस, कोंबड्या आणि गोमांस खात नाहीत."

आता वर उद्धृत केलेला उतारा ज्ञानकोशांतील असून त्या उताऱ्यांत वर्णिलेल्या वासुदेवाच्या माहितींत व मराठी जिल्ह्यांतून हिंडणाऱ्या वासुदेवाच्या प्रत्यक्ष वस्तुस्थितींत बरेंच अंतर असल्याने प्रस्तुत लेखकास पंढरपूर येथे गोविंदपुऱ्यांत गुलबेर

वाड्यात सोलापूर रस्त्याला राहणाऱ्या केशव रामचंद्र वासुदेव उर्फ गवळी याने समक्ष सांगितलेली माहिती त्याच्याच शब्दांत पुढीलप्रमाणे सारांशरूपाने दिली आहे:–

" आमची वस्ती मुख्यतः पंढरपूर, सोलापूर, बार्शी, शिराळ, तांदुळवाडी, सातारा, जोगाईचें अंब, परळी वगैरे प्रमुख ठिकाणीं थोडी थोडी आहे. आम्ही कृष्ण-भक्त असून गाई वगैरे पाळतों. आम्हाला वासुदेव किंवा गवळी म्हणतात. आमच्या-पैकी कांहीं जणांना जमिनी वगैरे असतात. ज्यांना स्वतःच्याच जमिनी आहेत, त्यांच्या बायका रानांत कामाला जातात. दुसऱ्याकडे मोलमजुरीस कधीच जात नाहीत. ब्राह्मणा-प्रमाणे पुरुष मिळवून आणतात व बायका बहुधा बसून खातात. अलिकडे आमच्या-पैकी शहरांत राहणाऱ्यांचीं मुलें व क्वचित् मुलीदेखील थोडे थोडे शिकतात. आमच्यांत अद्यापि कोणीहि इंग्रजी शिकलेला नाही व अजून तरी कोणी कोठेहि नोकरी धरली नाही. आम्ही आमच्या धर्माप्रमाणे भिक्षा मागतो त्यामुळे देव आम्हांला पोटाला पोट-भर देतो. कमी पडूं देत नाही. आमचीं गांवें वांटलेलीं असतात. तेथे वयतें मिळतें. त्याबद्दल बहुधा 'नागपंचमीला' एकदा घरोघर गाणें म्हणून आलें म्हणजे झालें. मग दुसरें कोणतेंहि काम करावें लागत नाही. आम्ही फार करून चार महिने पावसाळ्यांत घरीं राहून आठ महिने बाहेर फिरतों."

"आमच्यांत मुलींचीं लग्नें ८–१० वर्षांच्या वयांत होतात. मुलीचा बाप फक्त २५ रुपये ठेवायला घेतो. जुजबी डागिने व कपडे घालतात. लग्नांत मुलाकडचीं तीन व मुलीकडचीं दोन अशीं जेवणें यावीं लागतात. लग्न ब्राह्मणच लावतो व लग्नांत जानवें घालण्यास देतो. २५ रुपयापेक्षां जो जास्त पैसे घेईल त्यास 'दैव' ( जमात ) दण्ड करतें व दंड न दिल्यास त्यास वाळीत टाकतें. आमच्यांत पाट, किंवा मुहूरुत अगर काडीमोड नाहीं. ब्राह्मणांस दक्षणाहि वाटतात. पोटजातीशीं रोटीबेटी व्यव-हार होत नाहीत. तसेंच मांसभक्षण व मद्यपान निषिद्ध मानितात. मांस खाणारास व दारु पिणारास दैव जबर दंड करतें व प्रसंग पडल्यास त्यावर वाळीत किंवा बहिष्कार टाकितें आणि त्यामुळे लोक नीट वागतात. आम्ही भिक्षा मागून पोट भरतों. भिक्षेच्या वेळीं गाणीं म्हणतों. हीं गाणीं लोकांना फार आवडतात व त्यामुळेच आम्हांला भिक्षा मिळते. आम्हीं आमचीं गाणीं कोणाला उतरुन देत नाही. कारण आम्ही आमचीं गाणीं दुसऱ्याला दिल्यावर मग आमच्याजवळ काय राहिलें ? व मग आम्हांला कोण जवळ बोलवील ! तरी पण तुमचा फारच आग्रह आहे म्हणून जेवणखाण झाल्यावर तिसऱ्या प्रहरीं मी तुम्हाला चार दोन गाणीं म्हणून दाखवीन. तीं तुम्ही लिहून घ्या म्हणजे झालें. पंढरीला आल्यावर आवर्जून आमची गांठ घ्या. वगैरे "

वरीलप्रमाणे बोलणें झाल्यानंतर तो भिक्षेस निघून गेला. ठरल्याप्रमाणे योग्यवेळीं घरीं येऊन गाणीं म्हणून दाखविण्याचें औदार्य त्याने दाखविलें व आपलें वचन पाळलें. इतर अनेक लोकांप्रमाणे या अडाणी वर्गाचीहि अदूर दृष्टि व कोतीं

समजूत असणें स्वाभाविक असल्याने प्रत्यक्ष तो घरीं येईपर्यंत त्याच्या येण्याविषयी जबर शंका होती हें आम्ही येथे प्रांजलपणें कबूल करतों. यानंतर त्याच्या ग्रामगीता- पैकी 'गुराखी श्रीकृष्ण' किंवा 'गुराख्याचें गाणें' येथे नमुन्या दाखल त्याच्याच शब्दांत बसेंच्या तसेंच उद्धृत करतों.

## गुराखी कृष्ण

कृष्ण ग बाळ बोले यस्वदेला । गाइ ऐकनात मला ॥ ध्रु० ॥ भुंडी ग पारबोली जाई काशीला । गंगा ग गोदावर डोला दिला । दरसव लागली ढिला । जाती कुणब्याच्या शेताला । जोंधळा खाऊन बुडविला । बाइ फुकट दे कुन्हाला । एक कुणबी धाऊन आला । हाति भेंड ज्यान उपडिला । मी पळून आलों घराला । मला मारिन मन् बोलला । पळतां पायांत काटा मोडला । गाई ऐकनात मला । कृष्ण ग बाळ बोले यस्वदेला । गाई ऐकनात मला ॥ १ ॥

पुतळी सारंग पाणी पिईना । काळी बाळी काइ चरना । राइ गुरामंदि ठरना । जुगि वासरु घेईना । मथुरीला चिळ फुटना । लागि भाल्याला ऐकना । हशि नाचति छनछना । कंबळन घार्ली धिंगाना । बळि संग चाल करती । जुगि धानाला पळती । बाइ ग गाइ तुपान मला आवरना । याला घालुन दे लोडणा । गाई ऐकनात मला । कृष्ण ग बाळ बोले यस्वदेला । गाइ ऐकनात मला ॥ २ ॥

यमुना न् जमुना न् सरस्वती । तानी वासरु पाजती । कावेरी ढिला चाटती । गाइ द्रोणागिरी झुंजती । जिरि हनुम् चवताळती । लाल गुलाब पतंग उधळती । डोलारी गोहन लात झाडती । कंबळन दाव तोडती । हिरकण मकमल करकती । जान लक्ष्मीवर झुंजती । काळी ग मस्ताग गाय धाकटी । हंबरती वासरासाठी । गाइ ऐकनात मला । कृष्ण ग बाळ बोले यस्वदेला । गाइ ऐकनात मला ॥ ३ ॥

वार्डी मालन गाय जीज़ुटी । ढवळी पांढरी गाय चोरटी । घाली कणसावर मिटी । ढिला घालुनदे पायखुटी । राजि गिरजी टेकावर । टाकि पुसमा पाठीवर । हे तुकोबा ज्ञानेश्वर । काळी मोत्याचा अक्षर । सुलताना म्हणे बळिरामाला । धाडून देतो कृष्णाला । मनि ग कृष्णाला पेंचा वळखिला । नकु चालुस या आम्हाला । बग या ऐकनात मला । कृष्ण ग बाळ बोले यस्वदेला । गाइ ऐकनात मला ॥ ४ ॥

असा तो बोलला कि सारंगधर । बाइ संभाळ आपली गुर । उद्यां ग नाही जायाचा ज्ञानूवर । हात ठेवितो कानांवर । तुम्ही ग ऐकनात मला वासर । धारा काढु मी कुठवर । अंबे भवानी माय बंदर । तिनें लात दिली गुडघ्यावर । मी पडलों की धरणीवर । मला उठवाना खिनभर । बाइ ग मी परट सांगतो तुला । नाहीं जायाचो रानाला । गाइ ऐकनात मला । कृष्ण ग बाळ बोले यस्वदेला । गाइ ऐकनात मला ॥५॥

हें गाणें मोठें मनोरंजक आहे. त्यांत गुराख्यांच्या अनुभवास येणाऱ्या गोष्टीपैकी अत्यंत क्षुल्लक गोष्टीचें देखील वर्णन करावयाचें राहिलेलें नाही असें सूक्ष्म विचारांतीं कळून येईल. यानंतर त्यांच्या कथात्मक गीतांपैकी एक गीत त्याने जसे म्हटलें तसें देतों.

## ' गांधारीचा ववसा '

नारंदान कळ मातवली केला ऐरावती । गंधार वत्रसत होती । दुर्येधनाने माती कमवून केला त्याचा हाती । नगरांत पाडिल्या भिंती । सक्रातिचा सण आला तुम्ही धरावी चित्ती । आज धनलक्ष्मी येती । गंधार शिनगर करी । साडिचोळि लिलि भरतारी । ल्लाट कुंकान भरी । सुगडयाचिन पुंजा करी । खण घेऊन हातावरी । गेली कुंतीच्या मंदिरीं । बंशिवल तिच्या शिरीं । आव शोजे ऊसण सवाइ देण देण पूर्ण जाला । एग रोष गंधारिला । ऐका गोकुळ क्षेत्र । पांच पुत्र हे कुंतीला । एग रोष गंधारिला ॥१॥

कुंति म्हणे अरहर देवा केली तुमची सेवा । संकटी पाव महादेवा । माझी लेकर लहान धाकुटी । वै. पाचा हा केवा । यानि हातीं काय कमवावा । भार घालु मी कोणावर । माझ्या पोटि व पांच पोरं । भिव आला शिरवर खेळून । मानला पुशी खबर । इर क्षामध्वार । गिरि नदी पाडली गार । आणि पहा प.वेज पाहून गोळा झोकू जी लागला । एग रोष गंधारिला । ऐका गोकुळ क्षेत्र । पांच पुत्र हो कुतिला । एग रोष गंधारिला ॥ २ ॥

अर्जुन म्हणे आव भिवबा चिकुल कशाला आणिता । फुठे वाडेहुडे बांधिता । तुम्हास नाही कळल दादा अभिमान झाला होता । रोजना करिती माता । अर्जुन कळीचा काळ । काढा दूर नदांचा गाळ । दुर्येधनाने माती कमवून गज रे फिरविला होता । या सगळे नगरी भवंता । अर्जुन कळींचा काळ । पत्रिका लिहून चंचळ । बाणाशीं बाण निरमळ । बाण गेले देवाजवळ । तिरि लोकीं पांडव कुळ । आला ऐरावतिला मुळ । ऐव कैरव नित्य भांडति निरप पाठविला । एग रोष गंधारिला । ऐका गोकुळ खेत्र । पांच पुत्र हे कुंतिला । एग रोष गंधारिला ॥ ३ ॥

शिरीं सोहद बाणाचि ध्यान रचिली पायरी । पांचि पांडव सत्व भारी । हजार हातीच बळ भिवबाला वस्र नाही शिरीं । गेले चढून आगासावरी । तेतिस कोटी सभा देवाचि दणाणली कचेरी । बादशाहीन मुजरा करी । भिवबाला भेटाय चला एक म्होर । भिवबाला पाहून सभा काप थरथर । कुठे जनमलेव ऐस सुत व थोर । कुणा मावलीच्या पोटीं रामा हिर । भिवबाला पाहून हाति पळ दुरदुर । धर टांगडिला हाति फिरव गरगर । त्याची कावड करुन टाकली खांद्यावर । आला मिर्तिलोकाला घेऊन सत्व ध्वार । माता कुंती आरती ववळ भिवबाला । उचलुन कड घेतला । एग रोष गंधारिला । ऐका गोकुळ खेत्र । पांच पुत्र हे कुंतिला । एग रोष गंधारिला ॥ ४ ॥

अंबारीचा सहाज वरत कळस लाविला तिन । धड फडक्यावर निशाण । मोत्यान पवळयान चित्र काढी होसन । गज आणले सूर्येबाण । दुइ घटे दुइ बाजुला । दान ऐरावतीची पाठविली काया । तोंडांत घेऊन साकळी लाव खेळाया । हे दंत्र-वान बूट दिसाहवया । वर बसली माता कुंति जाति ववसाया । गेलि गंधारीच्या

महालालान उसन दिया । पांजन केलि कवतिक लावलि खालि पाया । काइ असून शंभाराच्या गारी भराया । नित्य भाव धरून लागतो सद्गुरुच्या चरणाला । एग रोष गंधारिला । ऐका गोकुळ क्षेत्र । पांच पुत्र हे कुंतिला । एग रोष गंधारिला ॥ ५ ॥

उपरोक्त गीताचें कथानक मूळ महाभारतांत नाही एवढेच नव्हे तर तें कवि-वर्य मोरोपंताच्या आर्याभारतांतहि नाही हें वाङ्मयविशारदांस विश्रुतच आहे. तथापि तें पांडवप्रतापान्तर्गत कथानकांत आढळून येतें. एवढेच नव्हे तर हरदास लोक 'गजगौरिव्रत' नांवाचें आख्यान करतात. त्यांत अगदी हेंच कथानक असल्याचें सूज्ञ वाचकांच्या तेव्हाच ध्यानीं येईल.

तद्वतच यांत क्वचित् दुर्बोध शब्दहि आहेत. त्यांत पाठभेदहि असण्याचा संभव आहे. तसेंच त्यांत अतिशयोक्ति नाही असेंहि म्हणता येणार नाही. तरी एकंदरींत त्यांत रसात्मकता व प्रसादहि भरपूर आहे, हें वरवर वाचणारांसहि दिसून येईल. खरें पाहू गेल्यास काव्यदृष्ट्या त्याचा विचार करण्याचेंच कारण नाही. आज फक्त सध्या विद्यमान असलेलें व नष्ट होऊं पाहणारें प्राचीन वाङ्मय संग्रहित करणें व नंतर त्याचें नीरक्षीरन्यायानें ग्रहण करणें हीच दृष्टि वाङ्मय-भक्तांची असणार असा तर्क केल्यास तो फारसा चुकीचा होईलसें वाटत नाही.

तरी लेखाच्या शिरोभागीं उद्धृत केलेल्या मयूरोक्तींत म्हटल्याप्रमाणे वाङ्मय-प्रभुहि सर्व प्रकारचें वाङ्मय संग्रही ठेवतील अशी सबळ आशा व्यक्त करून आम्ही आमच्या वाचकांची रजा घेतों.

———

# न्यायशास्त्र आणि मराठी भाषा

(लेखकः—रघुनाथशास्त्री कोकजे, तर्कतीर्थ, लोणावळें.)

गौतमऋषीच्या न्यायशास्त्रांतील कित्येक पारिभाषिक शब्द मराठीभाषेंत—काही जसेच्या तसेच तर कांही रूपान्तराने किंवा अर्थान्तराने—रूढ झालेले आहेत त्यांचें दिग्दर्शन येथे करावयाचें आहे.

१ **एकसमयावच्छेदेंकरून**ः—एकाच वेळीं; हा शब्द सं. **एकसमयावच्छेदेन** या शब्दावरून मराठींत आला आहे. संस्कृतांतील तृतीया प्रत्ययाचें असें रूपान्तर जुन्या मराठींत पुष्कळच दिसून येतें. याच शब्दाचा 'एकदेशावच्छेदेन' असा एक दुसरा भाऊ न्यायशास्त्रांत आहे. त्याला सोडून हा एकटाच कां आला हें कळत नाही.

२ **अभावः**--नसणें. न्यायशास्त्राइतकाच मराठींत रूढ आहे. 'गोविंदरावाजवळ संपत्ति खूप आहे पण '**अकलेचा पूर्ण अभाव आहे.**'

३ **लक्षण**ः--एखाद्या वस्तूला बरोबर ओळखतां येईल अशी खूण. (असाधारणो धर्मः) अशाच खुणेस लक्षण असें न्यायशास्त्रांत नांव आहे. न्यायशास्त्राप्रमाणे ही खूण चांगली किंवा वाईट दोन्ही प्रकारची असूं शकते. परंतु मराठींत फक्त वाईट दाखविण्याकडेच बहुशः उपयोग करितात. 'त्याचीं लक्षणें चांगलीं नाहीत;' 'तो तापांत पाणी मागतो हें लक्षण बरें नव्हे;' इ.

४ **प्रतियोगी**ः—हा शब्द नव्यानेच रूढ झालेला आहे. सहकारिता या शब्दाशीं समस्त असेंच याचें रूप प्रचारांत आहे. 'प्रतियोगी सहकारिता' या शब्दाचा विशिष्ट अर्थाने सध्या मराठींत उपयोग करण्यांत येतो. परन्तु तो बरोबर नाही. 'प्रतियोगी' हा संबंधिशब्द आहे व तो अभावाच्या अपेक्षेने स्वतःचें प्रतियोगित्व दाखवीत असतो. (यस्याभावः स प्रतियोगी) हा प्रतियोगी नेहमीच **अभावाशीं असहकारिता करणारा** असतो; फार काय, तसा तो नसेल तर त्यास प्रतियोगी म्हणतांच येणार नाही हें कोणत्याहि न्यायशास्त्रज्ञास सांगण्याचें कारणच नाही. तात्पर्य 'प्रतियोगी सहकारिता' या शब्दाला कांही अर्थच नाही. 'प्रतियोगी असहकारिता' असा शब्द होऊं शकेल पण त्यांत हा विवक्षित अर्थ येणार नाही. कारण प्रतियोगीची अभावाशीं नेहमीच असहकारिता असते. या अर्थाचा खरा शब्द हिंदींत रूढ केला गेलेला आहे आणि तोच बरोबर आहे. 'प्रतिसहकार' हाच तो शब्द. जसें उत्तरास प्रत्युत्तर दिलें जातें. उत्तरच नसेल तर प्रत्युत्तरहि नाही. त्याचप्रमाणे सरकारने 'सहकार' दाखविला तर जनतेचे पुढारीहि 'प्रतिसहकार' दाखवितील. म्हणून 'प्रतियोगी

सहकारिता' हा शब्द लांबलचक व चुकीचा असून 'प्रतिसहकार' हाच शब्द सुटसुटीत व बरोबर आहे.

५ वितंडवादः—हा शब्द निष्फळ वादास लाविला जातो. पण निष्फळपणा कोणत्या दृष्टीने हें बहुधा कोणास स्पष्टपणें माहीत नसतें. परन्तु पुढील गौतमसूत्राप्रमाणे तो कळून येईल. 'वितंडवाद' असा मूळ शब्द नसून 'वितण्डा' असा पारिभाषिक शब्द आहे त्याचें लक्षण

'स प्रतिपक्षस्थापनाहीनो वितण्डा' १. २. ३.

असें आहे. ज्यामध्ये परपक्षाचें खण्डण करण्यातच वादी गुंतून गेलेला असतो व स्वतःचें म्हणणें सिद्ध करून दाखवीत नाही त्या वादास वितंडवाद असें म्हणतात. कोणत्याहि वादास 'वितंडवाद' म्हणण्यापूर्वी वरील सूत्रांतील लक्षण त्यास लागू पडतें किंवा नाही हें पाहिलें पाहिजे.

६ शब्दच्छल—'शब्दच्छल' किंवा 'शब्दाचा कीस काढणें' यांचा प्रयोग बहुशः न्यायशास्त्रसंमत अशाच रीतीने मराठींत केला जातो. एखाद्या शब्दाचा प्रयोग कोणत्या अर्थाने केला जातो हें माहीत असूनहि मुद्दाम अवयवार्थाने किंवा अलाक्षणिक अर्थाने त्याचा अभिप्राय कल्पून वक्त्यास दोष देणें यास 'छलम्' अशी पारिभाषिक संज्ञा आहे.

वचनविघातोऽर्थविकल्पोपपत्त्या छलम् । १. २. १०

या गौतमसूत्रांत याचें विशेष खुलासेवार वर्णन केलेलें आहे. 'मी कोल्हापुरी चिवडा आणिला आहे' असें म्हणून चिवडा पुढे करितांच 'हा तर नुसता चिवडाच आहे, कोल्हा आणि पुरी कोठे आहेत?' असें विचारणें; तसेंच 'मी त्याच्या घरावरून आलों' असें म्हणतांच 'खोटें बोलतोस! त्याच्या घरावर चढणेंच शक्य नाही' असें सांगणें हीं सर्व 'शब्दच्छलां'चीं (किंवा न्यायाच्या परिभाषेप्रमाणे 'छला'चीं) उदाहरणें होत. 'छळवाद' हा शब्दहि यावरूनच निघाला आहे. ज्या वादांत असले छलप्रयोगच फार, तो छलवाद किंवा छळवाद होय.

७ कांटा काढून टाकणें:—'त्याने त्याचा कांटा काढून टाकिला' म्हणजे त्याची होत असलेली अडचण (त्याला दूर करून) नाहिशी केली. पण हा अर्थ या वाक्प्रचाराचा कसा व्हावा? सरळ पाहिल्यास 'त्याने त्याचा—त्याच्या पायास बोचलेला—कांटा काढला,' अर्थात् 'त्याचें दुःख नाहिसें करून त्यास सुखी केलें' असाच अर्थ दिसतो. मग हा उलटा अर्थ कोठून आला? या प्रश्नाचें योग्य उत्तर न्यायशास्त्रांतील 'कण्टकोद्धार' या शब्दाने मिळेल. दोन पक्षांत विवाद चालून त्यांत एकाचा पराजय होतांच विजयी पक्षाने 'त्याचा पराजय झाला' असें जाहीर करून त्याचा गर्व हरण करणें यास 'कण्टकोद्धार' अशी संज्ञा आहे. व या पारिभाषिक शब्दावरूनच मराठींत हा वाक्प्रचार रूढ झाला असावा. परंतु हा आमचा

तर्क बरोबरच असेल असें ठासून सांगता येत नाही. कारण संस्कृतांतहि ज्याचा क्वचितच उपयोग होतो त्याचें मराठी रूप इतकें प्रसृत कसें होऊं शकेल !

८ **अनुमान**:— अंदाज. अर्थ बरोबर आहे. पण थोडा फरक आहे. 'तो परीक्षेंत नापास होणार असें मीं पूर्वींच **अनुमान** केलें होतें.' यांत 'अनुमान' या ऐवजी 'अनुमिति' असा शब्द न्यायशास्त्राच्या परिभाषेप्रमाणे पाहिजे. एखाद्या पुराव्याच्या आधाराने जी अटकळ बांधिली जाते त्यास 'अनुमिति' असें नांव आहे. उ० वरील उदाहरणांत 'तो परीक्षेंत नापास होणार' ही 'अनुमिति' होय. ही अनुमिति ज्या पुराव्याने उद्भवते त्यास 'अनुमान' असें म्हणतात. उदाहरणार्थ वरील ठिकाणीं 'अभ्यास न करणें' वगैरे गोष्टींस अनुमान म्हणणें रास्त होईल. असो. न्यायशास्त्राचा मराठींत अधिक प्रसार होईल तेव्हाच अनुमान व अनुमिति यांतला सूक्ष्म फरक दाखविण्याची आवश्यकता उत्पन्न होऊन 'अनुमिति' हा शब्द प्रचारांत येईल व अनुमान शब्दाचें योग्य स्थान त्या शब्दास प्राप्त होईल. तोंपर्यंत 'अनुमान' शब्दासच अनुमितीचें काम करावें लागणार !

९. **सिद्धसाधक**:— एखादी अगोदरच ठरविलेली गोष्ट जणूं काय नव्यानेच करीत आहोंत अशी बतावणी करणारास हें नांव देण्यांत येतें. 'सिद्ध' पुरुष व त्याचा शिष्य तो 'साधक' अशा जोडीचा वाचक हा शब्द आहे अशी सामान्यतः समजूत आहे. पण वस्तुस्थिति तशी नाही. न्यायशास्त्रांत 'सिद्धसाधन' हा एक दोष असून तो करणारास 'सिद्धसाधक'— म्हणजे प्रतिपक्षालाहि मान्य असलेलीच गोष्ट सिद्ध करूं पाहणारा— असें म्हणतात. हा दोष प्रतिपक्षाकडून ओळखला गेला तर वादीस वादांतून बाहेर व्हावें लागतें. उलट न ओळखला जाईल तर सरशीच होते. मराठींत या दुसऱ्या प्रकाराने हा दोष करणारास हा शब्द लावण्यांत येतो. परंतु मूळ उद्गम न्यायशास्त्रांतील उपर्युक्त पारिभाषिक शब्दांतच आहे. फार काय शब्द तोच अर्थहि तोच, फक्त उपयोग विशिष्ट वेळींच केला जातो एवढेंच !

१० **विषयान्तर**:— प्रकृत विषय सोडून दुसराच विषय धरणें. याच अर्थी न्यायशास्त्रांतील पारिभाषिक शब्द 'अर्थान्तरं' असा आहे. त्याचें लक्षण

प्रकृतादर्थादप्रतिसंबद्धार्थमर्थान्तरम् । ५. २. ७

याप्रमाणे आहे. या संस्कृत शब्दाऐवजी हा मराठी शब्द प्रचारांत येण्याचें कारण मराठी शब्द अधिक स्पष्ट अर्थाचा आहे हेंच असलें पाहिजे.

११ **यथा तथाच**:— एखाद्या गोष्टीचें अस्तित्व तर नाकबूल करतां येत नाही. पण अस्तित्व मानल्यास त्याजोगतें कार्य प्रत्यक्ष दाखवितां येत नाही. अशा वेळीं या वाक्प्रचाराचा उपयोग करण्यांत येतो. उदाहरणार्थ 'विठ्ठलपंत ग्रॅज्युएट आहेत तेव्हा त्यांस इंग्रजीचें ज्ञान नाही असें कसें म्हणावें ! पण खरें बोलायचें तर त्यांचें इंग्रजीचें ज्ञान 'यथा तथाच' आहे. यांत बचत्यास त्यांस इंग्रजी येत नाही,

असें सपशेल विधान करवत नाही. पण त्याचें मत मात्र तसेंच आहे. कारण त्याचा विठ्ठलपंतांच्या बाबतींतील अनुभव तेंच म्हणतो. या उदाहरणाचें नीट पृथक्करण केल्यास या वाक्प्रचाराचें मूळ हुडकून काढतां येईल. वरील उदाहरणांत 'विठ्ठलपंतास इंग्रजी येत नाही' हेंच वक्त्यास दाखवावयाचें आहे. परंतु त्यांची बी. ए. ही पदवी त्या विधानाच्या आड येत आहे. तात्पर्य ते 'बी. ए.' आहेत तेव्हा त्यांस इंग्रजी येतें असें अनुमानानें म्हणा पाहिजे तर, पण माझा अनुभव मात्र तसें म्हणत नाही' हाच वक्त्याचा अभिप्राय असतो. म्हणून ज्या गोष्टीसंबंधी प्रत्यक्ष पुरावा अगदी उलट असतां ती गोष्ट केवळ अनुमानानेच– किंवा अनुमान धक्क्यानेच म्हणा पाहिजे तर– सिद्ध केली जाते तेव्हा हा वाक्प्रचार प्रवृत्त होत असतो. आता अनुमानाने एखादी गोष्ट सिद्ध करण्याचा आणि 'यथा तथाच' याचा काय संबंध आहे हें पाहूं. न्यायशास्त्राप्रमाणे कोणतेंहि अनुमान मांडतांना पांच वाक्यें उच्चारावीं लागतात. आणि त्यांत वरील सर्व शब्द ('च' सुद्धा) क्रमाने येतात तीं वाक्यें अशीं:—

१ पर्वतो वन्हिमान्, २ धूमात्, ३ यत्र धूमस्तत्र वन्हिः, यथा महानसम्, ४ तथा च अयं, ५ तस्मात् तथा.

वरील पांच वाक्यांपैकी तिसऱ्या व चौथ्या वाक्यांत सदर वाक्प्रचार जसाच्या तसा दिसून येतो. 'च' देखील मराठी निश्चयार्थक नसून संस्कृत (समुच्चयार्थक) आहे. तात्पर्य न्यायांतील महत्वाचे शब्द जसेच्या तसे एकत्र घेऊन हा वाक्प्रचार बनलेला आहे.

**१२ असा तसा किंवा जसा तसाः**—'यथा तथाचें' हें मराठी रूपान्तर आहे. या रूपान्तरांत मुळांतील 'च' गळून पडला आहे एवढेच; बाकी अर्थ तोच! उ० रामशास्त्री जसा तसा–असा तसा–शास्त्री नव्हता; प्रत्यक्ष पेशवे त्याच्या हुकमतींत असत. या मराठी रूपान्तरापुढे नकारार्थी रूप येत असते त्यामुळे व्यक्तीची स्तुती करण्यास याचा उपयोग होतो. उलट मूळ संस्कृत रूपापुढे होकारार्थी रूप येत असल्यामुळे व्यक्तीच्या निंदेच्याच कामीं त्याचा उपयोग होतो, ही मराठीने केलेली संस्कृतची विटंबना आहे. पण त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. चेष्टा, कर्म, क्रिया, आर्ष, भूत वगैरे किती तरी शब्दांची याचप्रमाणे मराठीने दुर्दशा केलेली दिसून येईल! अस्तु!

वर न्यायशास्त्रांतील कांही शब्द दिले आहेत. याशिवायहि तर्क, तर्कट, तर्कवितर्क, आबाधित सिद्धान्त, अनैकान्तिक, सामान्यतः, विशेषतः, पक्ष, वादी उपाधी वगैरे कित्येक शब्द जसेच्या तसेच (कांही ठिकाणीं थोड्या फरकाने) रूढ झालेले दाखवितां येतील; पण तसें करावयास न्यायशास्त्राच्या परिभाषेंत अधिक खोल शिरावें लागेल; सबब येथेच विराम करणें बरें!

---

# पारिभाषिक शब्दकोश

## [ चिटणीस, मराठी शास्त्रीय परिभाषा मंडळ, यांजकडून ]

## भौमिक परिभाषा

### A

Abysmal = गभीर, खोल

,, Deposit = गभीर निक्षेप

Acids = अम्ले

Acid igneous rock = अम्ल महुल शीलक
अम्ल बहुत असलेले
अग्निजन्य खडक

Actinolite = ॲक्टिनोलाइट

Adamantine lustre = रत्नप्रभा

Aerolite = उल्का

Agate = अकीक

Age or period = युग

Agglomerate = अणीदार तुकड्यांचा अग्निजन्य खडक

Air volcano = वायुस्फोटक

Alabaster = अलॅबॅस्टर

Albite = अल्बाइट

Alkali metal = अल्क–धातु

Allotrimorphic = अनेकरूपी

Alloy = मिश्र धातु

Alluvial = पुळणीचा, ओंबाळणीचा

,, Bank = पुलिन

,, Fan = पुळण पखा

,, Land = पुळण देश

Alluvium = पुळण, ओंबाळ

Aluminium = आश्म ( धातु )

Amber = अंबर

Amethyst = नीलमणि स्फटिक

Ammonite = अमोनाईट ( प्राणी )

Amorphous = अरवक

Amphibole = अंफीबोल

Amygdaloidal = बदामी

Anchorice = तळ बर्फ

Andesine = अँडेसाईन

Angle = कोन, कोना

Anhydrous = अजल

Anorthite = अनोर्थाईट

Anthracite = अन्थ्रासाईट

Anticline = कमान

Apatite = अपाटाईट

Apophysis ( of erruptive rocks ) = अधोभाग

Aquatic = जलस्थ

Aquous = जलसंभूत

Aragonite = अरागोनाईट

Archeology = पुराणवस्तुविज्ञान

Argillaceous = मृण्मय

Artisian spring = उत्प्रस्त्रव, उत्स्वर

Asbestos = तपत्राण

Associated = सहवासी, संयुत

,, with = संगत

Association = संगति

Atoll = आटोल

Augite = ऑगाइट

Augite pyroxine = ऑगाइट पायरोक्झीन

Autoclastic = स्वयंभग्न

Avalanche = बर्फ लोट

Alkali = अल्क

### B

Ballast = खडी

Band = पट्टा

Bank = तट

Bank deposit ( river ) = तटनिक्षेप

Barium = भारद

Baryte = (बराइट)-भारदपाषाण
Basalt = कार, कारीचा दगड
Base = धातु
Basal = तळसर
Basic (rock) = अल्क, शैलिक अम्ल कमी असलेले (खडक)
Bearing iron = लोहगर्भ
Bed = स्तरसमुच्चय
Bed & Assise = महामंडल
Beach = पुलिन
Biolite = काळा अभ्रक
Bog = दलदलीचा प्रदेश
Bomb = गोळा
Boss = विशालगड
Boulder = धोंडा
Breccia = भेकसिगा
Brick clay = विटेची माती

C

Calcarious = चूर्णवान्, चुन्याचे
Calcite = सिरगोळा, खटिका
Calcify = खटपूरण
Calcium = खट (धातु)
,, Sulphate = खट गंधिक
Cambrium = कॅम्ब्रियम्
Canada balsam = कानडा बालसम
Carbon = अर्क, कर्ब
Carbonate = अर्बिक, कर्बिक
Carboniferous = अर्वपूरित
Carnelian = लालगार
Cavern = कुहर, गव्हर
Cavernous = कुहरांतील
Cellulose = सेल्यूलोस, काष्ठीर
Cemented = निबद्ध
Chaledony = गारगोटी
Chalybeate = लोहमिश्रित
Chapter = विभाग
Characteristic or typical = बोधक
Chemical composition = रासायनिक घटना
Chloride = हरक
Chlorine = हर
Chlorite = क्लोराईट
Chronicle = क्रमदर्शक वृत्त
Chronology = कालक्रम
Class = वर्ग
Classification = वर्गीकरण
Clastic (fragmented) = शकलित
Clay = चिकणमाती मृत्तिका
Cleavage = चीर, उत्पाटन
Cleaved rock = विदीर्ण खडक
Cliff = सुळका
Coal field = दगडी कोळशाचा प्रदेश
Coal measure = दगडी कोळशाचा काळ
Coast = समुद्र किनारा
Coastal deposit = वेळा निक्षेप
Colourless = निवर्ण
Columner = स्तंभाकृति
Combined = संयुक्त
Common salt = मीठ, लवण
Concretionary = पिंडीभूत
Conchoidal = शुक्तिकाकृति
Conformability = सुसंगति
Conglomerate = गोटयाळ
Consolidation = पक्का होणें, परिणति
Contact Goniameter = स्पर्शकोणमापक
Contact metamorphism = स्पर्शजन्य विकृति
Contemporaneous = समकालीन
Copper pyrite = मोरपंखी
Coral = प्रवाल
Cretaceous = क्रिटेशिअस
Crumpled = विदत
Crystal = रवक
Crystalline = रवाळ
Crystallite = मणिक
Crystallize = रवाळणें
Current bedding or False bedding = प्रवाहजन्य स्तर

Curvature = वक्रता, बाक, गोलाई

D

Debris = डबर
Decalcified = खटिकाविमुक्त लुप्तखाटिक खटिकाहीन
Decay = विनाश
Decayed = विनष्ट
Decomposition = विघटन, वियोजन
Dendritic = पर्णसम
Denudation = धौत
(Ore) Deposit = निधि
Deposit = संचय
Desert = मरुस्थल
Debritus = डबर
Devitrefication = विकाचित होणें, काचलोप
Devitrefy = विकाच होणें, काचविलोप
Devonion = डेव्हानियन
Digonal (lamination) = कर्णरेषेवर, तिरपट
Diallage = डियालेज
Diatome = डायाटम
Diopside = डायोप्साईड
Dip = अवपात
Discoloured = विवर्ण, वर्णांतरित
Disintegral / Disintigrated = विश्लिष्ट
Disintigration = कणशः क्षरण (झीज)
Dislocation = निखळणें
Displacement = खोदिलेला
Division = भाग
Dodecahedron = द्वादशपैलू
Dolerite = काळवत्री
Dolomite = डालोमाईट
Down throw fault = अधःपात
Drift of snow = हिमसंघात
Dyke = बंध, भित

E

Earth's crust = भूकवच
Earthy debris = वाहून आलेले डगर
Earth quake = भूकंप
Ejected = उत्क्षिप्त
Element = मूलद्रव्य, मोल
Enstatite = एन्स्टटाईट
Eocene = इओसीन
Erosion = उत्खनन
Erosion vally = उत्खात दरी
Erratic block = हिमापहृत
Eruption = उद्रेक स्फोट
Eruptive = स्फोटज
Escarpment = कडा तुटलेला, कडा
Evolution = विकास

F

Face = पृष्टभाग
Facets = पैलू
Faceted = पैलूदार
Family of minerals = खनिजकुल
Fault = पात
Felsite = फेल्साईट
Felsitic = फेल्साइटसारखा
Felspar = फेल्स्पार
Ferrugenous shale = काव
Ferruginous = लोहमिश्र
Fibrous = तंतुमय
Fire-clay = भट्टीची माती
Flow structure = प्रवाही रचना
Fluoride = प्लुवक
Fluorine = प्लुव
Fluor spar = प्लुवस्फटिक
Fold = घडी
Foliated = पर्णसम
Footprint = पाऊल उमट, पदचिन्ह, पदमुद्रा
Fossil = अवशेष, परिशेष
Fossiliferous = परिशेषमय
Fossilisation = परिशोषण
Fragmental / Clastic = शकलित

Free state = शुद्धस्थिति
Free stone = कुरंड शिळा
Fuse = द्रवणें
Fusion = द्रवण

G

Gabbro = गॅब्रो
Garnet = गोमेद
Gastropod = शंखयुक्त प्राणी
Geological action = भौमिक क्रिया, भूस्तरीय क्रिया
,, investigation = अन्वेषण
,, process = क्रिया
,, period = युग
,, record = इतिहास
Geology = भौमिक, भूस्तरशास्त्र
Giant crystal } = बृहन्मणि
Pegmatite }
Glacial mud = हिमनदीचा गाळ
,, period = हिमयुग
Glaciation = हिमरेखांकित
Glacier = हिमनदी
Glassy (luster) = काचेरी (चमक)
Glauconite = ग्लाकोनाइट
Globuler = गोलसर
Gneiss = नाइस
Gold bearing quartz = सुवर्णगर्भ गार
Goniameter = कोणमापक
Granite = ग्रानाइट
Granitoid = बृहन्मणिमय
Granular = कणमय
Gravel = ग्रावा. गणग
Grey Wacke = ग्रे वाक
Grit = रेव
Gritty = कणीदार रेवाळ
Group, stage = टप्पा
Gypsum = जिपसम, गोदन्ती (चिरोळी)

H

Hade = झोक
Haematite = हेमाटाइट
Halite = सैंधव
Hadenbergite = हेडेनबर्गाइट
Hemicrystalline = अर्धमणिमय
Hexagonal = षट्कोणी
Hollocrystalline = पूर्णमणिमय
Horizontal = आडवा
Hornblende = हार्नब्लेंड
Human period = मानवयुग
Hypersthene = हायपरस्थीन
Hydrochloric acid = हरा‌म्ल
Hydrofluoric acid = प्लुषाम्ल
Hydrogen = उज्ज
Hydrous = सजल
Hypabryssal = अतलस्थित
Hyp rsthen = हायपरस्थीन
Hypocrystalline = अर्धस्वाद्ध
Hypogene = अर्धनिगूढ

I

Igneous = अग्निसंभूत
Ilmenite = इल्मेनाइट
Incline = झुकणे, कलणें
Inclination = झुकावा, कल
Injected = अंत:प्रविष्ट
Intermitant (fountain) = राजापुरी, गतागतिक (झरा)
Interstratified = स्तरानुबद्ध
Iron = लोह
Ironstone = लोहपाषाण
Irruptive = स्फुटज
Isomeric = समावयवी

J

Jaspar = जास्पर
Joining of beds = स्तरसंधान
Joints = भेगा (खडक विलग होत असताना पडलेल्या)
Jurrasic = जुऱ्यासिक

K

Kaolin = चिनीमाती
Kunkar = चुनखडी

L

Labrodorite = लाब्राडोराइट
Lamellated = पापडीदार
Lamellation = पापडी
Lamelli branch = शिंपायुक्त प्राणी
Laminae = पदर
Land slide = भूविसर्प भूविसरकाण
Lapilli = लापिली
Lateral = पार्श्व
Lava = लाव्हा, खंगर, खडक-रस
Layer = स्तर, थर
Lepidomelane – लापिडोलेन
Lapidolite – लापिडोलाइट
Lignite – लिग्नाइट
Limestone = चुनखडक
Limonite = लिमोनाइट
Limoniticshale ( Yellow ) = पिवडी
Loess = लोएस

M

Magma = मागमा
Magnesium = मग्न ( धातु )
Magnetite = मग्नटाइट, मग्नपाषाण
Manganese = मंज
Marble = संगमरवर
Marine = समुद्रज
Marcocite = मार्कोसाइट
Marl (lake) = खडूची चिकण माती
Massive = स्थूल
Medial = मध्य
Metallic luster = धातुप्रभ
Metalloid = निमधातु
Metal = धातु
Metamorphosed = विकृत
Mica = अभ्रक
Microcline = मायक्रोक्लीन
Mineral = खनिज द्रव्यें
Miocene = मिओसीन
Mollusc = नाट, शंख शिंपायुक्त प्राणी
Monoclinic = प्रवर्त ( मणि )
Moraine = हिमोढ ( हिमप्रवाहाबरोबर आलेले) दगड
Mudstone = गाळाचा दगड
Mummy = ममी
Muscovite = मस्कोव्हाइट

N

Nebula = तेजोमेघ
Neck = कंठ
Neolithic age = नवअश्म युग
Neve = हिमदरी संचय
Nodule = पिंडक
Nonmetal = अधातु
Norite = नोराइट

O

Ocean = महासागर
Octahedron = अष्टपैलू
Oligocene = ऑलिगोसीन
Oligoclase = ऑलीगोक्लेज
Olivine = ऑलीव्हीन
Oolite = मोहरीद
Ooze = पाझरणें
Opal lustre = विमलक प्रभा, पुलक प्रभा
Opaque = अपारदर्शक, अनिर्गम्य
Ore = आयस
Organism = सावान (कोरि) अवयवी
Orthoclase = आर्थोक्लेज
Orthorhombic (Trimetric) = त्रिमितिक
Outcrop = विवृतभाग
Overlap = अतिव्याप्ति
Oxide = प्राण्यक, ऊर्वक
Oxygen = प्राण्य ऊर्व

P

Paleontology = अवशेषविज्ञान
Paliolithic = आद्य अश्मायुध काळ
Pearly lustre = मौक्तिक-प्रभा
Peat = पीट
Peat moss = शेवालयुक्त पीट

Pebble = वाण
Pegmatite = पेग्मटाइट
Pellicle = पापुद्रा
Perlitic = मळसूत्री
Permian = पर्मियन
Perennial spring = संतत झरा
Peroxide = प्रप्राण्यक
Petrification = अश्मीभवन
Phosphate = स्फुरिक
Phosphorous = स्फुर
Pich stone = राळेसारखा दगड
Pisolite = कळीदार
Plagioclase = प्लॅगिओक्लेज रेखा
Pleistocene or glacial = हिम काळ
Pliocene = प्लिओसीन
Plutonic = पाताळस्थित
Polygonal = बहुकोण
Porphyry = पॉर्फिरी
Porphyritic = बृहन्मणियुक्त
Post glacial = हिमोत्तर ( युग )
Potash Felspar = पालाश फेल्स्पार
Potassium = पालाश
Precambrian } = प्रीकँब्रियन
Archaean } आर्केइयन
Precipice = सुळका, कडा
Precipitate = साका
Prehistoric = इतिहासपूर्वकालीन
Primary } = प्राथमिक ( युग )
Paleozoic }
Prism = त्रिपेलु, त्रिधार
Prismatic ,, ,,
Pyrite = सुवर्णमुखी, माक्षीक
Pyramid = चितिका
Pyroxyne = पायरोक्झीन
Pumice = अश्मफेन
Pumicious = अश्मफेनमय

Q

Quarry = खाण
Quartz = गार
Quartz vein = गारेची शीर
Quaternary period = चतुर्थ युग

R

Radiolaria = रेडिओ लारिआ
Rain print = वर्षाचिन्ह
Range = विशिष्ट कालावधि
Regeonal = प्रादेशिक
Relic = अवशेष ( शेषभाग )
Remain = शेष
Resin = राळ
Resinous lustre = राळेरी चमक
Reverse fault = विपात
Ripple mark = तरंग, चिन्ह
Rock crystal = स्फटिक

S

Salt = लवण
Sand dune = वाळूची टेकडी
Sand stone = कुरद
Sealy = खवलेदार
Schist = शिस्ट
Scoriaceous = खगरी
Seam = सीवर्नी, शीव, शिवण
Sea quake = समुद्रकंप
Secondary } = द्वितीय ( युग )
Mesozoic } मध्य ( युग )
Sediment = गाळ
Sedimentary = स्तरविशिष्ट
Series = प्रकार
Series, section or formation = श्रेणी
Serpentine = सर्पेंटाइन
Shale = शेल
Shearing = विदारण, विच्छिन्न होणें
Sheet = पर
Shell = शिंपा
Shingle = गोटे
Siderite = सीडेराइट
Silicious = गारेचे

Silicon = शिलिक, शोल
Silky = रेशमी
Silurian = सिलूरिअम
Slag = मळी, खंगर
Slaggy = खंगरी, मळीचा
Slide = विसर्प, घसरण
Soapy = गुळगुळीत
Sodium = समुद्र
Soil = मार्ता
Spangle = चमकी
Species = जाति
Spectroscope = वर्णादर्श
Spectrum = वर्णावलि
Spherulite = गोलकल्प
Sponge = स्पंज
Stalactite = लोंबता शंकु
Stalagmite = चढता शंकु
Stratification = स्तरीभवन, स्तररचना
Stratigraphy = स्तरविज्ञान
Stration = रेषा
Stratum = थर
Strike = तीर
String mineral vein } = दोरी
Striated = रेखांकित
Structure = रचना
Subdivision = विभाग
Sublimation = संप्लवन
Subsidence = निक्षेप, अधःक्षेप
Subsoil = तळमार्ता
Substage = विशिष्ट, बृहन्मंडल
Substance = द्रव्य
Sulphate = गंधिक
Sulphide = गंधक
Sulphur = गंधक (समासात 'गंध')
Sulphuric acid = गंधिकाम्ल
Suncrack = भेगा
Superposition = उपरि रचना
Surff = खळाळी, कल्लोळ
Surface flowing spring = पृष्ठसंभव झरा
Syncline = उलटी कमान
System = काल

T

Talc = संगजिरे
Talus = पडलेले दगड
Tertiary keinozore = तृतीय (युग)
Tetragonal (dimetric) = द्विमित
Texture = पोत (रचना)
Thawing = वितळणें
Thin section = सूक्ष्मच्छेद
Throat = कंठनाळ, नरडें
Throw = फेक, क्षेप
Thrust plane = अपसृत
Tide = भरती ओहोटी
Till = हिमनदीचा गाळ
Tilt = झोक
Tilting = झुकाव
Transition = संक्रमण, संक्रमणावस्था
Translucent = अस्पष्टपारदर्शक, दुर्गम्य
Transparent = पारदर्शक, निर्गम्य
Tremolite = ट्रेमोलाइट
Triassic = ट्रायासिक
Triclinic = त्रिप्रवर्त
Trough = द्रोण
Tufa = टुफा
Tufty = पुंजकेदार
Twin crystal = जुळे मणि
Type fossils = विशिष्ट परिजीव

U

Unconformity = विसंगति
Upheaval = उत्क्षेप
Upthrow fault = उत्पात

V

Vasculose = वृक्षमूलोज
Vein = रेषा
Vertical = उभा
Vesicle = छिद्र
Vesicular = सच्छिद्र
Vitreous lustre = काचप्रभा
Volcanic Ash = ज्वालामुखी राख

W

Waxy lustre = मेणप्रभा
Weathered = वात-विदत, वाताहत
Weathering = विदति क्षिजण

Z

Zeolite = झिओलाइट
Zone = कक्षा मंडळ

# अभिप्राय

**साहित्यसुधा**:— (स. व प्र. गो. वि. राजगुरु, ३०५ सदाशिव, पुणें. किं. १० आणे). येथील सर परशुरामभाऊ कॉलेजांतील सारस्वत सेवासंघाचें हें द्वितीय पुष्प असून, यांत ३।४ खेरीज करून २५ वर लेख व कविता विद्यार्थ्यांच्याच आहेत. एखाद्या नांवाजलेल्या भारदस्त आणि भरदार मासिकाप्रमाणे ही साहित्यसुधा मराठी वाचकांना आवडेल यांत शंका नाही. भावी लेखक, कवी, ग्रंथकार, संशोधक इत्यादि साहित्यसेवकांच्या छोट्या प्रतिमा (पाळण्यातले पाय !) यांत स्पष्ट दिसून भावी भाषोत्कर्षाविषयी वाचकांच्या मनांत बरीच आशा उत्पन्न होईल. यांतील प्रेमविषयक लघुकथांतून आधुनिक विचारक्रांतीच्याहि लहान लहान लाटा उसळतांना पाहून सनातनी हृदयाला धक्का बसेल, तर जगाची पुढली घडी कशी बसणार आहे याचा अदमास असणाऱ्यांना त्यांत कांही विषाद न वाटतां, 'हें असेंच चालावयाचें' हा समाधानाचा विचार येईल. कॉलेजच्या विखुरलेल्या मासिकात्रैमासिकांतून जे कांही सुंदर लेख दिसतात त्यांचाहि अशा पुस्तकांप्रमाणे संग्रह होणें अवश्य आहे. 'कॉलेजवाङ्मय' म्हणून हा प्रयत्न स्तुत्य व अनुकरणीय आहे.

**बाईलवेड्याचा प्रताप** व १० गोष्टी:— (प्र. किर्लोस्कर मासिक, किर्लोस्करवाडी, जि. सातारा, औंध). किर्लोस्कर मासिकाच्या उत्कर्षमालेंतील हें सातवें पुष्प श्री. वि. स. खांडेकर, श्री. काशीबाई कानिटकर, श्री. शं. वा. किर्लोस्कर, श्री. ना. धों. ताम्हनकर या सारख्या प्रसिद्ध लेखकांनी फुलविलें असल्याने त्याचा सुगंध मधुर व इष्ट असाच आहे. गोष्टींत शृंगाररस मुळींच नसतांहि त्या फार मनोरंजक व त्याबरोबरच उद्बोधकहि झाल्या आहेत. नुसत्या गोष्टीच वाचावयाच्या तर अशा वाचाव्या, असें बोट दाखवून सांगण्याजोग्या गोष्टी ज्या किर्लोस्कर मासिकांत येतात त्यांतील कांही निवडक या पुस्तकांत वेगळ्या छापल्या आहेत. 'किती थोडक्यांत असतें', 'बाईलवेड्याचा प्रताप', 'लक्ष्मीने दिलेली लक्ष्मी', 'देवाघरचा न्याय' या गोष्टी विशेष परिणामकारक आहेत.

---

# पुस्तकपरीक्षण

**शिक्षणविषयक नवे विचार—सं. भा. घों. कर्वे, किं. ३ रु.**
" शिक्षणविषयक नवे विचार " हें पुस्तक अभिप्रायार्थ आमच्याकडे पाठविल्याबद्दल आम्ही ग्रंथकर्त्यांचे आभारी आहों. शिक्षणाचा विषय हा अत्यंत महत्त्वाचा व जिव्हाळ्याचा असल्यामुळे त्याचप्रमाणे सध्या आमच्याकडे ह्या बाबतींत सर्वत्र काळाकुट्ट अंधःकारच पसरलेला असल्यामुळे श्रीयुत भास्कर धोंडो कर्वे यांनी संपादन केलेलें प्रस्तुत पुस्तक म्हणजे वर सांगितलेला अंधःकार नाहींसा करणारा एक आशाजनक दीपच होय. सर्व सुधारणांचा पाया म्हणजे शिक्षणपद्धतिच आहे. पण हा उगमच जर गढूळ पाण्याने भरलेला असेल तर त्या शिक्षणपानाने तृप्ति होण्याचें तर एकीकडेच राहो उलट पिणारे रोगग्रस्त झाले तर त्यांत आश्चर्य नाही. आम्ही आपलीं मुलें शाळा, पाठशाळांतून पाठवतों म्हणजे विद्यार्जनाकरिता म्हणून ज्यांच्या स्वाधीन करतों ते वस्तुतः सुशिक्षित अशिक्षित असल्यामुळे विद्यार्जनाच्या ऐवजी अज्ञानार्जन मात्र आमच्या मुलांच्या पदरीं पडतें. शिक्षणाच्या योगाने जे गुण विद्यार्थ्यांस यावे अशी आमची अपेक्षा असते ते येण्याच्या ऐवजीं अवगुणांचाच गठ्ठा घेऊन विश्वविद्यालयांतून मुलें बाहेर पडतात. लाखो रुपये आज आम्ही आमच्या मुलांच्या विद्येसाठी म्हणून खर्च करीत आहों त्याचा मोबदला आपल्याला कितपत मिळतो याचा विचार करण्यासहि मन धजत नाहीं. असो. प्रस्तावनेंत संपादकांनी शिक्षणाचें कार्य कसें व्हावयास पाहिजे याविषयी श्रीयुतकार यांचें जे विचार प्रविष्ट केलें आहेत ते अत्यंत मननीय असल्यामुळे त्यांचा पुनरुच्चार आम्ही येथे करीत आहों.

" शाळेतून बाहेर पडणारीं मुलें जर नागरिक या नात्याने आपलीं कर्तव्यें बजावण्यास नालायक असतील, जर त्यांना सभ्य व शिष्टसंमत चालीरीति माहीत नसतील, जर त्यांची आवडनिवड उच्च प्रकारची बनून जगाच्या व विशेषतः स्वदेशाच्या संस्कृतीची त्यांना ओळख झालेली नसेल, जर त्यांच्या ठिकाणीं सत्याची चाड उत्पन्न झाली नाही व मोठे झाल्यावर कांहीतरी बौद्धिक कार्य मन लावून करण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्ये उत्पन्न झालें नाही, जर उच्च ध्येय साध्य करण्याकरतां लागणारी चिकाटी, धैर्य आणि कार्यनिष्ठा त्यांना प्राप्त झाली नाही, जर सत्य, सौंदर्य आणि सौजन्य यांचा उदय त्यांच्या मनांत झाला नाही, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जर बौद्धिक, नैतिक व भावनात्मक शील मुलांमध्ये दिसून आलें नाही तर शिक्षणाचें कार्य अगदी फुकट गेलें, असें म्हणावें लागेल. "

हे विचार एका विद्याधिकारीसाहेबांचे आहेत संपादकांचे नाहीत हे ध्यानांत ठेवलें पाहिजे. संपादकांना ते पसंत असले तरी त्यांचा ठसा संपादकांच्या मनावर

चांगला उठला आहे की नाही याची आम्हांस शंका आहे. कारण त्यांनी स्वतः जर शिक्षणासंबंधी खोल विचार केला असता तर त्यांनी आपल्या ग्रंथाला दिलेलें नांव त्यांच्या त्या विचाराचें द्योतक नाही असें त्यास आढळून आलें असतें. "शिक्षणविषयक नवे विचार" याचा आम्हांस अर्थच कळत नाही. अशा बाबतींत जुने आणि नवे विचार असूं शकतील अशी आम्हांस कल्पना करितां येत नाही. लहानपणीं मुलीचें लग्न करावें असे विवाहविषयक जुने विचार होते त्या ठिकाणीं आता प्रौढपणीं विवाह करावा असा विचार उद्भुत झाला आहे. त्याचप्रमाणे शिक्षणाची गोष्ट आहे असें म्हणतां येईल काय? "नवे विचार" ह्या ऐवजी खरे विचार असें म्हणणेंच अधिक सोयीस्कर होईल असें आम्हांस वाटतें. शिक्षणमीमांसा हें तर नांव अधिक अन्वर्थक झालें असतें अशी आमची समजूत आहे. पुस्तकाला आरंभ शिक्षणाचें ध्येय या प्रकरणाने झाला आहे. यांत ध्येयाचा इतका बागुलबोवा करण्याचें वस्तुतः यत्किंचितहि प्रयोजन नाही. शिक्षणाचें ध्येय कोणत्याहि काळीं किंवा कोणत्याहि स्थळीं एकच असणार. तें काय असावें याबद्दल मतभेद होण्याचेंहि कारण नाही. तें ध्येय संपादन करण्याच्या साधनांत काल व परिस्थिति यांस अनुसरून बदल होण्याचा संभव असतो एवढेंच.

बुद्धि हे मनुष्याचें वैशिष्ट्य आहे. सचेतन सृष्टींत मनुष्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि प्राण्याला हें साधन परमेश्वराने उपलब्ध करून ठेवलेलें नाही. मनुष्याची सुधारणा व प्रगति हीं त्याने या बुद्धीच्या साह्याने करून घ्यावीं असा परमेश्वराचा संकल्प दिसतो. बुद्धिहीनत्वामुळे पशुपक्ष्यांना इतिहास नाही. सृष्टीच्या आरंभीं ज्या स्थितींत पशुपक्षी निर्माण झाले त्या स्थितींत बरोबर तो आजहि आहे व सृष्टीच्या प्रलयकालापर्यंत त्याच्यांत कांही बदल होईल असेंहि नाही. जडसृष्टि आणि मनुष्यसृष्टि यांच्यामधली ही जीवसृष्टि आहे. वेड्या मनुष्याचा मेंदू विकृत झालेला असतो अथवा मुळीच नसतो. अशा वेड्यांत आणि जनावरांत कोणताच फरक आढळून येत नाही हें आपण पाहतोंच. अर्थात् खरें मनुष्यत्व येण्यास बुद्धि हें इंद्रिय अपरिहार्य आहे हें उघड आहे. परंतु बुद्धींद्रियांत आणि इतर इंद्रियांत मूळचीच भिन्नता आहे ही गोष्ट प्रामुख्याने लक्षांत ठेवणें अवश्य आहे. इतर इंद्रियांची वाढ अथवा विकास होण्यास कोणत्याहि प्रकारचा प्रयत्न करावा लागत नाही. पाहण्याची शक्ति, श्रवणेंद्रियाचें सामर्थ्य किंवा दुसऱ्या कोणत्याहि कर्मेंद्रियाचें अथवा ज्ञानेंद्रियाचें सामर्थ्य वृद्धिंगत करण्यास शाळा-कॉलेजांत जावें लागत नाही; किंबहुना त्यांच्या वाढीची मर्यादा इतकी मर्यादित असते की, जन्मल्यापासून अल्पावधींतच त्यांची पूर्ण वाढ आपोआप होऊं शकते, यालाच मनुष्य सज्ञान झाला असे म्हणण्यांत येतें. ह्या सज्ञानावस्थेंत इतर ज्ञानकर्मेंद्रियांची वाढ पूर्ण झाली असली तरी बुद्धीची वाढ पूर्ण होते असें मात्र नाही. ही पूर्ण करण्यास परिश्रम करावे लागतात. म्हणून या बुद्धींद्रियाचा विकास करणें अथवा करविणें हें अत्यंत अवश्यक असल्यामुळे ह्या गोष्टीकडे समाजाने लक्ष प्रथम दिलें पाहिजे. इतर

इंद्रियें व बुद्धींद्रिय यांत दुसरा एक स्वभावतः भेद आहे तो हा की, इतर इंद्रियांची शक्ति जन्मतः बुद्धींद्रियापेक्षा अधिक असते. लहान मुलगा पाहतो, ऐकतो, पदार्थांची चव घेतो व सुगंधी पदार्थांचा वास घेतो त्या वेळेस त्याचें बौद्धिक सामर्थ्य जवळ जवळ शून्यच असतें. इतर इंद्रियांच्या मानाने मेंदूची वाढ फारच हळूहळू होत असते. सगळ्या इंद्रियांत जननेंद्रियाचीच वाढ सर्वांमागून होते. मेंदूच्या वाढीचा विचार करीत असतांना विशेष लक्ष्यांत घेण्यासारखी गोष्ट ही की, मेंदूची स्वाभाविक वाढ व त्याचा विकास हीं एकच नव्हत. मेंदूची स्वाभाविक वाढ झाल्यानंतरच त्याचें विकसन करण्याचा प्रयत्न करणें इष्ट होईल. या दृष्टीने ७ किंवा ८ वर्षे वयाचा मुलगा किंवा मुलगी होईपर्यंत म्हणजे त्याच्या मेंदूची वाढ पूर्ण होण्याच्या पूर्वीच त्याचा विकास करण्याची खटपट करणें योग्य होणार नाहीं. मेंदूच्या स्वाभाविक वाढीविषयी संशोधन करण्याचें काम शास्त्रज्ञांकडून अद्यापि झालें नाहीं याचें आश्चर्य वाटतें; अथवा या बुद्धींद्रियाची किंवा मेंदूची स्वाभाविक वाढ हें म्हणणेंच खोटें आहे असें तरी कोणी म्हणणार नाही ना? कदाचित् कोणी असें म्हटलेंच तर तें अनुभवाच्या विरुद्ध होईल असें वाटतें. ज्या इंद्रियाची वाढ उशीरा होते तें इंद्रिय श्रेष्ठ असा नियम बांधण्यास हरकत नाही. बुद्धींद्रिय हें श्रेष्ठ असल्यामुळे त्याची वाढ उशीरा होणेंच स्वाभाविक आहे. आणि या म्हणण्यांत जर कांही तथ्य असेल तर सात वर्षांच्या आंतील मुलांना शिक्षण देणें शास्त्रीय होईल की काय याचा विचार करणें अवश्य आहे. लहान मुलाला जन्मतः कमी दिसतें, कमी ऐकू येतें, त्याचप्रमाणे इतर ज्ञानेंद्रियांची शक्तिहि कमीच असतें. हीं इंद्रियें पुढे लवकरच पण हळूहळू वाढतात. मेंदूची वाढ सर्वांत मागून होते हे वर सांगितलेच आहे. ज्ञानेंद्रियांच्या वाढीनंतर त्यांच्यावर कोणताहि संस्कार करण्याची अवश्यकता असत नाही; परंतु बुद्धींद्रियाची स्वाभाविक वाढ पूर्ण झाली तरी त्याच्यावर शेवटपर्यंत संस्कार करावे लागतात ही गोष्ट विसरतां कामा नये. यावरून बुद्धींद्रियाच्या पायऱ्या येणेंप्रमाणे ठरतात. (१) बुद्धीची स्वाभाविक वाढ, (२) बुद्धीचा विकास अथवा परिणति आणि (३) ज्ञानार्जन. मेंदूची पूर्ण वाढ झाल्यावरच बुद्धीचा विकास करण्यास प्रारंभ करावा हे पूर्वी सांगितलेच आहे. येथे विशेष सांगावयाचें तें हें की, बुद्धीला चतुरस्रपणा आल्यानंतरच विद्यादानाला अथवा ज्ञानार्जनाला आरंभ करावा.

प्रस्तुत ग्रंथांत विद्वान् संपादकांनी बुद्धि शब्द न वापरतां त्याऐवजी बुद्धिपुरःसर मन शब्द वापरलेला आहे याचें कारण आम्हांस समजलें नाही. अंतःकरण अथवा मन याचें कार्य आणि स्वरूप बुद्धीहून निराळें असल्यामुळे आम्ही मन आणि बुद्धि यांमध्ये भेद मानतों. मन एक असो अथवा अनेक मनें असोत त्या वादांत सध्या पडण्याचें कारण नाही. तथापि मनविषयक हा वाद बुद्धीच्या संबंधानेहि उत्पन्न होण्यासारखा आहे. प्रत्येकाच्या बुद्धीचा क्रमाक्रमर्यादेपर्यंत विकास होणें अवश्य आहे, पण त्याशिवाय प्रत्येक व्यक्तीची बुद्धि एखाद्या विशिष्ट विद्येचें किंवा कलेचें आक-

# अभिप्राय

**मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहासः**— [१८१०–१९२७] (महाराष्ट्रीय ख्रिस्ती साहित्यसेवा-मंडळाचें प्रथम गुच्छ— प्र. रे. भा. कृ. उजगरे, सासवड, जि. पुणें. किं. ८ आणे). गंगासिंधूसारख्या अफाट नद्यांच्या पवित्र प्रवाहाकडे पाहून मोठा आदर वाटतो आणि अत्यानंद होतो व त्या आपल्याच भूमींत आहेत याबद्दल धन्यताहि वाटते; पण त्या कसकशा वाढत आल्या आहेत, त्यांना कोणत्या उपनद्या, ओढे, नाले, पाट वगैरे येऊन मिळतात याचा विचार एकदम मनांत येत नाही. तथापि अशा अनेक लहान लहान प्रवाहांमुळेच गंगासिंधूचें वैभव दृग्गोचर होत असतें. अशीच गोष्ट वाङ्मयाचीहि आहे. आपलें मराठी वाङ्मयच घ्या; त्याचा आधुनिक उत्कर्ष कोणाहि महाराष्ट्रियांस आनंदवील व आपली मातृभाषा मराठीच आहे हें कबूल करण्यास आता कोणासहि लाज वाटणार नाही. पण या अभिवृद्ध मराठी वाङ्मयांत ख्रिस्ती, इस्राएल, इस्लामी यांसारख्या अहिंदु धर्मीयांनी केलेल्या साहित्य-सेवेचाहि बराच भाग आहे ही जाणीव प्रथम येत नसली तरी, प्रस्तुत पुस्तकाच्या वाचनाने ती निःसंशय येणार आहे.

ख्रिस्ती मिशनऱ्यांनी हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व देशी भाषांचा अर्वाचीन पद्धतीप्रमाणे उद्धार केला असें म्हटल्यास मुळीच चुकीचें होणार नाही. कारण या भाषांतून त्यांना 'देवाच्या पुत्राचें शुभवर्तमान' सर्व जनतेला कळवावयाचें होतें. तेव्हा बायबलचीं भाषांतरें-- उतारे-- प्रार्थना वगैरे प्रसिद्ध करण्याचा त्यांनी सपाटा चालविला होता. आपल्याला देशी भाषा नीट अवगत व्हाव्या म्हणून सर्व भाषांचीं व्याकरणें आणि कोश हीं तयार करविलीं. या त्यांच्या प्रयत्नामुळे अनायासेंच देशी भाषांतून नवीन ग्रंथरचना होऊं लागली. असाच एक मराठी ग्रंथ म्हणजे फादर टॉमस स्टीफन या गोव्यांतील रोमन कॅथोलिक ख्रिस्ती मिशनऱ्याचें "ख्रिस्तपुराण" होय. हा ग्रंथ १६१६ सालीं प्रथम छापला. 'जैसी हरळांमाजी रत्नकिळा। कीं रत्नांमाजी हिरा निळा। तैसी भाषांमाजी चोखळा। भाषा मराठी॥' इत्यादि त्याचीं वचनें वाचून एकनाथयुगांतील या ख्रिस्ती महाकवीबद्दल आपला आदर दुणावतो. यानंतर कलकत्त्याचा सुप्रसिद्ध मिशनरी विल्यम केरी याने १८१० सालीं पहिला मराठी कोश रचिला. याच सुमारास अमेरिकन मिशनऱ्यांच्या वसाहती महाराष्ट्रांत होऊं लागलेल्या दिसतात. १८१७ सालचा पहिला मुंबईचा लांकडी छापखाना यांच्यापैकींच होय. लेफ्टनंट कर्नल केनेडी, कॅप्टन मोल्सवर्थ आणि मेजर कँडी यांचे मराठी-इंग्रजी, इंग्रजी-मराठी कोश सुप्रसिद्धच आहेत. मोल्स्वर्थ मराठी-इंग्रजी कोशास अद्याप कोणी मोठा प्रतिस्पर्धी झाला नसल्याने त्याचें महत्त्व अबाधित आहे. यापुढची महत्त्वाची साहित्यसेवा म्हणजे ॲकर्थ व शाळिग्राम यांनी संग्रहित केलेले ऐतिहासिक

पोवाडे होत. रे. स्टीव्हन्सन् ( मराठी व्याकरण ), डॉ. विल्सन् ( मराठी भाषेवर निबंध ), हेग (व्याकरणासंबंधी सोपे धडे), रे. ब्रूस ( ज्योतिःशास्त्राचीं मूलतत्त्वें) इ० अनेक युरोपियन मराठी भक्तांनंतर जेव्हा रे. हरी रामचंद्र ख्रिस्ती व भागोबा पवार (किनीकर) या मराठी ख्रिस्ती कवींचा आपण परिचय करून घेऊं लागतो तेव्हा कोठेसा या ख्रिस्ती मराठी वाङ्मयाविषयी आपलेपणा आपणांत उत्पन्न होतो. यांच्या काव्याचा कांही स्वाद रे. भास्करराव उजगरे यांनी आपल्या ख्रिस्ती साहित्याच्या समालोचनेंत दिलाच आहे ( पृ. २०—२२ ).

रे. बाबा पदमनजी यांच्यापूर्वी रे. मोडक व गोरे यांचे धार्मिक ग्रंथ वाचनीय वाटतील. बाबा पदमनजींची ग्रंथरचना फार अफाट व विविध स्वरूपाची आहे. शंभर सव्वाशें पुस्तकें त्यांनी लिहिलीं. त्यांत कोश, धार्मिक आणि सामाजिक विषयांचे ग्रंथ, चरित्रें आणि निबंध आढळतील. 'अरुणोदय' हें त्यांचें आत्मचरित्र मोठें मनोरंजक आणि उद्बोधक वाटेल. पितापुत्र चिपळूणकरांखेरीज पदमनजींसारखा जाडा ग्रंथकार गेल्या शतकांत दुसरा सांपडणार नाहीं. रे. नवलकर हेहि बाबांसारखे मोठे विद्वान होते. त्यांचे 'नवीन मराठी व्याकरण', 'मराठी भाषेचें इंग्रजी व्याकरण' वगैरे व्याकरण-विषयक ग्रंथ अभ्यासण्याजोगें आहेत.

ख्रिस्त-उपासनेंत फक्त पाश्चात्य इंग्रजी धर्तीवरचीं पदें १८६१ पावेतों गाण्यांत येत. ह्या वेळपावेतों मराठी ख्रिस्त्यांना स्वतंत्र काव्यरचना करण्यास मुळींच वाव मिळाला नव्हता तो कृष्णाजी रत्नाजी सांगळे यांनी देशी चालीवर पद्यें रचून करून दिला. 'गायनामृत' आणि 'कृष्णरत्न' हीं त्यांचीं पुस्तकें यामुळेच ख्रिस्ती समाजांत प्रिय झालीं आहेत. रे. ना. वा. टिळकांना या स्वतंत्र काव्यप्रांतांत स्वैर विहारण्यास सांगळ्यांनीच वाट करून दिली असें म्हटल्यास तें चुकीचें होणार नाही. रे. टिळकांपूर्वी पंडिता रमाबाईंचा मोठ्या आदराने उल्लेख करावा लागेल. 'स्त्रीधर्मनीति' व 'युनायटेड स्टेट्सची लोकस्थिति' हे त्यांचे दोन ग्रंथ चिरकाल टिकतील.

रे. टिळक हे मराठी ख्रिस्ती समाजाचे मोठे उद्धारक म्हणून जे समजले जातात तें अगदी खरें आहे. रे. उजगरे यांनी त्यांना ख्रिस्ती वाङ्मयाचे चिपळूणकर म्हटलें आहे. पण आम्ही त्याबरोबरच त्यांना त्या समाजाचे लो. टिळक व आगरकर असेंहि म्हणतों. कारण काळ्या ख्रिस्ती समाजाचा उत्कर्ष त्यांच्यामुळेच झाला. त्यांना युरोपियन ख्रिस्तीहि फार मानतात हें याच पुस्तकांतील पहिल्या ( डॉ. मॅक्निकल ) व शेवटच्या ( रे. एड्वर्ड्स् ) निबंध लेखकांच्या गौरवोक्तीवरून दिसून येईल. शिवाय हिंदुस्थानांत ख्रिस्ती लोकांसंबंधीं चांगलें मत प्रथम रे. टिळकांपासूनच होऊं लागलें. सर्व मराठी भाषेवर रे. टिळकांनी उपकार करून ठेवलेले आहेतच याबद्दल दुमत राहणार नाही; पण त्यांतल्या त्यांत महाराष्ट्रीय ख्रिस्ती वाङ्मयांत त्यांचा हात धरणारा दुसरा कोणी अद्याप झाला नाही. पूर्वीच्या नामदेव—तुकारामादि संतकवींच्या पावलांवर पाऊल टाकून त्यांनी ख्रिस्ती उपासनेला मोठा रसाळपणा आणि गंभीरपणा आणून दिला;

तो इतका की, युरोपियन मिशनरी संस्थाहि त्यांच्याकडे कृतज्ञताबुद्धीने पाहतात व त्यांचे अनुकरण करण्यास इतर हिंदी ख्रिस्ती समाजास बजावतात (पृ. १०८–९). उच्च वर्णीय हिंदू विद्वान् ख्रिस्ती झाल्यास त्या समाजास कसा उन्नतीस पोंचवितो याचीं उदाहरणें म्हणून रे. गोरे, पंडिता रमाबाई, रे. टिळक हीं देतां येतील. युरोपियन ख्रिस्ती व नेटिव्ह ख्रिस्ती यांमधील दुवा म्हणून की काय रे. टिळकांचें धर्मांतर झालें! असो.

रे. टिळकांच्या अनुकरणाने त्यांच्यामागून बऱ्याच मराठी ख्रिस्ती मंडळींनी उत्कृष्ट ग्रंथरचना करण्याचें काम हातीं घेतलें आहे. टिळक कुटुंब, रा. ब. आठवले, ढालवाणी, उजगरेबंधू, सावरकर, आढाव वगैरे अनेक लेखकांचीं नांवे घेतां येण्यासारखीं आहेत. पण स्थलाभावीं हात आंखडिला आहे. डॉ. ॲबट यांनी मराठी संतकवींचा सुसंगत अभ्यास करून त्यांचीं इंग्रजी चरित्रें प्रसिद्ध करण्याचें काम हातीं घेतलें आहे. आपल्या 'महाराष्ट्र संतकविमालें'त त्यांनी आजवर भानुदास, एकनाथ, भिक्षुगीत, दासोपंत दिगंबर, बहिणाबाई, स्तोत्रमाला व तुकाराम हीं सात पुष्पें प्रसिद्ध केलीं आहेत. डॉ. मॅकिकन्, एडवर्ड्स वगैरे इतर युरोपियन मिशनऱ्यांचें मराठी साहित्यसेवेकडे चांगलें लक्ष आहे.

अशा रीतीने मराठी ख्रिस्ती साहित्याचें स्थूल समालोचन केल्यानंतर रे. उजगरे यांनी ख्रिस्ती मराठी नियतकालिकांची यादी त्यांच्या माहितीसह जी दिली आहे (पृ. ३४–४०) तीहि मराठी साहित्येतिहासाच्या दृष्टीने उपयुक्त वाटेल.

ज्ञानोदयाचा पहिला अंक १८४२ त निघाला. म्हणजे आज त्या वर्तमानपत्राला ९० वें वर्ष आहे. मराठींत आज सर्वांत जुनें तेंच ठरेल. ज्ञानप्रकाश सहा वर्षांनी लहान आहे. सत्यदीपिका ( १८६१ आता बंद ), बालबोध मेवा (१८७३), प्रकाशक ( १८७८ ), स्त्रियांची मैत्रीण ( १८८६ ), सिंहनाद (१८९०) हीं गेल्या शतकांत सुरू झालेलीं मासिकें फारशी ऐकिवांतहि नसतात. यांखेरीज ५।६ नियतकालिकांद्वारें मराठीची सेवा विद्यमान ख्रिस्ती समाज करीत आहे. आजपावेतों या समाजाचें स्वभाषेकडे आपल्याप्रमाणे दुर्लक्ष होतें, याला बहुंशीं कारण इंग्रजी भाषेच्या फाजील महत्त्वाचा मनावर बसलेला मोठा पगडा. मध्यंतरी यांच्या भाषेला जें मिशनरी वळण मिळालें होतें त्याचाहि विनोदी नमुना ४३–४४ पृष्ठांवर दिला आहे. व मराठी ख्रिस्ती समाजाने स्वभाषा संभाळून तिचें संवर्धन करण्यासाठी काय काय केलें पाहिजे यासंबंधी ज्या बऱ्याच सूचना केलेल्या आहेत (४८–५०), त्या अंमलांत आल्यास मराठी ख्रिस्ती वाङ्मय निःसंशय अतिश्रेष्ठ दर्जाचें बनेल व त्याचा सूक्ष्म अभ्यास केल्याखेरीज वाङ्मयसेवकाला गत्यंतर राहणार नाही.

ख्रिस्तीवाङ्मय हें महाराष्ट्रसारस्वताच्या प्रासादांतील एक लहानसें दालन असून, त्या दालनांत प्रवेश करण्यास आजपर्यंत इतर वाङ्मयभक्त कचरत असत, किंवा त्याच्या उपयुक्ततेबद्दल फार साशंक असत. आता ते दालन या पुस्तकाच्या किल्लीने

मालकांनीच उघडलें असून त्यांत प्रवेश करण्यास ते आतिथ्यपूर्वक आमंत्रण करीत आहेत. 'बेने-इस्राएल लोकांनी मराठी वाङ्मयांत घातलेली भर' या मे. सालोमन सॅमसन् यांच्या १२ व्या महाराष्ट्र-साहित्य संमेलन-वृत्तांतील निबंधामुळे तें अज्ञात दालन जसें आपणांस खुलें होऊन साम्राज्याभिमानामुळे (अर्थात् स्वभाषेच्या) अत्यानंद झाला तसाच सात्विक आनंद या मराठी ख्रिस्ती वाङ्मयाच्या साग्र इतिहासामुळे होणार आहे. या पुस्तकाच्या प्रकाशनाचा इतिहासच आपल्या ख्रिस्ती बांधवांच्या ठिकाणीं असलेली स्वभाषेविषयी आस्था दाखवीत आहे. १९२७ सालीं नाशिक येथे महाराष्ट्रीय ख्रिस्ती लोकांचें पहिलें संमेलन झालें. त्यांत या पुस्तकांत आता संग्रहित केलेले सदर महत्त्वाचे निबंध वाचण्यांत आले. चार वर्षांनंतर ते निबंध त्यांवरची धूळ झाडून, उसनवारी करून (गरीब ख्रिस्ती साहित्यभक्तांपासूनच !) व एक नवीनच महाराष्ट्रीय ख्रिस्ती साहित्य-सेवा-मंडळ स्थापून प्रसिद्ध करण्याचे कांहीं वाङ्मयभक्तांनीं ठरविलें व 'ख्रिस्ती लोकांमध्ये अशा तऱ्हेचें पहिलेंच पुस्तक' निर्माण करण्याचा मान मिळविला. या त्यांच्या श्रमाचें मराठी वाचक चीज करतील अशी आशा वाटते.

चिंतामण गणेश कर्वे

---

# जादूचें पुस्तक

## ( एक चिनी लघुकथा )

( अनुवादक:— वासुदेव विश्वनाथ गोखले )

[ चिनी वाङ्मयांत सतराव्या शतकांतील ग्रंथकार ‘ पू सुङ् लिङ्’ याचा ‘ ल्याव् ची इ ’ नामक कथासंग्रह फार प्रसिद्ध आहे. ‘ पू सुङ् लिङ्’ च्या लघुकथा जगांतील इतर कोणत्याहि वाङ्मयांतील उत्तमोत्तम लघुकथांच्या तोडीच्या असून त्यांची भाषासरणी चिनी वाङ्मयाच्या परंपरेला अनुसरून साधी व प्रौढ आहे. आपल्याकडील सूत्रपद्धतीप्रमाणे वाक्यें लहान लहान व अर्थपूर्ण असूनहि स्पष्ट व सुसंस्कृत अशीं आहेत. प्रस्तुत गोष्ट या कथासंग्रहांतूनच घेतली असून हिच्यांत उपहासात्मक विनोदाची छटा पसरलेली आहे. हिचें जर्मनींतील ‘ सिनिका ’ मासिकाच्या पांचव्या वर्षाच्या पहिल्या अंकांत लिङ् त्सिऊ सेन् यांनी केलेलें एक सरस जर्मन भाषांतर उपलब्ध आहे. ]

‘ लान् यू जौ ’ चा जन्म एका जुन्या व बहुश्रुत घराण्यांत झालेला होता. अनेक पिढ्यांपासून या घराण्यांतील माणसांना पुस्तकांचा थोडा फाजील नाद असे. त्याचे वडील राज्याध्यक्षाचें काम करीत असत. ते मोठ्या काटकसरीने वागणारे असून जरा एकलकोंड्याप्रमाणेच रहात; आपली सारी शिलकी मात्र त्यांनी पुस्तकांत खर्चीं घातली होती ! हा पुस्तकांचा नाद त्यांच्या मुलाला आनुवंशिक हक्काने प्राप्त झाल्यासारखाच होता; इतकेंच नव्हे तर मुलगा अत्यंत पितृभक्त असल्यामुळे ‘ सुङ् ’ वंशांतील ‘ येन् जुङ् ’ नामक बादशहाच्या वेळेपासून चालत आलेले आपल्या कुळाचें बीजमंत्रहि मुलाने अगदी आत्मसात् करून टाकले होतें ! वाटेल त्या वेळीं सहज वाचतां यावेत म्हणून त्याने ते मंत्र आपल्या अभ्यासाच्या मेजासमोर भिंतीवर चिकटवून ठेवले होतें. ते असे:—

श्रीमंती कमवावया न पिवळीं शेतें इथे लागती, ।
ग्रंथीं त्यांहुनिही हजारपट जे तांदूळ ते पावती ! ॥
वाडे का मनि वांछिसी ? धरिसि का त्यांची अशी आवडी ! ।
त्यांची शोधुनि घे सुवर्णकुलुपें ग्रंथांतरीं चोखडी ! ॥ १ ॥
स्त्री व्हावी बरवी जरी तरि कुणी मध्यस्थ कामा नये, ।
ग्रंथांमाजि तुला मिळेल विमला ‘ रत्नप्रभा ’ गा स्वयें ! ॥
दारिद्र्या न जुमानि त्या तव, न हो कष्टी बहु अंतरीं ।
गाड्या-घोडेहि भेटतील तुजला ग्रंथीं बहुतापरी ! ॥ २ ॥
वाटे जरा हें सगळे मिळावं । ग्रंथीं तरी नित्य बुडूनि जावे ॥
तुवां बसावे खिडकीसमोर । जेथे असे स्वच्छ उजेड फार ! ॥ ३ ॥

यू जौ आपल्या पुस्तकांत इतका बुडून गेला की, त्याला बाहेरच्या जगाची शुद्धच राहिली नाही. आपल्या सोयऱ्याधायऱ्यांची, सग्यासोयऱ्यांची, कुणाचीच नाही ! वडील वारल्यावर त्याच्या घरची स्थिति फार हलाखीची होत चालली. पण तसतसा त्याचा पुस्तक-वाचनाचा हव्यास वाढतच चालला. इतका वाचनाचा नाद असूनहि तो वीस वर्षांचा झाला तरी अजून ठोंब्याच राहिला होता ! आपला परक्यासारखा; व्यवहार काडीचा ठाऊक नाही; इतके नडीचे दिवस आले तरी चार पैसे मिळवायचीसुद्धा अक्कल नाही ! बाकी त्याला इच्छा म्हटली तर कशाचीच नव्हती; एकदा वाचायला बसला म्हणजे ऊन की गारसुद्धा कळत नसे ! कोणी आप्त किंवा बरोबरीची मित्रमंडळी भेटायला आली की, त्याच्या मोठे जिवावर येई व वहिवाटीचें औपचारिक बोलणेंचालणें झाल्याबरोबर तो परत येऊन पुन्हा आपल्या पुस्तकांचा आश्रय करी.

वडिलोपार्जित मिळकत थोडी थोडी करून सारी विकून टाकावी लागली. पुस्तकाचें मात्र नाव काढायची सोय नव्हती. मेंदूवर केवळ फाजील ओझें लादलं गेल्यामुळेच त्याची पहिली प्रवेशपरीक्षासुद्धा उतरली नाही !

एकदा तो एक पुस्तक वाचीत बसला असतां तिकडून सोसाट्याचा वारा आला. आणि त्याबरोबर तें पुस्तक घराबाहेर उडून गेलें. यू जौ त्याचा पाठलाग करूं लागला. तसें करता करता त्याचा पाय जमिनींतील एका भेगेंत अडकला. पाय बाहेर काढून पहातो तों त्याला तिथे पुष्कळ वर्षांपूर्वी पुरून ठेवलेलें आणि वरवर गवत उगवलेलें असें तांदळाचें एक ताट सापडलें. तांदूळ खाण्याच्या लागीचं मुळीच नव्हतें खरं. तथापि यू जौला मात्र वाटलें की, आपल्या बीजमंत्रांतील गोष्ट आज खरोखरीच प्रत्ययास आली !

त्यानंतर कांही दिवसांनी आपल्या कपाटावर उंच ठिकाणीं एक पुस्तक धुंडाळीत असतां यू जौच्या हाताला एक लहान घट्ट असें कायसेंच लागलें. उजेडांत येऊन पहातो तो तें बुद्धाचें एक लहानसें सिंहासन होतें ! ते त्याने एका जवाहिऱ्याकडे विक्रीसाठी नेलें. त्याने परीक्षा करून सांगितले की, त्यावर सोन्याचा जुसता मुलामाच चढविला आहे ! यू जौला फार वाईट वाटलें. मग त्याला असा विचार पडला की, आता ही देणगी म्हणून एकाद्याला देऊन खूप करतां येईल; तर ती कुणाला द्यावी ? अखेरीस त्याने तें आसन आपल्या परलोकवासी पित्याच्या एका बड्या अधिकारावर असणाऱ्या सहाध्यायाला नजर केलें. या आदरप्रदर्शनामुळे त्या अधिकाऱ्याला इतका आनंद झाला की, त्याने तीनशे मोहोरा आणि दोन घोडे परत भेटीदाखल पाठवून दिले ! यू जौची आता खात्रीच झाली की, सिद्धी जरी थोड्या आडमार्गाने चालत येत असल्या तरी आपला बीजमंत्र अखेरीस सुफळसंपूर्ण झाल्याशिवाय रहात नाही !

यू जौ म्हणजे मोठा सात्त्विक मनुष्य;— जवळ जवळ साधुपुरुषच तो ! ऐहिक गोष्टींचा त्याला कधी स्पर्शसुद्धा होत नसे. तथापि आपल्याबद्दल सहानुभूती बाळगणारे कोणी तरी माणूस जवळ असावें असें त्यालाहि वाटूं लागलें. मग तर तो पूर्वी कधी नाही इतका आपल्या पुस्तकांत गढून गेला ! मात्र पानें चाळतां चाळतां अचानक त्यांतून एकादी सुंदर परी बाहेर

पडेल काय अशी आंच त्याच्या अंतःकरणाला लागून राहिली होती. तीस वर्षांचा झाला तरी अजून याला बायको नाही म्हणून लोकहि हळुहळू चेष्टा करूं लागले.

त्या सुमाराला लोकांमध्ये अशी एक अफवा उठली होती की, रात्रीच्या वेळीं आकाशांत 'कृत्तिका' नक्षत्र अजीबात दिसेनासेंच झालें आहे. तेव्हा एकजण हसत हसत येऊन चेष्टेने त्याला काय म्हणतो: "पहा बुवा ही 'कृत्तिका' तुझ्या पुस्तकांत कुठे सांपडली तर! तशी श्रद्धा ठेवलीस तर एकादे वेळीं लग्न साधूनहि जायचा!"

यावर दोन वर्षें गेलीं. यू जौ आता बत्तीस वर्षांचा झाला होता, तरीसुद्धा एकाद्या थोरल्या बाळाप्रमाणे त्याची वृत्ति असे. एकादी गोष्ट समजेनाशी झाली की, त्याच्या मनाला आपली सारखी रुखरुख लागून राहायची! एके दिवशीं रात्रीं असा अगदी कंटाळून जाऊन 'हान्' रियासतीच्या नवव्या खंडाचीं पानें चाळीत बसला होता. पानें उलटतां उलटतां त्याला मधेच एक सुंदर स्त्रीचें चित्र दिसलें! त्याबरोबर कांपऱ्या कांपऱ्या आवाजांत स्वतःशीच काय म्हणतो: "काय, माझ्या साऱ्या इच्छा या चित्रामुळेच तर पूर्ण होणार नसतील ना?" त्याच विचारांत गर्क होऊन तो चित्राकडे पहात बसला. तिचे डोळे अगदीच कांही निर्जीव दिसत नव्हते. पापण्याहि उघडत होत्याशा वाटल्या. पान उलटून चित्राच्या मागच्या अंगाला काय लिहिलें आहे म्हणून पहातो तो— 'कृत्तिका'! एकूण जिचा ध्यास लागून राहिला होता तीच अखेर आली म्हणायची! तें चित्र त्यानें मेजावर काढून ठेवलें. वाचन बंद केलें. खाणेंपिणें व झोंपहि तो विसरून गेला. तो अनिमेष दृष्टीने तिच्या डोळ्यांकडे पहात राहिला. अखेर त्या दृष्टीच्या प्रभावापुढे टिकाव लागेना म्हणूनच की काय, तें चित्र हळुहळू जिवंत होऊं लागलें! एक छोटीशी परी त्या पानांतून बाहेर पडली आणि पुस्तकावर येऊन हसतमुख उभी राहिली! यू जौला आनंदाश्रूंच्या भरांत जवळ जवळ दुसरें कांही दिसेनासेंच झालें. त्या चिमुकल्या मूर्तीला त्यानें अत्यंत आदराने वाकून नमन केलें. पुन्हा वर पहातो तो ती मूर्ती हातभर उंच झालेली! तो चकित होऊन पहातच राहिला. ती हळुहळू त्याच्या अगदी जवळ येऊन उभी राहिली. त्याने पुन्हा एकदा नमस्कार केला. आता त्याचे लक्ष तिच्या सौंदर्याकडे गेलें, तें खरोखरीच अप्रतिम होतें! मग एकदाचा धीर करून तिला म्हणाला: "तूं कोणी देवता आहेस काय? येथे तूं कोठून आलीस? कोण तूं?"

ती स्मितहास्य करून म्हणाली: "माझें नाव रत्नप्रभा. तूंच माझें हृदय आकर्षण केलेंस! पूर्वजांवर इतकी श्रद्धा ठेवणारा तुझ्यासारखा सात्त्विक पुरुष हजारो वर्षांत दुर्लभ आहे!"

आनंदातिशयामुळे यू जौला आपण जणूं काय स्वप्नांतच आहों असें वाटूं लागलें. ती सुंदरीहि त्याला कधीं विसंबली नाही.

वाचनाचा हव्यास सोडून देण्याविषयी रत्नप्रभेने त्याची अनेकवार विनवणी केली, पण पुस्तकांच्या वेडापुढे तिचा कांही इलाज चालेना. 'दुसरे विद्यार्थी उन्हाळ्यांतील आणि हिवाळ्याच्या आधीची अशा परीक्षा केव्हाच पास होऊन गेले सुद्धा!' म्हणून उपरोधिक बोलून पाहिलें, तरी त्याचा कांही उपयोग झाला नाही. शेवटीं सांगितलें: "आता वाचन कमी कर,

तरच परीक्षेत कांही धडगत लागेल. तूं वाचन बंद ठेवणार नसलास तर मी आपली जातें कशी ! " यानंतर थोडे दिवस त्याने पुस्तकें बाजूला ठेवली. पण फिरून त्यांनी आपला पगडा त्याच्यावर बसविलाच. एके दिवशीं तर अभ्यास करून करून यू जौच्या डोक्यांत गोंधळ उडून गेला. तेव्हा आपल्या सुंदरीच्या मुखाकडे पाहून मन थोडे रिझवावें म्हणून त्याने आपलें पुस्तक बाजूला ठेवलें. पण पहातो तों ती कोठेच सांपडेना ! ती गुप्त झाली होती. तो कष्टी झाला आणि तिचें नांव घेऊन हाका मारूं लागला. उत्तर कांही येईना. आता करणार तरी काय ? अगदी प्रथम ती ज्या पुस्तकांत दिसली होती त्या पुस्तकाकडे तो धावला. पूर्वीच्याच जागीं रत्नप्रभेचें चित्र त्याला आढळलें. मग त्याने तिच्यापाशीं पुष्कळ लाडीगोडी करून पाहिली, हात जोडले, नांव घेऊन तिला आळवलें तरी तिच्या डोळ्यानें पातेंसुद्धा हलेना. अगदी हताश झाला ! डोळ्यांत पाणी आणून त्याने तिच्यासमोर गुडघे टेकले. तेव्हा ती आली एकदांची; आणि म्हणाली: " अजूनहि जर तुला माझ्यापेक्षा पुस्तकांचीच चाड अधिक असेल आणि माझें जर ऐकायचें नसेल तर मी एकदा शेवटचीच जाईन. मग मात्र मला पुन्हा परत येतां येणार नाही हो ! "

त्याचा नाद घालविण्यासाठी ती त्याच्यापाशीं बुद्धिबळे खेळी. तिचें मन मोडूं नये म्हणून यू जौहि खेळत असे. पण खेळांत त्याला कांही मौज वाटत नसे. एकटा असला की हळूच पुस्तकांकडे वळलाच ! असाच एके दिवशीं चोरून वाचत बसला असतां ती अचानक आली. त्याने चटकन पुस्तक लपवायचा प्रयत्न केला, पण साधलें नाही. चकार शब्दसुद्धा न बोलतां ती तेथून निघून गेली. बिचाऱ्याच्या मनांत चर्र झालें ! त्याने लगेच तिच्या चित्राचें पुस्तक बाहेर काढून पाहिलें. पण काय ? पानें कोरीच होती ! तिचें चित्र जाग्याला नव्हतें. त्यावर अनेक दिवस लोटले. शोकविह्वल होऊन तिला हुडकण्याच्या आशेने तो पानें चाळीत बसे. अखेर पश्चात्तापाने हृदय व्याप्त होऊन तो उद्गारला, " रत्नप्रभे ! रत्नप्रभे !! आता ये एकदाची ! ये, तुझ्याइतकी मला पुस्तकें प्रिय नाहीत. तुझ्यावांचून मी आता जगत नाही ! एकदाच परत ये; मी तुझ्या अर्ध्या वचनांत रहायला तयार आहे ! " तोच मंदस्मित करीत ती पुनरपि त्याच्यापुढे प्रगट झाली. मग पुन्हा बुद्धिबळाचें खेळ सुरू झाले. यू जौला आता इतका उत्साह आला होता की, तिसऱ्याच दिवशीं त्याने दोन डाव जिंकले ! तीन दिवसानंतर ती त्याला गाणें बजावणें शिकवूं लागली. पांच दिवस होतात तों त्याला त्यांत इतकी गोडी वाटूं लागली की, पुस्तकांची आठवणसुद्धा होईना ! त्याची ती प्रगती पाहून तिलाहि मोठें समाधान वाटलें.

त्याचें व्यसन कायमचें सुटावें म्हणून ती आपलें जाळें अधिक अधिकच पसरूं लागली. कधीकधी दोघे मिळून मदिरेची उपासना करीत. 'चार लोकांशीं जाणेंयेणें ठेवीत जा' म्हणून ती त्याची मनधरणी करी. तिच्या प्रीतीखातर तो तसेंहि करायला तयार होई. लोक म्हणूं लागले कीः 'यूजौ पार बदलून गेला, इतकेंच काय पण 'सांघातिक' बनला !' एके दिवशीं दोघेजण मोठ्या मजेंत जेवीत बसले होते. यू जौने आपल्या लावण्यवती परीकडे विशिष्ट प्रेमपूर्ण नजरेने पाहिलें आणि एकदम म्हणालाः "पण अजून आपल्याला मुलें कशीं झालीं नाहीत ! आपलें परस्परांवरील प्रेम तर इतकें अगाध आहे की त्यापेक्षा अधिकाची कल्पनाहि करवत नाही.

म्हणतात तर खरें कीं, नवराबायकोचें एकमेकावर इतकें आभाळ्यासारखें प्रेम असलें म्हणजे मुलाचें सुख पहायला मिळतें म्हणून !"

ती जरा मोठेपणाचा भाव आणून व मधुरपणानें हंसत बोलली: "तरी मी नव्हतें म्हणत, कीं तुझें वाचन इतकें दांडगें, पण त्यांत नवराबायकांसंबंधी आतापर्यंत एकसुद्धा प्रकरण आलें नसेल म्हणून ! खरोखरीच तुझें माझ्यावर इतकें प्रेम असेल तर होईल मेली तीसुद्धां इच्छा पूर्ण ! म्हणतात नां, कीं 'बायकांची जात आणि चूलमुलांशीं गाठ !"

यू जौने पुन्हा विचारलें: "मग काय काय करायला हवें ?"

ती हसली; त्यांतील अर्थ गूढ होता !

त्यांचे प्रेम जेव्हां पुत्ररत्नाचें रूपाने फळास आलें तेव्हां त्यांच्या सुखाला पारावार राहिला नाही. यू जौ प्रत्येकाजवळ जाऊन आपल्या दांपत्यसुखाची ग्वाही देऊं लागला. पण त्या गोष्टीची इतकी वाच्यता न करण्याविषयी रत्नप्रभेने त्याला चतुर शब्दांत ताकीद दिली ! त्यावर त्याने एकाद्या लहान मुलाप्रमाणे उलट विचारलें: "काय ? आपल्या मनाला जें जें वाटतें तें तें असें अगदी आंतल्याआंत चोरून ठेवायला, इतके का लोकांना एकमेकाचें एकमेकांस कळेनासें झालें आहे ?"

याप्रमाणे दोन वर्षेंपर्यंत नवरा, बायको व मूल अशी आपल्या स्वर्गीय ऐक्यसुखांत नांदत होती. तों रत्नप्रभेला दिसून आलें की, यू जौचें पुस्तकाचें व्यसन पुन्हां वर डोकें काढीत आहे. खिन्न अंतःकरणाने ती त्याच्याकडे येऊन म्हणाली, "माझी आता जायची वेळ झाली !" ते शब्द त्याला वज्राघाताप्रमाणे भासले. हतवीर्य होऊन तो तिला आपल्या मुलाची शपथ घालूं लागला. रत्नप्रभा किती वेळ तरी बोललीच नाही. शेवटीं एवढे म्हणाली: "याला आता एकच उपाय ! मी थांबावें असें असेल तर तूं आपल्या साऱ्या पुस्तकांवर पाणी सोड ! ती जाळून टाक !"

तो गोंधळून जाऊन म्हणतो: "पण पुस्तकें म्हणजे तर माझा जीव की प्राण,—होय ना ? मग ती तुला आपल्याच घरचीं अशीं का वाटत नाहीत ?"

"करच हा एवढा स्वार्थत्याग; माझी तुला हात जोडून विनंती आहे !"

यूजौ मान हलवीतच राहिला. रत्नप्रभा अधिक अधिक आर्जवें करून बोलूं लागली: "माझ्या प्रीत्यर्थ तुला हा सर्वांत मोठा स्वार्थत्याग करावा लागणार हें मी जाणून आहे; पण करून टाकच एकदाचा ! हा मोह तुला सोडायचाच नसेल, तर मला इथून निघून जाण्याशिवाय दुसरें गत्यंतर नाही ! मी तीन वेळा माझ्या शृंखला तोडून टाकल्या; तिन्ही वेळा तुझ्याकडे परत आलें. चौथी वेळ मात्र माझ्या हातची नाही !" यू जौने तिचे शब्द कानांनी ऐकले खरें, पण त्याचें डोकें पुस्तकांच्या कचाट्यांत सापडलें होतें ! याच्यावर आता आपली सत्ता राहिली नाही हें पाहून रत्नप्रभेला वाईट वाटलें. मुकाट्याने ती नवरा आणि मूल यांना सोडून चालती झाली !

यू जौला तिची आठवण होऊन पहातो तो ती निघून गेलेली ! त्याने मोठमोठ्याने ओरडून हाका मारल्या, पण उत्तर मिळालें नाही. पूर्वी ज्या पुस्तकांत तिचें चित्र सापडलें होतें तें त्याने बाहेर काढलें. तापाने फणफणल्यासारखे होऊन त्याने त्यांतील पानें भराभर चाळून पाहिली.

तिचा पत्ता लागला नाही. कळून चुकले, की आपल्याला आणि मुलाला ही आता कायमची अंतरली! त्यानंतर यू जो कित्येक दिवस उदासपणें इतस्ततः भ्रमण करीत राहिला. ती अजूनहि कदाचित् आपल्याकडे परत येण्याचें मनांत आणील या आशेवर त्याने आपल्या प्रियतम मानलेल्या पुस्तकांची आहुती देऊन टाकली! रत्नप्रभा माघारी फिरली नाही ती नाहीच!!

दुःखाच्या भरांत, हुंदके देत देत आपल्या पुत्राजवळ येऊन त्याने जमिनीवर अंग टाकलें, आणि विलाप करूं लागला: "मला मूर्खाला अगोदरपासूनच का आपलें व्यसन आवरतां आलें नाही! अखेरीस एवढी अक्कल सुचायला माझ्यावर आधी आपल्या सर्वस्वाची अशी होळी करण्याची पाळी का यावी? माझ्या पापामुळे तूं आपल्या आईला अकालीं अंतरलास खरा, पण आता निदान तूं तरी आपल्या आयुष्यांत मोहाला बळी पडूं नयेस म्हणून मी तुझा खराखुरा पाठीराखा होईन! माझ्याप्रमाणे तुला आपल्या व्यसनाचा गुलाम बनता कामा नये. प्रसंग पडताच स्वार्थत्याग करण्याची तयारी कशी असावी लागते हें मी तुला आता चांगलें शिकवीन. लोकांशीं प्रेमाने वागायला तुला शिकलें पाहिजे. तळपणाऱ्या सूर्याच्या सोन्यासारख्या प्रकाशांत तुला हौसेने रहाटलें पाहिजे! उपवनें व पुष्पें पाहून तुला हर्ष वाटला पाहिजे! आपल्या दोघांचे डोळे आता आकाशांतील तारागणाकडे लागूं देत आणि त्याच्याच प्रकाशांत त्यांना मातृनक्षत्राचें -'कृतिके'चें—दर्शन घडूं दे!!"

———

# दशावतार

[संग्राहकः-रघुनाथ कृष्ण पाटणकर, राजापूर]

सूत्रधारः ॥ शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशं ॥ विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभांगं ॥ लक्ष्मीकांतं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यं ॥ वंदे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथं ॥१॥ या कुन्देन्दुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रान्विता ॥ या वीणावरदंड-मंडितकरा या श्वेतपद्मासना ॥ या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वंदिता ॥ सा मां पातु सरस्वती भगवती निःशेषजाड्यापहा ॥२॥ मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरीन् ॥ यत्कृपा तमहं वंदे परमानन्दमाधवं ॥३॥ समचरणसरोजं सांद्रनीलांबुदाभं ॥ जघननि-हितपाणिं मंडनं मंडनानां ॥ तरुणतुलसिमालाकंधरं कंजनेत्रं ॥ सदयधवलहासं विठ्ठलं चिंतयामि ॥४॥ गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ॥ गुरुःसाक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवेनमः ॥५॥

थैय दैई दधाधि जाधिळा गधा ॥ नारायणके नमो नमो जय नारायणकी नमो नमो ॥ थयाताथेताथयाताथे ॥

मेघैर्मेदुरमंबरं वनभुवः श्यामास्तमालद्रुमैर्नक्तं भीरुरयं त्वमेव तदिमं राधे गृहं प्रापय ॥ इत्थं नन्दनिदेशतश्चलितयोः प्रत्यध्वकुंजद्रुमं । राधामाधवयोर्जयंति यमुनाकूले रहः केलयः ॥ आधी देवसखा नागमपूजित सडमृगसारिराधा नमो नमो ॥ थया ताथ० ॥ नारायणके नमो नमो है ॥ चिंतामणि नमो नमो ॥ केशवमाधवमुकुंदमुरारे दशरथनंदन देवारे ॥ थैया ता० ॥ (माधवी येतो) भलि भलि भाजन गोपीजनरंजन सहमृगरारिराधा नमो नमो ॥ थया० ॥ (माधवी बोलतो) आहो ॥ (सूत्रधार) बहले ॥ (मा०) प्रथम आरंभ जाहले ॥ आता कोण यावे हो ॥ (सूत्र०) गोपाळ यावे ॥(मा०) कैसे प्रकारचे ॥ राधामुग्धमुखारविंदमधुपस्त्रैलोक्यमौलिस्थली नेपथ्योचितनीलरत्नमवनीभारावतारक्षमः ॥ स्वच्छन्दव्रतसुन्दरीजनमनस्तोषप्रदोषःश्चिरं कंसध्वंसनधूमकेतुरवतु त्वां देवकीनंदनः ॥ माथां मयूरपिच्छरत्ने कर्णि वरी कुंडले ॥ श्रीकंठे च वनमालिका कटितटी पीतांबरें वेष्टिला ॥ ऐसा जो नट लाघवी हरिमुखीं पांवा बरा वाजवी ॥ योगीमानसराजहंस-वनिता कंदर्प हे मारकणी ॥ सहित्यासो हरिगुणबुकल्यासो ॥ नमो नमो हरि हो हरि हो माधव देवा ॥ देवा रे गोपाळा ॥ थेयाताथे० ॥ आदौ हरि नाम् गणपति हरि नाम् धिता धित्ताभुक्दिडताता दिग् दिगताताथे ॥ गोविंदा गोपाळा ॥ ( येऊन नाचतात ) थयाताथे ॥ (अवसान) (मा०) आरे लफारे लफा ॥ (सूत्र०) बहुलेशवासा ॥ (मा०)

रोसंन् ॥ नायकाच्या धोत्रामध्ये लफा ॥ अरे येर ये ॥ (सूत्र०) कोणाला हटिकृतोसा ॥ (ना०) एथे हरिकथा मांडली आहे ॥ येथे रोसंन् नायिक् च्यार पाहिजेत् ॥ पैकी येकहि नाही ॥ तेन्हा साच्या काकाला त्याच्या आज्याला ॥ अरे हो राम चलो ॥येया०॥ अहो गोपाळा रे कोठेहो गेला कोठेहो गेला ॥ साजणी गेला ॥ येयाता० ॥ कायावीणे शिणहो जाये तरु आता करु काये अजुनी का हरि न ये हंस सये चालिला हरि कुठे हो गेला ॥ येया० ॥ अत्रिभुवनामाजी थोर जाहाला त्रिभुवन व्यापुनि थोर ॥ जाह० ॥ ब्रह्म सनातन ॥ सांडुन रेखुन मानुनि कैचा थोर ॥ जा० ॥ आनंदात्मज आनंदात्मज येता चुकला घोर ॥ जा० ॥ आयो मासावन आयो मादेरे ये माझराडरी पावनका सावन आ ॥ थया० ॥ (गोपाळ जातात) (ना०) अहो प्रथम आरंभ जाहले, गोपाळ नृत्य करून गेले, आता कोण यावे ॥ अयावारु यावे ॥ आयावारु यावे ॥ कैसे प्रकारचे हो ॥ वेदानुद्धरते जगन्निवहते भूगोलमुद्बिभ्रते ॥ दैत्यान्दारयते बलिं छलयते क्षत्रक्षयं कुर्वते पौलस्त्यं जयते हलं कलयते कारुण्यमातन्वते म्लेच्छान्मूर्च्छयते दशाकृतिकृते कृष्णायसितुभ्यंनमः ॥ (ब्रह्मदेव येतात) प्रलयपयोधिजले धृतवान् असिवेदं ॥ विहितवहित्रचरित्रमखेदं ॥ केशवधृतमीन शरीर जय जगदीश हरे ॥

थयथय ॥ अवसान ॥ (सूत्र०) आहो ॥ बहले सभेच्या ठायीं पर्वतासारिखे उभे ठाकले कोण म्हणावे हो हो ॥ आमला काय ठाऊक हो हो ॥ (सूत्र०) आमाला गणपतीकार भासतात ॥ गणपती म्हटल्यास कैसे प्रकारचे हो ॥ यस्य माता उमा देवी पिता यस्य तु शंकरः ॥ मूषको वाहनं यस्य स मां पातु विनायकः ॥ आहो ॥ बहले ना० ॥ गणपती म्हटले सिंधुराचे लेपन असते सुंढा असते मूषकाचे वाहन असते ते कांहीच भासत नाही हे विष्णुकार भासतात ॥ विष्णु म्हटल्यास कैसे प्रकारचे ? शांताकारं भु० ॥ ना०॥ विष्णु म्हटले शंख चक्र हस्तामध्ये असतात्, वस्त्र पीतांबरधारी असते, गळयामध्ये वैजयंतीमाळा असते, गरुडाचें वाहन असते ॥ तें कांहीच भासत नाही ॥ हे सांभाकार भासतात् ॥ सांभ म्हटले कैसे प्रकारचे ? विभूतीच्या लेपे शरिर अत्रे शुभ्र विलसे ॥ स्मशानी जो राहे कटिरुचिरव्याघ्रांबर दिसे ॥ स्वभावे निर्वाणी सुरनरमुनी ज्यासि जपती ॥ असा शंभो ध्याहो सकल तुमचे दोष हरती ॥ अर्थ पुरती ना० ॥ सांभ म्हटले व्याघ्रपरिधान असते विभुतीचे लेपन असते गळामध्ये रुंढाच्या माळा असतात्, नंदी वाहन असते, अर्धांगी पार्वती असते तें कांहीच् भासत नाही हे मनुष्याकार भासत् आहेत. स्वामी कोठुन आले पुसावे ॥ स्वामी आपले सार्थक नाम कायहो ॥ आहो ॥ बहले कानडया मुलखाहुन आलेले असतील; यांना कानडया भाषेने विचारू या ॥ स्वामि येलिन् बंदिन् येलिन् बंदिन् ॥ ना० ॥ आहो ॥ बहले (ना०) ॥ स्वामिला येलिन् बेलिन् कांहीच समजत नाही ॥ हे शुद्ध गोदातीराहुन आलेले आहेत ॥ त्यांना तेलंगी भाषेने हटका ॥ स्वामि येकुण वछला येकुण वछला हो ॥ आहो ॥ बहले (ना०) ॥ स्वामिला येकुण बिकूण कांहीच समजत नाही ॥ शुद्ध महाराष्ट्र देशांतुन आलेले आहेत त्यांना शुद्ध महाराष्ट्र भाषेने विचारा ॥ स्वामि आपले

सार्थक नाम काय हो ॥ ( काठी वर करितात् ॥ ) ना० ॥ आईकतात तर खरे कळासाहुन मृत्यु लोकाचे ठाई कोणत्या कारणास्तव आलेत् तें पुसावें ॥ ब्रह्मदेव देशपरिभ्रमण अस्तु निरंतर व्यासिरस्तु ॥ ना० आम्हि म्हटले तथास्तु ॥ प्रस्तुत काळि तेच करीत अस्तु ॥ ना० ॥ स्वामि आपले सार्थ० ॥ ब्रह्मदेव ॥ अडीचनायकाहो ॥ ना० ॥ स्वामि कुटुंबाची कांही गरज नाही ॥ आपले सार्थ० ॥ ब्रह्मदेव ॥ साडेतीन पोरे हो ॥ ना० ॥ अडीच बायका साडेतीन पोरे येक म्हणी राव खुडे मागुन पुढून बेरजेस ताळा घ्यावा स्वामि ॥ ब्रह्म० अडीच खंडी तंदुळा पाहिजेत हो ॥ अलकारप्रियो विष्णुर्जलधाराप्रियःशिवः नमस्कारप्रियो भानुर्ब्राह्मणो भोजनप्रियः ना० ॥ आहो ॥ बहुले ना० ॥ त्यांना ब्राह्मणसंतर्पण कर्णेची फार इच्छा आहे ॥ कोठुन आलेत पुसावे ॥ स्वामि आपले सार्थ० ॥ ब्रह्मदेव ॥ ब्रह्मा ॥ना०॥ कोण ब्रह्मा चतुर्मुखः ॥ ना० ॥ कोठे आहे ॥ ब्रह्म० ॥ पाहुन घ्या ॥ एक दोन तीन चार ॥ ना० ॥ येकला आहा की शिष्ये आहेत ॥ ब्रह्म० ॥ कोटी ॥ ना० कोठे आहेत ॥ ब्रह्म० ॥ गंगातिरी ॥ ना० ॥ बोलावल्यास ॥ ब्र० ॥ येतील ॥ अरे हो राम चलो ॥ नायीक भेटती हरिहरा ॥ असे काय केले ॥ असे काय केले ॥ बहुता काळी गुरु-शिष्या भेट जाहली; मागुन पुढुन क्षेम आलिंगन दिलेन्, आता येक येक आसन द्यावे ॥ ना० ॥ हे घ्यावे ॥ सर्वेषु गात्रेषु शिरःप्रधानं ॥ ते साहून भूमि आसन धरावे ॥ काठी तांब्या नेऊन् ठेवितात् ॥ ( ब्रह्मदेव बसतो) आसन झाले, अग्र उदक आणुन द्यावे ॥ स्वामिराज हें गंगातीरचे उदक घ्यावे ॥ असे काय केले ना० ॥ उष्णकाळ तृषा फार लागली, थोडें उदक प्राशन केले ॥ ते उच्छिष्ट जाहले नुतन आणून द्यावे; ना० ॥ स्वामिराज हे गंगातिरचे उदक घ्यावे ॥ देतो ॥ दोन शेत्रा ॥ कोष्टयाच्या घरीं ॥ गर्भ सावळी ॥ गंगेचे तिरीं ॥ काष्ठकुमंडलु ॥ कुंभाराघरीं ॥ व्याघ्रचर्म व्याघ्रावरी असे घेऊन संकासुर नामे दैत्य सप्तसमुद्राचे पला तिरास राहत असतो ॥ त्याला तुम्ही आम्ही आमचे पकवाजी मिळून गजेर शब्दे करु या म्हणजे येइल ॥ अरे हो वेदा-हरिणा संकासुरा आहो ॥ बहुले संकासुर नामे दैत्य त्याला निद्रेचे वेसण फार आहे तेव्हा तुम्हि० ॥ ( पूर्ववत् ) वेदाहरिणा संकासुरा ॥ ( संकासुर येतो, संकासुर बोलतो) ॥ आरे चाप ॥ आक् थु ॥ सुईवर सुई ॥ इत्यादिक ॥ बायको खाली दादला ॥ ना० ॥ या प्रांती नसतो ॥ संका. ॥ या प्रांतीं असतो असे घालून सप्त समुद्राचे पला तिरास फुलाच्या झाडामध्ये आम्ही फार चांगली मजा केली ॥ ना कचीहो ॥ सं० ह्या हातामध्ये ह्या हातई ॥ त्या० ॥ संकासुरा संकासुरा कोणी हटिक्ले ॥ ना० ॥ आम्ही हटिक्ले ॥ सं० ॥ कशाकरिता हटिक्ले ॥ ना० ॥ ब्रह्मदेव गोसावी जपा करिता जपा ॥ सं० ॥ त्याचे गफाः ॥ ना० ॥ जपा म्हटले तुला समजत नाही ॥ सं० ॥ नाही ॥ ना० ॥ त्याचे च्यार वेदाः ॥ ( संकासुर हंसला ) सं० ॥ अहो नाईक् हो ॥ पृथिवीचे ठायीं ऐक आहे त्याने सर्व पृथिवी व्यापिली तर च्यार झाल्यावर कसे होईल ॥ ना० ॥ ते कसे काय ॥ सं० ॥ त्याचे फोफो० ॥ साहा शास्त्रें अठरा

पुराणे आगमा निगमा वासुदेवा ॥ नंदनराजा ॥ येय० ॥ (अवसान) सं० ॥ असे काय केले ॥ ना० ॥ सुक्र देवीच्या मैत्रेकरुन तुझ्या आज्याची वर्णना केली. तुझ्या चित्ताला काय येते ॥ सं० ॥ नारायणा ॥ ना० ॥ नारायणा रे नारायणा ॥सं०॥ एथे नारळरचा ॥ ना० ॥ आधी नारायण त्याचे ध्यान केले ॥ तुझ्या चित्ता काय येते ॥ सं० रामा रामारे रामा ॥ ना० रामा० ॥ सं० एथे मरा जेथे मरा, एथे काय मराला आलो आहोत् ॥ ना० ॥ आधी राम त्याचे ध्यान केले तुझ्या चित्ताला काय येते ॥ सं० ॥ शिवशिव ॥ ना० ॥ शिवाशिवाशिवा महादेवा ॥ (संकासुर संध्या करितो ॥) ना० ॥ असे काय केले ॥ सं० ॥ तिनशे साठ गांव वाराणशी केले ॥ शिवदेवाला गेले, शिवाची पुजा केली, त्याचे चरणतीर्थ होतें आम्हि घेतलें ॥ ना० ॥ ते फार चांगले केले, रोसन् नायकाच्या कपाळाला काय फासले ॥ सं० ॥ कुत्र्या मांजराच्या ईष्टेने पाय भरला तो या लेकाच्या कपाळाला फासला ॥ ना० ॥ थुः उष्ट्या ॥ सं० ॥ थुः खरकुत्या ॥ ना० ॥ ब्रह्मदेव ध्यानस्त बसले आहेत त्याचे वेदशास्त्र आ० तुम्हि आम्हि पृथ्वीचे राज्य करु० ॥ ना० ॥ घे घे ॥ सं० ॥ तू घे मला भय वाटतो ॥ ना० ॥ तु तु घे॥ सं० गेला ॥ ना० ॥ काय पाहतोस ॥ नाडज्ञान पाहतो ॥ झाले हो झाले ॥ ना० ॥ काय झाले ॥ सं० ॥ ब्रह्मदेव गोसावी या गांवचे मिरासदार जाहले ॥ ना० ॥ कायम करतोस ॥ सं० ढेकुण० ॥ ना० ॥ तुझ्या दाढीत ॥ सं० ॥ घुण घुण० जाळ जाळ मार मार इत्यादिक ॥ ना० ॥ संकासुर नामें दैत्य भीत असतो की ॥ ना० ॥ घे घे अरे ब्रह्मदेवाने तुजवरती शक्ती सोडिली आहे ॥ ती संजीवन.... नीरजीव आहे घे घे ॥ सं० ॥ घेतो वेदाशास्त्रे आगमा निगमा हे आणून दिल्हे घ्यावे ॥ ना० ॥ ब्रह्मदेव गोसावी इंद्राघरीं मस्त मार्डीनो वेदन् नास्ती ॥ मच्छ कूर्म वराह नरहरी वामन रामोरामश्च कृष्णः ॥ बौद्धकलंकी दशावतारः ॥ ना० ॥ ब्रह्मदेव आपण असे भ्रांत कां ॥ ब्रह्म०॥ संकासुर नामे दैत्य येऊन त्याने आमचे वेदशास्त्र नेले याकरितां भ्रांत आहों ॥ ना० ॥ यावेळी शरण कोणाला जावयाचें ॥ ब्रह्म० ॥ श्रीहरीला ॥ प्रलयपयसुधातुशुक्रशक्तिर्मुखाभ्यः ॥ श्रुतीगमनुपवेतो प्रत्युपादत्युदत्वा ॥ दितिकथज-मयज्ञो ॥ ब्रह्मसत्यव्रतानां तमहमखिलहेतो जिंभनेनं नतोस्मि ॥ प्रलयकाली येकदां ॥ ब्रह्मदेव उच्चारुनी रत सदां ॥ संकासुरें वेद चोरोनी तदां ॥ समुद्रांतची प्रवेशला ॥ तों विधाता सावध जाहला ॥ त्रास पावोनी घाबरला ॥ समुळ वेद कोणी नेला ॥ भ्रांत जाहला मानसां ॥ (जय विजय येतात) जय ॥ जय श्रीहरी ॥ ना० ॥ अरे तुम्ही कोण आहां ॥ जय० ॥ जय जिवई म्हणतात ते आम्ही आहो ॥ ना० ॥ कोणाकडून आलेत् आहा ॥ ज० ॥ श्रीहरीकडुन ॥ ना० ॥ कशाकरिता ॥ या मंदिरामध्ये उत्पात होत असतो. कोणी धर्मेकरून वर्तले, कोणी अधर्म करुन वर्तती ॥ याचा शोध पहाणेकरिता महाविष्णुने पाठविला आहे ॥ ना० ॥ मागाहून सत्यव्रत राजाची स्वारी होत आहे ॥ नारायण० ॥ अवसान ॥सत्यव्रत येउन भेटतात् ॥ ना० जयविजई ब्रह्मदेवास जाऊन सांग श्रीहरीची स्वारी होत आहे ॥ नारायण० ॥ अव-

सान ॥ भेटले श्रीहरीस ॥ ० श्री॥ ब्रह्मदेव आपण भ्रांत कां ॥ ब्रह्म० ॥ संकासुर नामे दैत्य येऊन आमचें वेदशास्त्र नेलें ॥ याकरिता भ्रांत आहों ॥ श्री० ॥ वेदशास्त्राचा उद्योग करितो ॥ ना० ॥ तेव्हा चितनिश्चयें करोनी ॥ ब्रह्मा येकाग्र बैसला ध्यानी ॥ वैकुंठपतीतें शुद्ध भावें करोनी ॥ शरण गेला सप्रेमे ॥ अनाथनाथा कृपाघना ॥ भक्तपालका जगजीवना ॥ विधात्याला प्रत्यक्ष दर्शन ॥ देऊनी सावधान पै केंले ॥ आता कोणत्या गुणे जळामाजी ॥ दुष्ट वधावा सहजी ॥ ऐसे विचारोनिया गाजी ॥ मत्स्यरूप जाहला ॥ श्री० ॥ ब्रह्मदेव आशीर्वाद आहे ॥ ( श्रीहरी जातो ) ॥ ना० ॥ सत्यव्रत महाराज, हें गोदातीर आहे ॥ येथे स्नानसंध्यादिक षट्कर्मे करावीं ॥ अर्घ्य-प्रदान सोडावें ॥ सं० ॥ ठीक आहे ॥ सत्यव्रत राजाहो सूर्यनंदन अकस्मात्र प्रगटला ॥ पुरोहित बोलतो ॥ ब्रह्मदेव ॥ ब्रह्म० ॥ बोलावे ॥ पुरोहित ॥ सत्यव्रतराजा अर्घ्यप्रधान करितां समई त्याचे अंजुळीमध्ये मीन उत्पन्न जाहला आहे ॥ ब्रह्म० ॥ आमचा कार्य-भाग जाहला ॥ ना० ॥ तो वैवस्वतें कमंडलूंत घातला ॥ तयामाजि थोर जाहला ॥ तेथुनी विरंची सोडिला ॥ भरोनि उरला त्यांतहि० ॥ पुरोहित ॥ ब्रह्मदेव तो मीन कूपोदकीं तेथुनहि भरोन उरला वर ॥ ब्रह्मदेव० ॥ त्याला कुपोदकीं सोडावा ॥ रायें कुपोदकीं सोडिला ॥ तो कूप त्याणे व्यापीला ॥ विस्मित होवोनि तये वेळां मच्छ टाकी सरोवरीं ॥ पुरो० ॥ ब्रह्मदेव तों मीन जो आहे तो कूपोदकींहि भरोन उरला वर ॥ ब्रह्मदेव ॥ त्याला सरोवरीं सोडावा ॥ ते शफरी म्हणे नृपाते ॥ राया हें स्थान न पुरें मातें ॥ विशाळ तळ पाहोनि तेथे ॥ मज सोडावें दयाळा ॥ पुरो० ॥ ब्रह्मदेव तो मीन जो आहे तो आपणाजवळ प्रार्थना कशी करितो आहे ! मला हे स्थान पुरत नाही विशाळ तळ पाहून सोडा ॥ ब्रह्मदेव० ॥ त्याला सागरामध्ये सोडा ॥ सत्यव्रत चतुर-शिरोमणि हा प्राकृत मत्स्य नव्हे चक्रपाणि ॥ ऐसे ओळखोनि अंतरीं ॥ तेथुनी सोडिला सागरीं ॥ पुरोहित०॥ तो ब्रह्मदेव मीन जो आहे तो प्राकृत नव्हे साक्षात् वैकुंठाधिपति आहे असे जाणून त्याला सागरामध्ये सोडला ॥ सत्यव्रतासी अभय देउनी ॥ जलमार्गी प्रवेशला चक्रपाणि ॥ संकासुराते शोधुनी वधिता जाहला क्षणार्धे ॥ मत्स्यौतारा नारायणा॥ युद्ध जाहलें ॥ संकासुरादि मृत होउन गेले ॥ ना० ॥ हरि वेद तो शंख तेव्हा ॥ विरिंचि करि प्रार्थिना निज ताता हरीचि ॥ तदा मत्स्य देउनि शंख हा वधिला ॥ दिले वेद आणुनि देवें विधीला ॥ मत्स्यरूपी या वेदोधारा ॥ महाकपटिंया शंखासुरा ॥ वधोनि धर्म वाढविला ॥ सुखी केले सर्वांहि ॥ श्री हरि० ॥ ब्रह्मदेव हे वेद घ्यावे स्वस्त राहावें ॥ आशिर्वाद आहे बरें ॥ थैयाता इति ॥ ना० ॥ आहो ॥ ( बहुले ) हे प्रथमारंभ जाहले, गोपाळ नृत्य करून गेले ॥ उध्यावास ध्यान करून परमेश्वराने मत्स्याचें रूप धरून वेदाचा उध्धार केला ॥ आतां काय करावे ? रासक्रीडा करावी ॥ अवसान घ्यावें ॥ थैयाताथे ताथनाताथे ॥

अथ रासक्रीडा ॥ श्रितकमलाकुचमंडलधृतकुंडल ए । कलितललितवनमाळ- जय जय देव हरे ॥ जय देवारे गोपाळा रामकृष्णा देवारे ॥ ये यद दैथा ॥ माळा-

कार परस्परे कर गळां घालुनी गोपांगना ॥ गाती नाचति पाहती अवचिया येका जगज्जीवना ॥ सोन्याचे मणि गोंविले भुजगुणि गान्याशि शंका च ना ॥ पाचूके पदकस्थळी स्मर मना श्रीदेवकीनंदना ॥ ( अवसान ) ताथै० ॥ कालियविषधरगंजन जनरंजन ए यदुकुलनलिनदिनेश जय जय देव हरे ॥ ( थय ) ज्याच्या लेणें तपें तरले साजणी अरे हो ॥ ०॥ नायिका० ॥ अगे यागे माधवी ॥ माधव०॥ अगे कागे माझि चाखोल्याची भाजी ॥ त्याचि अलंकार भूषणे होउ यात ॥ ना० ॥ पद ॥ निळे चागुणे अग सये प्रकाशी ॥ गळा हार जो यातिला शिळखुडाचा ॥ तुरा खोंविला केशरी निगडीचा ॥ मर मर मर पोरा फाकड्या फजितखोरा टिळा रेखिला मृतिका कोळशाचा ॥ रे माझ्या मोहना काय करू ? आं ओ अलि जा खेळों ॥ प्राणिरा येउन नाचतात् ॥

---

## ॥ अथ अवतार कूर्म ॥

नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ पीतांबरपरिधाना सुरकल्याणनिधाना ॥ नारायण० ॥ उद्धृतभूधरभारा हतधेनुकचाणूरा ॥ नारायण० ॥ राधाधरमधुरसिका ॥ रजनीधरकुत्राटिळका ॥ नारायण ॥ ब्रह्मदेव आले ॥ नारायणादीक सर्व देव आले ॥ नमस्कार केला ॥ ब्रह्म० ॥ इंद्रादिक देव हो ॥ आपण कोणत्या कारणास्तव आलेत आहां ॥ देव म्हणाले ॥ दुर्वासऋषीच्या श्रापेकरून सर्व स्थळें गेली, सर्व लक्ष्मी गेली, पृथ्वीवर दैत्य अपार माजले, राहावयाला स्थळ नाही ॥ याकरिता आपणाकडे शरणागत आहों ॥ ब्रह्मदेव० ॥ देवहो आपण क्षीरसमुद्री चला, तेथे शेषशाई नारायणाचे स्तवन करा, नंतर तुमचा कार्यभाग होईल ॥ क्षीरोदधावमरदानवयूथपानाम् ॥ उन्मथ्नताममृतलब्धये आदिदेवः । पृष्ठेन कच्छपतनुर्विदधार गोत्रं । निद्रा क्षणोद्रिपरिवर्तकषाण कण्डूः ॥ नारायण ॥ श्रीहरी म्हणती ॥ तुम्ही कंचा कारणास्तव आलेत आहां ॥ देव म्हणाले ॥ दुर्वास ऋषीच्या श्रापेकरून सर्वहि लक्ष्मी गेली, सर्वहि स्थळें गेलीं, पृथिवीवर दैत्य अपार माजले, राहावयाला स्थळ नाही याकरिता आपणाकडे शरणागत आहो ॥ श्रीहरी० ॥ देव हो आपण बळी दैत्याकडे चला, सख्यत्व करा, मंदराचळ पर्वत आणा, समुद्रमंथन करा, त्यांतून अमृत व रत्ने निघतील ती यथाविभागे विभाग करून घ्या, तेणेकरून तुमचा कार्यभाग होईल ॥ नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ (दैत्य आले ॥) देव० ॥ अरे हवालदार बळी दैत्यापासी जाउन सांग, देव आपल्या भेटीकरिता येता आहे ॥ (हवालदार सांगतो ॥) दैत्य म्ह० ॥ येउयात् ॥ ( देव आले. ) दैत्य बळी म्ह० ॥ देवहो आपण कंचा कारणास्तव आलेत आहां ॥ देव० ॥ तुम्हा दैत्यामध्ये

आम्हा देवामध्ये द्वैतार्थ नसावा ॥ सख्यत्व असावे ॥ तुम्ही आम्ही मिळुन समुद्रतिरी जाउन मंदराचळ पर्वत आणून समुद्रमंथन करूं ॥ त्यांतून अमृत व रत्नें निघतील तीं यथाविभागे विभाग करुन घेऊं ॥ म्हणजे तुमचा कार्यविभाग होईल ॥ बळी० ॥ ठीक आहे ॥ देव० ॥ उठावें ॥ इंद्रादि देव मिळोनी ॥ बळी दैत्यासि सख्य करोनी ॥ उभयता एकत्र होवोनी ॥ समुद्रमंथन आरंभिलें ॥ नारायण नारायण० ॥ अवसान ॥ (समुद्रतीरीं आले ॥) देव० ॥ दैत्यहो श्रीहरीचे आराधन करु या ॥ नारायणा० ॥ (श्रीहरी आले ॥) श्रीहरी म्ह० ॥ देवहो समुद्रतिरीं आलें की ॥ देव० ॥ आलो ॥ श्रीहरी० ॥ गरुडा येथुन तूं जा ॥ गरुड म्ह० ॥ कां स्वामी ॥ श्रीहरी० ॥ वासुकी सर्प जो आहे तो तुझ्या भयास्तव येणार नाही ॥ गरुड म्ह० ॥ मला विभाग असावा ॥ श्रीहरी० ॥ आहे बर ॥ श्रीहरी० ॥ देवहो हा वासुकी घ्या ॥ पर्वताला वेढा घाला ॥ पुन्हा स्वस्थ मंथन चालू द्या ॥ धावे पावे करुणाकरे ॥ निर्वीकरे स्वर्गापर्यंत गाती हरी रे ॥ देव० ॥ देवहो अमंगळ पुच्छाकडे लागावयाचें नाही, अधोमुखाकडे लागावयाचे ॥ देव० ॥ ठीक आहे ॥ दैत्य० ॥ अधोमुखाकडे लागलो खरे परंतु वासुकीच्या ज्वाळा फार बोमाला लागल्या आहेत तेणंकरुन शरीरे दग्ध जाहली. देवहि आळले तरी देवहो याजला कसा काय विचार ॥ देव० ॥ श्रीहरीची आराधना करुयां ॥ धावे पावे० ॥ अवसान ॥ श्रीहरी ॥ देवहो मेघाला आज्ञा केली आहे ॥ किंचित् किंचित् मेघवृष्टी होत आहे मेघछाया करविली आहे पुन्हा स्वस्थ मंथन चालू द्या ॥ धावे पावे० ॥ देव० ॥ दैत्यहो पर्वताचा भार फार जाहला आहे ॥ सांभाळा बर ॥ दैत्य० ॥ ठीक आहे ॥ धावे पावे० ॥ देव० ॥ दैत्यहो पर्वत बुडो लागला हे ओ ॥ यावेळी श्रीहरीचे स्तवन करुयां ॥ मंजुळगुंजाभूषा मायामानुषवेषा ॥ नारायणा० ॥ ( कूर्म आला ) मंथन करीत मंदरपर्वत ॥ बुडो लागलासे जळात ॥ कौर्मरूप होउनी श्रीभगवंत ॥ तया स्थळीं राहिला ॥ देव० ॥ दैत्य हो ॥ मंदराचळ धरी पृष्ठी ॥ चौदा रत्नें काढिलीं सागरीं ॥ कूर्मवत्र मधुकैटभारी ॥ भक्तराज कैवारी कोण साच ॥ श्रीहरीने कूर्मरूप धारण करुन मंदराचळ पृष्ठीवरती धारण केला आहे ॥ दैत्य म्हणतात्, ठीक आहे पुन्हा स्वस्त मंथन चालू द्या ॥ धावे पावे० ॥ देव० ॥ दैत्य हो पर्वत उडो लागला आहे ॥ यावेळी श्रीहरींचे आराधन करुयां ॥ दैत्य० ॥ ठीक आहे ॥ धावे पावे ॥ (श्रीहरी आले ॥) दैत्य म्हणतात् ॥ श्रीहरी आम्ही बहुत काळ मंथन केलें परंतु कांही निष्पन्न होत नाही ॥ श्रीहरी म्ह० ॥ तुम्ही सोडा, आम्हीं स्वहस्ते करितो ॥ श्रीहरी म्ह० ॥ देवहो ॥ मंथन करितासमई प्रथमता वीष उत्पन्न जाहलें तेणेकरून तीनहि लोक तप्त जाहले आहेत तयावेळी सांभ सदाशिव त्रिपुरारी जो याचे स्तवन करुया ॥ सांभ शिवहर पालय माम् ॥ परमाकृपामही देव ॥ हरसांभ ॥ सांब राही बहना कटिचर्मांबरादि वसना ॥ शस्परलिंग परादिशमना सांबा ॥ दिगंबरा जगदीश कमां शिवहर पालय माम् ॥ ( सांभ आले ) सांभ म्ह० ॥ देव हो आपण कंचा सराणास्तव आलेत् आहा ॥ देव म्ह० ॥ मंथन करितासमई प्रथमतः वीष उत्पन्न

जाहलें ॥ तेणेकरुन तीनहि लोक संतप्त जाहले याकरिता आपणाकडे शरणांगत आलो वर ॥ सांब म्ह० ॥ यातला विचार करितो नंतर सांगतो ॥ सांब म्ह० ॥ देव हो वीष जें आहे तें आम्ही प्राशन करितों ॥ ( सांभ पडद्याशीं गेले ) पद ॥ राम नाम रसने जपता मधु अमृत प्राशन केलें ॥ सागरासी मंथन करितां तों वीष हळहळलें ॥ आक्रांत जाहला अवनी कल्होळे नभ व्यापिलें ॥ त्या घराशी जाळित गेलें ॥ त्या सांभ सदाशिवाने पाहताचि प्राशन केले ॥ राम नाम रसने जपतां मधु अमृत प्राशन केलें ॥ प्राशितांचि विष शिवकंठी अग्नीने देह जळाला ॥ मस्तकी गंगा धारिली, परी देहाचें आसन न सांडी ॥ शरीराचें उष्ण न कंठ त्या क्षणांत जाहल्या नारी ॥ राम नाम रसने० ॥ सांब म्ह० ॥ देव हो वीष प्राशन करितासमई मोठें आश्चर्य जाहलें ॥ देव म्ह० ॥ कंचे ॥ सांब म्ह० ॥ शीतकंठ होतों तो नीलकंठ जाहलों ॥ किंचित् हस्तातुन भूमीवर पडले ते वृश्चिकाने पुच्छाग्रि धारण केलें ॥ वासुकीने मुखाग्री प्राशन केले ॥ पुन्हा स्वस्त मंथन चालुद्या ॥ ( धावे पावे करुणा० ॥ ) श्रीहरी म्ह० ॥ देव हो धनमंत्री ॥ अमृत कलश घेऊन पळाले बरे ॥ (दैत्य घेउन गेले) देव म्ह० ॥ श्रीहरी आम्ही बहुत काळ मंथन केलें, त्यांतून अमृत निघालें, तें दैत्य घेऊन पळाले बरें ॥ श्रीहरी म्ह० ॥ देवहो स्वस्थ बसावें ॥ समुद्रातूनी रत्नें निघालीं ॥ तीं दैववंतासी प्राप्त जाहलीं ॥ निरदैवे श्रम पावोनी नेली ॥ श्रीहरी प्रतिकुळ म्हणोन ॥ श्रीहरी म्ह० ॥ स्वस्त बसावें ॥ ( एक दैत्य उठुन म्ह० ) बळी दैत्य महाराज ॥ प्रथमतः अमृत आम्ही प्राशन करणार असें म्हणतात् ॥ ( कलह करितात् ) सूत्रधार म्ह० ॥ देवहो दैत्यामध्ये कलह उत्पन्न जाहला बरें ॥ देव म्ह० ॥ आमचा कार्यभाग जाहला ॥ ( पद ) हुलडी आवे आजि माये राज मै ॥ हुलडी आवें ॥ दादर मोरण पैयां बोले ॥ ( मोहनी आली ) बिजली आदर पाहे रामा ॥ हुलडी आवें ( राहू उठून नाच करूं लागला ) बोलतो माहाराज भगवान मे जोडा कैसा बनाया ॥ इत्यादिक ॥ दैत्य उठून म्हणाले ॥ हे स्त्रीये तुजपाशी कांही बोलावयाचें आहे ॥ मोहनी म्ह० ॥ बोला बरें ॥ दैत्य० ॥ हा अमृत कलश घे, आम्हा चौघां दैत्यांमध्ये यथाविभागे विभाग करुन दे ॥ मोहनी० ॥ मी वाटची परस्त्री आहे, मजवरती विश्वास ठेवूं नका ठेवल्या असता फसून जाल ॥ दैत्य म्ह० ॥ तुजवरती आमचा विश्वास आहे ॥ नायिक म्ह० ॥ अरे दैत्य हो ही वाटची परस्त्री आहे, हिजवरती विश्वास ठेवू नका ॥ दैत्य म्ह० ॥ हिची आमची खूण पटली आहे ॥ मोहनी ॥ स्वस्थ बसावे ॥ श्रीहरी ॥ हे स्त्रिये सव्य अपसव्य बरें ॥ पद ॥ त्वरित ये जगदंबा माळसा ॥ नको विसरूं मानसा ॥ त्वरित ये जगदंबा माळसा ॥ सुरासुर मिळुनी समुद्र मंथिला धरी मोहनीसा ॥ उभे पंक्तीने बसा म्हणोन वाढिलें अमृत पसपसा ॥ त्वरित ये जगदंबा माळसा ॥ चंद्रसूर्य मध्यस्थ राहु धनुजतेजसा ॥ तसा निरखतां तसा तेक्षणी उडवी चक्र दशदिशा ॥ फिरवी गादसा नका विसरूं मानसा ॥ त्वरित ये० ॥ ( मोहनीने देवास अमृत पाजलें ॥ ) चंद्रसूर्ये म्ह० ॥ श्रीहरी आम्हा चंद्रसूर्यामध्ये बसोन प्रथमतः अमृत कोण प्राशन करितो तो पाहून घ्या ॥ श्रीहरी

# पुस्तकपरीक्षण



**प्राणायाम भाग १ ला**—(लेखक-कुवलयानंद. मूल्य रु. २ आ. ८). कुवलयानंद ह्या नांवाने आपणास ओळखावयास लावणारे श्री. गुणे ह्यांनी योगशास्त्राच्या अभ्यासाकरता लोणावळे व बोरिवली ह्या ठिकाणीं संस्था स्थापन करून तद्द्वारा सामान्य लोकांना समजेल अशा भाषेंत व अशा स्वरूपांत योगाची माहिती प्रसिद्ध करण्याचा स्तुत्य प्रयत्न चालविला आहे ही अत्यंत अभिनंदनीय गोष्ट होय. योगशास्त्र निर्माण करण्याचें श्रेय हें भरतभूमीलाच दिलें पाहिजे. आर्यांशिवाय इतरांना हें शास्त्र अनवगतच आहे. हटयोगावर संस्कृतमध्ये अनेक ग्रंथ प्राचीन ऋषींनी लिहून ठेविले आहेत. ह्या अपूर्व ग्रंथांत प्रतिपादन केलेले सिद्धांत व निर्दिष्ट केलेलीं तत्त्वें आधुनिक शास्त्रीय उपकरणांनी तावून सुलाखून पाहण्याचा पहिला प्रयत्न श्रीमत् कुवलयानंद यांचाच होय. ह्या नवीन उपक्रमाच्या योगाने श्रीमत् कुवलयानंद यांचे नांव महाराष्ट्राच्या यौगिक साहित्याच्या इतिहासांत चिरस्मरणीय होईल ह्याबद्दल आम्हास यत्किंचितहि शंका वाटत नाही. योगग्रंथमालेपैकी 'प्राणायाम' हें दुसरें पुस्तक होय. ही ग्रंथमाला इंग्रजींत आहे ह्यावरून मराठी भाषा न जाणणाऱ्या अशा हिंदुस्थानांतील व हिंदुस्थानाबाहेरील अशा असंख्य इंग्लिश शिक्षितांस हटयोगाची माहिती करून देण्याचा उद्देश श्री. कुवलयानंद यांचा असावा असें दिसतें. परकी भाषेंत ग्रंथ लिहिणें म्हणजे आपल्या घरांतील संपत्ति आपण होऊन त्यांच्या हवालीं करण्यासारखें आहे, अथवा आपल्या स्वतःच्या घरांतील माणसांची उपासमार करून इतरांना अन्नदान करण्यासारखें आहे. असो. एवढी गोष्ट वजा केली तर बाकी सर्व बाबतींत श्री. कुवलयानंद यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों.

हटयोगाचा अभ्यास दोन हेतूंनी केला जातो. अष्टांगयोगाच्या साहाय्याने समाधींत ईश्वरसाक्षात्कार होतो आणि म्हणून योग हें मोक्षप्राप्तीचें साधन आहे असें आम्ही समजतों. ह्या मुख्य उद्देशाशिवाय योगसाधनाने शरीरसंवर्धन होतें असा अनुभव असल्यामुळे शारीरिक अनामय प्राप्त व्हावें ह्या उद्देशानेहि यौगिक पद्धतीकडे लोक धाव घेतात. शुद्ध रक्ताचा भरपूर पुरवठा होईल तरच शरीर निरोगी राहतें. आपण जें अन्न खातों त्याचें रूपांतर रक्तांत होऊन त्या रक्तापासून शरीराच्या घटकावयवांची वाढ होत असते. सगळ्याच अन्नाचें रक्त झालें असतें तर विसर्जनेंद्रियांचें कारणच पडलें नसतें. परंतु अन्नाच्या बऱ्याच भागाचें रक्त बनल्यावर काही भागाचा शरीरपोषणाला ज्याची गरज नाही असा मळ तयार होतो. विसर्जनेंद्रियांच्या दुर्बलतेमुळे हा मळ जर शरीरांतून सपशेल बाहेर गेला नाही तर शरिरांत विषारी वायु उत्पन्न होतात. ह्या वायूंच्या योगाने अन्नाचें बनलेलें रक्त दूषित होतें. रक्तामध्ये अशा रीतीने दोष उत्पन्न होऊं नये म्हणून मनुष्याला खबरदारी घ्यावी लागते. तात्पर्य रक्तामध्ये दोष उत्पन्न होऊं न देणें तसेंच त्यांत अधिक शुद्धता आणणें ह्या दोन गोष्टी साधण्याकरिता सर्व आरोग्य-

याला खर्ची पडलें आहे. प्राणवायूच्या योगानें रक्त शुद्ध होतें आणि हा प्राणवायु प्राणायाम केला असतां शरीरवृद्धीला जरूर तितका मिळूं शकतो.

प्राणायामांत प्राण आणि आयाम असे दोन शब्द आहेत. आरोग्यापुरताच विचार केला तर प्राण या शब्दाचा अर्थ श्वासोच्छ्वास असाच समजला पाहिजे हें उघड आहे. आयाम म्हणजे थांबणें. श्वासोच्छ्वासाची क्रिया रात्रंदिवस चालू असते. ही क्रिया कांही काळ बंद ठेवणें म्हणजे श्वास बाहेरहि जाऊं द्यावयाचा नाही व आंतहि घेऊं द्यावयाचा नाही, तर शरीरात जागच्याजागीं कोंडून ठेवावयाचा. हें प्राणायामाचें कार्य शब्दार्थावरून सूचित होतें. श्वास कोंडण्यालाच अथवा श्वासाची आयातनिर्गत बंद करण्याला कुंभक हा पारिभाषिक शब्द आहे. वायू आंत घेणें याला पूरक व बाहेर घालविण्याला रेचक असे म्हणतात. सामान्यतः प्राणायामांत पूरक मग कुंभक आणि नंतर रेचक असे तीन प्रकार असतात. या तीन क्रिया मिळून प्राणायाम होतो. यांपैकी कोणत्या क्रियेला प्रथम महत्त्व दिलें गेलें हा प्राणायामाच्या कल्पनेच्या विकासाचें संशोधन करणाऱ्याला विचार करण्यासारखा प्रश्न आहे. "श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः" या सूत्रावरून कुंभकालाच प्राधान्य दिल्याचें स्पष्ट दिसतें. परंतु नवीन अभ्यासकांनी पूरक आणि रेचक या दोनच क्रिया कराव्या, कुंभकाच्या नादीं लागू नये असा ग्रंथकारांनी आपला स्वतःचा अभिप्राय व्यक्त केला आहे. "प्रच्छर्दनविधारणाभ्यां वा प्राणस्य" या दुसऱ्या सूत्रामध्ये श्वास बाहेर टाकण्याच्या क्रियेचा आणखी समावेश केला आहे. प्राणाचें प्रच्छर्दन म्हणजे बाहेर सोडणें आणि विधारण म्हणजे धरून ठेवणें. या दोन क्रियांनी प्राणायाम होतो असें पतंजली म्हणतो. रेचक, पूरक व कुंभक हे पाठीमागल्या ग्रंथकारांनी उपयोजिलेले शब्द पतंजलीच्या काळीं प्रचारात आलेले नव्हते. कारण पतंजली ते शब्द वापरीत नाही. वर उल्लेखिलेल्या सूत्रांत पूरकाचा निर्देश नाही हे वाचकांच्या ध्यानीं आलेंच असेल. आमच्या समजुतीने पूरक, कुंभक आणि रेचक या तिन्ही क्रिया सारख्याच उपयुक्त आहेत. फुप्फुसांत जो कारबनडायऑक्साइड हा विषारी वायू निर्माण होतो तो बाहेर घालवून टाकणें इष्ट असल्यामुळे तें कार्य रेचकाने साधतां येतें. वरील दूषित वायू घालवणें हें जसें अगत्याचें आहे तसेंच रक्त शुद्ध करण्याकरिता प्राणवायूची त्यांत भर टाकणें जरूर असल्यामुळे पूरकाचीहि अवश्यकता सिद्ध होते. कुंभकाच्या योगाने कोणतें कार्य साधतें याची चर्चा ग्रंथकर्त्यांनी केलेली दिसत नाही. कदाचित् प्राणायामांत कुंभकाचें विशिष्ट कार्य नसावें असेंहि असूं शकेल. परंतु पतंजली कुंभकालाच विशेष महत्त्व देतो त्याचा उल्लेख वर केलाच आहे. आमच्या मतें श्रीमत् कुवलयानंद यांनी या प्रश्नाचा अधिक विचार करावयास पाहिजे होता.

प्राणायामाचे जे निरनिराळे प्रकार आहेत ते तदंतर्गत तीन क्रियांपैकी प्रथम कोणती करावयाची यावरून झाले आहेत. साधारणपणें प्राणायामांत सध्या तरी सामान्य जन पूरक, कुंभक आणि रेचक हा क्रम अनुसरतात. परंतु हा क्रम ठेवलाच पाहिजे असें नाही. कोणी उलट दिशेने आरंभ करतात. प्रथम रेचक नंतर कुंभक आणि शेवटीं पूरक. कित्येक वेळा नंतर पूरक, रेचक या क्रिया न करतां श्वासाचें केवळ निरोधनच केलें जातें. म्हणजे कुंभकच तेवढा करतात. श्वासोच्छ्वासाची गती वाढविण्यास कुंभकाचा उपयोग होतो हें कोणालाहि समजण्या-

जरूरी आहे. एवढाच जर कुंभकाचा उपयोग असेल तर कुंभकाला गौणत्व येणें स्वाभाविक आहे. प्राणायामाचे चार प्रकार ग्रंथकर्त्यांनी मराठींत विशद करून सांगितले असते तर त्यांचा उपयोग मराठी वाचकांना ज्यास्त झाला असता. आमच्यामतें इंग्रजींत पुस्तक लिहिणें अपरिहार्यच असेल तर महत्त्वाच्या गोष्टी टीपांच्या रूपाने मराठींत स्पष्ट कराव्या.

प्राणवायूकरता आपण प्राणायाम करतां एवढें ठरलें म्हणजे प्राणायाम उघड्या व शुद्ध हवेंत केला पाहिजे हें ओघानेच प्राप्त होतें. स्वाभाविक श्वासोच्छ्वासांत मनुष्य एका श्वासांत ५०० घन सेंटिमीटर किंवा ३० घन इंच हवा घेत असतो. परंतु प्राणायामाच्या योगाने हें प्रमाण ३६०० पर्यंत जातें. श्वासाबरोबर जी हवा शरीरांत जाते तींत प्राणवायू २०·९६ इतका असतो. त्याच्या उलट श्वासामध्ये १६·०२ इतका प्राणवायू हवेबरोबर बाहेर जातो. अर्थात् ४·९४ इतका ऑक्सिजन एका श्वासोच्छ्वासाच्या क्रियेने शरीराला पुरविला जातो. कारबन-डायऑक्साइडचा प्रकार त्याच्या उलट आहे. श्वासाबरोबर घेतलेल्या हवेंत या वायूचें प्रमाण ०·०४ इतकें असतें तर उच्छ्वासाबरोबर बाहेर गेलेल्या हवेंत हा वायु ४·३४ या प्रमाणांत असतो. यावरून श्वासोच्छ्वासाची क्रिया शारीरिक प्राणायामाला पोषक आहे हें व्यक्त होतें. प्राणायामाने निसर्गाच्या साहाय्याला आपण जातों असें होतें. कुवलयानंद यांनीं असें सिद्ध केलें आहे की, प्रत्यक्ष प्राणायामांत प्राणवायुचें प्रमाण कमीच असतें. परंतु त्याच्या योगानें श्वसनेंद्रियांचें सामर्थ्य वाढून पुढल्या चोवीस तासांत हें निरयाचें प्रमाण वाढलें जातें. म्हणजे नैसर्गिक श्वासोच्छ्वासाची क्रिया अधिक कार्यक्षम होते.

असो. ग्रंथकर्त्यांनी ह्या पुस्तकांत प्राणायामाची पुष्कळ उपयुक्त माहिती दिली आहे. तिच्यापासून सामान्य वाचकांसहि आपला फायदा करून घेतां येईल असा आमचा विश्वास आहे. हटयोगांत प्राणायामाप्रमाणेच आसनांचेंहि महत्त्व वर्णिलें आहे. आणि कोणतें तरी आसन घालूनच प्राणायाम करण्याची वहिवाट आहे त्यामुळे ग्रंथकर्त्यांनी एक प्रकरण आसनां-करिता खर्ची घातलें आहे तें योग्यच आहे. निरनिराळे रोग बरे करण्याचें सामर्थ्य निरनिराळ्या आसनांत आहे असा अनुभव आहे. म्हणून आसनयुक्त प्राणायाम झाला असतां दोहोंचाहि फायदा शरिराला मिळूं शकतो हें सांगावयास नको. दुसऱ्या तीन प्रकरणांत उज्जयी, कपालभाति आणि भस्त्रिका या तीन प्रकारच्या प्राणायामाची माहिती दिली आहे. त्याशिवाय श्वसनेंद्रियांचें सांगोपांग वर्णन पहिल्या प्रकरणांत केलें असून शेवटच्या प्रकरणांत प्राणायामाचें महत्त्व शारी-रिक दृष्ट्या व अध्यात्मिक दृष्ट्या किती आहे तें सांगितलें आहे. यांखेरीज ग्रंथाला जीं परिशिष्टें जोडलीं आहेत त्यांत प्राणायाम व आसनें यांच्या अभ्यासाचा क्रम निरनिराळ्या दृष्टींनी विचार करून केला आहे. याप्रमाणें हें सर्वच पुस्तक फार उपयुक्त झालें आहे. करिता तें जवळ बाळगून त्यांत लिहिल्याप्रमाणे जर कोणी प्राणायाम करूं लागेल तर त्याला डॉक्टराकडे जाण्याचा प्रसंग येणार नाही असें आम्हास वाटतें. शिवाय ह्या पुस्तकाच्या विक्रीचें उत्पन्न आश्रमाकरिता खर्च व्हावयाचें आहे हें ध्यानांत ठेऊन सर्वांनी ह्या मालेला आश्रय द्यावा अशी आमची मनापासून इच्छा आहे.

ना. गो. चापेकर

———

# अभिप्राय

[१] ब्रह्मी यंडाळीचें ब्रह्मपुराण व [२] मुसलमानी मुलखांतली मुशाफरीः—(ले. श्रीपाद रामचंद्र टिकेकर, किं. प्रत्येकी १ रुपाया. मिळण्याचे ठिकाणः—समर्थ भारत छापखाना, १४७ सदाशिव, पुणें २ ). श्रीयुत टिकेकर हे मुशाफर बनून परदेशांत जे हिंडतात ते केवळ चैनीसाठीं किंवा आपल्या द्रव्यार्जनक्षमतेंत एखादी परीक्षा उत्तीर्ण होऊन भर घालण्यासाठी नव्हे, तर स्वबांधवांना तद्देशस्थितीचें पूर्ण व सत्य ज्ञान करून देण्यासाठीच होय. बाहेरच्या त्यांच्या मुशाफरी राहणीमुळे त्यांना इतर श्रीमंत प्रवाशांना कधीहि शक्य होणार नाही अशी बारीकसारीक माहिती सहजासहजीं मिळवितां येते. त्यातून ते कसलेले व विनोदी लेखक असल्याने स्वतः परिश्रमाने मिळविलेली माहिती वाचनीय असते हें सांगावयास नकोच. ब्रह्मी पुराणांत ब्रह्मदेशाची व मुशाफरींत वायव्यसरहद्द, इराण व अरबस्तान या देशांची चटकदार पण अभ्यसनीय अशी विवेचक माहिती आढळेल व हिंदी मनाला जागजागीं आपलेपणाचा अभिमान वाटूं लागेल. पण त्याबरोबरच आपल्या अपौरुष पारतंत्र्याची शरम येईल. ब्रह्मदेशावर प्राचीन काळीं हिंदूंनी वर्चस्व गाजविलें त्याचा सूड म्हणून की काय पश्चिमेकडल्या मुसलमानांनी हिंदूंना नंतर पादाक्रांत केलें. इकडे ब्रह्मदेशांत स्वराज्याची आकांक्षा यंडांत रूपांतर पावलेली दिसत आहे, तर पश्चिमेकडे मुसलमानी मुलुखांत यंडांतून स्वराज्याचा उदय होत आहे. असो. या दोन्ही पुस्तकांच्या वाचनानें प्रत्येकाच्या ज्ञानांत निःसंशय भर पडेल व ' दिसतें तसें नसतें ' याचें प्रत्यंतर येईल.

शिक्षणक्षेत्रांत भूगोल विषय हा इतिहासापेक्षाहि पुष्कळवेळां जास्त मनोवेधक होतो याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे ' मुशाफरी '. आंतरबाह्य मानवी व्यापाराच्या केंद्राभोंवतीं भौगोलिक माहितीचे धागे विणावयाची अगदी आधुनिक भूगोल-शिक्षण-पद्धति या पुस्तकांत नकळत अंगिकारलेली दिसेल व त्यामुळे विद्यार्थ्यांच्या अभ्यसनीय पुस्तकांत याचा अवश्य समावेश होईल अशी आशा वाटते. यदाकदाचित् निराशा झालीच तर तिचें खापर यांतील कांही प्रभावर फोडावें लागेल.

या दोन्ही पुस्तकांचें लेखन नवीन शुद्धलेखनमंडळाच्या निर्णयांना अनुसरून केल्याबद्दल आम्ही लेखकाचें अभिनंदन करितों.

चिं. ग. कर्वे

चंद्रिका :— आधुनिक मराठी कवींत विशेष नाणावलेले असूनहि ज्यांचे काव्यसंग्रह अद्यापि प्रकाशित झालेले नाहीत असे कवि आजपर्यंत दोन होते — बडोद्याचे चन्द्रशेखर आणि वऱ्हाडांतील अकोल्याचे बी. श्रीयुत चन्द्रशेखर शिवराम गोऱ्हे यांचा काव्यसंग्रह चन्द्रिका या नांवाने, भारतगौरव-ग्रन्थमालेचें १०६ वें पुष्प म्हणून प्रसिद्ध करून श्रीयुत महेशराव कुलकर्णी यांनी निदान महाराष्ट्राचा तरी गौरव खास केला आहे. पुस्तक खुद्द कर्त्यांच्याच देखरेखीखाली तयार झालें असल्यामुळे कार्य फार व्यवस्थित झालें आहे. या

बाबतींत दोष अेकच दाखवितां येईल. कवितांचे मूलाधार साक्षेपाने प्रत्येक ठिकाणीं द्यावयास पाहिजेत ते तसे दिलेले नाहीत. सुप्रसिद्ध मूलाधार न दिले तरी समजतात, परन्तु अप्रसिद्ध मूलाधार अचानकपणें आढळल्यास मुक्याबरोबर ओलेंहि जळायला लागून स्वतन्त्र कविताहि भाषान्तरित वा रूपान्तरित मानण्याकडे वाचकांची प्रवृत्ति स्वाभाविकपणें होते.

चन्द्रशेखरांची कविता अेकन्दरींने पाहतां जुन्या वळणाची दिसली तरी तिच्यांतील स्वाभाविक सौन्दर्यामुळे तिच्या मोहकपणाला कमीपणा येत नाही. आङ्ग्ल कवितेवरून सुचलेले विचार ठिकठिकाणीं बेमालून रीतीने शोभतील अशा भाषेने मांडलेले पाहून त्या कवितेविषयी अधिकच जवळीक वाटूं लागते. चन्द्रशेखरांची कविता संस्कृत शब्दप्रचुर असली तरी ती क्लिष्ट व दुर्बोध नाही. संस्कृत शब्द आले तर ते आत्मसंस्कृतीमुळे, मुख्यत्वेंकरून अर्थाच्या अभिव्यक्तीसाठी येतात, दीर्घप्रदीर्घ यमकांच्या सिद्धीसाठी येत नाहीत. ती सत्प्रवृत्त आहे पण रूक्ष नीतिपाठ देणारी नाही. तिच्यांत विचारांचें गाम्भीर्य आहे पण गूढगुञ्जनी वैयर्थ्य नाही. ती रसाळ आहे. पण पाणचट वा थिल्लर नाही. ती मधून मधून पदलालित्याने मण्डित आहे पण ती कृत्रिमतेपासून आलिप्त आहे. ती परिश्रमपूर्वक रचलेली दिसते पण तिच्यावरील तजेला अम्लान आहे. ती दर्बारी आहे परन्तु हाजीखोर नाही. यश आणि अर्थ यांची प्राप्ति तिला नको आहे असें नाही, परन्तु त्याच्यासाठी ती सत्ताधीशाच्या अथवा लोकाभिरुचीच्या लहरीची दासी व्हावयाला तयार नाही. 'जें जें शुद्ध उदात्त उज्ज्वल असें हेलावितें तें मनीं' अशी ही त्यांची कविता नाना चित्तकला प्रसन्न करून त्यांना दिव्य दीप्ति देणारी आहे.

उत्तम भाषान्तराचा नमुना हवा असल्यास 'कालार्णव' 'कारञ्जें' या कविता आहेत. 'चिन्तोपन्त उदास' व 'रङ्गराव हर्षे' हीं उत्कृष्ट पृथगात्म रूपान्तरें आहेत. कोठून तरी अेखादी क्षुद्र सूचना घेऊन त्यावरून सविस्तर रचलेली हृदयङ्गम वर्णनात्मक कथा पहायची झाल्यास 'काय हो हा चमत्कार!' आहेच. 'वसन्त माधव' 'हिन्दवन्दना' वगैरे कविता सरस व स्वतन्त्र आहेत. प्राचीन आदर्शभूत दीर्घ काव्याचा मासला हवा असल्यास 'श्रीसोमनाथाच्या वास्तुपुरुषाचें दर्शन' आहे; आणि अनुभवाचा जिव्हाळा पहावयाचा असल्यास 'वनाभिनन्दन', 'कवितारति', 'दत्तवियोग', 'गोदागौरव' वगैरे कविता आहेत. कवितेच्या निरनिराळ्या क्षेत्रांत चन्द्रशेखरांनी संस्मरणीय कामगिरी करून ठेवली आहे.

परन्तु ही कामगिरी ( ३११ पृष्ठांची असली तरी ) कवीच्या काळाच्या व कर्तृत्वाच्या मानाने आणि महाराष्ट्रियांच्या अपेक्षेच्या मानाने तितकीशी मोठी नाही. तथापि या लोकसत्तेच्या काळांत तिला योग्य तो आश्रय मिळून तिचें चीज झाल्यास ही चन्द्रिका अेखाद्या महाकाव्याची प्रस्तावना ठरेल अशी आम्हाला आशा आहे, कारण चन्द्रशेखर आश्वासन देतात कीः—

"सम्प्रति अवर्षणाने तापाने कोळपून जे गेले
त्या पारिजातकांवरि फुलतिल वर्षाङ्कुरांत हो झेले!"

माधवराव पटवर्धन.

गीतगुम्फाः—श्रीयुत यशवंत नरसिंह केळकर यांच्या आज तागायत बहुतेक प्रसिद्ध व अप्रसिद्ध कवनांचा हा संग्रह आहे. हा केवळ त्यांच्या 'हौसेचा मामला' आहे असें तेच प्रस्तावनेंत म्हणतात. ते स्वतः एक परिश्रमशील इतिहाससंशोधक आहेत. असें असतांना

त्यांनी आपल्या हौसेने केलेल्या कृतींचें परिश्रमपूर्वक परिष्करण केलेलें नसावें हें शोचनीय आहे. आणिली, अलों, पुनः पुन, कोळें (कोवळें), पाहाड, पाहाड, भर्ती, पयधारा वगैरे चुकीचे शब्दप्रयोग त्यांच्यासारख्या जबाबदार लेखकाच्या लिखाणांत नसावेत. यांतील कितीतरी रसापकर्षक छंदोभंग सहज टाळतां आले असते. पोवाडा रचतांना पद्धत जुनी असावी हें इष्ट आहे. परंतु जुने ऐतिहासिक वातावरण निर्माण करावयाला शब्दांचीं अशुद्ध रूपेंच वापरावला पाहिजेत असें नाहीं. मराठीची शब्दसंपत्ति वाढविण्यासाठी अपरिचित मराठी शब्दांस चालना दिली पाहिजे, आणि या बाबतींत श्रीयुत केळकर यांनी मिशनरी उत्साह दाखविला आहे. परंतु या सार्‍या त्यांनी नवीनच वापरलेल्या शब्दांवर टीपा लिहून त्यांनी थोडी चर्चा केली असती तर विचारी नवीन लेखकांचीं मनें वळविण्याला आणि त्यांच्या स्वतःच्या कवितांतील त्या शब्दांचें स्वारस्य ध्यानांत यायला चांगलीच मदत झाली असती.

उपमारूपकामध्ये अभिनवता हा या संग्रहाचा ठळक गुण आहे. "अन्यस्पर्शित पाखरापरि मला थारा तिथे कोठला? 'ललित पल्लवीं शुभ्र फुलें तीं' फुलबाजीपरि बिन्दु ढाळिती," "कानाचीं शिंपली उमलुनी नुकती पडली दिसे। कुडी तव मोत्यापरि भासते," "उजळ उषेपरि प्रसन्न होतां टवटवीत तव वदन। चिवचिव करिती चिमुकलेच ते शब्दपोत आंतून," ठायिं ठायिं कोळ्यांचीं जाळीं गवतावर पसरलीं। लिलीपुटीयन सैन्याने जणूं छावणीच घातली' वगैरे उपमा जितक्या अभिनव तितक्याच सरस व समर्पक आहेत. परंतु असें विधान सार्‍याच उपमांविषयीं करितां येणार नाही. सारखी वीज लवत असतांना गर्जना करून कडाडणारे मेघ 'दीन' मुळीच वाटत नाहीत. "वा तपाळ कपाळ सहाण आयत खरी" (पृ. ९५) या मासलेवाईक ओळींत दिलेली कपाळाला सहाणेची उपमा रा. जोशी यांच्या 'विनोद' नाटकांत जितकी मजेदार वाटते तितकीच ती येथे हास्यास्पद वाटते. शिवाय उपमेंत नाविन्य स्पृहणीय आहे, पण तें हठाकृष्ट नसावें; तें सहजस्फुरित पाहिजे. आणि आता विसाव्या शतकांत नव्याचा पुरस्कार करणार्‍याने तरी मौक्तिक हें स्वातीच्या जलबिंदूपासून होतें हा संकेत टाकून द्यायला हवा. त्याचप्रमाणे वृक्षलतांची जी लग्नगाठ नेहमीच बांधण्यात येते ती वाटते इतकी सार्वत्रिक नाही.

बारकाव्याने मनोहर वर्णन करून हुबेहूब चित्र नटवून देणें हाहि श्रीयुत केळकर यांचा एक विशेष आहे तो "गायिका" या कवितेंत खुलून दिसतो. त्यांच्या अनेक कवितांत जिव्हाळ्याचा ओलावा जरा कमीच आहे. ज्या कवितेंत तो सहानुभूति उत्पन्न करण्याइतका आहे त्या म्हणजे 'हरिणी आणि चमेली' 'माझा जाईचा वेल,' 'निराशा,' 'बहकलेस,' 'बालामित्र,' 'मृत्यु कसा हवा' या होत आणि त्या खरोखरीच उत्कृष्ट आहेत.

गोटा घोटिव' या कवितेंत जरी कल्पनेचा थोडा विलास असला तरी हें एक शुद्ध अदृश्य अवगीत आहे. या अवगीताचा रोख ज्या व्यक्तीवर आहे ती जर वाचकाच्या दृष्टीसमोर नसेल तर कविता फिकी पडेल. ही कविता लिहावयाला कितीजरी सबळ कारण घडलें असलें तरी ती प्रसिद्ध करण्याचा मोह श्रीयुत यशवंतराव केळकर यांनी टाळला असता तर त्यांत त्यांचा दिलदारपणा व सदभिरुचि हीं दिसून आलीं असतीं.

---

# शंका, चर्चा इत्यादि

## एकपिंड

कित्येक कुटुंबांत प्रात्यब्दिक श्राद्धांत त्रयीचा उच्चार करून एकपिंडच देण्याची वहिवाट आहे ती शास्त्रोक्त नाही असें श्री. चंद्रात्रे यांनी ध्वनित केलें आहे (म. सा. पत्रिका पुस्तक १ पान १७३); परंतु एकपिंडप्रदानाला शास्त्रांत आधार नाही असें नाही. मृततिथीला दर वर्षास करावयाचें श्राद्ध एकोद्दिष्टच करावें अशी याज्ञवल्क्य स्मृति आहे (श्राद्धप्रकरण श्लो. २५६). आमच्या मतें मृततिथीच्या दिवशीं सालोसाल आपण जे श्राद्ध करतों तें ज्याची मृततिथि असेल त्याचेंच फक्त करावें. म्हणजे तें पित्या पुरतेंच असावें. आजा व पणजा यांचा त्यांत संबंध असूं नये. आजा पणजाची मृततिथि नसतांना त्यांना बापाच्या मृततिथीला पिंड देण्याचें वस्तुतः कारण नाही. अमावास्येच्या दिवशीं होणारें श्राद्ध पिता, पितामह व प्रपितामह या सर्वांचें असणें वाजवी आहे. दर्शश्राद्ध केल्यास मृततिथीला श्राद्ध करण्याचें वास्तविक कारणच नाही. तथापि करणेंच असेल तर आणि शास्त्राचा उद्देश समजून घेऊन धर्मकृत्य व्हावें अशी इच्छा असेल तर दर महिन्याला दर्शश्राद्ध पार्वणविधीनें करून प्रतिसांवत्सरिक श्राद्ध एकोद्दिष्ट विधीनें करावें. कांही कुलांत क्वचित् हा आचार दृष्टीस पडतो तोच योग्य आहे असें आम्हांला वाटतें. देशाचार आणि कुलाचार याप्रमाणे आचार ठेवावा हें विज्ञाने श्वरांचें मत म्हणजे शास्त्राचा निर्णय नव्हे. "सपिण्डीकरणात्पूर्वं पित्रोरेवहि पार्वणम्" हें व यासारखीं वचनें दर्शश्राद्धालाच लावावीं.

## सप्रे की छप्रे!

चिपळोणकरांचे कागद चाळीत असतां मला एका गृहस्थाचें नांव छप्रे असें लिहिलेलं आढळलें. दोन तीन ठिकाणीं छप्रे असेंच लिहिलें असल्यामुळे चुकीचा संभव नाही. तेव्हा आपोआपच मनांत असा विचार आला की, खरें नांव सप्रे नसून छप्रेच असावें. राजवाड्यांच्या जोडीला छपरें बसण्यासारखें आहेत. छ च्या जागीं स उच्चार करणारे लोक आहेतच. ते छपर–सपर असा उच्चार करतात. घराच्या भागांतून पडलेलीं उपनांवें आणखीहि आढळतात. उ. भिताडे, घाबे, माडीवाले, फडताळे, पाखाडे, उंबऱ्ये, वगैरे. याशिवाय देवळे, जमीने हीं नांवेंहि याच वर्गांत पडूं शकतील. बखले हें आडनांव बखळ–खुली जागा–या शब्दावरून बनलें असावें. बखळ–बखळे–बखले.

## कांही प्रचारांतून गेलेले शब्द

माफजावी व सुजरुसी "येणेंप्रमाणे आकरा सनगें चौकशीने घेऊन माफजावीने पाडून घ्यावीं."

या वाक्यांतील "माफजादी" हा शब्द मावजत या शब्दाचा अपभ्रंश दिसतो. मावजत म्हणजे दक्षता-काळजी. याच अर्थी बुजरुसी हा शब्द येतो. उदा०-"गांवाचा बुजरुसीने वसूल घेऊन."

चश्मी—"दुपटे साथे पटीचे 'चश्मी' जरीकाठी" "पातळें साहा साथेपटीची चश्मी जरीकाठी" चश्मीचा अर्थ काय ?

राणवा—रानवा अथवा 'राणवा' म्हणजे कुरण. उदा०-राणवा मक्त्याने दिला.

शालजम्याचा आंगरखा; एक बुंदकी रुपया वगैरे सारखे असंख्य शब्द भाषेतून काय-मचे गेले. अर्थात् वस्तु गेल्या म्हणून शब्द गेले.

कुंभकर्ण—हें नांव अद्यापि कांही जातींत आहे असें दिसतें. उदा०-राजाराम कुंभकर्ण कासार.

राजक्रमी—हें आडनांव ब्राह्मणांत असल्याचें आढळतें. उदा०-चिंतो रघुनाथ राजक्रमी, कुळकर्णी.

---

## 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळ, इंदूर'

ही संस्था श्रीमंत होळकर सरकारांच्या आश्रयाखाली चालली आहे. या संस्थेमार्फत मराठी भाषेतील उत्तम ग्रंथकारास त्याच्या ग्रंथाबद्दल ग्रंथाच्या योग्यतेनुरूप पुरस्कारार्थ रक्कम दिली जाते. या कार्याप्रीत्यर्थ स्वतंत्र रक्कम श्रीमंत होळकर दरवर्षी सरकारांनी देण्याचें ठरविलें आहे. त्याप्रमाणे ग्रंथोत्तेजक मंडळ ग्रंथाची निवड करण्याचें कार्य करून पुरस्काराची रक्कम देण्याचें ठरल्यावर रकमेच्या $\frac{1}{2}$ किंवा $\frac{1}{4}$ मंडळ ठरवील त्याप्रमाणे-किंमतीचीं पुस्तकें मंडळा-कडे पाठविलीं पाहिजेत. ग्रंथकारांनी आपापल्या ग्रंथाच्या तीन प्रती चिटणीसाकडेस खालील पत्त्यावर पाठवाव्या. ग्रंथ पावल्याबद्दलची पोच तावडतोब पाठविली जाऊन मंडळाचा निर्णय साधारणपणे तीन महिन्यांत कळविला जाईल.

| | |
|---|---|
| पत्ता—प्रो. बा. गो. ऊर्ध्वरेषे, काव्यतीर्थ एम्. ए. रामबाग, इंदूर सिटी. | आपला, बा. गो. ऊर्ध्वरेषे, चिटणिस, म. ग्रं. मं. रामबाग, इंदूर. |

# अपभ्रंश भाषेंतील सूक्तसंग्रह

(लेखकः—प्र. घों. कानिटकर)

प्रो. उपाध्ये ( राजाराम कॉलेज, कोल्हापूर ) यांनी जोइंदु ( योगींद्र ) नामक जैन कवीच्या अपभ्रंश काव्यासंबंधी भांडारकर इन्स्टिटयूटच्या त्रैमासिकांत ( Vol. 12 Part II ) फार मार्मिक विवेचन केलें आहे. सदर लेखांत प्रोफेसर मजकुरांनीं जोइंदुच्या प्रत्येक काव्यांतील मनोरंजक नमुनेदार श्लोक दिले आहेत. ते बहुतेक श्लोक दोहावृत्तांत आहेत. त्यांतील कांहीं सरस श्लोकांचें भाषांतर खालीं देण्याचा विचार आहे. जैन धर्मांतील स्थूल तत्त्वें त्यावरून समजून येतील.

शौरसेनीप्रभृति चार प्राकृत भाषांनंतर अपभ्रंश भाषा प्रचारांत आली व अपभ्रंशानंतर जुनाट मराठी जन्मास आली. अपभ्रंश भाषेंतील सर्वच लकबा मराठींत नाहींत; तथापि अपभ्रंश भाषेशीं मराठीचा बराच संबंध येतो ही गोष्ट खालील श्लोकांवरूनहि प्रतीत होईल. जैनांचे बहुतेक वाङ्मय अर्धमागधी व अपभ्रंश या भाषांत ग्रथित केले आहे. जुनी हिंदी व गुजराथी भाषा अपभ्रंश भाषेपासून बनली आहे ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वरी व महानुभावांच्या ग्रंथांतील बऱ्याच क्लिष्ट शब्दांचा उलगडा अपभ्रंशाच्या सहाय्यानें होतो ही गोष्ट सवडीप्रमाणे एखाद्या लेखांत साधार दाखविण्याचा हेतु आहे.

जोइंदूचा "श्रावकाचार दोहक" नामक २२४ दोह्यांचा एक ग्रंथ आहे. त्यांतील उपमा, दृष्टांत व नैतिक तत्त्वें रमणीय आहेत. सबब त्यांतूनच बहुतेक दोहे घेतले आहेत. आतां प्रस्तुत विषयाकडे वळूं.

दोहाः— महु आसाइय थोडउ वि णासइ पुण्ण बहुत्तु ।
वइसाणरहं तिडिकउ वि काणणु डहइ महंतु ॥२३॥

छायाः— मधु आस्वाद्य स्तोकमपि नश्यति पुण्यं प्रभूतम् ।
वैश्वानराणां स्फुलिंगमपि काननं दहति महत् ॥

अर्थः— थोडक्यासुद्धा मधूचा आस्वाद घेतला असतां मोठ्या पुण्याचा नाश होतो; अग्नीच्या एका ठिणगीनेसुद्धा मोठें वन जळतें.

दोहाः— संगि मज्जमंसरयहं मइलिज्जइ सम्मत्तु ।
अंजणगिरिसंगि ससिहि किरणउ काला हुंति ॥२८॥

छायाः— संगे मद्यमांसरतानां मलिनीभवति समस्तम् ।
अंजनगिरिसंगेन शशिनः किरणाः कालाः भवन्ति ॥

**अर्थ**:—मद्यमांसरत पुरुषांच्या किंवा मनुष्यांच्या संगाने सर्व मलीन होतें; कज्जल-पर्वताच्या संसर्गाने चंद्राचे किरण काळे होतात.

दोहा:— वसणाइँ ताव छंड जिया परिहर वसणासत्त ।
सुक्कइ संसग्गें हरिया पेक्खइ तरू डज्झंति ॥५२॥

छाया:— व्यसनानि तावत् त्यज जीव परिहर व्यसनासक्तम् ।
शुष्काणां संसर्गेण हरिताः पश्यत तरवः दह्यन्ते ॥

**अर्थ**:—हे जीवा ! व्यसनें सोड आणि व्यसनासक्तांपासून दूर रहा; वाळलेल्या वृक्षांच्या संसर्गाने ओलीं झाडें जळतात. ( वाळक्याबरोबर ओलें जळतें.)

दोहा:— भोगहं करहि पमाणु जिय इंदिय मकरि सदप्प ।
हुंति ण भल्ला पोसिया दुद्धे काला सप्प ॥६५॥

छाया:— भोगानां कुरु प्रमाणं जीव इंद्रियाणि मा कुरु सदर्पाणि ।
भवंति न भद्राः पोषिताः दुग्धेन कालाः सर्पाः ॥

**अर्थः**—हे जीवा, प्रमाणशीर भोग घे; इंद्रियें शिरजोर होऊं देऊं नकोस; दुधाने कृष्णसर्पांचें पोषण केलं तरी ते भले होत नाहीत.

दोहा:— काइं बहुत्तइ संपयइ जा किवणाहं घरि होइ ।
सायरणीरु खारिं भरिउ पाणिउ पयइ ण कोइ ॥८९॥

छायाः— किं प्रभूतया संपदा या कृपणानां गृहे भवति ।
सागरनीरं क्षारेण भरितं, पानीयं पिबति न कोऽपि ॥

**अर्थः**—कृपणांच्या घरीं असणाऱ्या पुष्कळ संपत्तीचा काय उपयोग ! समुद्राचें पाणी क्षाराने भरलेलें असतें, तें कोणीसुद्धा पीत नाही.

दोहा:— पत्तहं दिण्णउ थोअडउ वियरिय होइ बहुत्तु ।
वडहँ बीउ धरणिहिं पडियउ वित्थरु लेइ महंतु ॥९०॥

छायाः - पात्राणां दत्तं स्तोकं विस्तृतं भवति प्रभूतम् ।
वटानां बीजं धरणौ पतितं विस्तारं लाति महान्तम् ॥

**अर्थः**—सत्पात्रीं केलेल्या अल्प दानाचा मोठा विस्तार होतो ( मोठी फलप्राप्ति होते ); वडाचें बीं पृथ्वीवर पडलें तर त्याचा मोठा विस्तार होतो ( मोठा वटवृक्ष सूक्ष्म बीजापासून होतो).

दोहा:— जं जिय दिज्जइ इत्थ भवि तं लब्भइ परलोइ ।
मूलें सिंचइ तरुवरहं फलु डालहँ पुणि होइ ॥९५॥

छाया:— यत् जीव दीयते अत्र भवेत्तत् लभ्यते परलोके ।
मूलेन (मूले) सिंचति तरुवराणां, फलं शाखानां पुनः भवति ॥

**अर्थ**:—हे जीवा, ह्या लोकीं जें द्यावें तें परलोकीं मिळतें, वृक्षांच्या मूलाच्या ठिकाणीं सिंचन केलं तर खांद्यांना फळ येतें.

दोहा:— धम्मे सुहु, पावेण दुहु एउ पसिद्धउ लोइ।
तम्हा धम्मु समायरहि जें हियइच्छिउ होइ ॥१०१॥
छाया:— धर्मेण सुखं पापेन दुःखं एतत् प्रसिद्धं लोके ।
तस्मात् धर्मं समाचर येन हृदयेप्सितं भवति ॥

अर्थ:—धर्माने सुख, पापाने दुःख ( मिळतें ) हें लोकांत प्रसिद्ध आहे; म्हणून धर्माने वाग; त्याच्या योगाने हृदयेप्सित (वस्तु) मिळेल.

दोहा:— धम्मे जाण हुंवंति णरा पावें जाण ण हुंति ।
घरवर गेहुवरि चढहिं कूवखणा य तलि जंति ॥१०२॥
छाया:— धर्मेण ज्ञानिनः भवंति नराः पापेन ज्ञानिनः न भवंति ।
गृहकराः गेहोपरि आरोहंति कूपखनकाः च तले यांति ॥

अर्थ:— पुरुष धर्माने ज्ञानी होतात, पापाने ज्ञानी होत नाहीत; घर करणारे ( सुतार ) घराच्या वरवर चढतात आणि विहीर खणणारे तळीं (खाली खाली) जातात.

दोहा:— सत्थसएण वियाणियइँ धम्मु ण चरइ मुणेवि ।
दिणयरसउ जइ उग्गमइ घुइडु अंधउ तो वि ॥१०५॥
छाया:— शास्त्रशतेन विज्ञातेन धर्मं न चरति ज्ञात्वा ।
दिनकरशतम् यदि उद्गच्छति घूकः अंधः तथापि ॥

अर्थ:—धर्म कळूनसुद्धा जर आचरण करीत नाही तर शेंकडो शास्त्रें शिकून उपयोग काय ! जरी शंभर सूर्य उगवले तरीसुद्धा घुबड अंधच असतें.

दोहा:— जो वयभायणु सो जि तणु किं कज्जइ इयरेण ।
तं सिरु जं जिणमुणि णवइ रेहइ भत्तिभरेण ॥११६॥
छाया:— यः व्रतभाजनं स एव तनुः किं क्रियते इतरेण ।
तत् शिरः यत् जिनमुनिं नमति राजते भक्तिभरेण ॥

अर्थ:—ज्याच्या योगाने व्रतपालन होतें तेंच खरें शरीर; इतर शरीराशीं (भोगरत) काय कर्तव्य आहे ? जिनमुनीला वंदन करून भक्तिभराने शोभतें तेंच खरें मस्तक होय.

दोहा:— जे सुणंति धम्मक्खरइँ ते हउँ मण्णमि कण्ण ।
जे जोवहिं जिणवरहँ मुहुँ ते पर लोयण धण्ण ॥११८॥
छाया:— ये शृण्वन्ति धर्माक्षराणि ते अहं मन्ये कर्णान् ।
यानि पश्यंति जिनवराणां मुखं तानि परं लोचनानि धन्यानि ॥

अर्थ:—जे धर्माक्षरें ऐकतात त्यानाच मी कर्ण मानतों; जे जिनश्रेष्ठांचें मुख पाहतात तेच डोळे फार धन्य होत.

दोहा:— रूवहुउप्परि मइ म करि णयण णिवारहि जंत ।
रूवासत्तपयंगडा पक्खहिं दीवि पडंत ॥१२६॥

छायाः— रूपस्य उपरि मतिं मा कुरु नयने निवारय याती ।
रूपासक्तपतंगः पक्षैः दीपे पतन् ॥

**अर्थः**—रूपाच्या ठिकाणीं आसक्ति धरूं नकोस; रूपांकडे धावणाऱ्या नयनांचें निवारण कर; रूपावर आसक्त झालेला पतंग पंखांसुद्धा दिव्यांत पडतो.

दोहाः— मउयत्तणु जिय मणि धरहि माणु पणासइ जेण ।
अहवा तिमिरु न ठाहरइ सूरहु गयणि ठिएण ॥१३२॥

छायाः— मृदुत्वं जीव मनसि धारय मानः प्रणश्यति येन ।
अथवा तिमिरः न स्थास्यति सूर्यस्य गगने स्थितेन ॥

**अर्थः**—हे जीवा, मनाच्या ठिकाणीं मृदुत्व धारण कर; त्यामुळे मान (अहंकार) नाश पावतो. कारण गगनामध्ये सूर्य असतांना अंधकार राहूं शकणार नाही.

दोहाः— गुणवंतहँ सह संगु करि भल्लिम पावहि जेम ।
सुवणसुपत्तविवज्जियउ वरु तरु वुच्चइ केम ॥१४१॥

छायाः— गुणवतां सह संगं कुरु भद्रं प्राप्स्यसि यथा ।
सुमनसुपत्रविवर्जितः वरः तरुः उच्यते कथम् ।

**अर्थः**—गुणवंताशीं संगति कर, म्हणजे कल्याण प्राप्त होईल. फुलें व पानें नसलेल्या वृक्षाला चांगला कसें म्हणतां येईल !

दोहाः— दुल्लहु लहिवि मणुयत्तणु भोयहं पेरिउ जेण ।
इंधणकज्जें कप्पयरू मुलहो खंडिउ तेण ॥२१९॥

छायाः— दुर्लभं लब्ध्वा मनुजत्वं भोगानां ( कृते ) प्रेरितः येन ।
इंधनकार्येण कल्पतरुः मूलात् खंडितः तेन ॥

**अर्थः**—दुर्लभ असें मनुष्यपण मिळून ज्याने भोगांच्या ठिकाणीं आत्म्याची प्रेरणा केली, त्याने इंधनाकरिता कल्पतरूचा समूळ छेद केला.

## योगसार

दोहाः— अप्पा अप्पइँ जो मुणइ जो परभाव चएइ ।
सो पावइ सिवपुरगमणु जिणवर एउँ भणेइ ॥३४॥

छायाः— आत्मा आत्मनि यः जानाति यः परभावं त्यजति ।
सः प्राप्नोति शिवपुरगमनं जिनवरः एवं भणति ॥

**अर्थः**—जो आत्म्याच्या ठिकाणीं आत्मा जाणतो, जो परभाव टाकून देतो तोच शिवपुराला गमन करितो असें जिनश्रेष्ठ म्हणतात.

दोहाः— जो परमप्पा सो जि हउँ जो हउँ सो परमप्पु ।
इउ जाणेविण जोइआ अण्ण म करहु वियप्पु ॥२२॥

छायाः— यः परमात्मा स एव अहं यः अहं सः परमात्मा ।
इति ज्ञानेन विना योगिन् अन्यं मा कुरु विकल्पम् ॥

**अर्थ**:–जो परमात्मा तोच मी, जो मी तोच परमात्मा; या ज्ञानाशिवाय हे योग्या ! दुसरा विकल्प धरूं नकोस. ( सोऽहं–अहं सः । जीव शिवैक्य).

दोहाः– अप्पसरूवह जो रमइ छंडवि सहु ववहारु ।
सो सम्माइट्ठी हवइ लहु पावइ भवपारु ॥८८॥

छायाः– आत्मस्वरूपे यः रमते त्यक्त्वा सर्वं व्यवहारम् ।
सः सम्यग्दृष्टिः भवति लघु प्राप्नोति भवपारम् ॥

**अर्थः**—सर्व व्यवहार सोडून जो स्वस्वरूपीं रत होतो तो समदृष्टी होतो व भवसमुद्राच्या पलीकडील तीर लवकर गाठतो.

वरील तिन्ही दोह्यांत एकच तत्त्व सांगितलें आहे तें:–मुमुक्षूने आपपरभाव नष्ट करून स्वस्वरूपीं रत व्हावें.

## परमात्मप्रकाश

दोहाः– अप्पा पंगुहु अणुहरइ अप्पु ण जाइ ण एइ ।
भुवणत्तयहँ वि मज्झि जिय विहि आणइ विहि णेइ ॥६७॥

छायाः– आत्मा पंगोः अनुहरति आत्मा न याति न आयाति ।
भुवनत्रयाणां अपि मध्ये जीव विधिः आनयति विधिः नयति ॥

**अर्थः**—आत्मा पंगु पुरुषाचें अनुकरण करितो, आत्मा (स्वतः) जात नाही व येत नाही. हे जीवा ! त्रिभुवनांत पूर्वसंचित (कर्म) आत्म्याला आणतें व नेतें.

[ पापपुण्यामुळे आत्म्याला जननमरणाच्या फेऱ्यांत पडावें लागतें. पापक्षय, होऊन पुण्यसंचय झाला म्हणजे मोक्षपद प्राप्त होतें ].

दोहाः– हउँ वरु बंभणु वइसु हउँ हउँ खत्तिउ हउँ सेसु ।
पुरिसु णउंसउ इत्थि हउँ मण्णइ मूढु विसेसु ॥८२॥

छायाः– अहं वरः ब्राह्मणः वैश्यः अहं अहं क्षत्रियः अहं शेषः (शूद्रः) ।
पुरुषः नपुंसकः स्त्री अहं मन्यते मूढः विशेषम् ॥

**अर्थः**—मी श्रेष्ठ ब्राह्मण, मी वैश्य, मी क्षत्रिय, मी शूद्र, मी पुरुष, नपुंसक, स्त्री इत्यादि भेद मूढ मनुष्य मानतो.

दोहाः– भल्लाहँ वि णासंति गुण जहँ संसग्गु खलेहिं ।
वइसाणरु लोहहं मिलिउ तें पिट्टियइ घणेहिं ॥२३७॥

छायाः– भद्राणां (भव्यानां) अपि नश्यंति गुणाः येषां संसर्गः खलैः ।
वैश्वानरः लोहेन मिलितः तेन पिट्यते घनैः ॥

**अर्थः**—भल्यांचेसुद्धा गुण दुष्टांच्या संसर्गाने नाश पावतात; अग्नि लोखंडाची संगत धरितो म्हणून त्याला घणाचे घाव खावे लागतात.

दोहाः– रूवि पयंगा सद्दि मय गय फासइ णासंति ।
अलिउल गंधइ मच्छ रसि किम अणुराउ करंति ॥२४२॥

छाया:— रूपे पतंगाः शब्दे मृगाः गजाः स्पर्शे नश्यंति ।
अलिकुलानि गंधे मत्स्याः रसे किमर्थं अनुरागं कुर्वन्ति ॥

अर्थ:—रूपाच्या ठिकाणीं पतंग, शब्दाच्या ठिकाणीं मृग, स्पर्शाच्या ठिकाणीं गज नाश पावतात; भृंग सुगंधावर व मासे रसावर कां बरें लुब्ध होतात !

[ पंच कर्मेंद्रियांच्या विषयांचे ठिकाणीं आसक्ति धरिली तर त्याचें फळ आत्म-नाशप्राप्ति; एका इंद्रियसुखामुळे जर नाश होतो, तर पांची कर्मेंद्रियांच्या विषयांचे ठिकाणीं आसक्त असलेल्या मनुष्यांचा नाश होईलच होईल. ]

दोहा:— जे दिट्ठा सूरुग्गमणि ते अत्थमणि न दिट्ठ ।
तें कारणिं वढ धम्मु करि धणि जोव्वणि किमु तिट्ठ ॥

छाया:— ये दृष्टाः सूर्योद्गमने ते अस्तमने न दृष्टाः ।
तेन कारणेन वत्स धर्मं कुरु धने यौवने किं तृष्णा ॥

अर्थ:—सूर्योदयानंतर ज्या वस्तु दिसतात त्या सूर्यास्तानंतर दिसत नाहीत. वत्सा ! या कारणाने धर्म कर; धन आणि यौवनाच्या ठिकाणीं तृष्णा कां करतोस !

[ यत् दृष्टं तत् नष्टं । धर्म एव नित्यः । धन आणि यौवन हीं दोन्ही अशाश्वत आहेत. त्यांच्या ठिकाणीं आसक्ति न धरतां शाश्वत असा जो धर्म त्याविषयीं इच्छा धर म्हणजे चिरसुखाचा लाभ होईल ].

## दोहापाहुड

दोहा:— तित्थहि तीत्थ भमेहि वढ धोयउ चम्मु जलेण ।
एहु मणु किमु धोएसि तुहुँ महलइ पावमलेण ॥१६१॥

छाया:— तीर्थात् तीर्थं भ्रमसि वत्स धौतं चर्म जलेन ।
एतत् मनः किं धावसि त्वं मलिनीभूतं पापमलेन ॥

अर्थ:—वत्सा ! एका तीर्थाहून दुसऱ्या तीर्थाला जातोस आणि फक्त आपल्या शरीराचें कातडें धुतोस; परंतु पापमलाने मलिन झालेलें हें (तुझें) मन धुतोस काय !

[ लौकिकदृष्ट्या जरी धार्मिक आचरण असलें तरी चित्तशुद्धीशिवाय त्याला महत्त्व नाही. किंबहुना तें ढोंगच होय. ]

टीप:—जोइंदूच्या प्रत्येक ग्रंथांतील दोहे वर दिले आहेत. जोइंदू इ०सनाच्या सहाव्या शतकापूर्वी झाला असावा असें प्रो० उपाध्ये यांचें मत आहे. वरील उताऱ्यांतील बऱ्याच क्लिष्ट स्थळांचा उलगडा प्रो० उपाध्ये यांनी मला करून दिला त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. तसेंच त्यांच्याच परवानगीने वरील मराठी भाषांतरहि केलें आहे. तसेच डॉ. वा. गो. परांजपे यांचीहि मला बरीच मदत झाली याबद्दल मी त्यांचाहि आभारी आहें.

---

# मूलदेव

( लेखक--प्रा० पा. वा. काणे, मुंबई )

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या गेल्या अंकांत ( वर्ष ४ अंक ४ ) रा. कानिटकर यांचा 'सांकेतिक भाषा' या विषयावर एक लेख प्रसिद्ध झाला आहे. कामसूत्रावरील यशोधराच्या टीकेंतील सांकेतिक भाषेबद्दल तीन श्लोक त्यांनी अवतारित केले आहेत. त्यांतील दुसऱ्या श्लोकांत वर्णिलेल्या सांकेतिक भाषेला 'मूलदेवीय' असें म्हटलें आहे. हा मूलदेव कोण याबद्दल रा. कानिटकर यांस कांही सांगतां येत नाही. मूलदेव हें कंसाचें एक नांव आहे असा एका कोशांतील आधार त्यांनी दिला आहे. मूलदेवाचे संबंधाने बरीच माहिती प्राचीन ग्रंथांत आहे. तिचा थोडक्यांत निर्देश खाली करींत आहें.

'वेतालपंचविंशति'मध्ये मूलदेवाची कथा आहे. ही कथा क्षेमेन्द्राच्या बृहत्कथा-मंजरींत (पान ३४६ ) व सोमदेवाच्या कथासरित्सागर या ग्रंथांत आली आहे. शशाङ्कवतीलम्बकांत ती कथा पंधरावी वेतालकथा म्हणून आहे (तरङ्ग २२ आदितः ८९). ती कथा थोडक्यांत अशी आहे की, नेपाल देशांत शिवपूर नगरींत शशिप्रभा नांवाची राजकन्या होती. तिने आपल्या प्रासादाजवळील उद्यानांत मनःस्वामी नांवाचा तरुण ब्राह्मणयुवा पाहिला. दोघेंहि प्रथमदर्शनींच कामशरविद्ध झालीं. त्या राजकन्येचें त्याने हत्तीच्या हल्ल्यापासून रक्षण केलें. पुढे तिच्या प्राप्तीचें चिंतन करीत असतां त्या नगरींत मूलदेव नांवाचा धूर्त व सर्वसिद्धिपूर्ण असा गुरु आहे हें त्याला आठवलें. तो मूल-देवाला शरण गेला त्यावेळीं तेथे त्याचा अहर्निश जवळ असणारा शशि नांवाचा मित्र होता. मूलदेवाने त्याचे तोंडांत एक गुटिका दिली त्याबरोबर तो तरुण रूपवती कन्या झाला. त्या कन्येला मूलदेवानें राजाकडे न्यास म्हणून ठेविली व तेथे राजकन्या आणि कन्या-वेषधारी ब्राह्मणयुवा हीं विषयांत रममाण झालीं. पुढे मूलदेवानें आपली कन्या (म्हणजे कन्यारूपधारी ब्राह्मणयुवा) परत मागितली असतां ती देतां न आल्यामुळे मूलदेवाचा कोप शमविण्यासाठीं राजाने आपली कन्या मूलदेवाने आपला पुत्र म्हणून पुढे केलेल्या शशि या मित्राला दिली. तेव्हा प्रश्न उत्पन्न झाला की, राजकन्येचा उपभोग प्रथम ब्राह्मण तरुणाने केल्यामुळे ती त्याची स्त्री किंवा 'शशि'बरोबर तिचा विवाह झाल्या-मुळे ती शशीची स्त्री. हा प्रश्न वेताळाने विक्रमाला केला व विक्रमाने ती शशीचीच धर्मशास्त्रप्रमाणे स्त्री असा निर्णय दिल्यामुळे वेतालाचें समाधान झालें. अशी ही कथा आहे. कथासरित्सागरांत पुनः विषमशीललम्बकांत ( ५ वा तरंग आदितः १२४ ) मूलदेवाचें वर्णन आलें आहे. तो विक्रमादित्याच्या दरबारांत बसणारा एक धूर्त होता आणि 'शशि' नांवाचा त्याचा मित्र होता असें तेथे सांगितलें आहे. कथासरित्सागर हा ग्रंथ मूळ पैशाची भाषेंतील गुणाढ्यकृत बृहत्कथेचा सारांश आहे असें सोमेश्वरानेच

सांगितलें आहे ( 'ग्रंथविस्तरसंक्षेपमात्रं भाषा च भिद्यते' असें तो म्हणतो ). तेव्हा ही मूळदेवाची कथा इसवी सनाच्या पहिल्या शतकाच्या सुमारास लिहिलेल्या बृहत्कथेंतहि होती असें अनुमान करण्यास हरकत नाही.

बृहत्कथामंजरीचा कर्ता जो प्रसिद्ध काश्मिरी पंडित क्षेमेन्द्र त्यानेच 'कला-विलास' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे तो काव्यमालेंत छापलेला आहे. याचे दहा सर्ग असून बहुतेक सर्व पद्यें सुन्दर अनुप्रासयुक्त अशा आर्यावृत्तांत आहेत. त्यांत सांगितलें आहे की, अनेक प्रकारच्या मायाजालांनी धूर्तांचा ज्याने पराभव केला होता आणि सर्व कलांत अग्रगण्य असा मूळदेव नांवाचा गुरु होता[1] व त्याचा शशि नांवाचा मित्र होता आणि कन्दलि नांवाचा प्रमुख शिष्य होता (१-३७). हिरण्यगुप्त नांवाच्या सार्थवाहाळीस चंद्रगुप्त नांवाचा एकुलता एक मुलगा होता. त्याला लोक-व्यवहारदक्ष करण्यासाठी हिरण्यगुप्ताने मूळदेवाचे स्वाधीन केलें व त्या मूळदेवाने जी शिकवण चंद्रगुप्ताला दिली त्याचें सार 'कलाविलास' ह्या ग्रन्थांत क्षेमेन्द्राने दिलें आहे. जगाच्या व्यवहारांत दम्भ, लोभ, काम यांचें कसें साम्राज्य आहे, वेश्यावृत्त, मोह, मद, गायकलोक, कायस्थ, हेमकार, वैद्य, फलज्योतिषी, किमया करणारे इत्यादि धूर्तांचें वर्णन, सकलकलानिरूपण, धर्मकलाकलाप इत्यादि विषयांचें मनोरंजक विवेचन या ग्रंथांत आहे.

कादम्बरींत विन्ध्याटवीवर्णनांत बाणभट्ट म्हणतो की, विन्ध्याटवी 'कर्णीसुतकथेव संनिहितविपुलाचला शशोपगता च'. विन्ध्याटवींत शश (ससे) होते व कर्णीसुताच्या कथेंतहि शश येतो. वरती मूळदेवाच्या कथेंत त्याचा शशि नांवाचा मित्र होता असें सांगितलें आहे त्याचाच बाणभट्टाने शश असा उल्लेख केला असला पाहिजे. ह्यावरून कर्णीसुत म्हणजेच मूळदेव असा तर्क निघतो. हा कर्णीसुत स्तेयशास्त्राचा प्रवर्तक होता. सुबन्धूच्या वासवदत्तेंत (हॉल प्रत पान १४२) 'कलाङ्कुर इव विजितनगर-मण्डनाः' असा उल्लेख आहे व त्यावरील टीकाकाराने 'हारावली' नामक कोशाचा आधार देऊन 'कर्णीसुत, मूळदेव, मूलभद्र व कलाङ्कुर' हे पर्याय शब्द आहेत असें सांगितलें आहे. दशकुमारचरिताच्या दुसऱ्या उच्छ्वासांत ( आगाशे प्रत पान ६५ ) राजवाहन अपहारवर्म्याची कथा ऐकून त्याला म्हणतो 'कथमसि कार्कश्येन कर्णीसुत-मप्यतिक्रान्तः'.

ह्यावरील उताऱ्यावरून असें दिसतें की, मूळदेव किंवा कर्णीसुत हा सकलकलांत निपुण, चौर्यशास्त्रांचा प्रणेता व आपल्या मायाजालाने अनेक धूर्तांना आणि वेश्यांना फसविणारा असा पुरुष होऊन गेला. अशा पुरुषाच्या नांवाने एखादी सांकेतिक भाषा किंवा बोलीचा प्रकार प्रचलित असणें अगदी स्वाभाविक आहे. म्हणून यशोधराने

---

१ तत्रासीदभिभूतप्रभूतमायानिकायघातधूर्तः । सकलकलानिलयानां धुर्यः श्रीमूलदेवाख्यः ॥ कलाविलास सर्ग १-९.

उद्धृत केलेल्या श्लोकांतील 'मूलदेवीय' भाषा ह्या पुरुषाशींच संबद्ध आहे असें मानावें.'

मृच्छकटिकांत तिसऱ्या अंकांत शर्विलकाने चौर्यशास्त्राचे प्रणेते म्हणून कुमार कार्तिकेय, कनकशक्ति (हें कार्तिकेयाचेंच नांव आहे असें दिसतें), भास्करनन्दि व योगाचार्य यांचीच फक्त नावें घेतलीं आहेत. त्यांत मूलदेव किंवा कर्णीसुत याचें नांव नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

'गूढलेख्य' म्हणून जी तिसरी सांकेतिक भाषा यशोधराने सांगितली त्या श्लोकाचा सर्वमान्य अर्थ लावणें कठीण आहे. त्यांतील ग्रह (९), नयन (२), वसु (८), सागर (४), मुनि (७), ज्वलन (३), अंग (६) हे शब्द संख्यावाचक असून 'तुकशृंग' याचा अर्थ 'तु' (किंवा 'त') आणि 'क' हीं अक्षरें शेवटीं घालावीं असा होतो. ह्या श्लोकाचा एक अर्थ असा होईल की, १, २, ३ इत्यादि संख्या आंकड्यांनी न दर्शवितां वरील सारख्या शब्दांनी दाखवाव्या व अशा रीतीने तयार केलेल्या संख्यावाचक शब्दांचे शेवटीं त व क हीं अक्षरें घालावीं. परंतु ह्या अर्थांत अक्षरांबद्दल दुसरीं कोणतीं तरी अक्षरें योजावयाचीं ही पद्धत नाहीं. दुसरा अर्थ असा संभवतो कीं, क पासून जीं व्यंजनें आहेत तीं मोजून त्यांचे जागीं संकेत करून आंकडे दर्शविणारे शब्द घालावे व शब्द संपला हें दर्शविण्यासाठीं तु किंवा क चा उपयोग करावा; उदाहरणार्थ 'खग' (पक्षी) दर्शविण्यासाठीं 'नयनज्वलनक' असें म्हणावें (कारण ख व ग हीं दुसरी तिसरीं व्यंजनें आहेत त्यांबद्दल नयन म्हणजे दोन व ज्वलन म्हणजे तीन आणि शब्द संपला हें दर्शविण्यासाठीं क). त्यांतहि अ, इ, उ इत्यादि भिन्नभिन्न स्वर कसे दाखवावयाचे तें समजत नाहीं.

२ मूलदेवासंबंधाने वरीलपैकीं बहुतेक माहिती 'कलाविलास' ह्या ग्रंथाच्या संपादकांनी टीपेंत दिली आहे. त्याचप्रमाणे मी 'कादंबरी' या ग्रन्थावरील माझ्या इंग्रजी टिप्पणांतहि अनेक वर्षांपूर्वी दिली होती. निव्वळ मराठी वाचकांसाठीं ती या ठिकाणीं उद्धृत केली आहे.

# पुस्तकपरीक्षण



'**अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक**' (संपादक गं. दे. खानोलकर, भारत गौरव ग्रंथमाला, मुंबई):–मराठी वाङ्मयांत चरित्रात्मक ग्रंथ थोडे; टीकात्मक ग्रंथांचीहि तीच स्थिति; अशा परिस्थितींत दिवंगत वाङ्मयभक्तांची चरित्रें एकत्र आणून, त्यांच्या लिखाणांची माहिती देऊन, व त्यावर टीकात्मक चर्चा करून देण्याची अवघड जबाबदारी श्री. खानोलकरांनी सदरील ग्रंथ संपादून ती यशस्वी रीतीनें पार पाडिली ही अभिमानास्पद गोष्ट होय. चिकित्सात्मकबुद्धीनें एकाच लेखकाच्या जीवनक्रमाचें साधंत चित्र रेखाटणें, व अनेक लेखकांच्या लिखाणांचा त्यांच्या चरित्रांशीं मेळ घालून तो मर्यादित ग्रंथांत सादर करणें यांत महदंतर आहे. पूर्वोक्त कार्याचें यश व्यक्तिगत मेहनतीवर व अभ्यासावर अवलंबून असतें, तर उपरोक्त कार्य वैयक्तिक मेहनतीबरोबरच सहकार्यावर व लेखकांच्या लोकसंग्राहक वृत्तीवर अवलंबून असतें. त्यांतून 'ग्रंथरचना पायाशुद्ध, सशास्त्र, संगतवार व निर्दोष व्हावी' अशी इच्छा असल्यास लेखकाचें कार्य अधिक कष्टाचें होतें. असें असून सुद्धा हें दुष्कर व बऱ्याच अंशीं पराधीन असें कार्य श्री. खानोलकर यांनी पुरें करून मराठी वाङ्मयाच्या टीकात्मक व संदर्भात्मक अभ्यासाच्या एका शाखेंत संस्मरणीय कामगिरी केली यांत शंका नाही. ह्या कोशवजा वाङ्मयग्रंथाबद्दल मराठी भाषेचे अभ्यासी व संशोधक ग्रंथकर्त्यांचे सदैव ऋणी राहतील.

ग्रंथांत चरित्रात्मक भागापेक्षा विवेचनात्मक किंवा टीकात्मक भागावर भर दिला आहे व तो यथार्थ आहे. प्रथम खंडांत ७१ चरित्रें दिलीं असून त्यांत किर्लोस्कर, गडकरी इत्यादि नाटककार, हरी नारायण आपटे, कृष्णाजी केशव गोखले इत्यादि कादंबरीकार, गोडबोले, केशवसुत व टिळक इत्यादी कवि, खरे, चांदोरकर इत्यादि इतिहास संशोधक ह्यांच्या चरित्रांची व वाङ्मयीन जीवितांची संगतवार व मनोरंजक माहिती दिलेली आहे. एका अर्थानें हा ग्रंथ वाचतांना गेल्या शंभर वर्षांत मराठी वाङ्मयांत झालेले सर्व फेरबदल व ते घडवून आणण्यास अंशतः किंवा निमित्तमात्र कारणीभूत झालेल्या व्यक्ती मनःचक्षू पुढून जातात व महाराष्ट्र सारस्वताचें महत्त्व मनास पटतें. पुस्तकांतील जवळ जवळ एक चतुर्थांश भाग 'केशवसुतां'वरील टीका लेखानें व्यापिला आहे. ह्या लेखाच्या विस्तारामुळे बाकीच्या लेखास गौणत्व प्राप्त होतें हें जरी थोडा वेळ मान्य केलें तरी हा लेख सर्व लेखांत अत्यंत मार्मिक व विचारप्रवर्तक आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. हा लेख प्रो. माधवराव पटवर्धन यांनी लिहिला असून त्यांत केशवसुतांचा त्यांचा अभ्यास व त्यांनी घेतलेले परिश्रम पूर्णपणें

व्यक्त होतात. आधुनिककवींचे नेते व स्फूर्तिदाते ह्या दृष्टीने केशवसुतांची योग्यता, त्यांच्या अभिनव काव्यांत व्यक्त झालेली विविधता, त्यांच्या लिखाणाबद्दल झालेली साधकबाधक, योग्य व अवास्तव टीका ह्या सर्व गोष्टींचें परीक्षण ह्या लेखात आलें असल्यामुळे ह्या लेखाचा विस्तार अपरिहार्य व क्षम्य आहे असें पुष्कळांस वाटेल. टीकाकार स्वतः कवि—बंडखोर व सुधारणाप्रिय कवि—आणि जिच्यांत विविध विवेचनीय प्रश्न निघतात अशी अभिनव केशवसुतांची काव्यरचना हा प्रतिपाद्य विषय; अर्थात् लेखक विषयात रंगून गेल्यामुळे मुख्य ग्रंथाची प्रमाणबद्धता बिघडली व लेखणीचा ताळतंत्र सुटला तर त्यात नवल तें काय? मृतकवीबद्दल आपला शक्य तितका आदर व्यक्त करून सुद्धा त्याच वेळीं त्याच्या गुणावगुणांची चर्चा सशास्त्र, तर्कशुद्ध व निःपक्षपाती होण्याकरिता लेखकाने अत्यंत काळजी घेतली आहे असें वाटतें. सर्वांगीणता, सुसंगतता, समंजसपणा व सहृदयता हे टीकेचे प्रधान गुण ह्या लेखांत व्यक्त होतात व म्हणून आमच्या दृष्टीने हा 'दीर्घसूत्री भासणारा' प्रबंध मननीय, आदर्शभूत व नवविचारप्रवर्तक आहे. अर्थात् एक दोन ठिकाणीं ह्यात वाङ्मयसेवकांबद्दल केलेला वैय्यक्तिक उल्लेख जर गाळला असता (पान १०२ प्रो. बेहरे यांच्याबद्दल व पा. १३७ रा. खांडेकर यांच्याबद्दल) तर फारच चांगलें झालें असतें.

केशवसुत हे प्रो० पटवर्धनांचे 'प्रिय' कवि आहेत, व ते महाराष्ट्राचेंहि प्रिय कवि राहणार ही जाणीव त्यांना पूर्ण आहे. परंतु आपल्या 'प्रिय कवीच्या नांवाला अवास्तव स्तुति-निंदेच्या कल्लोलावर आत्यंतिक हेलकावे मिळावेत हें त्यांस इष्ट वाटत नाही' आणि 'पोकळ स्तुति करण्याची रूढि पडूं नये, सोनें असलें तरी तें किती नंबरी आहे हें ओळखतां यावें म्हणून त्यांनी केशवसुतांच्या वाङ्मयीन जीविताचें 'विस्तृत व दिसायला निष्ठुर असें परीक्षण केलें आहे'. एकीकडे विभूतिपूजा तर दुसरीकडे चिखलफेंक अशा क्रियाप्रक्रियांहि रसग्रहणास बाध येतो व काव्यचिकित्सा विकृत होते. आपण केलेलें विवेचन ह्या द्वंद्वापासून विमुक्त आहे व 'अपरीहार्य' मतभेद असून सुद्धा 'आपल्या परीक्षणाच्या वाचनाने काव्यचिकित्सेस व रसग्रहणास मदत होईल अशी सबळ आशा' प्रो. पटवर्धनांनी व्यक्त केलेली आहे.

ह्या लेखांत आलेल्या 'विविध विवेचनीय विषयांचा' व त्यांवरील टीकेचा परामर्ष घेणें हें या परीक्षणाच्या आवाक्याबाहेरील आहे. परंतु एक दोन महत्त्वाच्या गोष्टींचें दिग्दर्शन करणें सयुक्तिक होय असें वाटतें. सर्व लेख वाचल्यावर केशवसुतांच्याबद्दल साधारण वाचकांमध्ये असलेल्या पुष्कळ कल्पनेला धक्का बसतो. प्रो. पटवर्धन अगदीच नवीन असें कांही प्रतिपादन करीत नसले तरी त्यांच्या तर्कशुद्ध लिखाणामुळे केशवसुतांकडे व इतरांहि कवींकडे पाहण्याची दृष्टि बदलेल असें आम्हांस वाटतें.

गुणावगुणांची चर्चा करून प्रो. पटवर्धनांनी केशवसुत हे युगप्रवर्तक कवि नव्हत, व त्यांच्या पुष्कळ कवितेंत 'मौलिक स्वतंत्रता किंवा अबोधपूर्व कल्पनांची अभिव्यक्ति अगदी थोडी आहे' हें प्रतिपादन करण्याचा प्रयत्न केला आहे. केशव-

सुतांच्या काव्यांत कृत्रिमतेचा दोष दिसतो व 'जोरदार पृथगात्मता, सरस रचनेची विपुलता आणि कलेची आदर्शभूत कामगिरी या त्रयींचा असाधारण प्रतिभेच्या ठिकाणीं दिसणारा संगम' त्यांत दिसत नाही असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. त्यांच्या मतें केशवसुताच्या कवितेंत जें नवीन आहे, तें त्या काळीं पाश्चात्य संस्कृतीशीं संघर्षण चालू झाल्यामुळे समाजाच्या विचारांत व आचारांत जी खळबळ उडाली तिचें प्रतिबिंब होय. केशवसुताचे बोल हे पडसाद होत व ते जरी अंतःकरणापासून निघालेले असले तरी जातिवंत काव्य त्यांत फार थोडे आहे. थोडक्यांत म्हणजे 'एकोणिसाव्या शतकाच्या चौथ्या पंचविशींत इंग्रजी भावगीताच्या वाचनाने स्फूर्ति पावून ज्यांनी पाश्चात्य धर्तीची कविता रचावयास सुरवात केली, त्या कविवर्गांत कालदृष्ट्या व गुणदृष्ट्या केशवसुत अग्रेसर होत परंतु केशवसुताच्या कवितेने काळाच्या ओघाबरोबर एरव्ही घडून आलीच नसती अशी कोणतीच क्रांती घडवून आणलेली दिसत नाही.'

प्रो. पटवर्धनांनी काढलेला हा निष्कर्ष, जरी थोडाफार सत्य असला तरी तो केशवसुताच्या भक्तजनास पटणार नाही इतकेंच नव्हे तर आधुनिक वाङ्मयाबद्दल अभिमान बाळगणाऱ्या पुष्कळ वाचकांस तो रुचणार नाही. दिवंगत किंवा हयात असलेल्या लेखकांच्या लिखाणाकडे पाहण्याची त्यांची दृष्टि इतर लेखकापेक्षा जरा निराळी आहे यांत शंका नाही. तर्काच्या रुक्ष पण उच्च जागेवर अधिष्ठित होऊन काव्यप्रदेशाकडे दृष्टि टाकल्यास पुष्कळशीं रोपें खुजट दिसलीं तर त्यांत नवल काय! असाहि प्रश्न कित्येक विचारतील. अशाच कठोर तर्कपद्धतीने वाङ्मयाची छाननी करूं गेल्यास पुष्कळच लिखाण 'सोनें' नाही असेंच दिसून येईल. काव्यचर्चेच्या प्रांतात तर्कास जागा आहे, परंतु त्याचा तेथे ताबा चालणार नाही; त्याने त्या प्रांतांत खुशाल वावरावें. पण मदतनीस म्हणून मालक म्हणून नव्हे! खऱ्या कलेस सत्याची चाड आहे व 'न्याहाळून पाहिल्यावर ज्या कवितेंतील विसंगति, कृत्रिमता ही अधिकाधिक प्रतीत होऊं लागते ती जिवंत कलाकृती नव्हे!' हे सर्व खरें, परंतु कलाविकासाच्या द्वारें जें सत्य प्रतीत होतें तें हरएक प्रसंगीं तर्काच्या कसोटीस पूर्णपणें उतरेल असें मात्र नाही. 'यात्येकतोऽस्त शिखरं पतिरौषधीनाम्' ह्या श्लोकांत शास्त्रीय सत्य असो व नसो त्या योगाने त्याच्या सौंदर्यास कमीपणा येतो असें मुळीच नाही. 'झपूर्झा' व 'हरपले श्रेय' ह्या कवितेवर केलेली टीका इतकी तर्कप्रधान (तर्कट!) झाली आहे की, शेवटीं टीकाकारास 'भिक नको पण कुत्रा आवर' अशाच अर्थाची विनंती करणें भाग पडतें. मधुन मधुन विखुरलेलीं सुभाषितवजा वाक्येंसुद्धा सर्वतः सत्य आहेत असें वाटत नाहीं. कवितेबद्दल विवेचन करतां करतां ते लिहितातः—'निराळ्या शब्दांनी सांगावयाचें म्हणजे कवि हा निर्माण कांही करीत नाही. 'संतकवि दासगणु व लावणीबहाद्दर पठ्ठे बापूराव या दोघांच्या प्रतिभांच्या स्फुरणाची क्रिया एकच आहे. 'हिंदी अशिक्षित शेतकरी वर्ग कांही अंशीं मजूरवर्ग हे अल्पसंतुष्ट आहेत पण ते कां? तसे रचना केली व टिळकांची प्रतिभा केशवसुत, विनायक, बालकवि व गोविंदाग्रज या

तर ते आळशी व प्रारब्धवादी आहेत.' त्याचप्रमाणे केशवसुताबद्दल लिहितांना टीकाकार म्हणतात, 'सूर्योदयाच्या वेळीं कांही पक्षी किलबिल करून जणूं काय त्याचें स्वागत करतांना दिसतात परंतु सूर्योदय हा कांही त्यांच्या किलबिलाटाने घडून येत नाही हें विसरतां कामा नये.' ह्या ठिकाणीं केशवसुताची कविता म्हणजे पक्ष्यांचें किलबिलणेंच होय असें प्रो० पटवर्धनांना म्हणावयाचें आहे काय? परिस्थिति व कवि ह्यांचा कार्यकारण असाच संबंध असतो का पुष्यपोषक असा असतो? प्रो० पटवर्धन लिहितात, 'झपूर्झा' ह्या अर्थशून्य शिर्षकाहून 'काव्यतंद्रेचा प्रभाव' हें नांव अधिक सार्थ झालें असतें. परंतु ते नांव एखाद्या निबंधास शोभलें असतें. काव्यास 'झपूर्झा' हेंच नांव गोड व सार्थ दिसतें. अशा व इतर कांही ठिकाणीं प्रो० पटवर्धनांनी आपली लेखणी वाजवीपेक्षा जास्ती तिखट केली आहे असें आम्हांस वाटतें. एका अर्थाने असें म्हणतां येईल कीं, रसिकांस काव्य अर्पण केल्याबरोबरच टीकाकारांस त्यावर आपलें टीकास्त्र चालविण्यास हक्क प्राप्त होतो परंतु त्याने 'शायलॉक'–प्रमाणे आपला हक्क प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करूं नये; नाहीतर 'तुझा हक्क तूं बजाव पण त्यावेळीं रक्ताचा एक थेंब जर सांडला तर मात्र त्याचा परिणाम तुला भोगावा लागेल' अशाच तऱ्हेचा निष्ठुर आणि निरोधक सवाल करण्याशिवाय गत्यंतर राहत नाही. असो, शेवटीं प्रो० पटवर्धनांनी इतरत्र लिहिलेल्या टीकात्मक शब्दांनी त्यांची रजा घेणें योग्य होईल.

'अखेर ही गोष्ट खरीच. कवितेचा आत्मा भावनारूप असल्यामुळे त्याची प्रतीति होणें प्रत्येकाच्या मानसिक सिद्धतेवर व उपजत वृत्तीवरच अवलंबून असणार. टीकाकार तरी स्खलनशील मनुष्यप्राण्यांपैकीच एक आहे.'

केशवसुताप्रमाणे वाङ्मयात बंडखोरी करून समाजाच्या विचारास धक्का देण्याचें कार्य ज्यांनी केलें त्या कै. आगरकरावरील लेख आदर्शभूत आहे. नांवाच्या वर्णक्रमास अनुसरून ह्या निबंधास दुसरी जागा मिळाली आहे व तीच जागा गुणक्रमानेहि त्यास दिल्यास चूक होणार नाही. अवघ्या तीस पानांच्या मर्यादेंत ज्याने 'अंतरीचा ज्ञानदिवा, मालवूं नको रे' असें महाराष्ट्रास सांगून जागें केले, त्या सुधारक नेत्याच्या जीवनक्रमाची संगति त्यांतील कोणतीहि चटकदार गोष्ट न वगळतां करणें व त्याबरोबर त्याच्या लेखनकार्याचा सचिकित्सक आढावा काढणें हें महत्कार्य श्री. वि. ह. कुलकर्णी ह्यांनी सुंदर रीतीनें साधिलें आहे. टिळक, आगरकर व चिपळूणकर इत्यादि समकालिन व भिन्नमतप्रवर्तक लोकनायकांच्या कृतींचें परीक्षण–कित्येक प्रसंगीं तुलनात्मक परीक्षण–निर्भीड व स्थिरचित्त करून लिहिण्यांत जी एक उच्च मनोभूमिका लागते ती श्री. कुलकर्ण्यांच्या ठिकाणीं आहे हें ह्या निबंधावरून स्पष्ट दिसतें. आगरकरांचे निबंध आजहि नव्याने वाचण्याच्या लायकीचे आहेत हें लेखकाचें विधान कोणासहि पटण्याजोगतें आहे. विष्णुशास्त्री व आगरकर यांनी स्वमतानुरूप देशाची कशी सेवा केली हें सांगून त्यांच्या भाषाशैलीबद्दल श्री. कुलकर्णी लिहितात:–

'आगरकर यांची भाषासुंदरी अलंकारप्रिय नाही असें नाही पण पोक्त व ठसकेबाज आहे. ती दृष्टीला दृष्टी लावून बोलते पण तिच्या डोळ्यांत पाप नाही. ती सडेतोड बोलणारी पण अंत:करणाची प्रेमळ आहे.' ह्या निबंधाच्या शेवटीं भाषेच्या पुष्टीकरणार्थ घेतलेले उतारे समर्पक आहेत. मात्र 'शनिदेव ऊर्फ साडेसातीचा देव' ही विनोदात्मक आरती उद्धृत करण्याचा मोह लेखकास कां आवरतां आला नाही ह्याचें किंचित् आश्चर्य वाटतें. तसेंच 'आगरकर यांच्या मरणानंतर त्यांच्या सुधारकालाहि पुढें लवकरच मरण आल्याचें पाहिलें म्हणजे त्यांच्या पुढची पिढी नादान निपजली व त्यांच्यांत आगरकरांमध्ये दिसून येणारा जोम व तडफदारपणा राहिला नाही'—ही निराशोक्ति विभूतिपूजेच्या दृष्टीने मान्य असली तरी ती सत्य आहे, असें वाटत नाही. उलटपक्षी आगरकरांचे एक चहाते प्रो. भाटे मोठ्या आशायुक्त वाणीने सांगतात की, 'आगरकरांनी ज्या सुधारणारूपी वृक्षाचें बीज तीस पसतीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत रुजत घातलें त्या बीजाचा आता चांगला जोमदार वृक्ष बनला असून तो फांद्या व पालवी ह्यांनी डंवरलेला आहे.'

हा निबंध वाचल्यावर साहजिकच कै. आगरकरांचे एका अर्थाने प्रतिस्पर्धी व भिन्नमतप्रवर्तक विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या टीकालेखाकडे वाचकांची दृष्टी वळते. लेख वाचल्यावर श्री. कुलकर्णी यांच्याप्रमाणेच श्री. गोखले यांनी चरित्रकथन व वाङ्मयटीका हीं दोन्ही कार्यें अत्यंत चोखपणाने व समतोल बुद्धीने केलीं आहेत हें वाचकास कबूल करावें लागतें. शास्त्रीबोवांच्या एकंदर लिखाणाची छाननी करून त्यांच्या विध्वंसक व विधायक अशा दोन्ही बाजूंचें समर्थन करून श्री. गोखले यांनी वाङ्मयक्षेत्रांत त्यांनी किती भरीव व स्फूर्तिदायक कार्य केलें, हें उठावदार रीतीने प्रतिपादन केलें आहे. 'आधुनिक वाङ्मयसेवकांस वाङ्मयसेवेची व देशसेवेची स्फूर्ति मालेनेच दिली व तिने आपल्याहिपेक्षा सवाई शिष्य निर्माण केले' हें तत्त्व सप्रमाण सिद्ध करण्यांत श्री. गोखले यांनी आपलें लेखनकौशल्य विशेषत: निबंधाच्या समारोपांत व्यक्त केलें आहे. 'वाङ्मयाची मराठेशाही प्रस्थापित करणारे श्री. चिपळूणकर हे मराठी भाषेचे शिवाजी होत' ही अतिशयोक्ति नसून वस्तुस्थितीचें उठावदार वर्णन होय हें श्री. गोखले ह्यांच्या लेखावरून वाचकांस पटतें.

प्रस्तुत ग्रंथांतील ठळक ठळक वाङ्मयसेवकांच्यावरील लेखांचा नामनिर्देश सुद्धा करणें हें ह्या लहानश्या परीक्षणाच्या मर्यादेपलिकडील आहे. तरी पण पुष्कळशा लेखांत दिलेली माहिती साधार व विश्वसनीय असून चर्चाहि मार्मिक व सांगोपांग आहे. प्रसिद्ध कवि श्री. टिळक यांच्यावरील लेख वाचनीय असून त्यांत टिळकांच्या काव्यांतील गुणदोषांचें वर्णन रसिकतेने करण्यांत आलें आहे. विशेषत: टिळकांच्या धार्मिक कवितेबद्दल केलेली चर्चा महत्त्वाची असून 'टिळकांचें धर्मांतर म्हणजे त्यांच्या आत्म्याच्या तीव्र तळमळीच्या उपशमनाचा उपाय,' हें विधान सुंदर रीतीने विशद केलें आहे. 'टिळकांनी गोविंदाग्रजांप्रमाणेच दुसऱ्याच्या पावलांवर पाऊल टाकून काव्य-

कवींच्या प्रतिभेपेक्षां हिणकस होती' हीं विधानें टिळकभक्तांस रुचणार नाहीत. तरी पण समंजस वाचकांस त्यांची सत्यता मान्य करावी लागेल असें आम्हांस वाटतें. सुप्रसिद्ध टीकाकार व लघुकथा लेखक श्री. खांडेकर यांनी लिहिलेले 'किर्लोस्कर व गडकरी' या नाटककारांवरील लेख त्यांच्या कीर्तीस साजेसे आहेत. आपल्या विशिष्ट भाषापद्धतीस अनुसरून त्यांनी सुरवातीपासून आपल्या लेखांत सुंदर उपमांची व कोट्यांची खैरात केली आहे. 'गंगेचा उगम या दृष्टीने गंगोत्रीचें जें महत्त्व तेंच मराठी नाटकाच्या दृष्टीने 'किर्लोस्करांचे नाट्यकलेला गायनकलेची जोड देऊन किर्लोस्करांनीं संगीत नाटकाची जी प्रथा पाडली ती आज अर्धशतक होऊन गेलें तरी जोमाने सुरु आहे.' हे श्री. खांडेकरांनीं काढलेले उद्गार सर्वांना पटतील यांत शंका नाही. कुंटे व जांभेकर यांच्यावरील निबंध जरी बऱ्याच इतर माहितीमुळे थोडेसे कंटाळवाणे वाटले तरी तत्कालीन परिस्थितीच्या माहितीच्या दृष्टीने ते खरोखरीच उपयुक्त ठरतात. श्री. कुलकर्णी यांनी अच्युतराव कोल्हटकरांवरील लेख काळजीपूर्वक रीतीने लिहिला असून त्यांच्या भाषाशैलीवर मार्मिक विवेचन केलें आहे. परंतु त्यांचें 'विनोदात्मक कवित्व' म्हणून जो उतारा विस्ताराने उद्धृत केला आहे तो गाळला असता तर बरें झालें असतें.

ह्या खंडांत एकूणदर्शनीं आढळणारा मुख्य दोष म्हणजे प्रमाणबद्धतेचा अभाव. पुस्तकातील ह्या दोषाबद्दल जाहीर कबुली संपादकांनी एके ठिकाणीं (प्रगतींत) दिली आहे. हेंहि खरें कीं, असल्या संदर्भात्मक व चरित्रात्मक ग्रंथांत कोणत्या लेखकाचें जीवनकार्य व लिखाण किती ओळींत द्यावें असें प्रमाण काढणें कठीण पडेल. तरी पण आलेल्या लहानथोर पाहुण्यास यजमान योग्य त्या सत्काराने वागवून त्याची यथोचित संभावना करतो, त्याचप्रमाणे संग्राहकांस महत्त्वाच्या लिखाणास व लेखकांस योग्य तितकी जागा आपल्या ग्रंथांत देणें क्रमप्राप्त होतें. उदाहरणार्थ, 'केशवसुता'सारख्या कवींवरील टीकालेखाने जवळ जवळ ७५ पानें व्यापिलीं असलीं तरी त्यांत फारसें वाउगें झालें असें कोणास वाटणार नाहीं. परंतु आरंभींच नामक्रमामुळे 'अग्रपूजेचा मान मिळविलेले अनंततनय यांच्या जीवनक्रमाची व लिखाणाची वासलात एका पानांत (तें सुद्धा संबंध नव्हे) लावण्यांत आली आहे हें पाहून पुष्कळांस वाईट वाटेल. 'बालबोध' कर्ते श्री. ओक ह्यांच्या बद्दलची माहिती जुजबी वाटते व त्यांच्या ग्रंथांचा नामनिर्देशापलिकडे फारसा उल्लेख करण्यांत आलेला नाही. गोळे यांच्यावरील लेखहि त्रुटित व असमाधानकारक आहे. त्यांच्या 'ब्राह्मण व त्यांची विद्या' व 'हिंदुधर्म व सुधारणा' ह्या विचारप्रवर्तक ग्रंथांवर थोडीतरी चर्चा पाहिजे होती असें आम्हांस वाटतें. 'कर्तुमकर्तुं अन्यथा कर्तुं' अशी शक्ति असलेल्या 'मुद्राराक्षसाने' (Printer's Devil) तर गोळे यांना ९ वर्षेच आयुष्य दिलें आहे. कारण त्यांची जन्मतिथी १८५८ असतां ती १८९८ (चुकून) देण्यांत आली आहे 'श्रीनभूमि' ह्या ग्रन्थाचे कर्ते रामकृष्ण सखाराम आठवले (१८५८-१९१०) ह्यांचा उल्लेख ह्या खंडांत करणें महत्त्वाचें जरी नसलें तरी क्रमप्राप्त होतें असें आम्हांस वाटतें. श्री. चंदावरकर ह्यांनी (आमच्या माहिती

प्रमाणे मराठींत कांहीं निबंध (विशेषतः मासिक मनोरंजनांत) लिहिले आहेत म्हणून न्यायमूर्तींचा नामनिर्देश झाला असता तर बरें झालें असतें. श्री. कृ. प. गाडगीळ ह्यांची जन्मतारीख एके ठिकाणीं १८४७ दिलेली आहे व ह्या ग्रंथांत ती १८४८ देण्यांत आली आहे. वामनशास्त्री इस्लामपूरकर ह्यांच्या मृत्युतीथीबद्दल जरा घोटाळा झालेला दिसतो. ह्या ग्रंथांत १९१३ साल दिलेलें आहे तर विविधज्ञानविस्ताराच्या एका जुन्या अंकांत (वर्ष ४३ अंक ३ रा) पुढील मजकूर आढळतो. 'आम्हांस लिहिण्यास अत्यंत दुःख वाटतें की, पंडित वामनशास्त्री हे ३ दिसेंबर १९११ रोजीं मिरज मुक्कामीं परलोकवासी झाले'. त्याचप्रमाणें शास्त्रीबुवांच्या लिखाणांत त्यांची श्रीहर्षावरील टीका (विविधज्ञान विस्तारांत आलेली) व त्यांचे 'महा साध्वी मीराबाईचें चरित्र' ह्यांचा उल्लेख आढळत नाही. परंतु अशा प्रकारचे दोष अगदी थोडेच आहेत हें नमुद करणें जरूरीचें आहे.

सारांश 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवकाचें अंतर्बाह्य स्वरूप आकर्षक आहे. एकाच व्यक्तीने मनांत आणल्यास व भाषेच्या 'भरीव' सेवेची बळवत्तर इच्छा धरल्यास तिच्या हातून स्मरणार्थ व उपयुक्त कार्य होऊं शकतें ह्याचें द्योतक म्हणून प्रस्तुत ग्रंथ दाखविण्यास हरकत नाही असें आम्हांस वाटतें. एका अर्थाने अशा ग्रंथाच्या संपादकाचें कार्य म्हटल्यास सोपें व म्हटल्यास अवघड असतें. सोपें असें की, चार विद्वान मंडळी संग्रहीं असली की, बसल्याबसल्या एक मोठें पुस्तक बाहेर काढण्यास कांहीच पंचाईत पडत नाही. खरें पाहिल्यास एवढ्यानेच भागतें असें नाही. माहिती बरोबर आहे किंवा नाहीं, टीका सशास्त्र व सुसंगत आहे व मार्मिक आहे काय इत्यादिहि प्रश्न संपादकांनी सोडवावयाचे असतात. त्या दृष्टीने श्री. खानोलकरांचें कार्य 'सुत्रस्थे वास्ति मे गतिः' अशांच्याहि पेक्षा श्रेष्ठ दर्जाचें आहे ह्यांत संशय नाही. एक गोष्ट मात्र वाचकांच्या चटकन नजरेंन येते आणि ती ही की, प्रस्तुत ग्रंथांत स्वतः खानोलकर व त्यांचे मित्र पटवर्धन, कुलकर्णी, मराठे, खांडेकर इत्यादि उत्साही लेखक यां सर्वांच्या लिहिण्यांत एक धोरण दिसून येत नाही. रा. खानोलकरांनी बहुधा बहु-मोल उताऱ्यांचें संकलन करण्यापलिकडे विशेष चर्चा केलेली दिसत नाही. उलट पटवर्धनांनी पूर्वींच्या सर्व टीकाकारांचा समाचार घेऊन एका विशिष्ट धोरणाने आपला निबंध लिहिला आहे असें दिसतें. श्री. कुलकर्णी यांनी आगरकरांच्या पूर्व वयाची माहिती साद्यंत दिली आहे तर श्री. खांडेकरांनी आपले निबंध सुंदर कल्पनांनी व कोट्यांनी सजविलें आहेत. अशा प्रकारचे इंग्रजी ग्रंथ पाहिल्यास त्यांत अनेक लेख-कांच्या भिन्न विचारपद्धति व भाषावैचित्र्य आढळें तरी सर्वांच्या हातास वळण एकाच संपादकीय धोरणाचें दिसून येतें. अशा प्रकारचें संपादकीय वळण लागल्यास प्रस्तुत खंडाहून पुढील खंड अधिक प्रमाणबद्ध, एकरंगी व संग्रहणीय होईल अशी आम्हांस खात्री आहे.

---

नी. वा. किंकर

# परिषद्वार्ता

## विशेष साधारण सभा— ता. २७ मार्च १९३२.

प्रो० आळतेकर, रा. ब. दा. ग. पाध्ये प्रभृति २३ सभासदांनी गेल्या जुलई महिन्यांत, हैद्राबाद (दक्षिण) येथे गेल्या मे महिन्यांत भरलेल्या संमेलनाचे समर्थी परिषदेच्या सभा मरून ठराव मंजूर झाले. त्यासंबंधी विचार करणें इ० कामासाठीं, विशेष सभा भरवावी अशी मागणी परिषदेचा नियम १० प्रमाणे केल्यावरून, पुणें, ता० ५–३–३२ च्या, अध्यक्ष रा. रा. माधवराव विनायक किबे व कार्याध्यक्ष रा० रा० नारायण गोविंद चापेकर यांच्या सहीच्या सूचनेप्रमाणे, परिषदेची एक विशेष सभा मुंबई येथे मुं० मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या दिवाणखान्यांत, रविवार ता० २७ मार्च १९३२ रोजीं, स्टँ. टा. १२ वाजतां भरली होती. सभेस खालीलप्रमाणें गृहस्थ हजर होते.

| | | |
|---|---|---|
| १ | सरदार माधवराव विनायक किबे, | अध्यक्ष |
| २ | रा० रा० नारायण गोविंद चापेकर, | कार्याध्यक्ष |
| ३ | रा० ब० दा. ग. पाध्ये, | ट्रस्टी |

४ रा. न. चिं. केळकर ५ रा. रा. पु. जोशी ६ रा. श्री. म. वर्दे ७ रा. रा. ग. हर्षे ८ रा. के. ना. काळे ९ रा. ग. दा. देसाई १० रा. य. द. वाडेकर ११ रा. प्र. धों. कानिटकर १२ रा. सुं मा. वैद्य १३ रा. रा. म. जोशी १४ रा. वा. सि. बेंद्रे १५ रा. वा. गो. परांजपे १६ रा. ग. गं. जांभेकर १७ रा. न. र. फाटक १८ रा. के. ल. ओगले १९ रा. वा. म. जोशी २० रा. जी. आर्. परुळकर २१ रा. दा. सा. यंदे २२ रा. चिं. ग. कर्वे २३ रा. रा. म. आठवले २४ रा. वा. गो. मायदेव २५ रा. ग. मा. कुरुळकर २६ रा. मा. दा. आळतेकर २७ रा. त्र्यं. मा. कुरुळकर २८ रा. य. रा. दाते २९ रा. शं. का. गोखले ३० रा. र. वि. कानिटकर ३१ रा. वि. द. घाटे ३२ रा. माधवराव पटवर्धन ३३ रा. कृ. पां. कुळकर्णी ३४ रा. पां वा. काणे ३५ रा. नी. भा. भाटवडेकर ३६ रा. ज. र. घारपुरे ३७ रा. ग. वि. मुळे ३८ रा. आ. ह. बोरवणकर ३९ रा. शं. गो. देसाई ४० रा. मा. वि. बागडे ४१ रा. भा. रा. दामले ४२ रा. सि. म. अभ्यंकर ४३ रा. पु. गो. काणेकर ४४ वि. स. वर्दे ४५ रा. दा. ग. पाध्ये ४६ रा. ब द. फणसाळकर ४७ रा. द. मा. लोंढे ४८ रा. अ. ना. भालेराव.

सभेचें काम रीतसर सुरू होण्यापूर्वी रा ब. दा. ग. पाध्ये यांनी सभासदांस विनंती केली की, सभेच्यापुढे येणारें काम वादविवादग्रस्त असल्या कारणाने त्याचा निकाल स्नेहसलोख्याने व तडजोडीच्या तत्त्वावर होणें शक्य असल्यास तशा तऱ्हेचा

ठरावाचा खर्डा तयार करण्यासाठी वगैरे सुमारें एका घटकेची मुदत सभासदांनी त्यास म्हणजे रा. पाध्ये व अध्यक्ष सरदार किबे, कार्याध्यक्ष रा. रा. चापेकर व रा. रा. न. चिं. (तात्यासाहेब) केळकर यांस द्यावी, आणि मुदतीनंतर मग सभेचें काम नियमित रीतीने चालावें. थोडी भवति न भवति होऊन ही विनंती मान्य करण्यांत आली. मग उपरिनिर्दिष्ट चार गृहस्थांनी एकीकडे जाऊन विचारविनिमय करून ठरावाचा एक खर्डा सभेपुढे ठेवण्यासाठी दिलेल्या मुदतींत तयार केला, व तसें सभेस कळविलें.

नंतर अध्यक्ष सरदार किबे हे स्थानापन्न होऊन त्यांनी सभेचें काम सुरू केलें. प्रथम सभेची सूचना रा. रा. कृ. पां. कुळकर्णी यांनी वाचून दाखविल्यावर अध्यक्षांच्या निमंत्रणावरून रा. ब. दा. ग. पाध्ये यांनी पुढील ठराव सभेपुढें मांडला व त्यास रा. रा. पां. वा. काणे यांनी अनुमोदन दिल्यावर, तो भवति न भवति होऊन मूळ खर्ड्यांत थोडीबहुत दुरुस्ती होऊन अखेर सर्वानुमतें पसार करण्यांत आला.

(अ) दक्षिण हैद्राबाद येथे गेल्या मे महिन्यांत महाराष्ट्र सम्मेलन भरलें त्या वेळीं व त्यानंतर आजपावेतों महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ज्या सभा वगैरे झाल्या व परिषदेसंबंधी ज्या गोष्टी घडून आल्या त्यावरून परिषदेच्या सभासदांमध्ये तिच्या हिताहिताच्या काही जिव्हाळ्याच्या गोष्टी, बाबी इत्यादि विषयी तीव्र मतभेद असल्याचें दिसून आलें आहे; करितां, ह्यापुढे परिषदेचें काम स्नेहसलोख्याने चालावयासाठी कोणत्या योजना कराव्या तें विचारविनिमय करून ठरविण्यासाठी, त्याचप्रमाणे विशेषेंकरून खाली नमूद केलेल्या गोष्टी करण्यासंबंधीची सर्व व्यवस्था करण्यासाठी आणि तत्संबंधी पुढे काय करावयाचें ह्याबद्दलहि योजना ठरविण्यासाठी, आणि सदर योजना, शिफारसी वगैरे पुढील परिषदेच्या साधारण सभेपुढे मंजुरीसाठी ठेवण्याची व्यवस्था करण्यासाठी खाली कलम (आ) मध्ये नांवें दिलेल्या गृहस्थांची एक कमिटी नेमिली जावी:—

### विशेषेंकरून करावयाच्या वगैरे गोष्टी: —

(१) इ. स. १९२६ पासून १९३१ अखेर परिषदेच्या सामान्य व ट्रस्टफंडाचा संपूर्ण हिशेब व कामकाजाचा रिपोर्ट तयार करणें व सदर हिशेब ऑडिट करून घेणें.

(२) सदर हिशेब पुढे ठेवण्यासाठी व नवें अधिकारी मंडळ नेमण्यासाठी आणि वार्षिक वृत्तांताची मंजुरी इत्यादि नेहमीचीं कामें करण्यासाठी व पुढे कलम ३ व ४ मधील बाबींसंबंधीच्या शिफारसी, योजना इत्यादींचा विचार करण्यासाठी वगैरे परिषदेची विशेष अशी वार्षिक सभा भरविणें.

(३) सभेच्या कचेरीसंबंधी निश्चित योजना सुचविणें.

(४) सभेच्या घटनेंत व नियमांत काय फेरफार करणें इष्ट आहे त्यासंबंधी शिफारसी करणें.

(५) महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका पुढे चालू ठेवावयाची की नाही त्याचा विचार करून ठेवावी असें कमिटीस योग्य वाटल्यास, तिजसंबंधी संपादकत्वादि व्यवस्था कोणत्या स्वरूपाची असावी इत्यादि विषयी शिफारसी करणें.

(आ) कलम (अ) प्रमाणे नेमली जाणाऱ्या कमेटींतील सभासदांचीं नांवें:—

(मुंबईत २३ सभासदांच्या निमंत्रणाने ता. २० मार्च रोजीं भरलेल्या परिषदेच्या सभेंत नेमलेल्या कमिटीचे ८ सभासद.) —१ रा. मा. दा. आळतेकर २ रा. जि. कृ. परूळकर ३ रा. स. रा. खांदेवाले ४ रा. य. र. दाते ५ रा. श्री. स. वर्दे ६ डॉ. कुरूळकर ७ रा. रा. सुंदरराव वैद्य ८ रा. ब. दा. ग. पाध्ये.

(ता. २७ च्या सभेंत अधिक निवडलेले).९ रा. न. र. फाटक १० रा. ग. गं. जांभेकर ११ रा. न. चिं. केळकर १२ रा. के. ल. ओगले १३ रा. पां. वा. काणे १४ रा. वसंतराव राऊत १५ रा. चिं. ग. कर्वे १६ रा. कृ. पां. कुळकर्णी १७ रा. माधवराव पटवर्धन शिवाय १८ अध्यक्ष व १९ कार्याध्यक्ष.

(इ) वरील कमिटीच्या सभा पुण्यास भराव्या. सभा बोलावण्याचें वगैरे काम रा. रा. य. रा. दाते आणि कृ. पां कुळकर्णी यांनी करावें. नेमलेल्या कमिटीने, परिषदेच्या हैद्राबाद येथे सम्मेलन प्रसंगीं भरलेल्या व नंतर मुंबई येथे ता. २० मार्चला भरलेल्या व आज ता. २७ मार्च रोजीं भरलेल्या परिषदेच्या सभांत झालेले ठराव व इतर गोष्टी ह्या सर्व विचारांत घेऊन मग आपल्या योजना, रिपोर्ट, शिफारसी वगैरे ता. १५ जूनचे आंत निश्चित कराव्या.

(ई) वरील सर्व कामांविषयी शेवटचे ठराव, निकाल वगैरे करावयासाठी परिषदेची विशेष अशी वार्षिक सभा मुंबई येथे ३१ जुलई १९३२ चे आंत भरवावी.

(उ) (ई) मध्ये निर्दिष्ट केलेली परिषदेची सभा अध्यक्ष व कार्याध्यक्ष यांनी बोलवावी. कमिटीचे सर्व रिपोर्ट वगैरे त्यांसच सादर केले जावे. तदनंतर अध्यक्षांचे आभार मानण्यांत येऊन सभा विसर्जन झाली.



# शुद्धलेखनमंडळाचा वृत्तान्त

श्री० रा. रा. अध्यक्ष,

१६ वें साहित्य संमेलन, हैद्राबाद.

गोवें येथे भरलेल्या साहित्यसंमेलनांत मंजूर झालेल्या ठरावान्वयें शुद्धलेखनांतील उर्वरित बाबींचा व विशेषतः विरामचिन्हांचा विचार करून निर्णय करण्याकरिता पुढील गृहस्थांचें मंडळ नेमलें.

| | |
|---|---|
| श्री. ना. गो. चापेकर (अध्यक्ष) | श्री. चिं. वि. वैद्य |
| ,, ना. दा. बनहट्टी | ,, न. चिं. केळकर |
| ,, ब. ग. खापर्डे | ,, रा. दा. देसाई |
| ,, कृ. पां. कुलकर्णी | ,, वा. म. जोशी (आवाहक) |

मंडळास आणखी सदस्य स्वीकृत करण्याचा अधिकार ठरावानें दिला होता. त्याप्रमाणे श्री. यशवंत खुशाल देशपांडे आणि प्रो. माधव त्र्यंबक पटवर्धन ह्यांना सदस्य म्हणून स्वीकृत करून घेतले. कामाच्या व्यापृततेमुळे श्री. तात्यासाहेब केळकर ह्यांना मंडळाचें काम करणें अशक्य होईल असें वाटल्यावरून त्यांनी आपल्या जागेचा राजीनामा दिला त्याप्रमाणे श्री. वामनराव जोशी ह्यांनाहि चिटणिसाचें काम करण्यास जरूर ती फुरसत न मिळाल्यामुळें त्यांनीहि चिटणिसीचा राजीनामा पाठविला. हे दोन्ही राजीनामे पहिल्या बैठकींत मंजूर करण्यात आले.

एकच शब्द निरनिराळ्या प्रकारांनी जो लिहिला जातो तसा तो लिहिला जाऊं नये म्हणून तसले शब्द मोठ्या प्रयासाने श्री. ना. दा. बनहट्टी व श्री. ब. ग. खापर्डे ह्यांनी एकत्रित केले व त्यांच्या याद्या तयार केल्या. त्याचप्रमाणे विरामचिन्हां-चीहि यादी राजवाडे ह्यांच्या लेखनावरून तयार करण्यांत आली. श्री. यशवंतराव देशपांडे यांनी विरामचिन्हांच्या इतिहासाच्या दृष्टीने मानभावी ग्रंथांतील जुनीं विरामा-चिन्हें हुडकून काढून दिलीं. ह्या सर्व याद्या अवलोकनार्थ व विचारार्थ मंडळाच्या सदस्यांकडे फिरविण्यांत आल्या.

मंडळांत दूर दूर प्रांतचे सदस्य असल्यामुळे मंडळाचें काम पत्रद्वाराच करावें लागलें. पुण्यास बैठकी तीनच झाल्या व त्यास पुणें येथील स्थानिक सभासद हजर राहूं शकले. आतापर्यंत थोड्याच बाबी विचारांत घेतां आल्या. त्यासंबंधी तात्पुरते निर्णय पुढे दिले आहेत.

१ 'पुण्य,' 'लावण्य,' हे व यासारखे दुसरे तत्समशब्द 'पुण्ण्य,' 'लावण्ण्य,' असे लिहावे. याला पाणिनीच्या व्याकरणशास्त्राचा आधार आहे. मराठींत हे शब्द विकल्पानें 'पुंण्य' 'लावंण्य' असे लिहावे.

२ तालव्य व दन्ततालव्य ह्या व्यंजनांचा उच्चारांतील भेद दाखविण्याकरिता दन्ततालव्यास खाली एक चिन्ह (टिंब) वापरावें. उदा.—च़ छ़ ज़ झ़; परंतु दन्ततालव्या- साठी स्वतंत्र चिन्ह असणें इष्ट आहे.

३ मराठींत ख आणि र व या वर्णांचा घोटाळा होतो. तो टाळण्यासाठीं निराळें चिन्ह वापरावें.

४ विरामचिन्हांसंबंधी विचार. १ कारण, परंतु वगैरे अव्ययांपूर्वी वाक्य पूर्ण झालें म्हणून पूर्णविराम देतात तो देऊं नये. स्वल्पविराम द्यावा. उदा.—१ ईश्वर आम्हांस खात्रीने पार पाडील, कारण आम्ही एकनिष्ठेनें वर्तलों. २ ईश्वर आम्हांस खात्रीने पार पाडील, परंतु आम्ही कोठे एकनिष्ठेने वर्ततो.

२ "शिवाय, तसेंच" ह्या शब्दांच्यापूर्वी वाक्यांत पूर्णविराम द्यावा. उदा.— पुण्याच्या बारभाईंच्या शंका कुशंकांचा निकाल एकदाचा लागला. शिवाय (तसेंच) महादजी तेथे असल्यामुळे आणखीहि पुष्कळ बाबी निस्तरल्या गेल्या.

३ शीर्षकाच्या पुढे पूर्णविराम देतात तो देऊं नये.

४ चालत्या वाक्याच्या शेवटीं ज्यावेळीं संदर्भनिर्देश कंसांत दिलेला असतो त्यावेळीं पूर्णविराम कंसाच्या शेवटीं द्यावा. वाक्याच्या शेवटीं देऊं नये. उदा—श्रीमं- ताची क्रीडासक्ति फार आहे. निरंकुश गजसादृश्य आहे (ऐ. टि. ५-२).

५ 'पण' हें अव्यय 'परंतु' ह्या अर्थी तंतोतंत योजिलें असेल तर त्याच्या पूर्वीच्या वाक्याच्या शेवटीं स्वल्पविराम घालावा. ज्यावेळीं तो शब्द किंचित् विरोध दाखवीत असेल त्यावेळीं कोणतेंच चिन्ह घालूं नये. उदा.—मी गेलों पण जेवलों नाहीं. पुस्तक लिहिलें पण छापलें नाही.

६ उद्धृत केलेलीं वाक्यें ज्यावेळीं प्रधान वाक्याशीं संबद्ध असतात त्यावेळीं त्यांच्या शेवटीं पूर्णविराम देऊं नये; स्वल्पविराम द्यावा. उदा:—'हा कारभार तुमच्याने तडीस जावयाचा नाहीं,' असें तोतयाने त्यांना स्पष्ट बजाविलें.

७ 'उदाहरणार्थ,' 'ह्यावरून' वगैरे शब्दांच्या पूर्वीच्या वाक्याच्या शेवटीं पूर्ण- विराम द्यावा. उदा:—विवाह करून प्रत्येकाने वंशवृद्धि करणें हें कर्तव्य होय अशीं स्पष्ट वचनें आहेत. उदाहरणार्थ, अग्निहोत्ररूप हें सत्र मरेपर्यंत चालू ठेविलें पाहिजे (श. ब्रा. १२-४-१-१).

८ चिह्नांपैकीं स्वल्पविराम, अर्धविराम व पूर्णविराम ठेवावे. प्रश्नचिह्न, उद्गार- चिह्न व अपूर्णविराम ठेवण्याचें कारण नाही. कंस, अवतरणचिह्नें रूढ झालीं आहेत तीं ठेवावीं. अंकगणित, बीजगणित व भूमिति यांतील सर्व चिह्नें ठेवावीं.

———

## पुणें येथील कचेरींतील झालेला जमाखर्च

### जानेवारी १९३२

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| मागील महिन्यांतील शिल्लक | २५/११ | छपाई | १५ |
| वर्गणी | १०६/४ | टपाल (तिकिटें) अंकासाठी भरून | ५५ |
| एकूण जमा | १३१/१५ | पगार, कारकून डिसेंबर १९३१ चा | ७/८ |
| | | परांजपे प्रचारक यांस | २० |
| | | सामान | २ |
| | | प्रचारकार्यास | २ |
| | | देणगी | /४ |
| | | एकूण खर्च | १०१/१२ |
| | | शिल्लक | ३०/३ |
| | | | १३१/१५ |

### फेब्रुवारी १९३२

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| मागील महिन्यांतील शिल्लक | ३०/३ | छपाई | ४८/८ |
| वर्गणी | ७६/११ | पगार, कारकून जानेवारी १९३२ चा | ७ |
| एकूण जमा | १०६/१४ | टपाल | १४/७ |
| | | वर्ष ४ अंक ४ वाटणें | २ |
| | | हमाली | /२/३ |
| | | ग्रंथ | /१ |
| | | सामान | /५ |
| | | सादील | //३ |
| | | ना. गो. चापेकर | ३/८ |
| | | कोल्हटकर | १० |
| | | एकूण खर्च | ८५/१५/६ |
| | | शिल्लक | २०/१४/६ |
| | | एकूण रुपये | १०६/१४. |

प्राथमिक व दुय्यम शाळांतील वाचनालयांकरिता मुंबई सरकारने मंजूर केलेली

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

## वर्ष ५ वें, अंक २ व ३ रा

## अनुक्रमणिका

# परिषदेची हानि

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे एक उपाध्यक्ष, व दक्षिण हैद्राबाद संस्थानांतील सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय पुढारी व साहित्यसेवक ना. केशवराव कोरटकर यांस पुणें मुक्कामीं एकाएकीं २१।५।१९३२ रोजीं देवाज्ञा झाली. नामदारसाहेब हे अगदी गरिबींतून स्वपराक्रमाने वर येऊन संस्थानांत वरिष्ठ न्यायाधिशाच्या हुद्यापर्यंत गेले होते. ते शिक्षण विषयक आणि सामाजिक कार्यांत फार मन घालीत: बहुतेक मोठमोठ्या संस्थांशीं त्यांचा कार्यकारी सभासद या नात्याने निकट संबंध असे. विशेषतः मराठी साहित्यसेवा त्यांना आवडे. व फुरसतीच्या वेळीं एखाद्या विद्यार्थ्याप्रमाणे ते अभ्यास करतांना आढळत. विदर्भ साहित्य-संमेलनाच्या एका अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. गोंवें येथें भरलेल्या १५ व्या म. सा. संमेलनप्रसंगीं त्यांनी पुढील संमेलनास हैद्राबाद येथे निमंत्रण देऊन, त्या-प्रमाणे स्थानिक परिस्थिति मुळींच उत्साहजनक व अनुकूल नसतां गेलें संमेलन कसें यशस्वी करून दाखविलें याची आठवण पुष्कळांस असेलच. या संमेलनाची त्यांना अतिशय दगदग झाली पण त्यांनी तीबद्दल अवाक्षरहि कोठें काढलें नाही. परिषदेच्या चालू क्रांतीच्या काळांत त्यांच्यासारख्या कुशल कर्णधाराचा फार उपयोग झाला असता. त्यांच्या शोचनीय निधनामुळे अखिल महाराष्ट्राबरोबर परिषदेचीहि फार हानि झाली आहे; याबद्दल परिषदेस फार खेद होत आहे.

होऊन गेला, त्याने खडकांवर व स्तंभांवर अनेक शासनलेख खोदून ठेविले आहेत. यांपैकी एका शासनांत चोल, पांड्य, सतियपुत, व केरलपुत (केरळ), यांचा नामनिर्देश आहे. दुसऱ्या एका शासनांत रास्टिक, पेतेनिक, व अपरान्त, हीं नांवें आढळतात. यांपैकी रास्टिक हे 'राष्ट्रिक' म्हणजे वसाहतवाले होत; व पेटेनिक म्हणजे पैठणकर समजलें पाहिजेत. तिसऱ्या एका शासनांत भोजांबरोबरच पेतेनिकांचा उल्लेख आहे. भोज हे वैदर्भपति म्हणून प्रसिद्ध आहेत. तेव्हा पेतेनिक हेहि त्याचे निकटस्थ असावे, असे सहज अनुमान निघतें. एकंदरींत अपरान्ताच्या किंवा कोंकणाच्या पूर्वेस व विदर्भाच्या पश्चिमेस असणाऱ्या दण्डकानामक महा-कान्तारांत वसलेल्या वसाहतवाल्यांना व गोदावरीतीरस्थ पैठणकरांना हीं 'रास्टिक' व 'पैठाणिक' नांवें लागू करणें प्राप्त आहे. 'महावंस' नांवाचा बुद्धधर्मीयांचा पालिग्रंथ सिंहलद्वीपांत इ. स. पांचव्या शतकाच्या सुमारास लिहिला गेला. त्यांत बुद्धधर्माचा विश्वसनीय पूर्वेतिहास आला आहे. त्यांत अशी हकीकत नमूद केली आहे की, अशोकाच्या कारकीर्दींत सतराव्या[१] वर्षी मठपति 'मोग्गलीपुत्ततिस्स' याने बाह्यदेशांत बुद्धधर्माचा प्रसार करण्यासाठी 'कत्तिको' मासांत प्रचारक पाठविले. त्यांपैकी महादेव नांवाचा प्रचारक महिसमंडलास (म्हैसुरास), रक्खितो नांवाचा वनवासीस (कारवारास), योन (यवन) धम्मरक्खितो नांवाचा अपरान्तास (कोंकणास) आणि महाधम्मरक्खितो नांवाचा महारट्ठास (महाराष्ट्रास) पाठविला. यांत महाराष्ट्राचा स्पष्ट उल्लेख असून, हा देश म्हैसूर, कारवार व कोंकण, यांस लागून पण पृथक् होता, असें अनुमान करण्यास बरीच जागा आहे. तसेंच, इ. पू. २०० ते इ. स. २०० या कालावधींत तयार झालेल्या कान्हेरी, कार्लें, नानाघाट व भाजें येथील लेण्यांत खडकांवर कोरलेल्या लेखांत तेथील विहार, चैत्य, स्तंभ, धागोबा वगैरेकरिता ज्यांनी मदतीदाखल दानें व देणग्या दिल्या, त्यांचीं नांवें कांही ठिकाणीं दाखल केलीं आहेत. त्यांत कित्येक व्यक्तींच्या नांवाला 'महारटिणी' व 'महारठी' अशीं उपलक्षणात्मक पदें जोडलेलीं आहेत[२]. इ. पू. २०० चे सुमारास 'सातवाहन' उर्फ 'शालिवाहन' वंशाच्या राजांनी गोदाथडीचा मुलूख जिंकून प्रतिष्ठान उर्फ पैठण नगरी आपली राजधानी केली. आपणांस 'आंध्रभृत्य' म्हणविणाऱ्या याच शालिवाहन राजवंशांतील सतरावा राजा 'हाल[३]' याने सप्तशती नांवाचा अनेककविकृत पद्यसंग्रह तयार केला. या संग्रहांतील कवितांच्या भाषेला 'महाराष्ट्री' हें नाव दिलेलें आहे. 'हाल' राजा इ. स. पहिल्या शतकांत झाला. म्हणजे इ. स. च्या आरंभास गोदाथडीला 'महाराष्ट्र' नांवाचा मोठा प्रदेश आर्यांनी वसविलेला असून, तेथील लोकांस 'महाराष्ट्री' किंवा 'महा-राष्ट्रिक' म्हणत व त्यांची भाषाहि 'महाराष्ट्री' या नांवाने प्रसिद्धीस येऊन तिच्यांत अनेक शिष्ट कवि रचना करूं लागले होते.

---

१. Dr. Wilson's Lecture on the Religious Excavations of Western India, p. 47. P. V. Kane's Ancient Geography and Civilization of Maharashtra, p. 9.

२. Dr. Wilson's Lecture on the Religious Excavations of Western India, pp. 52-53. P. V. Kane's Geography and Civilization of Maharashtra pp. 9-11.

३. Smith's Early History of India pp. 208-9.

वरील सर्व टिप्पणांचा एकत्र विचार केला असतां, महाराष्ट्र देश कसा वसत गेला व मूळचा महाराष्ट्र देश कोणता, याची बरीच सुसंगत कल्पना करितां येते.

५. पाणिनिपूर्व काळीं विंध्याच्या उत्तरेकडील आर्यांचा दक्षिणापथाशीं पुष्कळ संबंध आलेला होता. परंतु विदर्भ व कोंकण या प्रान्तांशिवाय त्यांची कोठेहि अन्यत्र सलग वस्ती अगर सत्ता नव्हती. या दोन प्रान्तांच्यामध्ये तापीपासून कृष्णेपर्यंत महाकान्तार होतें व त्यांत आर्य ऋषींच्या तुरळक व तुटक राहाट्या होत्या. पाणिनीनंतर इ. पू. तिसऱ्या शतकाच्या सुमारास या वसाहती विस्तृत, सलग व व्यवस्थित झाल्या होत्या. त्यांना आता ' राष्ट्र ' ( Colonized provinces ) हें प्रौढ नांव मिळून, त्यांतील लोक ' राष्ट्रिक ' या नांवाने प्रसिद्धीस आले होते. यानंतर लवकरच इ. स. च्या थोडें आगेमागे या लहान लहान स्वतंत्र राष्ट्रांची मोटी जूट बनली, व राष्ट्रसंघास ' महाराष्ट्र ' ही सामुदायिक संज्ञा मिळाली. तेथील लोकांना ' महाराष्ट्री ' म्हणत, व त्यांच्यांत जें प्राकृत वाङ्मय तयार होत होतें, त्याच्या भाषेसहि ' महाराष्ट्री प्राकृत ' हें नामाभिधान लाभलें.

वरील विवेचनावरून लक्ष्यांत येईल की, हल्ली मराठी भाषेचा जो सलग प्रदेश आहे व ज्याच्या सीमा या प्रकरणाच्या दुसऱ्या कलमांत दर्शविल्या आहेत, तो मूळच्या महाराष्ट्रापेक्षा बराच मोठा आहे. मूळ महाराष्ट्राची व्याप्ति स्थूलमानानें तापीपासून कृष्णेपर्यन्तच्या महाकान्तारांत होती. म्हणजे हल्लींच्या मराठी भाषेच्या प्रदेशांतून, दमणपासून कारवारपर्यंतची कोंकणपट्टी ( = अपरान्त + कोंकण ) व विदर्भ ( मध्यप्रान्त + वऱ्हाड ) आणि बल्लारीच्या आसपासचा मुलूख, हीं वगळलीं म्हणजे मध्यंतरीं शिल्लक राहणारा टापू मूळचा महाराष्ट्र ठरतो. यांत खानदेश, नाशिक, अहमदनगर, पुणें, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बेळगांव, विजापूर व धारवाड हे जिल्हे आणि हैदराबाद संस्थानाचा पश्चिमेचा अर्धा भाग व औरंगाबाद यांचा समावेश होतो.

६. वरच्या कलमांतील प्रतिपादनावरून ' मराठा ' व ' मराठी ' हे शब्द आम्ही कसे व्युत्पादितों, हे स्पष्टच होत आहे. परंतु या शब्दांच्या हल्ली नानातऱ्हांच्या व्युत्पत्त्या सुचविण्यांत येत आहेत, त्यातील मुख्यमुख्यांचा थोडक्यांत विचार करणे अप्रासंगिक होणार नाही.

( अ ) महाराष्ट्र[1] = महारराष्ट्र ' महारांचा देश. या व्युत्पत्तीला, ' गांव आहे तेथे महारवडा आहे. ' या म्हणीचा व महाराष्ट्रांत गांवोंगांव महारकीचीं वतनें आहेत या वस्तुस्थितीचा, आधार देण्यांत येतो. शिवाय ' महाराष्ट्र ' यांतील ' र ' च्या लोपाला ' गुजरात ' ( गुर्जरराष्ट्र ), व ' सोरट ' ( सूरराष्ट्र ) हे जवळचेच दाखले पुढे करण्यांत येतात. परंतु वरील म्हणीवरून महारांच्या अस्तित्वापलीकडे कांही शाबीत होत नाही. महारांप्रमाणेच इतर गांवकामगारांनाहि पुरातन काळापासून चालत आलेलीं वतनें आढळतात. महार राजे असल्याची कोणत्याहि प्राचीन शिलालेखांत अगर ऐतिहासिक लिखाणांत नोंद आढळत नाही. ' राष्ट्र, ' ' राष्ट्रिक, ' ' महाराष्ट्र, ' व ' महाराष्ट्री ' हे शब्द इ. स. दुसऱ्या तिसऱ्या शतकापासून वाङ्मयांत आढळतात, पण त्या काळापूर्वीच ' महार ' हा जातिवाचक शब्द

---

१. डॉ. वुइल्सन् व मोल्स्वर्थ.

भाषेत रूढ होता असें सिद्ध झालेलें नाही. जर 'महाराष्ट्र' शब्दाची व्युत्पत्ति खरी असती, तर हा प्रांत जिंकणाऱ्या आर्यांनी तें नांव इतक्या अभिमानाने मिरविलें नसतें.

(आ) महाराष्ट्र[1] = महा-रट्ट. अशोकशासनांतील 'रास्टिक' किंवा 'राष्ट्रक' हे रट्ट नांवाचे दक्षिणचे राजे होते. शातवाहनानंतर गोदेपासून कृष्णेपर्यंतचा मुलूख यांचे ताब्यांत इ. स. ३०० च्या सुमारास आला. विदर्भाच्या भोजांनी आपल्यास 'महाभोज' म्हणण्याची जशी सुरुवात केली, तशीच रट्टांनी आपल्यास 'महारट्ट' म्हणण्यास सुरुवात केली. यांची सत्ता फार दिवस टिकली नाही. गुप्तांनी हा प्रदेश लवकरच जिंकला. नंतर इ. स. चारशेंच्या सुमारास चालुक्यांनी गुप्तांवर चढाव करून महाराष्ट्र जिंकिलें. पुढे इ. स. ७०० चे सुमारास रट्टांनी अगर महारट्टांनी पुन्हा डोकें वर केलें, व चालुक्यवंशी दुसऱ्या कीर्तिवर्म्याचा पाडाव करून आपला अंमल प्रस्थापित केला. हे रट्ट आता आपल्याला 'राष्ट्रकूट' म्हणवूं लागले, व त्यांच्या मुलखाला 'महारट्ट देश' हें नांव पडलें. या व्युत्पत्तीवर आक्षेप असा आहे की, 'राष्ट्र', 'महाराष्ट्र', 'महाराष्ट्री', 'राष्ट्रिक', हे शब्द इ. पू. ५०० पासून आढळतात व इ. स. च्या आरंभापूर्वीच ते रूढ झाले होते. पण 'रट्ट' हा लोकवाचक शब्द त्यानंतर तीनशें वर्षांनी ऐकण्यांत येतो. इ. स. तिसऱ्या शतकांतील त्यांची सत्ता तुटपुंजी, तात्पुरती व संशयितच दिसते. पुढे इ. स. सातव्या शतकांत मात्र ते खरे नांवाजले गेले. तेव्हा या रट्टांचें नांवहि कानीं येण्याच्या पूर्वी जर 'राष्ट्रिक' व महाराष्ट्री' हे शब्द अस्तित्वांत आले होते, तर 'रट्ट' शब्दापासून हे शब्द व्युत्पादण्यांत कार्यकारणांचा विपर्यास केल्यासारखें होतें.

(इ) महारठी[2] = महारथी, महारठिणी = महारथिनी. महारथी म्हणजे वीरशिरोमणि व महारथिनी म्हणजे महारथीची पत्नी. परंतु 'महारथी' हें सामान्यनाम आहे. आणि त्याचा बिरुदासारखा किंवा पदवीसारखा प्रयोग केल्याचें त्या काळच्या ऐतिहासिक अगर इतर वाङ्मयांत आढळत नाही. शिवाय ज्या काळच्या शिलालेखांत[3] हे शब्द आढळतात, त्या काळच्या इतर शिलालेखांत व वाङ्मयांत 'राष्ट्रिक', 'महाराष्ट्र' व 'महाराष्ट्री' हेहि शब्द आढळतात. मग सरळ व्युत्पत्ति राजरोस हातीं लागत असतां, काल्पनिक, निराधार व संशयास्पद व्युत्पत्ति सुचविण्यांत स्वारस्य तरी काय ?

(ई) 'मरेंगा पण हटेंगा नाही', 'मार रट्टा' वगैरे व्युत्पत्त्या केवळ विनोदी कोटिक्रम आहेत.

(उ) मराठा = चोर, लुटारू. हा शब्द प्रथमतः मोगलांनी हिंदी बंडखोरांस[4] लाविला. तोच आता 'मराठी' भाषा बोलणाऱ्यांस लाविण्यात येतो. ही व्युत्पत्ति अत्यंत खोडकर व प्राचीन आणि अर्वाचीन इतिहासाविरुद्ध आहे. हिची अधिक संभावना करण्याची जरूरीच नाही.

---

१ डॉ. सर् रा. भांडारकर.

२ डॉ. स्टिव्हन्सन् व डॉ. भगवानलाल इंद्रजित्.

३ नानाघाट, कार्ले, कान्हेरी, भाजें इत्यादि लेण्यांतील इ. पू. २०० ते इ. स. १०० च्या कालांतील शिलालेख.

४ "Marahtta, a word meaning robber or rebel. The epithet was applied by the Moghal soldiery to those Hindus who rose against the tyranny of the Imperial Delhi." Nelson's Encyclopædia.

७ विंध्याच्या दक्षिणेस आर्यांच्या अगदीं पुरातन वसाहती प्रथमतः विदर्भांत झाल्या- मुळे व नंतर झालेल्या महाकान्तारांतील महाराष्ट्रीय वसाहती पूर्व बाजूस विदर्भाला लगतच असल्यामुळे, मराठीचें मूळ विदर्भांत सापडणें संभवनीय आहे. तसेंच, कोंकणपट्टीची वसाहत महाराष्ट्राच्या पूर्वी झालेली होती व तेथील आर्य सिंध व माळवा या प्रांतांतून आलेले होते. तेव्हा कोंकणपट्टींतील आर्यांच्या भाषेचें मूळ बीज त्याच उत्तर प्रांतांतून आलें असलें पाहिजे. ही कोंकणपट्टी महाराष्ट्रांतील पश्चिम बाजूच्या वसाहतीला लगत असल्यामुळे महाराष्ट्राच्या भाषेच्या पायांत कोंकणचाहि मालमसाला मिसळलेला असणार, हें अनुमान निघतें. म्हणजे महाराष्ट्राच्या भाषेवर एका बाजूने वैदर्भीची व दुसऱ्या बाजूने कोंकणीची छाप बसावयास पाहिजे होती. परंतु इ. स. आरंभापासूनच महाराष्ट्र राजकीय दृष्ट्या महत्त्वाला चढलें आणि त्यांतील सत्ताधीशांनी विद्वानांना उत्तेजन दिल्यामुळे महाराष्ट्रीय वाङ्मय चांगलें नांवाजण्यासारखें निपजलें. पुढे अर्वाचीन मराठीचा उदय झाला त्या वेळींहि जनतेवर छाप पाडणारे प्रासादिक व बुद्धिमान् कवि पैठण व पुणें या बाजूसच विशेष उदयास आले. मराठशाही व पेशवाई यांच्या अम- दानींत तर सातारा, कोल्हापूर व पुणें हीं राजकीय व आध्यात्मिक चैतन्याचीं केंद्रस्थानें झालीं. त्यानंतर आंग्लशाहींत पुण्याचें महत्त्व कायम राहून, मुंबानगरीचा मळवट भरला. राजकीय चळवळी व समाजसुधाऱ्याचा बूट, यांचा उद्गम मुंबानगरींत व पुण्यपुरींतच झाला. शाळा- खातें स्थापन होऊन अर्वाचीन युगांतील ग्रंथकर्तृत्वाचे सर्व अध्वर्यू याच पुरद्वयांत व त्याच्या आसपासच्या टापूंत लाभले. या योगायोगपरंपरेने मूळ महाराष्ट्राच्याच भाषेचा पगडा वैदर्भीवर व कोंकणीवर पडून त्यांना हल्ली मराठीचे वाचिक पोटभेद म्हणून अस्तित्व सांभाळणें भाग पडलें आहे. या पोटभाषांचें थोडेसे मासले परिशिष्टांत सादर केले आहेत.

८ मराठीच्या सद्यःकालीन प्रदेशाच्या सरहद्दीवर बऱ्याच इतर देशभाषा तिला सहचरी लाभल्या आहेत. उत्तरेस पश्चिमपूर्व क्रमाने गुजराती, राजस्थानी, पश्चिम हिंदी व पूर्व हिंदी; पूर्वेस, उत्तरदक्षिण क्रमाने पूर्व हिंदी, गोंडी व तेलगु; दक्षिणेस, पूर्वपश्चिम क्रमाने गोंडी, तेलगु व कानडी. पश्चिम सरहद्दीवर समुद्र असल्यामुळे परभाषेच्या मुलखाचा तेथे प्रत्यक्ष संपर्क नाही; तरी पण दर्यांत संचार करणाऱ्या आरबी, मिस्री, पोर्तुगीझ्, इंग्लिश् इत्यादि परदेशस्थ व्यापारी लोकांशीं मराठी मुलखाच्या पश्चिमपट्टीचा अनेक शतकें संबंध आलेला आहे. अशा रीतीने सरहद्दीवरील परभाषांच्या लगटीने 'मिश्र भाषा' उत्पन्न होतात; परंतु हें मिश्रण बहुशः शब्दकोशांत व कांही वाक्संप्रदायांतच होतें, अंतर्घटनेला फारसा धक्का लागत नाही. तरी पण, या मिश्रणाचा अतिरेक होऊन सामान्य जनतेच्या भाषांना तितक्या मर्यादित टापूंत बरेच वेळां अगदी रांगडें, बेंगरुळी व भेडगुजरी रूप येतें.

'बारा कोसावर भाषा बदलते' अशी आपल्यांत म्हण आहे. हा भाषेचा बदल शब्द- भेदापेक्षा उच्चारभेदांत विशेष असतो व त्यामुळे भाषेच्या अन्तर्घटनेंतहि थोडाबहुत फरक पडतो. उदा०–'ती जाते,' हें वाक्य प्रांतपरत्वें 'ती जात्ये,' 'ती जाती,' असें उच्चारलें जातें. हाच प्रकार पुढील वाक्यें, वाक्यांश व शब्दरूपें यांचा आहे.— 'माझ्यापासून,'= 'मापा- सून,' 'मापून,' 'मासून,' 'माहून.' 'त्याच्या घरीं' = 'त्याचे घरीं,' 'त्येचे घरीं,' 'तेचे घरीं,' 'तेच्या घरीं.' 'त्यास' = 'त्यासला,' 'त्येसला,' 'तेसला,' 'त्याजला,' 'त्येजला,' 'तेजला.' 'अलीकडे–पलीकडे' = 'ऐलीकडे–पैलीकडे,' 'अलीकडं–पलीकडं,' 'अल्याड–पल्याड.' 'ते करतात' = 'ते करताती,' 'ते करित्याती,' 'ते करित्यात,' 'ते करितात.' 'मी पाणी प्यालों' = 'मी पाणी प्यायलों,' 'मी पानी पिलों.' 'हें त्याने मला कळविलें' = 'हो त्येण माम्नी कळविलें,' 'हें त्याणं मला कळीविलें.' 'माजघर' = 'माझ घर.' 'ओटा' = 'बटा.'

'माहेर' = 'माहीर.' 'जहर' = 'झर,' 'जर,' 'झेर,' 'जेहर.' या उदाहरणांत उच्चारभेदांचे सर्व प्रकार दाखविले आहेत असें नाही. परंतु उच्चारान्तराने व्याकरणप्रक्रियेंत वैकल्पिक रूपें कशीं येतात व भाषेची अन्तर्घटना कशी फिरते, हें यांवरून दिसून येईल. अशा भाषेच्या रूपान्तरांस 'पोटभाषा' किंवा 'विभाषा' हें नांव योग्य दिसतें. एकाच प्रांतांत भिन्न संस्कृतीच्या जातींत व एकाच जातींतील स्त्रीपुरुषांतहि असे उच्चारभेद सर्वत्र आढळतात. अशा रीतीने व्यवहारांत नांदणाऱ्या अनेक बोलींपैकी शिष्ट गणलेल्या वर्गांची बोली मात्र लेखनांत अभियुक्त मानलेल्या भाषेशीं बरीच जुळते. 'बरीच जुळते,' असें म्हणण्याचें कारण हें की, निरनिराळ्या प्रांतांतील शिष्टांच्या बोलींतहि फरक पडतोच. इतकेंच नव्हे तर प्रत्येक प्रांतांतील शिष्ट बोलींत असे कांहीं विशेष प्रकार असतात कीं, तोंडी व्यवहारांत जरी ते शिष्टांस मानतात तरी ते लेखांत आले असतां, अशुद्ध व ग्राम्य समजले जातात. उदा०—'हें रामानी मला सांगितलेंन्' असें अनेक शिष्टांच्या बोलींत येतें, परंतु ते लिहितांना 'हें रामाने मला सांगितलें,' असेंच ग्रंथभाषेच्या पद्धतीस धरून लिहितात. एवंच, सामान्य नियमांस धरून मराठीचे (१) ग्रांथिक मराठी, (२) प्रांतिक शिष्ट भाषा, (३) प्रांतिक ग्राम्य भाषा व (४) सरहद्दीवरील मिश्रभाषा असे चार भेद आहेत. यांपैकी 'ग्रंथभाषा' ही नमुनेदार होय व शिक्षणाचा जों जों फैलाव होईल, तों तों इतर भाषाप्रकार ग्रंथभाषेशीं अधिकाधिक मिळते होत जातील. मराठीचे वर दर्शविलेल्या स्वरूपाचे असंख्य पोटभेद आहेत, त्यांपैकी ठळक ठळक पुढील तक्त्यांत त्यांच्या देशव्याप्तीसह दाखविले आहेत. मिश्रभाषांसंबंधे मिश्रणाचे घटकावयवहि दाखल केले आहेत.—

## ग्रंथभाषा—मराठी

| पोटभाषा | देशव्याप्ति | मिश्रभाषा | देशव्याप्ति | मिश्रणाचे घटक |
|---|---|---|---|---|
| आगरी | कोंकण | भिल्ली, अहिरणी, खानदेशी इत्यादि | खानदेश | मराठी + गुजराती |
| कायोडी | ठाणें, कुलाबा | | | |
| कुणबाऊ | महाराष्ट्र कोंकण | कोल्हाटी | महाराष्ट्र | मराठी + कानडी |
| कोंकणी | द. कोंकण | तिरगुळी | नाशिक | मराठी + तेलगू |
| चित्पावनी | द. कोंकण | फिरंगी | गोवें | मराठी (कोंकणी) + पोर्तुगीज् |
| ठाकरी | ठाणें | कारवारी | कारवार | मराठी (कोंकणी) + कानडी |
| नागपुरी | नागपुर | | | |
| धनगरी | महाराष्ट्र कोंकण | | | |
| बेलदारी | कोंक, कानडा | | | |
| वारळी | ठाणें | | | |
| वऱ्हाडी | वऱ्हाड | | | |

९ वर दुसऱ्या कलमांत दाखल केलेल्या मराठी भाषेच्या सलग प्रांताबाहेरहि सर्व हिंदुस्थानभर ठिकठिकाणीं मराठी भाषेचा परिस्थित्यनुसार कमजास्त व्याप आढळून येतो. इ. स. सतराव्या व अठराव्या शतकांत महाराष्ट्राने स्वराज्यस्थापना करून आपली सत्ता दक्षिणोत्तर वाढविली व ठायीं ठायीं मराठी संस्थानें उत्पन्न करून मराठी सत्तेबरोबर मराठी भाषेचाहि तेथे शिवाव घडविला. अशा प्रांतांत ती दरबारी भाषा बनली. परंतु या संस्थानांतून मूळ भाषांचें उच्चाटन होणें शक्यच नव्हतें. त्यामुळे दरबारी मराठीचें संस्थानी प्रजेमध्ये मूळ न रुजतां, ती केवळ दरबारी लिखाणांत व तत्रस्थ मराठमंडळींत जीव धरून राहिली. आजमितीस अशा प्रकारच्या बऱ्याच संस्थानांत तेथील प्रजाजनांच्या मूळ भाषेला पुनः दरबारीं मान मिळूं लागल्यामुळे तर उपरी मराठीची फार केविलवाणी व निराश्रय स्थिति होणार आहे. मराठकुटुंबांत ती जागती राहण्याचा संभव आहे, हें खरें; परंतु कुटुंबाबाहेरील सर्व व्यवहारांत तद्देशीय जबरदस्त भाषेशीं तिचा सामना हरघडी घडत असल्यामुळे, तिचें तेज कमी पडून, ती कमकुवत व विकृत होणार, यांत शंका नाही. कालान्तराने अशा परिस्थितीच्या ओघापुढे या मराठी संस्थानांतील मराठी भाषा असें मिश्र रूपान्तर पावेल की, तिला मराठीचा पोटभेद गणण्याऐवजी तद्देशीय भाषांचा पोटभेद गणणें जास्त सोईचें होईल. अशा प्रकारचीं मुख्य संस्थानें इंदूर, ग्वालेर, बडोदें व तंजावर हीं होत. याशिवाय बऱ्याच तीर्थक्षेत्रीं महाराष्ट्रीय ब्राह्मणकुटुंबें लहान मोठ्या वसाहती करून राहिलेलीं आहेत. जेथे काशीसारख्या मोठ्या वसाहती आहेत, तेथे मराठपणा अद्याप अव्यंग टिकला आहे. परंतु इतरत्र जेथे दोन-चार कुटुंबांचीच वस्ति आहे, तेथे मराठमोळा मावळत जाणें केवळ अपरिहार्य आहे.

१० वर दुसऱ्या कलमांत निर्दिष्ट केलेला सलग प्रांत मराठीचा 'स्वदेश' होय. आणि आता दहाव्या कलमांतील फुटकळ टापू हे 'बाह्यदेश' होत. मराठी भाषा बोलणारांची एकंदर संख्या ठोकळ मानाने दोन कोटि आहे व तिची सरासरी वर्गवारी खाली दिली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| स्वदेश ... ... ... ... ... ... | | | १९० लक्ष |
| | महाराष्ट्र (खानदेशसुद्धा) | ७० लक्ष | |
| | वैदर्भ (नागपूरसह) | ८० " | |
| | कोंकण (गोमान्तकसह) | ४० " | |
| | | १९० लक्ष | |
| बाह्यदेश (संस्थानें व क्षेत्रतीर्थांच्या वसाहती) ... ... | | | १० |
| | | एकूण | २०० लक्ष |

# प्रकरण तिसरें
# मराठीची वर्णमाला

१ आजमितीस हिंदुस्थानांत बंगाली, गुजराती, सिंधी, हिंदी, मराठी वगैरे ज्या आर्य-भाषोत्पन्न देशभाषा चालू आहेत, त्या सर्वांच्या लिप्यांचें मूळ 'देवनागरी' लिपींत आहे. देवनागरी ही संस्कृत भाषेची स्वतंत्र लिपी असून, आजकाल उपलब्ध असलेलें संस्कृत वाङ्मय याच लिपींत लिहिलेलें आढळतें. ही लिपि केव्हां अस्तित्वांत आली हें जरी नक्की ठरत नाही, तरी ती पाणिनीच्या पूर्वीच ब्राह्मणोपनिषत्कालांत[1] हयात असली पाहिजे, असा तर्क करितां येतो.

वैदिक संस्कृत, पाणिनीय संस्कृत, आद्य प्राकृत अगर पाली, महाराष्ट्रीप्रभृति प्राकृत भाषा, प्रांतोप्रांतींचे अपभ्रंश, आणि अखेर हल्लीच्या देशभाषा अशा परंपरेने आज सुमारें चार हजार वर्षांच्या कालविभागांत हिंदुस्थानांतील आर्य-भाषांची क्रांति घडून आलेली आहे. त्यामुळे जरी 'देवनागरी' लिपि या भाषांची सर्वमान्य लिपि म्हणून टिकली आहे, तरी प्रत्येक भाषेच्या गरजेनुसार वेळोवेळीं तिच्या वर्णमालेंत फेरफार घडून आलेले आहेत. पाणिनीच्या वेळीं शिष्ट भाषेंत दोन वर्णोच्चार नव्हते. एक 'ळ'कार व 'ळ्ह'-कार. हे दोन्ही उच्चार वेदसंहितेंत 'ड'कार व 'ढ'कार यांच्या ऐवजीं विकल्पाने येतात; म्हणजे 'ईडे' व 'मीढुषे' हे शब्द 'ईळे' व 'मीळ्हुषे' असे उच्चारलेले व लिहिलेले आढळतात. अर्थात्, हे उच्चारच पाणिनेय भाषेंत नसल्यामुळे त्याच्या वर्णमालेंतून हे दोन्हीहि वर्ण गळलेले आहेत. परंतु ते वेदकालीन उच्चार अशिष्टांत चिवटपणाने टिकून राहिले होते, आणि पुढे जेव्हां गौतम बुद्धापासून अशिष्ट 'पालीचा' चालता चढता काळ आला, तेव्हां पालीच्या वर्णमालेंत या वर्णांना पुन्हां स्थान लाभलें. पण पाली भाषेंत 'ऋ, ॠ, ऌ, ऐ, औ' यांचे उच्चार नसल्यामुळे, हे वर्ण वर्णमालेंतून वगळले गेले. तसेंच, पालीच्या शिष्ट संप्रदायांत 'श' व 'ष' या ऊष्म्यांचा लोप होऊन फक्त एक 'स' वर्णच उरला. यानंतर महाराष्ट्रीप्रभृति प्राकृत भाषांचा व पुढे अपभ्रंशांचा ग्रंथांत समावेश झाला, व त्यांच्या उच्चार-संप्रदायानुसार आणखी कांही वर्णांना चाट मिळाली. उदाहरणार्थ, महाराष्ट्रींत 'न'कार नाही, फक्त 'ण'कार आहे. मागधींत 'स'कारा ऐवजीं 'श'कार व 'र'कारा ऐवजीं 'ल'कार येऊन 'स' व 'र' यांस वर्णमालेंतून खो बसला. पैशाचींत 'ण'कार नाहीसा होऊन फक्त 'न'कारच राहिला. हीच स्थिति अपभ्रंशाची आहे. यानंतर सांप्रतच्या देशी भाषांचा संभव झाला. यांपैकीं विशेषतः मराठी भाषेवरच दृष्टि रोखली, तर असें आढळतें कीं, ग्रंथभाषा

---

1 We are not yet certain when the art of writing came to be invented– or introduced– in Ancient India. It was certainly much earlier than what Max Müller once believed it to be. Whatever that period might be, it must have been prior to the production of प्रातिशाख्य literature. Belwalkar's Systems of Sanskrit Grammar, p. 4.

झाल्यापासूनच तिचा शुद्ध संस्कृत उच्चाराकडे ओढा आहे. तरी पण पाली व प्राकृत या भाषांचाहि वेध तिला सुटला नाही. यामुळे पाणिनीय वर्णमालेंतील सर्व वर्ण मराठी वर्णमालेंत असून, शिवाय पालीसंसर्गानें 'ळ'कारासहि तींत योग्य स्थान लाभलें आहे. एकंदरीत मराठीची देवनागरी, संस्कृत, पाली, प्राकृत व अपभ्रंश या सर्वांच्या देवनागरीपेक्षा वर्णसंख्येने गब्बर आहे.

३ देवनागरी लिपी ही बहुगुणसंपन्न आहे. तिच्या इतकी पूर्णत्वाजवळ आलेली दुसरी कोणतीहि लिपी आज काल आढळत नाही. परंतु, जरी पाणिनीय वर्णमाला संस्कृताच्या शिष्टरूपाला साजेशी व पुरेशी आहे, तरी मराठीची वर्णमाला तिला सांप्रत कोती होऊं लागली आहे, हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

४ पूर्णावस्थेची वर्णमाला म्हटली म्हणजे तिच्यांत पुढील लक्षणें आढळलीं पाहिजेतः—

( १ ) भाषेंतील प्रत्येक स्वतंत्र साध्या उच्चाराला एकेकच स्वतंत्र चिन्ह असलें पाहिजे.

( २ ) वर्णमालेंतील प्रत्येक चिन्हाचा एकच साधा स्वतंत्र उच्चार पाहिजे.

( ३ ) संयुक्त उच्चार त्याच्या घटकांच्या चिन्हांच्या संयोगानेच दर्शविला जावा.

५ उच्चारांचे दोन वर्ग पडतात. ( १ ) साधे उच्चार, व ( २ ) जोड अगर संयुक्त उच्चार. साधे उच्चारहि शुद्ध किंवा मिश्र असूं शकतात. पाणिनीनें अ, इ, उ, ऋ, ऌ, ए, ऐ ओ, औ हे नऊ स्वरोच्चार साधे गणले आहेत. यांपैकी पहिले पांच 'शुद्ध साधे' व शेवटचे चार 'मिश्र साधे' आहेत. संस्कृत भाषेंत स्वराचा पूर्ण उच्चार असल्यामुळे संयुक्त स्वरोच्चारच नाही; स्वरांचा संधि होऊन जो नवा स्वर उत्पन्न होतो, तोहि साधाच पण 'मिश्र साधा' असतो. याचा अर्थ असा की, दोन स्वर जवळ जवळ आले असतां, ते पृथक्च राहतील, किंवा त्यांचा संधि होऊन नवीनच 'मिश्र साधा' स्वरोच्चार निर्माण होईल. पाणिनि आ, ई, ऊ, आणि ॠ हे अ, इ, उ आणि ऋ यांचेच दीर्घ उच्चार मानितो, त्यांस स्वतंत्र स्वर म्हणून गणीत नाही. या व्यवस्थेवर असा आक्षेप आहे की, हे दीर्घोच्चार साधेच आहेत. तेव्हा 'ए, ऐ, ओ, औ,' या दीर्घ व साध्या उच्चारांप्रमाणेच यांनाहि वर्णमालेंत स्वतंत्र स्थान मिळालें पाहिजे. आणखी एक आक्षेप घेतां येतो की, 'अ'चा उच्चार कितीहि लांब ओढला तरी तो 'आ' होऊं शकत नाही, म्हणून 'आ' हा एक स्वतंत्रच साधा दीर्घ उच्चार मानावा लागतो. पाणिनीची व्यंजनव्यवस्था निर्दोष आहे. उच्चारस्थान, घोष (किंवा नाद), प्राण, व ऊष्मश्वास यांचा सूक्ष्म विचार करून सर्व व्यंजनांचें यथायोग्य वर्गीकरण करण्यांत आलें आहे. ज्या उच्चारांचे दर्शक वर्ण संस्कृताच्या नागरी वर्णमालेंत नाहीत, ते उच्चारच संस्कृत भाषेंत नाहीत, असें धरून चाललें पाहिजे; आणि असें गृहीत धरलें म्हणजे नागरी वर्णमाला संस्कृत भाषेला अगदी पुरेशी होती व आहे. पाणिनीच्या वर्णव्यवस्थेवर कृष्णशास्त्री[1] गोडबोले यांचा असा आक्षेप आहे की, क-वर्गादि पांची वर्गांतील दुसरे व चवथे वर्ण संयुक्त आहेत; म्हणजे 'ख, घ, छ, झ, ठ, ढ, थ, ध, फ व भ,' हीं महाप्राण व्यंजनें, 'क, ग, च, ज, ट, ड, त, द, प, व ब,' या अल्प प्राणांत 'ह'कार हा महाप्राण मिळून झालीं आहेत.

१ मराठी भाषेचें नवीन व्याकरण, पृ. १५.

रा. रामचंद्र भिकाजी जोशी[1] यांनीहि याच मताचा अनुवाद केला आहे. अर्थात् हीं संयुक्त म्हणजे जोड व्यंजनें मानलीं, म्हणजे वर्णमालेंत दोष उद्भवतो; कारण, वर्णमालेचें खरें कर्तव्य प्रत्येक साध्या उच्चाराला एकेक चिन्ह देण्याचें आहे. संयुक्त उच्चारांना तींत स्वतंत्र जागाच मिळूं शकत नाही. संयुक्त उच्चारांचे घटक जे साधे उच्चार त्यांच्या चिन्हांची प्रत्यक्ष एकत्र जोडणी करूनच संयुक्त[2] उच्चार दाखविले पाहिजेत. तेव्हा पाणिनीसारखा चोखाळ वैय्याकरण व उच्चारध्वनींचा मीमांसक 'ख, घ, छ' इत्यादि व्यंजनांस साधींच समजत होता, असें म्हणणें प्राप्त आहे. याच कलमाच्या आरंभीं सांगितलें आहे की, 'साधे' उच्चारहि 'शुद्ध' व 'मिश्र' असूं शकतात. 'ख, घ, छ' इत्यादि व्यंजनांचे उच्चार साधेच, पण मिश्र स्वरूपाचे आहेत. परंतु ते संयुक्त नाहीत. संस्कृत वाणीचा एक स्वभावगुण असा आहे की, संयुक्त व्यंजनांपूर्वी जो स्वर येईल, त्यावर आघात होतो व त्यामुळे तो स्वर ऱ्हस्व असल्यासहि त्याचा दीर्घ स्वरांप्रमाणे द्विमात्रक उच्चार होतो. ही कसोटी प्रस्तुतच्या व्यंजनांस लाविल्यास ते साध्या उच्चाराचेच वर्ण ठरतात. 'वाग्घरि' (वाक् + हरि), 'रुग्हर' (रुक् + हर), व शरद्धार (शरद् + हार), या शब्दांचा उच्चार 'वाघरी', 'रुघर' व 'शरधार' या शब्दांच्या उच्चाराहून अगदी भिन्न आहे. दुसऱ्या त्रिकुटांतील 'घ' व 'ध' या वर्णांनी मागील स्वरास हिसका बसत नाही; व 'रुघर' व 'शरधार' या शब्दांत 'रु' व 'र' यांच्या दोन मात्रा होत नाहीत. परंतु 'ग्ह' व 'द्ह' हीं संयुक्त व्यंजनें असून त्यांचा परिणाम मागील स्वरांच्या उच्चारावर स्पष्ट होतो. एवंच, 'ख, घ, छ' इत्यादि महाप्राण वर्ण साध्या[3] उच्चाराचेच आहेत. पाणिनीनें वर्णमालेंत त्यांस स्वतंत्र चिन्ह दिलें हें योग्यच आहे. वैदिक 'ळ' व 'ळ्ह' हे साधे उच्चार असून पहिला 'शुद्ध' व दुसरा 'मिश्र' आहे. येथे एक बाब लक्ष्यांत घेण्यासारखी आहे की, क-वर्गादि पांच वर्गांतील अनुनासिक वर्ण, आणि य, व,

---

१ मराठी व्याकरण पृ. १४.

२ It is the business of the alphabet to furnish us with separate signs for *simple* sounds, but not for *compound* sounds. If the alphabet contains a short-hand symbol *x*, representing in one letter the sounds of $k+s$, why we may reasonably ask, should it not contain other short-hand symbols, say, a short-hand symbol for $a+n+d$? Such a symbol we indeed possess in the form &; but we do not regard this symbol as a letter of the alphabet.— (Elements of English Grammar by A. S. West, pp. 48-49)

३ The objection may be raised that if *x* is rejected, because it can be represented by $k+s$, we ought to get rid of *f*, because it can be represented by $p+h$, and that we might *fife*, phiphe, just as we spell *philosophy* with a *ph*. But the cases are quite different. The sound of *f* is not a compound of *ph*. It is a simple sound, and it is entitled to a separate letter. It is the use of *ph*, for *f* which is often to censure from the alphabetical stand-point.— (Elements of English Grammar, by A. S. West p. 49)

र, ल हे अर्धस्वर यांच्या जोडीचे महाप्राण संस्कृत वार्णीत नाहीत; इतकेंच नव्हे तर हे वर्ण ज्यांचे पूर्ण अवयव आहेत व उत्तर अवयव 'ह'कार आहे, असे संयुक्त व्यंजनोच्चारहि तींत नाहीत. 'प्राह्ण, अपह्नव, ब्रह्म, सह्य, प्रह्लाद, आह्लाद, आह्वान' इत्यादि दरोबस्त शब्दांतील ह-कारयुक्त संयोगांत पहिला अवयव ह कार असून दुसरा अवयव अनुनासिक किंवा अर्धस्वर आहे. आता अनुस्वाराचा विचार करूं. क-वर्गादि पांच वर्गांतील एखाद्या व्यंजनापूर्वी त्याचें स-वर्ग अनुनासिक येऊन त्यांचा संयोग होत असेल, तर तें अनुनासिक गाळून त्याचे बदला त्याच्या पूर्वीच्या अक्षरावर अनुस्वार देण्याची चाल दक्षिण हिंदुस्थानांतील महाराष्ट्र वगैरे देशांनी घातली, असें कृष्णशास्त्री गोडबोले म्हणतात[1] तें खरें दिसतें. महाराष्ट्रीयांनी लेखनसौकर्यास्तव 'पङ्क, पण्डित, कुम्भ' वगैरे शब्द 'पंक, पंडित, कुंभ' असें लिहिण्याचा प्रघात पाडला, व तेणेंकरून निर्दोष संस्कृत नागरींत एक दोष उत्पन्न केला. '-' या एकाच चिन्हाने अनुस्वारोच्चार व 'ङ्' इत्यादि पांच अनुनासिक व्यंजनें दाखविली जाणें, हें दुष्टच गणलें पाहिजे. खरा अनुस्वार फक्त अर्धस्वर व ऊष्मे यांच्या पूर्वींच येतो, व तेथें अनुस्वाराच्या मागील अक्षरानंतर नाकांतून सूर येऊन पुढील अर्धस्वर किंवा ऊष्मा यास द्वित्त येतें; म्हणजे 'संयोग, संरब्ध, संलग्न, संसार, संशय, पिंषन्ति, संहार' यांचे खरे संस्कृत उच्चार 'सँय्योग, सँव्वाद, सँर्‌रब्ध, सँल्लग्न, सँस्सार, पिँष्षन्ति, सँह्हार' असे झाले पाहिजेत. संस्कृत वर्णमालेंतील प्रत्येक वर्णाचा उच्चार व नांव, हीं एकच असल्यामुळे लिहिणें अगदी बिनघोटाळ्याचें होतें. संस्कृत वार्णीत जे जे उच्चार आहेत, ते ते सर्व वर्णचिन्हांनी दाखवितां येत असल्यामुळे शब्दांच्या अक्षरवटिकेचा प्रश्न आपोआप निकाली लागतो.

६. आता याच पद्धतीने मराठी वर्णमालेची छाननी करून ती कितपत निर्दोष आहे, तें पाहूं.

मराठी भाषा इ. स. तेराव्या शतकांत अभियुक्त ग्रंथरूपांत दृष्टीस पडते. त्या वेळेपासून तों तहत आंग्लशाहीची प्राणप्रतिष्ठा महाराष्ट्रांत होईपर्यंतचें बहुतेक सर्व वाङ्मय प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीने संस्कृताच्या आधारावर आरूढ झालेलें आढळतें. या वाढत्या वाङ्मयाची शिष्ट-प्रवृत्ति अधिकाधिक अस्सल संस्कृत शब्द व वाक्संप्रदाय जसेच्या तसेच उचलून घेण्याकडे विशेष आढळते. परंतु या प्रवृत्तीबरोबरच पाली व प्राकृत भाषा यांच्या निकट सान्निध्याने अंगीं खिळलेले संस्कारहि मराठीला डकून राहिलेले आहेत. यामुळे मराठीने संस्कृताची नागरी वर्ण-माला जशीच्या तशीच घेतली, पण पालीच्या व प्राकृतांच्या हाडींमासीं खिळलेल्या लकबींच्या कारणाने ह्रस्व 'आ, ए व ओ' हे स्वर, ळ-कार, ओझरता अनुस्वार व दन्ततालव्य च-वर्ग, हेहि तिला चिकटून राहिले. तेव्हा संस्कृत तालव्य च-वर्गापासून मराठी दन्ततालव्य च-वर्ग निवडतां यावा म्हणून त्या वर्गांतील वर्णांखाली बारीक टिंब घालून नवीन दंततालव्य च-वर्गाचे पांच वर्ण वर्णमालेंत दाखल करण्यांत आले. त्याप्रमाणेच खरा अनुस्वार व मराठींतील ओझरता अनुस्वार, यांतील भेद स्पष्ट व्हावा म्हणून ओझरता अनुस्वार चंद्रकोरींत लिहून वर्णमालेंत आणखी एका खुणेची भर घालण्यांत आली. आ, ए, ऐ, ओ, औ या स्वरांचे ह्रस्वत्व दर्श-

[1] मराठी भाषेचें नवें व्याकरण, पृ. १९.

विण्यासाठी त्यांच्या माथ्यावर चंद्रकोरीचें भूषण चढवून त्यास वर्णमालेंत पृथक्त्व देण्याचा प्रयत्न करण्यांत आला. परंतु या क्लृप्त्या फारशा लोकमान्य झाल्या नाहीत. त्या सामान्यतः त्रासदायक व अनवश्यक वाटल्यामुळे त्यांची हेळसांड झाली व त्या मागे पडल्या. खरें पाहिलें असतां, ज्यांची जन्मभाषाच मराठी आहे, त्यांना या खुणांची साहजिकच जरूरी भासत नाही. परंतु या खुणा न योजिल्यामुळे मराठीची वर्णमाला सदोष झाली आहे, हें नाकारतां येणार नाही. 'कंकणें' आणि 'कांकणें' या दोन शब्दांतील पहिल्या अक्षरावरील टिंब दोन निरनिराळे उच्चार दाखवितें, आणि 'पेण्ड' व 'पेड' या शब्दांतील मात्रा एकदा ह्रस्व व एकदा दीर्घ स्वरोच्चाराची दर्शक आहे, ही गोष्ट निर्दोष वर्णमालेच्या पहिल्या लक्षणाशीं विसंवादी आहे. इ. स. च्या तेराव्या शतकापासून महाराष्ट्राचा मुसलमानांशीं व त्यांच्या आरबी व फार्सी भाषांशीं संबंध जडला व त्या भाषांतील शब्द मराठींत आपलें बस्तान बसवूं लागले. नोकरपेशांतील कांही बुद्धिवान् महाराष्ट्रीयांनी या परकी भाषांचा चांगला अभ्यास केला. परंतु सामान्य जनतेने दैनिक व्यवहारांत या भाषांतील जे शब्द उचलले, त्यांना त्यांनी मराठी वळण दिलें; म्हणजे त्या शब्दांचे मूळचे खरे उच्चार करण्याची पर्वा न मानितां, ते आपल्याला सहज उच्चारतां येतील अशीं त्यांना अपभ्रष्ट रूपें देण्यांत आलीं. उदा०— दौत ( दवात् ), खातर ( खातिर् ), सामील ( शामिल् ), खिसा ( कीसा ), मोहरम ( मुहर्रम् ), सुलाख ( सूराख् ), इसम ( इस्म ), मगज ( मग्झ् ), सिलीग ( शिल्क ), अर्ज ( अर्झ् ), पोक्त ( पुख्त ), तरबेज ( तरबियत् ), ऐवज ( इवझ् ). इ. स. तेराव्या शतकापासून जे ग्रंथकार महाराष्ट्रांत होऊन गेले, त्यांमध्ये कोणी आरबी फार्सीचा खरा मर्मज्ञ होता, असें दिसत नाही. यामुळे त्यांनी वर दिल्यासारखीं सामान्य वहिवाटीस आलेलीं या परभाषांतील शब्दांचीं रूपेंच आपल्या ग्रंथांत योजलीं व हीं रूपें मराठ्यांस उच्चारण्यास सोईचीं असल्यामुळे अर्थातच मराठी वर्णमालेंत कांही उणीव भासमान् झाली नाही. इ. स. सोळाव्या शतकापासून महाराष्ट्राचा पोर्तुगीज् व इंग्रज् या लोकांशीं संबंध येऊं लागला, व त्यांच्या भाषेंतील शब्द मराठींत घुसण्यास धडपडूं लागले. मराठ्यांना त्या वेळीं या भाषांचें व्यवस्थित ज्ञान नसल्यामुळे, त्यांनी आरबी-फार्सी शब्दांप्रमाणे या युरोपीय शब्दांना आपल्या मर्जीप्रमाणे प्रायश्चित्त देऊन मराठी भाषेशीं सवर्ण करून टाकिलें. उदा०— पाद्री ( Padro ), आल्पिष्टन् ( Elphinstone ), मोस्तर ( Master ), घनतुरप (Gun-troops), हुकुम्डर् ( Who comes there ? ), कडाबीन ( Carbine ), कोडत ( Court ), वाघीण ( Waggon ), लाट ( Lord ), इस्तूर् ( Stuart ), इस्क्रू ( Screw ), अभिस्त्राक्ट ( Abstract ). कांही शास्त्री, पंडितांनी इंग्रजी शब्दांना संस्कृत भाषेला साजतील अशीं भरघोस स्वरूपें देण्याचा प्रयत्न केला. उदा०— पात्रण ( Patron ), मोक्षमूलर ( Max Müller ), शर्मण्यदेश ( Germany ), आंग्ल (English), स्तुर्त (Stuart). परंतु इ. स एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून इंग्रजीचा अभ्यास व्यवस्थेने व आस्थेने होऊं लागला. हल्ली इंग्रजी चांगलें जाणणारा मोठा शिष्ट वर्ग तयार झाला आहे, व याच वर्गांतून अलीकडील ग्रंथकार उदय पावत आहेत. या कारणाने या ग्रंथकार वर्गाला इंग्रजी शब्दांचे वेडेवांकडे अपभ्रंश मानवत नाहीत. रा. वासुदेवराव आपटे यांचा 'शब्दरत्नाकर' उलटला, तर त्यांत 'माजिस्तेत' शब्द आढळत नाही. पण 'मॅजिस्ट्रेट' आढळतो. अशा

रीतीने इंग्रजी शब्दांचे असल उच्चार मराठींत उतरणें आता वस्तुगत्या जरूर झाल्यामुळे, मराठी वर्णमाला अपुरी भासूं लागली आहे. शब्दरत्नाकरांत 'मॅजिस्ट्रेट' व 'क्रिकेट' हे दोन्ही शब्द आढळतात. पण जरी पहिल्यांतील ए-कार दीर्घ व दुसऱ्यांतील ऱ्हस्व आहे, तरी लिपी-वरून हा भेद ध्यानीं येण्यास कोणतेंच साधन नाही. इंग्रजीच्या निकट परिचयाने पुढील स्वरोच्चार मराठींत घुसत आहेत:— Attend, Fairy, Fatal, Pat, Pet, Pot, Fawn तसेंच Fine व Value अशा शब्दांतील दन्तोष्ठ्य वर्णहि मराठीला नवीनच आहेत. टिंबें व चंद्रकोरी यांचा उपयोग करून यांपैकी कांही उच्चारांचीं चिह्नें तयार करण्यांत आलीं आहेत. परंतु या दिशेने आस्थेवाईक प्रयत्न होऊन, नव्या चिह्नांची वर्णमालेंत निखालस व्यवस्था झालेली नाही.

मराठीच्या मूळ स्वभावांतच असे कांही उच्चार आहेत की, ते संस्कृत वाणींत नव्हते, आणि आम्ही संस्कृत वर्णमाला बहुतेक जशीच्या तशीच उचलल्यामुळे तींत या खास मराठी उच्चारांची दाद नीटशी लागलेली दिसत नाही. या बाबतींत चालढकल करून आम्ही कसें तरी भागवीत आहों. वर्णमालेची जरूर ती वाढ किंवा सुधारणा न केल्यामुळे आमच्या व्यवहारांत कांही प्रत्यक्ष आडलें आहे, अशांतला भाग नाही. परंतु ही स्थिति जोंपर्यंत चालू आहे, तोंपर्यंत आमची वर्णमाला निर्दोष आहे, असें आग्रहाने म्हणणें अनुचित होय[1].

मागील कलमांत असें दाखविलें आहे की, ज्यांत पूर्ववर्ण अनुनासिक आहे व उत्तरवर्ण ह-कार आहे, असे संयोग संस्कृत वाणींत नाहीत. परंतु असले संयोग मराठी वाणींत सडकून आहेत. उलट मराठींत ह-काराचा पूर्वावयव म्हणून अनुनासिकाशीं किंवा अर्धस्वराशीं संयोग होत नाही. 'प्राह्न, चिह्न, ब्रह्म, बह्वर्थ, ह्रास, विह्वग' हे संस्कृत शब्द आम्ही मराठींत 'प्राण्ह, चिन्ह, ब्रम्ह, बव्हर्थ, ऱ्हास, विव्हग' असे उच्चारतों, पण दोन्ही तऱ्हांनी लिहितों. शिवाय संस्कृतांत अनुनासिक व अर्ध वर्ण यांचे महाप्राण वर्ण नाहीत ते मराठींत आहेत[2]. उदा०— 'कण्हेर', 'पन्हें', 'म्हाळसा', 'नव्हे', 'तऱ्हा', 'वल्हें'. परंतु या साध्या मिश्र वर्णांचा व 'प्राण्ह' इत्यादि शब्दांनी संयुक्त वर्णांचा लिपींत कांहीच भेद दाखवींत नाहीत. इतकेंच नव्हे, तर 'म्हणे, म्हातारा, म्हशा' इत्यादि शुद्ध मराठी शब्द बरेच वेळां 'ह्मणे, ह्मातारा, ह्मशा' असे लिहून असंबद्धतेंत तिरंगीपणा आणतों.

य-कारयुक्त मिश्र पण साध्या उच्चारांचीहि मराठी वर्णमालेंत अद्याप सोय लागावयाची आहे. 'मृग्य, कुड्य, पद्य, पुण्य, अच्युत, शल्य, सख्य' इत्यादि संस्कृत शब्दांतील य-कार-युक्त अक्षरें संयुक्तवर्ण आहेत. पण 'आग्यावेताळ', चामड्याच्या वाद्या', पुण्याच्या हवेल्या',

---

१ "आमच्या वर्णमालेशीं इतर वर्णमाला ताडून पाहतां त्या अत्यंत सदोष आहेत, असें दिसून येईल. आमच्या वर्णमालेंतील प्रत्येक शब्दाचा उच्चार, व त्याचें मूल्य, एकच असून, अनुपयुक्त, द्विरुक्तिक किंवा मिश्र मूल्याचा, असा एकहि वर्ण तिच्यांत नाही."

गो. का. चांदोरकरकृत आर्यलिपी, पृ. १३

२ य-काराचा महाप्राण मराठींत आढळत नाही व त्याचा पूर्ववर्ण या नात्याने ह-काराशीं संयोगहि होत नाही.

'सख्यासख्यांच्या फुगड्या' इत्यादि प्रयोगांतील य-कारयुक्त अक्षरें मिश्र पण साध्या उच्चारांची दर्शक आहेत. परंतु या संयुक्त आणि साध्या मिश्र उच्चारांतील भेद लिपींत स्पष्ट होत नाही.

वरील विवेचनावरून एक बाब लक्ष्यांत येईल की, आम्ही मराठींत सर्वच व्यंजनें य-कारयुक्त मिश्र करूं शकतों, म्हणजे तीं अंशतः तालव्य करितों. ही गोष्ट एका च-वर्गासंबंधें मात्र आम्ही लक्ष्यांत घेऊन टिंबाच्या साह्यानें हा भेद दर्शविण्याचा प्रयत्न केला होता, पण तो वायां गेला. संस्कृतांतील तालव्य च-कार व मराठींतील मिश्र च्य-कार यांत उच्चारासंबंधें वास्तविक कांहीच भेद नाही. मोरोपंतासारख्या चोखाळ पंडित कवीनेहि त्यांस अभिन्न गणिलें आहे, हें खालील यमकावरून स्पष्ट होईल.

केलें बिभीषणें प्रभु मंत्रौषधिने विशल्य ते, ज्यांचें ।
नामचि करि पाण्याहुनि पातळ यश भास्करादि तेजांचें ॥ वन. १२।५०
क्षुब्ध असेंही पाहुनि आसादी तर्तुकाम रावणि ज्या ।
तो श्रीलक्ष्मण बुडवी त्यासि, जसा सिंधु पामरा वणिजा ॥ वन. १२।५५

याचा परिणाम असा झाला आहे की, मराठी पोथ्यांतून संस्कृत तालव्य च-वर्गाचीं अक्षरें 'च्य, छ्य, ज्य' अशीं लिहिलेलीं कधी कधी आढळतात. उदा०—

च्यारि खाणी, च्यारि वाणी, चौऱ्यासि लक्ष जीवप्राणी,
संख्या बोलिली पुराणीं, वर्तती आता ॥ दासबोध, १३।१।१.
आनंद, विनोद, उद्वेग, चिंता, काया, छ्याया, माया, ममता,
जीवित्वें पावे नाना वेथा, तोचि आत्मा ॥ दासबोध १३।१।१२.
वीटलें या च्यीन प्रपंच्यापासुनी, वमन तें मनीं बैसलेंसे. ॥
(तुकारामाची जगनाडी गाथा, अभंग ८९७).

आणिकहि सांगिजतील, चौदा आंतु मुदल
स्वयंभु मुख्य वडिल च्यारि मनु ॥ राजवाडे ज्ञानेश्वरी, १०।९१.
सत्य असोन आछ्यादिलें, मिथ्या नसोन सत्य जालें ॥ दासबोध, ७।१०।५.

आजमितीस आम्ही य—कार मिश्रित साधे उच्चार प्रत्यक्ष य—वर्ण इतर व्यंजनास जोडून दाखविण्याचा प्रघात कायम केला आहे; तरी पण 'राजाला' यासारखीं कांही रूपें व इ—कार-युक्त 'च'—वर्ग, हे अपवाद म्हणून राखिले आहेतच. हल्लीच्या मराठींत विभक्ति प्रत्ययादि लागून जीं रूपें य—कारमिश्रित होतात, तीं जुन्या पोथ्यांतून उदा०—राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरींत-य-कारहीन लिहिलेलीं आढळतात, पण त्यांचा उच्चार तालव्यच करावयाचा असतो. परंतु हें समजण्यास लिपींत नक्की साधन नसल्यामुळे, य—कारमिश्रित व य—कारहीन, अशीं दोन्ही रूपें मानण्याकडे आपली प्रवृत्ति झाली आहे.

हांगा राजसूयाचां सभासदीं देखतां त्रिभुवनिची मांदी,
कैसा ग्रतघा दुर्वादीं निस्तेजिलासि ॥ ज्ञानेश्वरी, ११।१०१.

एयावरी पार्थां माझां भजनीं आस्था,
तरी तेयातें मी माथां मुकुट करीं ॥ ज्ञानेश्वरी, १२।२१२.
तेयाचेया गुणाचीं लेणीं लेवंड आपुलां वाणीं,
तेयाचीं कीर्ति श्रवणीं आइकों आम्हीं ॥ ज्ञानेश्वरी, १२।२२०
ऐसेनि अहंकृती भावो जेयाचां बोधिं जाला वा ॐ
तऱ्ही देहा जवं निर्वाहो, तवं आथि कर्म ॥ ज्ञानेश्वरी, १८।४१९
आरे रे महात्म्याचां ठाइं देवें मारामारी नाहीं,
म्हणौनी जीवें राषीलासी, तें तु नाठवीसी कांही ॥ ( प=ख )
( चोभाकृत उषाहरण, इ. सं. मं. अहवाल, श. १८३३, पृ. ३६ ).
तुम्हा यादवांचां कुळीं कांही पळतां कऱ्हणा लाज नाही,
सांडूनु मथुरापाटण रीगालेती कवणी ये ठाइं ! ॥ कित्ता, पृ. ३८
मार्गि सुटलेया सरांटी न सटे पर्वताचां पोटीं,
तीहीं थांइ अडदरलासीं पळतां क्षणे दाविसी पाटी ॥ कित्ता
बाणु हरिहरां माझारी दोघांचे हात षांदावरी
सांतीपाटू करीत आहे ब्रह्मा गगन गर्जे जयाजयाकारीं ॥ कित्ता, पृ. ५०
वैष्णवांचां घरीं देवाची वसती, वीस्वास हा चीती सत्य भाव. ॥
( तुका० जगनाडी गाथा, अभंग ९३४ ).

य–कारमिश्र उष्म्याचीं मात्र वर्णमालेंत स्वतंत्र चिन्हांनी सोय केली आहे. स–कारांत य–कार ओघरता मिसळला म्हणजे अंशतः तालव्य होणारा ऊष्मा ' श ' ह्या स्वतंत्र चिन्हाने आपण दर्शवितों. उदा०–' ठसा ' याची चतुर्थी 'ठशास, ठशाला, ठशातें.' तरी पण 'श'च्या ऐवजी ' स्य ' किंवा ' श्य ' लिहिलेलें क्वचित् आढळतेंच. उदा० —

तुम्हीं आम्हीं भलें आतां जालों चीतां कास्याची ! तु. ज. गा. अ. १३०४.
आश्या नाही कवणाची तुका म्हणे परीसाहुनी आगळा. कित्ता, १०७५.
मैसळींचें वीर्य ऐस्यां अनुभवें. ॥ कित्ता, ९१९.

ट-वर्ग मूर्धन्य आहे, परंतु त्याचे उच्चार आम्ही कित्येक वेळां जरा नरम करितों, तर कित्येक वेळां कडक करितों. हे वर्ण शब्दाच्या आरंभीं आले, किंवा अन्तीं येऊन द्वित्त असले, किंवा त्यांच्यामागे अनुनासिक असला, तर त्यांचा उच्चार कडक व ठसठशीत होतो; पण ते इतरत्र आले असतां, त्यांचा उच्चार नरम व ओघरता होतो. टपका–अटप, टाईप–पटाईत, डकणें–भडकणें, ढका–चढण, खड्डा–खडा, खोण्ड–खोड, कण्ठ–कठडा अशा तऱ्हेच्या शब्द-युग्मांच्या उच्चारांची चांगली पारख व तुलना केली असतां, वर निर्दिष्ट केलेला भेद लक्षांत आल्यावांचून राहणार नाही. तेव्हा आमच्या वर्णमालेंत ट–वर्गांचें निश्चित मूल्य नाही, हें सिद्ध[1] होतें.

---

१ दादोबा पांडुरंग यांनी ड-कारापुरता हा उच्चारभेद मानिला आहे. ते म्हणतात, " ड, या वर्णाचा उच्चार मराठींत दोन प्रकारचा आहे; त्याचा नियम असा आहे की, हा वर्ण शब्दाच्या आरंभीं असतां याचा उच्चार शुद्ध ड सारखा होतो; परंतु शब्दाच्यामध्ये, अथवा शेवटीं असला तर, शुद्ध ड उच्चा-

मराठी वर्णमालेंतील अनुस्वाराचें टिंब तर बहुरूपीच आहे. तें पुढील उच्चार दाखवितें:—(१) क-वर्गादि पांची वर्गांतील अनुनासिक; उदा:—अंगडें, चिंच, तांडेल, पंती, बंब. (२) मराठींतील ओझरता नासिक्य उच्चार; उदा:—बांक, चांचड, कांटा, तांतड, लांपट. (३) य आणि व यांच्यापूर्वी संस्कृतांतील अस्सल अनुस्वार; उदा०—संयम, संवत्. (४) स्वर, य आणि व हे अर्धस्वर व ऊष्मे, यांच्यापूर्वी व अनेक प्रत्ययांत ओझरता नासिक्य उच्चार; उदा०—ठांई, वांयां, कांहीं, रानोंरान, संवय, धांवणें, घांस. (५) र, ल, स, श, आणि ह, यांपूर्वी अनुस्वरानंतर व-चा उच्चार; उदा०—संरम्भ, संलग्न, संसार, संशय, सिंह. या पांचव्या प्रकाराचा परिणाम असा झाला आहे की, हे शब्द कित्येक वेळां व-कारयुक्त लिहिलेहि जातात. क्वचित् हा व-चा उच्चार जरा अघळ पघळ करून त्याला अ-काराची साथहि देण्यांत येते.

उपजौनी संवसारीं तुथें चुकले जे, मुरारी,
तेयांचा जननीयेसी भारु पडे नव मासवरी ॥
(चोभाकृत उपाहरण, भा. इ. सं. मं. अहवाल, श. १८३३, पृ ५५).
अवो, न भुले ची, संवसारला, घर्ग घेउनी उठीला,
तवं तो अर्ध चंद्रु बाणु दडकरी कंठीं उपटला ॥ किंत्ता, पृ. ३७.
जो संवसारव्यथा फीटला निरास्यें निवडला
पांसाहून सूटला विहंगु जैसा ॥ ज्ञानेश्वरी, १२।१८०.
नाना अवतार धरणें, दुष्टांचा संव्हार करणें
धर्म स्थापाया कारणें विष्णूस जन्म ॥ दासबोध, १०।४।४१.
सवंसाराहातीं अंतरलों दुरी आतां कृपा करीं नारायेणा ॥
(तुका० ज० गाथा, अभंग ९८२).

कित्येक वेळां या व-कारास औ काराचें रूप मिळतें. उदा०—

फुगडी गे, अवघें मोडी गे, तरीच गोडी गे, सौंसार तोडी गे.॥ किंत्ता १०३१.

आजमितीस सुद्धा कौंस (कंस), सिंव्ह (सिंह), अशा धर्तीचे शब्द लेखांतून आढळत नाहीत असें नाही. एकंदरींत मराठी वर्णमालेंतील अनुस्वारांचें मूल्य अनिश्चित आहे, असें सिद्ध होतें.

विसर्गांचे बाबतींतहि आमची धरसोडच आहे. 'दुःख, अन्तःकरण, इतःपर, अंधकार, (सं. अंधार)' हे शब्द 'दुख्ख, अन्तष्करण, इतस्पर, अंधक्कार' असे उच्चारले जातात व क्वचित लिहिलेहि जातात. कित्येक वेळां विसर्गाचा उच्चार हुबेहूब 'ह'-सारखा करून आम्ही तो मागील वर्णांत मिसळून टाकितों. उदा—सध्यां (सद्यः), पुन्हां (पुनः).

आमच्या वर्णमालेंत पूर्वी क्ष आणि ज्ञ या अक्षरांचा समावेश होत असे. 'ळक्षज्ञ' वर्णमालेचा शेवट 'कोणत्याही गोष्टीची इतिश्री' या अर्थी आमच्या घरगुती भाषेंत सुप्रतिष्ठित

---

रते वेळेस जितकी जीभ टाळ्यावर दाबावी लागते तितकी न दाबतां मध्येच किंचित् पसरावी लागते. डाग आणि बडबड अ० भडभड, या दोहों शब्दांत ड्चा उच्चार सारखा नाही." मराठी भाषेचें व्याकरण, पृ. ८.

झाला आहे. परंतु क्ष व ज्ञ हे संयुक्त वर्ण असल्यामुळे ते वर्णमालेंतून काढण्यांत आले; हें योग्यच झालें. क्ष, ज्ञ, व यांच्याच सारखीं दुसरीं चमत्कारिक पद्धतीने लिहिलेलीं जोडाक्षरें साध्या पद्धतीने लिहिणें व छापणें सोईचें होणार आहे. शिवाय जोडाक्षरांचे घटकहि दृश्य होऊन, उच्चारास नियम राहील. उदाहरणार्थ, क्ष व ज्ञ हीं अक्षरें क्ष व ज्ञ अशीं लिहावीं. हल्लीं आपण ज्ञ-चा जो उच्चार करितों, त्याचा विचार केला असतां, ज्ञ वर्ण 'द्न्य' असा लिहिणें योग्य होईल. याच अक्षराचा जेव्हा 'ग्य' उच्चार करितात, तेव्हा तें तसेंच लिहितात. उदा– 'ग्यानबा तुकाराम' ही वैष्णवांची हांक.

७ मागच्या कलमांतील ऊहापोहाचा इत्यर्थ इतकाच की, संस्कृत वाणीपेक्षा मराठी वाणींत उच्चारांचें विविधत्व फार असल्यामुळे, संस्कृत नागरी वर्णमाला मराठीस अपुरी झाली आहे. तात्त्विक दृष्टीला मराठी वर्णमालेंतील वर्णांचें अनिश्चित मूल्यत्व, द्विरुक्तत्व इत्यादि दोष दिसल्यावांचून राहणार नाहीत. तरी पण वरील एकंदर दोषांचा विचार केला, तर त्यांतील बहुतेक सूक्ष्मभेदात्मक आहेत, आणि ते सर्व दूर करावयाचे म्हणजे मराठीची वर्णमाला व्यवहारदृष्ट्या आटोपशीर राहणार नाही असें वाटतें. इतकी सदोष असलेली ही आमची वर्णमाला व लिपि, इंग्लिश व इतर युरोपीय भाषांच्या वर्णमालांशीं व लिपींशीं ताडून पाहिल्यास, आमच्या वर्णमालेचें श्रेष्ठत्व कबूल केल्यावांचून सुटकाच नाही. Quay (की), Choir (क्वायर), Brougham (ब्रूम्), Psalm (साम्), Etiquette (एटिकेट्), Victuals (व्हिट्ल्स) इत्यादि अनेक इंग्रजी शद्बांचे उच्चार व वर्णवटिका यांत जो असंबद्धपणाचा विलक्षण चमत्कार दृष्टोत्पत्तीस येतो, तसा चमत्कार मराठींत घडणें शक्यच नाही. इंग्रजी भाषेंत शद्बांच्या उच्चारांचें चंचलत्व नाहींसें न होतां, शब्दांची वर्णवटिका मात्र वज्रलेप झाल्यामुळे, हा असंबद्ध प्रकार उत्पन्न झाला आहे. पण मराठी वर्णमालेंत मोठी सोय ही आहे की, तिच्या वर्णांचीं नांवें व उच्चार एकच आहेत, व आम्ही जसें बोलतों, तसेंच लिहिण्याचा बहुशः प्रयत्न करितों, म्हणजे, शब्दाचा उच्चार बदलला की, त्याचें अक्षरात्मक लेख्य स्वरूपहि बदलतें.

८. उच्चाराप्रमाणे बरेंचसें हुबेहूब लिहितां येणें, हा जरी देवनागरीचा विशेष गुण आहे, तरी त्या गुणाचाच एक असा परिणाम झाला आहे की, जुन्या पोथ्यांतून व इतर लिखितांतून शद्बलेखनांत लेखक- लेखकाच्या अधिकाराप्रमाणे व त्याच्या वाणीच्या शुद्धाशुद्धतेनुसार वैचित्र्य उत्पन्न झालेलें आहे. शिवाय, एकच मनुष्य कित्येक शद्बांचे उच्चार निरनिराळ्या वेळीं किंचित् निरनिराळेहि करितो. बरेच वेळां हे भिन्नभिन्न उच्चारहि अस्पष्ट, डळमळीत, अगर ओझरते असतात. अशा स्थितींत उच्चाराच्या डौलाप्रमाणे लिपीनेहि डौल खाल्ला, तर आश्चर्य कसलें! याच कारणाने जुन्या पोथ्यांत व लिखितांत, शद्बलेखनांत नाना तऱ्हा आढळतात; इतकेंच नव्हे, तर एकाच लेखकाने लिहिलेल्या एकाच ग्रंथांत परस्परांशीं विसंवादी व विरुद्ध प्रकारहि आढळतात. ग्रंथकारांत अगर लेखकांत वाङ्मयविषयक अशिष्टपणा जितका जितका अधिक असेल, तितका तितका हा लेखनांतील चालढकलपणा, सैलपणा व अनिश्चितपणा अधिक वाढतो. वाङ्मयविषयक शिष्टपणा हा उच्चवर्णावर, तपश्चर्येवर, वेदान्तज्ञानावर, भक्तिमार्गांतील अधिकारावर, व्यवहारपटुतेवर किंवा अशांसारख्या इतर महनीय व पूज्य गुणांवर अवलंबून असतो, असें

नाही. जन्मजात प्रवृत्ति, सहवासियांची भाषापद्धति, शिक्षणाने घडणारे जिव्हासंस्कार, शिष्ट वाङ्मयाचें भाषाशुद्धीच्या दृष्टीने केलेलें परिशीलन व स्वतःच्या मनाचा उच्चाराच्या व लेखनाच्या बाबतींतील चोखाळपणा, या कारणसमवायाने वाणीचा व लिपीचा शिष्टपणा अंगीं बाणतो. तेव्हा एखाद्या जुन्या ग्रंथलेखकाची भाषा अगर लेखपद्धति अशिष्ट आहे, असें म्हटलें असतां, त्याच्या पूज्य गुणांवर अगर अधिकारावर घाव घातल्यासारखें होतें, असें निष्कारण मानून कोणीहि रुसवा करूं नये. ज्ञानेश्वराचे कालापासून तों सद्यःकालापर्यंतचे ग्रांथिक-शिष्ट-मराठीचें सामान्य धोरण असें दिसतें की, मूळ संस्कृत शब्द अपभ्रंशाच्या बऱ्याच दरवाज्यांतून जात जात, अखेर ज्या वेषाने तो मराठींत बद्धमूल झाला असेल, तो त्याच वेषांत स्वीकारावयाचा व त्याचा जो व्यावहारिक अर्थ असेल, त्या अर्थापुरताच त्याचा उपयोग करावयाचा; परंतु मध्यंतरीचे संक्रमणावस्थेंतील अपभ्रंश योजावयाचे नाहीत. उदा०—शब्द-सद्द-साद, अशी अपभ्रंशाची परंपरा आढळते. यांपैकी 'शब्द' व 'साद' हींच रूपें मराठींत योजिलीं जातात, आणि 'शब्द' हा संस्कृतांतील व्यापक अर्थाने वावरतो, तर 'साद' याची अर्थव्याप्ति मर्यादित असते. हाच प्रकार पुढील शब्दांत दिसून येईलः—परीक्षणें—परिक्खणें—परीखणें—पारखणें; मार्ग—मग्ग—माग; हस्त—हत्थ—हत्त—हात; दृष्टि—दिरिटि—दिट्ठि—दिठि—दिठ; खर्पर-खप्पर-खप्पड-खापर. या शब्दांमधील संक्रमणस्थितींतील रूपें योजिणें हें अशिष्टपणाचें लक्षण गणावें लागतें व अशा रूपांच्या संख्येवर अशिष्टपणाचें प्रमाण अवलंबून राहील. एकाच काळचे सुमारास झालेल्या जुन्या निरनिराळ्या लेखकांचे लिखाणास वरील कसोटी लाविली असतां त्यांत शिष्टाशिष्टांची निवड करितां येण्यासारखी आहे. कल्याणस्वामींनी लिहिलेला समर्थांचा दासबोध व जगनाड्यांनी लिहिलेली तुकारामांची गाथा, यांच्या लेखनाची तुलना केली असतां, लेखकाच्या शिष्टपणाचें तारतम्य सहज लक्ष्यांत येईल. मोरोपंतांचें लिखाण व महिपतबावांचे लिखाण यांतहि अशीच तुलना करितां येण्यासारखी आहे. हुबेहूब उच्चार मराठी लिपींत उतरतां येतात, याच सोईचा हा परिणाम आहे. परंतु यामुळे एक फायदा असा झाला आहे की, जुन्या लिखाणाच्या लेखकाचा नक्की काळ माहीत असल्यास, त्या विवक्षित लेखकाच्या प्रांतांत व समाजवर्गांत शब्दांचे कोणते अशिष्ट अपभ्रंश प्रचलित होते, हें जाणण्यास, हे लेखनप्रकार मोठेंच खात्रीलायक साधन झालें आहे.

'इ' व 'उ' या स्वरांच्या ह्रस्वदीर्घत्वासंबंधे जुन्या पोथ्यांत फारच बेबंदशाही आढळते. नागेश, विठ्ठल, आनंदतनय, रघुनाथ पंडित, वामन पंडित, रामदासस्वामी, निरंजन गोसावी, मयूर पंडित इत्यादि कवींचीं काव्यें अक्षरमात्रागणवृत्तांत बरींच असल्यामुळे, लेखकानी लिखाणांत प्रमाद केले असले तरी त्या कवींचे धोरण ह्रस्वदीर्घांच्या बाबतींत किती सैल अगर रेखीव होतें, हें ठरविणें साधारणपणें शक्य आहे. परंतु जुन्या मराठी काव्यांचा प्रचंड भाग ओंवी, अभंग व पदें या बहुशीं निरंकुश छंदांत गुंफला असल्याकारणाने कवींचें ह्रस्वदीर्घसंबंधें धोरण ठरविणें अशक्य आहे. हें वाङ्मय बरेंच लोकप्रिय असल्यामुळे, त्याचे लेखनकारहि अनेक समाजवर्गांतील आहेत. त्यामुळे हें वाङ्मय शिष्ट लेखकाने लिहिलें असतां, बरेंच शुद्ध आढळतें आणि उलटपक्षीं तें अगदी अव्युत्पन्नाच्या हातून घडल्यास फारच अशुद्ध आढळतें. सामान्यतः

जुन्या पोथ्यांत दीर्घ उ–कार व ह्रस्व इ–कार[1] यांचा बराच दुष्काळ आढळतो. ज्ञानेश्वरी, चोमा कृत उषाहरण, तुकारामाची जगनाडी गाथा, समर्थांचा दासबोध या ग्रंथांच्या पोथ्यांबर-हुकूम अस्सल प्रति छापलेल्या आहेत. सुभानन्त स्वामी, गोपाळ कवि व विष्णुदास नामा यांच्या भारतपर्वांच्या पोथ्या आमच्या पाहण्यांत आहेत. या सर्वांत दीर्घ इ–चा सुळसुळाट व दीर्घ उ–चा खडखडाट अनुभवास येतो. बहुशः हा पिशाच लिपीच्या सहवासाचा परिणाम असावा. पिशाच लिपी हेमाद्रीच्या कालापासून म्हणजे इ. स. तेराव्या शतकापासून कारकुनी लिखाणांत शिरून लोकप्रिय झाली. महाराष्ट्र पंडितांनी मात्र आपल्या ग्रंथलेखनांत तिला थारा केला नाही. म्हणजे, ग्रंथलिपी नागरी व व्यवहारालिपी पैशाची, अशा दोन लेखन पद्धति इ. स. तेराव्या शतकापासून महाराष्ट्रांत जोडीने नांदू लागल्या. नागरीलिपी सुवाच्य व सुढाळ असल्यामुळे तिला 'बाळबोध' हें नांव पुढे मिळालें, आणि पैशाची लिपी गुंतागुंतीची व लपेटीची असल्यामुळे तिला 'मोडी' म्हणूं लागले. इ. स. १६ व्या शतकापासून महाराष्ट्रांत कारकुनी पेशाला चलती आली व मोडीचा प्रचार अति वाढला. या पुढील काळांत मुक्तेश्वराची पर्वे, वामनी श्लोक, दासबोधाचे समास, पांडवप्रताप इत्यादि ग्रंथ सुद्धा लांब खरड्यांवर मोडींत लिहिलेले आढळतात. एकंदरींत हा मोडीचा पगडा पोथ्यांतहि दिसूं लागला. पुष्कळ पोथ्यांतून 'कृ, ण, च, आ, र, ए, ऐ, स, न' इत्यादि वरींच अक्षरें मोडी पद्धतीने लिहिलेलीं आढळतात. मोडींत उकार चिन्ह ह्रस्वच आहे आणि इ–काराची वेलांटी दीर्घच असते. एखादी गांठ जास्ती देऊन यांचा भेद दाखविण्याचा प्रघात होता, परंतु त्यांत ढळमळीतपणा असे. तेव्हा या मोडीच्या प्रभावाने पोथ्यांतून दीर्घ उ–कार व ह्रस्व इ–कार फार कमी आढळतात, असें अनुमान काढण्यास कोणतीच हरकत नाही.

---

## प्रकरण चवथें

# मराठीचें मूळ

१ प्रत्येक भाषेचीं दोन अंगें असतात; एक बाह्यांग म्हणजे शब्दकोश, दुसरें अंतरंग म्हणजे व्याकरण. मूळभाषेंत परभाषेंतील शब्द अनेक आगंतुक कारणांनी येत असतात. या विषयाचा किंचित् उपन्यास पहिल्या प्रकरणाच्या अखेरच्या कलमांत केला आहे. केवळ शब्दांवरून भाषेचें मूळ अमुक आहे, असें निश्चित करतां येणार नाही. मराठी भाषेंत कानडी, तेलगु, आरबी, फार्सी, पोर्तुगीज, इंग्लिश इत्यादि परभाषेंतील शब्द घुसून प्रतिष्ठित झाले आहेत. पण

---

१ "दीर्घ इकाराची लकब मराठ्यांचे लिहिण्यांत फार जुनी व शिष्टसंमत आहे." ( भावे–तुका- ज. गाथा, भाग २ प्रस्तावना १९).

त्यावरून मराठीचें मूळ यांपैकी कोणत्याहि एका भाषेंत आहे, असें सिद्ध होणें कठीण आहे. एक तर, मराठी शब्दकोशांत जवळ जवळ शेंकडा पंचाहत्तर शब्द असे आहेत की, ते यांपैकीं कोणत्याहि भाषेंतून आलेले नाहीत. शिवाय, या भाषांतील शब्द घेतांना, मराठीनें त्यांवर आपला शिक्का मारून त्यांस आपलेसें करून टाकिलें आहे. हा मराठीचा शिक्का ज्या परंपरेंत आढळेल, त्याच परंपरेंत मराठीचें मूळ सापडणार. परंतु भाषेचें दुसरें अंग म्हणजे आंतर रचना हें विशेष महत्त्वाचें आहे. या रचनेंत सर्व व्याकरणप्रक्रियेचा समावेश होतो, आणि या आन्तर रचनेचें जें मूळ, तेंच त्या भाषेचें मूळ असें समजणें अवश्य आहे. नामधातुविभक्ति, सर्वनामें, संख्यावाचकशब्द, अव्ययें, उपसर्ग, अत्यंत परिचित धातूंचीं व विशेषणांचीं मूळ रूपें, उद्गारवाचीशब्द या गोष्टींचा अंतर्भाव अंतरंगांत होतो. ज्ञानेश्वर हे मराठींतील आद्य ग्रंथकार म्हणून सामान्य समजूत आहे; व ज्ञानेश्वरी हाच मराठींतील पहिला मोठा व अभियुक्त ग्रंथ आहे, ही बाब सर्व संशोधकांस मान्य आहे. आज आपण जी मराठी भाषा बोलतों व लिहितों ती ज्ञानेश्वराच्याच भाषेचें पांचसहाशें वर्षांनी परिणत झालेलें स्वरूप आहे. तेव्हा ज्ञानेश्वरी भाषेचें जें मूळ, तेंच आजच्या मराठीचें मूळ. ज्ञानेश्वरी भाषेचें अत्यंत चिकित्सापूर्ण व्याकरण रा. वि. का. राजवाडे यांनी अविश्रांत मेहनतीने व सूक्ष्म अवलोकनाने तयार केलेलें आहे. या व्याकरणांत आक्षेप घेतां येण्यासारख्या फारच थोड्या बाबी आहेत. सामान्यतः सर्व बाजूंनी विषयाची फोड स्पष्टपणें झाली असून रा. ब. वैद्य म्हणतात त्याप्रमाणे, "श्रीज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण" हें मराठी भाषेच्या वाङ्मयाच्या इतिहासांत एक क्रांतिकारक व अत्यंत महत्त्वाचें केंद्रस्थान होईल, असें म्हणावयास हरकत नाही.....मराठी भाषेची वाढ कोठून व कशी झाली, याचें ऐतिहासिक दृष्ट्या एका मजबूत आधारावरून सोपपत्तिक स्पष्टीकरण करण्याचें श्रेय प्रथम राजवाड्यांनी घेतलें आहे." या बहुमोल ग्रंथांत मराठीची आंतररचना बहुतेक सर्वपरींनी संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश या परंपरेने बनली आहे, हें अगदी निश्चयात्मक ठरलें आहे. त्याची पुनरावृत्ति येथे करण्याची अवश्यकता नाही.

२ मराठी व इतर सद्यःकालीन संस्कृतोत्पन्न देशभाषा, या हिंदुस्थानांत झालेल्या पांच भाषाविषय उत्क्रान्तींचें फळ आहे.

कोणत्याहि शिष्ट ग्रंथभाषेची स्थिति नेहमी अशी असते की, तिच्या भोवतीं अनेक अशिष्ट बोली व्यवहारांत वावरत असतात. कालान्तराने या अशिष्ट बोलींपैकी एखाददुसरी शिष्ट ग्रंथभाषा बनते, व पूर्वीची ग्रंथभाषा माजी ठरते. पण नवी भाषा प्रमुखत्वें पूर्वीच्या भाषेवर उभारलेली असते. एका झाडावर दुसऱ्या झाडाचें कलम करण्यासारखा हा प्रकार नसतो, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. जुन्या झाडाच्या जीर्ण खांद्या, डहाळ्या व पानें एका बाजूने गळून पडण्यास लागावीं, पण दुसऱ्या बाजूने त्यालाच नवीन पालवी फुटावी, अशापैकी हा प्रकार आहे. ही नवभाषासंभवाची क्रिया अनेक शतकेंपर्यंत चालू असते, आणि मूळभाषा व तत्संभूत नवीन भाषा या दोन्ही कमीअधिक काळपर्यंत लोकव्यवहारांत शेजारीं शेजारीं नांदत राहतात; म्हणजे एकीचा अत्यंत लोप झाला व दुसरीचा नंतर कोंब फुटला अशी वस्तुस्थितिच नसते.

१ निबंध व संभाषणें, पृ. ९७.

केळीच्या बुंध्याला जसा मुनवा फुटतो व मूळ झाड आणि नवा मुनवा हीं दोन्ही जशीं कांहीं मुदतीपर्यंत जोरांतच असतात, तशीच स्थिति वरील भाषांची असते. नवी भाषा ग्रंथयुक्त झाली, तरी व्यवहारांतून गेलेल्या भाषेंत विद्वानांच्या हातून कित्येक वर्षेपर्यंत ग्रंथ-निर्मिति होतच राहते.

हिंदुस्थानांत वैदिक कालापासून आजपर्यंत घडत आलेल्या आर्यभाषेच्या पांच ठळक उत्क्रान्तींचा ठोकळ आराखडा रेखणें अस्थानीं होणार नाहीं.

३ वैदिक वाङ्मयांत असे पुष्कळ मंत्र आहेत, की, त्यांतील ऋचांची भाषा लौकिक संस्कृत जाणणारास मुळीच कळणार नाहीं. परंतु दुसरे कित्येक असे मंत्र आहेत की, त्यांची भाषा साधारण समजेल, आणि कांहींची भाषा तर बरीचशी परिचयाचीहि भासेल. उदाहरणार्थ, पुढील तीन ऋचा पहाः—

आ नो वहन्तु सप्तयो रघुष्यदो रघुपत्वानः प्र जिगात बाहुभिः ।
सीदता बर्हिरुरु वः सदस्कृतं मारयध्वं मरुतो मध्वो अन्धसः ॥
(ऋ. १।३५।६)

तम आसीत्तमसा गूळ्हमग्रे ऽ प्रकेतं सलिलं सर्वं मा इदम् ।
तुच्छयेनाभ्वपिहितं यदासीत् तपसस्तन्महिना जायतैकम् ॥
(ऋ. १०।१२०।३)

एतावानस्य महिमानो ज्यायाँश्च पूरुषः ।
पादो ऽ स्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ॥
(ऋ. १०।९०।५)

वरील ऋचांपैकीं तिसऱ्या ऋचेची भाषा बहुतेक पाणिनीय भाषेसारखीच आहे; पण पहिल्या दोहोंची निराळी आहे. असा रचनाभेद असला तरी या सर्व ऋचांची भाषा वैदिक गीर्वाण वाणीच आहे. म्हणजे वैदिक वाणीचीच परिणति होऊन पाणिनीची भाषा घडली, हें उघड आहे. ही पहिली उत्क्रान्ति.

४ पहिल्या प्रकरणांत 'संस्कृत भाषा मृत नाही,' या मुद्याचा उपन्यास करितांना, असें नमूद केलें आहे की, पाणिनीने आपल्या अष्टाध्यायींत ज्या निगमेतर लौकिक भाषेचें व्याकरण गोविलें आहे, ती शिष्टजनांची व ग्रंथांची चालू वाणी होती. तिला तो 'भाषा' म्हणतो. याचा अर्थ असा की, या भाषेचीं रूपान्तरें अशिष्टांत खेळत होतीं, तीं पाणिनीच्या मतें 'भाषा' या प्रौढ नांवास पात्र नव्हतीं. परंतु पाणिनीच्या काळींहि या अशिष्ट भाषाप्रचारांचा थोडाबहुत परिणाम ग्रंथभाषेवर होऊं लागला होता, ही गोष्ट पाणिनीच्या व्याकरणास धरून नसलेल्या कित्येक प्रयोगांचे दाखले तत्कालीन ग्रंथांत आढळतात, यावरून सिद्ध होते. उदाहरणार्थ[१]:—

१ रा. वासुदेव गोविंद आपटे यांनी केलेला 'प्रवासी' मासिकांतील एका लेखाचा अनुवाद.—वि. विस्तार, पु. ४२, अं. ४.

( अ ) न-काराबद्दल ण-कार.–आपस्तंब श्रौतसूत्र–णाम ( १०।१४।१ ), एणम् ( १४। २०।७ ), अणुक ( १६।१३।६ ). आपस्तंब धर्मसूत्र–अणुलेपन ( १।३, ११।१३, ११ ।१२–१५ ).

( आ ) ई बद्दल इ.–आपस्तंब श्रौतसूत्र–त्रिणांजन ( ८।६।१ ), गर्भिणिप्रायश्चित्त ( ९।१९।४ ), नदिद्वीप ( १६।१६।२-३ ). तैत्तीरिय संहिता ब्राह्मण–पत्नि, गर्भिणि. रामायण-मुनिपत्नयः ( ७।४९।१४ ), लक्ष्मिसंपन्न ( १।८।२०, ६।१४।१० ), लक्ष्मिवर्धन ( १।१८। २८, ६।१०१।१४ ).

( इ ) ऊ बद्दल उ–रामायण–गृहगृध्नुनाम् ( ९।७५।१४ ).

( ई ) शब्दांचीं वैकल्पिक मूळरूपें--क्षुर–खुर; ऋक्ष–रिच्छ–अच्छ; कक्ष--कच्छ; प्रियाल--पियाल; गण्ड--गल्ल; चंद्र--चंदिर; मारिष--मारिस; दर्शन--दरेशन; मकरन्द -मरन्द; किसलय--किसल; पुरातन--पुराण; नूतन -नूत्न; शुद्र--शूद्र; अर्य–आर्य; शकृत्--सकृत्; ग्र--ग्ल; शूर्प--सूर्प; वसिष्ठ--वशिष्ठ; वेश–वेष; युग--जुग; चर्--चल्; तृह्--तृंह् इत्यादि.

असो. याप्रमाणे शिष्टेतर बोली शिष्ट भाषेवर आस्ते आस्ते आपला ठसा उठवीत असतां पाणिनीनंतर सुमारे दोनशें वर्षांनी गौतमबुद्ध[1] अवतरले. त्याने आपल्या वयाच्या छत्तिसाव्या वर्षी सार्वजनिक उपदेश करण्यास उपक्रम केला. वैदिककर्मकाण्ड, यज्ञांतील हिंसा आणि वर्णाश्रमसंस्था यांवर त्याचा कटाक्ष असल्यामुळे, प्रथमतः त्याच्या मताचा फैलाव वाणी, कारागीर, शेतकरी इत्यादि लोकांतच विशेष झाला. बुद्धाने या लोकांस त्यांच्याच अशिष्ट भाषेंत आपलीं मतें समजावून देण्यास आरंभ केला. या भाषेस 'बुद्ध मागधी' हें नांव आहे. पुढे या पंथाच्या अनुयायांची संख्या विपुल वाढून, त्यास जेव्हा इ. स. तिसऱ्या शतकांत भरपूर राजाश्रय मिळाला, व या पंथाचे प्रचारक देशोंदेशीं धर्मप्रसारार्थ जाऊं लागले, तेव्हा हीच 'बुद्ध मागधी' या पंथाची धर्मभाषा होऊन बसली. बुद्धाचीं वचनें, चरित्र व कथा, त्याच्या संप्रदायाचे नियम व निर्बन्ध वगैरे सर्व लिखाण बौद्धांनी याच 'बुद्ध मागधींत' केलें. बुद्धपंथांत कालान्तराने अनेक बुद्धिवान् व विद्वान् संस्कृतज्ञ होऊन गेले, व त्यांनी मोठमोठीं विद्यापीठें स्थापिलीं व धर्म, नीति, न्याय, तत्त्वज्ञान, व्याकरण, कोश, काव्य, नाट्य इत्यादि विषयांवर संस्कृत भाषेंत दांडगी ग्रंथ संपत्ति निर्माण केली. परंतु 'बुद्ध मागधी' हीच बुद्धधर्माची विशिष्ट भाषा टिकून राहिली, व ती 'पाली' या नांवानें विशेष प्रसिद्धीला आली. 'पाली' शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधें खाली दिलेलीं अनेक मतें आढळतात:—

( अ ) पल्ली=खेडें गांव. पाली=खेडवळांची भाषा. ही व्युत्पत्ति ग्राह्य समजणें कठीण आहे. संस्कृतापासून उत्पन्न झालेल्या ज्या प्राचीन अगर अर्वाचीन भाषा आपल्यास ज्ञात आहेत, त्या सर्वांमध्ये पाली ही संस्कृत भाषेशीं अत्यंत मिळती व जवळची दिसते. तेव्हा तिला खेडवळ म्हणण्यापेक्षा अर्धवट नागर म्हणणेंच सयुक्तिक होईल.

---

१ हा ऐंशी वर्षांचा होऊन इ. स. पूर्व ४८३ मध्यें वारला. म्हणजे याचा जन्म इ. स. पूर्व ५६३ या वर्षी झाला होता.

( आ ) पाउलि=पाउलि=पाली. बुद्ध हा मागध होता, व पाटलिनगर ऊर्फ पाटलिपुत्र ( हल्लीची पाटणा ) ही मगधदेशाची राजधानी होती. तेव्हा पाली म्हणजे पाटलिभाषा. पाटलि-पाडलि--पाअलि--पाली ही व्युत्पत्तिपरंपरा. परंतु अशा रीतीने शब्दान्तःस्थ असंयुक्त व्यंजनाचा लोप होत नाही. महाराष्ट्री प्रभृति प्राकृतांतहि 'ट' काराचा लोप होऊं शकणार नाही; कारण, 'कगचजतदपयवां प्रायो लोपः' या सूत्रांत ट अगर ड यांचा अन्तर्भाव केलेला नाही.

( इ ) प्रकट[1]-पाअड-पाअल-पाल-पाली ( स्त्री० ). या व्युत्पत्तीप्रमाणे महाराष्ट्रीप्रभृति प्राकृतांत 'प्रकट'-पासून पाली-शब्द निघूं शकेल. परंतु पालीभाषेंत हा व्यंजनलोप होऊं शकत नाही, आणि बौद्धांनी आपल्या पवित्र धर्मभाषेचें नांव इतर भाषांतून घेतलें, असें म्हणण्यास मुळीच आधार नाही.

( ई ) 'पाल[१]' धातूपासून पाली=सन्मार्ग दाखवून मनुष्याचें रक्षण करणारीं त्रिपिट-कादि धर्मग्रंथांतील वचनें. बुद्धघोषाचार्योंनी अट्ठकथा ( अर्थकथा ) या ग्रंथांत 'पालि'-शब्द 'त्रिपिटक ग्रंथ' अगर त्यांतील 'वचनें' या अर्थी योजिला आहे. पुढे जेव्हा त्या आचार्योंनी अट्ठकथा त्रिपिटकाच्या भाषेंत लिहिल्या, तेव्हा सिंहली बौद्धांनी त्यांसहि 'पालि'-शब्द लावण्यास सुरवात केली, आणि तेव्हापासून त्या ग्रंथांतील भाषेलाच हें नांव पडलें.

( उ ) पालि=पंक्ति, ओळ. वचन=धर्मवचन व संप्रदाय ग्रंथ=धर्मवचनाची भाषा.

या पांची व्युत्पत्तींत शेवटची व्युत्पत्ति सरळ व साधी दिसते. असो, पालीबद्दल बौद्धांना साहाजिकच मोठा अभिमान व प्रेम वाटे, व पाली हीच खरी सनातन व पवित्र भाषा, असें प्रतिपादनाकडे त्यांचा कल वाहूं लागला. पालीचा वैय्याकरण कच्चायन सांगतो की, "पाली भाषा हीच मानव जातीची मूळ भाषा जाणावी; ब्रह्मदेव हीच भाषा बोले, लहान मुलेंहि इतर भाषा शिकण्यापूर्वी हीच उच्चारतात व बुद्धानेहि धर्मोपदेशार्थ हिचाच उपयोग केला.

सा मागधी मूळ भासा नरा यायादि कप्पिका।
ब्रह्मानो चस्सुनालापा संबुद्धा चापि भासरे ॥

खाली दिलेल्या उताऱ्यावरून पालीचें सामान्यस्वरूप वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

( १ ) देवदेवस वा ( सुदे )वस गरुडध्वजे अयं कारिते इह[३] लिओदेरेण भागवतेन ।दियससुपुत्रेण[४] तखसिलाकेन योनदूतेन आगतेन महाराजस अंतलिकितस[५] उपंता सभासं रभो ( को ) सीपुतस ( भा ) गभद्रस त्रातारस वासिना ( मज्झदे ) से नही राजे नवधंम्मा ( नुसासनाय )............

संस्कृतच्छाया—देवदेवस्य वासुदेवस्य गरुडध्वजः अयं कारितः इह हेलिओदोरेण भागवतेन दियस्य पुत्रेण तक्षशिलाकेन यवनदूतेन[६] आगतेन महाराजस्य अन्तलिकस्य उपान्तात् संकाशं राज्ञः कौत्सीपुत्रस्य भागभद्रस्य त्रातुः वासिना मध्यदेशे नाभिराज्ये नवधर्मानुशासनाय... ( रा. दे. श. भांडारकर, वेसनगर शिलालेख, इ. पू. १०८ ).

---

१ राजवाडे—ज्ञानेश्वरी प्रस्तावना, पृ. २१. २ रा. धर्मानंद कोसंबी.

३ Heliodorus. ४. Dion. ५ Antialkidas. ६ Ionian, Greek.

( २ ) सवं शुभकर्मंहेतोः फलमिदं शृणुतास्य कर्मस्य ।
पूजारहो भवितुं सर्वजगे अनुबंधत इममनन्तयशं ॥
( ललित वत्सराज )

कर्मस्य=कर्मणः । पूजारहो=पूजार्हः । जगे=जगति । यशं=यशः

( ३ ) परमत्थं पकासेतुं परमत्थ विनिच्छयं ।
पकरणं कतं तेन परमत्थत्थ वेदिना ॥
( अनुरुद्धाचार्य—परमत्थविनिच्छय )

संस्कृत—परमार्थं प्रकाशयितुं परमार्थविनिश्चयम् ।
प्रकरणं कृतं तेन परमार्थार्थवेदिना ॥

( ४ ) मा वोच फरुसं कञ्चि वुत्ता पटिवदेय्यु तं ।
दुक्खाहि सारम्भकथा पटिदण्डा फुसेयु तं । ( धम्मपद )

संस्कृत मा-वोचः पुरुषं कञ्चिदुक्ताः प्रतिवदेयुस्त्वाम् ।
दुःखाहि संरम्भकथा प्रतिदण्डाः स्पृशेयुस्त्वाम् ॥

( ५ )...रञो वासिठिपुतस सिरिपुळुमायिस सवछरे एकुनवीसे राजरञो गोतमीपुतस... कुलविपुलसिरिकरस सिरिसात काणिस मातुय महादेवीय गोतमिय बालसिरीय कारिता देयधम... एनच लेण महादेवी...ददाति निकायस भदायनी भिक्षुसंघस......

( नाशिकच्या त्रिरश्मिगिरि गुहेंतील शिलालेख, सुमारे इ. स. १५० ).

संः—राज्ञो[1] वासिष्ठीपुत्रस्य श्रीपुळुमायेंः संवत्सरे एकोनविंशे राजराजस्य गौतमीपुत्रस्य ...कुलविपुलश्रीकरस्य श्रीशातकर्णेः मातुः महादेव्याः गौतम्याः बालश्रियः कारित देयधर्मे एतच्च लेण्यं महादेवी....ददाति निकायस्य भद्रायणी भिक्षुसंघस्य...

( ६ ) ( अ ) अतिकातं अंतरं राजानो विहारयातां ञयासु । एत मगव्या अञानि च एतारिसानि अभिरमकानि अहुंसु ॥ ( अशोक शिलालेख, गिरनार. )

( आ ) अतिकंतं अंतलं लाजानो विहालयानं नाम निखमिसु । हिदामिगविया अंनानिच एदिसानि अभिलामानि हुवंतिनं । ( किता, धौली. )

( इ ) अतिकंतं.... लाजानो विहालयातं नाम निखमिसु । हिदा मिगविया अंनानिच हेडिसानि अभिलामानि हुसु । ( किता, खाल्सी ).

( ई ) अतिक्रंतं अंतरं....विहरयत्र नम निक्रमिषु । अत्र मृगय अञानि च हे दिशनि अभिरमति अभवसु । ( किता, कपूर्दगिरी ).

संः—अतिक्रान्तमन्तरं राजानो विहार यात्रां निरयासिषुः । अत्र मृगयान्यानि चैतादृशा न्यभिरामकाण्यभूवन् । (इ. पू. ३ रें शतक).

वरील उताऱ्यावरून इतकें सहज लक्ष्यांत येईल की, पाली भाषा ही संस्कृत भाषेचेंच निकृष्ट पण अगदी जवळचें रूप आहे. अशिष्ट बोलींचा नित्य सहवास व संस्कृतचें अपुरें ज्ञान

---

१ हा शिलालेख ' महाराष्ट्रींत ' आहे, असें रा. ब. पु. बा. जोशी म्हणतात. ( निबंध संग्रह, पृ. २४५ ). परंतु तो उघडउघड पाली लेख आहे. ( Dr. Sir R. G. Bhandarkar's Philological Lectures, p. 68 ).

अशी स्थिति असली म्हणजे रांगडी संस्कृताचा उद्भव होणें अपरिहार्य होतें. पुढे बौद्धपंथांत उत्तम संस्कृतज्ञ पंडित झाले, हें खरें, पण पालीभाषा व गाथाभाषा यांचें जें एकदा गंगाजमनी स्वरूप बनलें, तें तसेंच टिकलें. आपल्या इकडेहि 'पत्रिकांमध्ये' जोशीलोक अशाच तऱ्हेची अर्धवट संस्कृत भाषा योजितात, हें प्रत्यक्ष अनुभवास येतें. एकंदरींत पाली ही अपकृष्ट' संस्कृत भाषा गणावी, हेंच योग्य.

वरील उताऱ्यावरून पालीची देशकालव्याप्तिहि अंदाजतां येण्यासारखी आहे. अशोकाचे शिलाशासनलेख इ. पू. तिसऱ्या शतकांतले आहेत. वेसनगरचा लेख इ. पू. पहिल्या शतकांतील आहे. नाशिक येथील पुलुमायीचा लेख इ. स. पहिल्या शतकांतला आहे, व अठ्ठकथा इ. स. पांचव्या शतकांत झाल्या व परमार्थ विनिश्चय इ. स. अकराव्या शतकांत रचला गेला. अशोक लेखांची देशव्याप्ति पंजाबपासून बंगालपर्यंत आढळते. कान्हेरी, नाशिक, जुन्नर, नानाघाट, कार्लें वगैरे ठिकाणचे पालीलेख अस्सल महाराष्ट्रांतील आहेत. तसेंच वेसनगर व पुलुमायीचा लेख हे बौद्धांचे नसून, हिंदुधर्मीयांचे आहेत. हे सर्वच लेख सामान्य जनतेच्या माहितीकरिता कोरण्यांत आले असल्यामुळे, ते त्यावेळच्या सामान्यतः प्रचलित असलेल्या शिष्ट भाषेंतच लिहिलेले आहेत, असें मानणें सयुक्तिक होईल. भाषेला विशेष भरधोंसपणा व प्रौढत्व आणण्याकरिता पुलुमायीचे लेखांत समासप्राचुर्य आढळतें. तरी पण इतर सर्व लेख साधे व सोपे आहेत. या एकंदर परीक्षणावरून असा सिद्धान्त पदरीं पडतो की, हिंदुस्थानच्या उत्तरसीमेपासून तों द्राविडी भाषांच्या प्रान्तापर्यंत पालीभाषेचा प्रचार बौद्धधर्मांबरोबर फैलावला. बुद्धधर्माचे प्रचारक ज्या ज्या प्रांतांत गेले, त्या त्या प्रांतांत ते पालीभाषेंतच लिखाण करूं लागले. परंतु त्या त्या प्रांतांतील विशिष्ट बोलीहि पालीवर आपला ठसा उमटवूं लागल्या, आणि त्यामुळे पालीभाषा निरनिराळ्या प्रांतीं निरनिराळ्या रंगाने नटूं लागली व तिला मिश्ररूप येऊं लागलें. अशोकाचा बुद्धधर्मास पाठिंबा मिळाल्यावर त्याचा महाराष्ट्रांत प्रसार झाला. कार्लें, कान्हेरी, वगैरे ठिकाणचे चैत्य, विहार, लेणीं, हीं या बुद्धधर्म प्रसाराचीं जागतीं चिन्हें आहेत. या चलतीच्या काळांत बौद्ध प्रचारकांनी पालीभाषेचा उठाव महाराष्ट्रांत केला व तिचा महाराष्ट्रांतील भाषेशीं बेमालूम मिलाफ बनून, ती महाराष्ट्रांतील शिष्ट भाषा झाली असावी. तें कसेंहि असलें, तरी आजकालच्या मराठीच्या धमन्यांतून पालीभाषेचें रक्त बरेंच वाहत आहे, यांत शंका नाही. तेव्हा पालीभाषा शिष्टग्रंथ भाषा झाली, ही हिंदुस्थानांतील दुसरी भाषाविषयक उत्क्रांति होय.

५. अशोकाच्या एका शिलाशासनाचे गिरिनार, धौली, खालसी व कपुर्दिगिरि या ठिकाणचे पाठ वरील कलमांतील साहाव्या उताऱ्यांत दाखल केले आहेत. ते पाठ परस्परांशीं व संस्कृतछायेशीं ताडून पाहिले म्हणजे निरनिराळ्या प्रांतांत वर्णोच्चारभेदाने व व्याकरणप्रक्रियाभेदाने पालीभाषेचीं रूपान्तरें कशी होत असत, हें प्रत्ययास येईल. परंतु प्रांतोप्रांतीं लौकिक पालीचीं जरी अशीं रूपान्तरें घडून येत होतीं तरी ग्रंथपालीचें स्वरूप कायम ठशाचें बनलें, व तें स्वरूप धम्मपद व अठ्ठकथा या ग्रंथांत आढळतें याचा अर्थ असा की, पालींत

---

Dr. Sir R. G. Bhandarkar's Philological Lectures, pp. 67-70.

# सती जाण्याची मीमांसा

( लेखकः- चि. ग. वाकसकर )

१ पतीच्या शवाबरोबर स्वतःस जाळून घेणाऱ्या स्त्रीच्या मृत्यूचा उल्लेख 'सती गेली' असा करितात. इंग्रजीच्या राजवटींत सती जाण्याच्या बंदीचा कायदा सन १८२९ मध्ये झाला. तेव्हापासून पुढचा विचार तूर्त बाजूस ठेविला तरी ही सतीची चाल कधीपासून अस्तित्वांत आली, तिची व्याप्ति किती, कोणकोणत्या वर्णांपुरती होती वगैरे अनेक मुद्यांचा आपण विचार करूं.

२ सती जाणें हा मूळचा वैदिक धर्म होता किंवा नव्हता हें सांगणें कठिण आहे. मूळ वेदमंत्रांत किंचित् फेरफार करून तो मंत्र सती जाण्याच्या कृतीला अनुकूल केला गेला असा एका मंत्रासंबंधाने विरुद्ध पक्षाचा आक्षेप आहे. हा आक्षेप ग्राह्य धरिला तरी अशी फिरवाफिरवी करण्याच्या वेळीं तरी सती जाण्याची कल्पना होती हें मान्य करणें प्राप्त आहे. कदाचित् मूळची सती जाण्याची चाल प्रस्तुत मंत्र स्फुरण्याच्या वेळीं ज्ञानदृष्टी-पुढे आली असणेंहि संभवनीय आहे. हवापाण्याच्या शीतलतेमुळे पाश्चात्य देशांत आत्मरक्षणाकडेच अधिक लक्ष असणें नैसर्गिक आहे. परंतु पौरस्त्य देशांत हवापाणी अनुकूल असल्याने पारलौकिक कल्पनांकडेस लोकांच्या मनाची अधिक प्रवृत्ति असणें साहजिक आहे. महात्मा झोरोस्टर, येशू, महंमद, गौतमबुद्ध, महावीर, बसवा, कन्फ्युशस्, नानक इत्यादि जगत्प्रसिद्ध धर्मप्रणेते पौरस्त्य देशांतच जन्मलेले आहेत. यांतील अधिक संख्या तर हिंदुस्थानांतीलच आहे. यावरून असें वाटूं लागतें की, ही सतीची चाल सुद्धा पौरस्त्य देशांपैकी हिंदुस्थानांतच उत्पन्न झाली असावी. सती जाण्याचा प्रसंग असूनहि कौसल्या वगैरे साध्वी सती गेल्याचा उल्लेख रामायणांत नाही. यावरून तेव्हा ही चाल नसावी किंवा पूर्वी असली तर अगदी लुप्त तरी झाली असावी असें निश्चितपणें वाटतें. महाभारतांत मात्र पंडूच्या शवाबरोबर त्याची एक पत्नी माद्री सती गेल्याचा उल्लेख आहे. भारतीयुद्धांत लक्षावधी वीर कामास आले, पण एकहि स्त्री सती गेल्याचा उल्लेख स्त्रीपर्वांत नाही. पांडवांपैकी धर्मराजाबरोबर द्रौपदी सती गेली असावी असें स्वर्गारोहणपर्वावरून वाटतें. भीमार्जुनादि बाकीचे चार बंधु धर्माच्या अगोदर मृत्यु पावले असें त्यांत स्पष्टच आहे. सारांश, सती जाणें हा वैदिक धर्म दिसत नाही. पुनर्विवाहाची चाल मोडून टाकण्यासाठींहि कदाचित् ही सतीची चाल उत्पन्न झाली असावी.

३ क्वचित् स्त्री सती गेल्याचा उल्लेख पुराणग्रंथांतूनआहे. पाली व जैन वाङ्मयांत सतीचा उल्लेख नसणें हें अहिंसा धर्माच्या दृष्टीने योग्य आहे. हंपी येथे एका जैन मंदिरासमोर सतीचें भव्य व प्रेक्षणीय स्मारक आहे. पण त्याचा त्या जैन मंदिराशीं कांही संबंध दिसत नाही. अधिकाधिक विचार करतां ही चाल रजपुतांनी केव्हा तरी सुरू केली

असावी असें वाटूं लागतें. मुसलमान नेत्यांच्या अत्याचारामुळे प्रथम जोहार करण्याची चाल उत्पन्न होऊन नंतर सतीची चाल सुरू झाली असावी व त्यानंतर या चालीला धार्मिक स्वरूप देण्यांत आलें असावें. एकाचा वियोग सहन न झाल्यामुळे प्राण सोडणारे कांही पशुपक्षी असल्याचें समजतें. वारसाईचा हक्क नष्ट करून स्त्रियांचें जीवित शक्य तेवढें कष्टप्रद केलें असतांहि विधवा जीवंत राहूं लागल्याच हें पाहून सतीचा शास्त्रार्थ पुढे आला असावा. लोकोत्तर कर्तृत्वाच्या पतीचा वियोग स्त्रीस दुःसह होतो म्हणून लोकोत्तर कर्तृत्व प्राप्त करून घेण्याचा पुरुषाचा हेतु असावयास पाहिजे. किंबहुना, अशा अवघड पेचांतून पुरुषवर्गाची मुक्तता करण्यासाठीच ही सतीची चाल सुरू झाली असावी. कदाचित् कांही रानटी जातींतूनहि ही चाल आपल्या पूर्वजांनी घेतली असेल. कांहीहि असलें तरी ही चाल उच्च संस्कृतीची द्योतक नाही हें मात्र खरें आहे.

४ बंगाल, पंजाब, रजपुताना, गुजराथ, मध्यहिंदुस्थान, मद्रास, विजयानगर इत्यादि बहुतेक हिंदुस्थानभर इसवी सनाच्या अठरा व एकुणीसाव्या शतकांत सती जाण्याची किंवा पतिनिधनोत्तर पत्नीस बळी देण्याची चाल प्रचलित होती असें दिसतें. बंगाल्यांत तर पतिघातिनीसतीकुंड, सिंदुरी पहाड हीं सती जाण्याचीं ठिकाणें म्हणून आजला प्रसिद्ध आहेत. विशेषतः रजपूत राजाच्या मागे त्याच्या विवाहित पत्नी, रखेल्या, दासी व इतर कांही नोकरचाकर बळी देण्याचा प्रघातच दिसतो. शीखांनीहि ही चाल उचलली होती असें इतिहास सांगतो. हंपी रस्त्यावरील व नदीवरील मंदिरें, चितोडचें महासती मंदिर, मंडीचा सतीप्रस्थर हीं ठिकाणें आजहि मोठीं प्रेक्षणीय म्हणून प्रसिद्ध आहेत. सारांश, सतीच्या स्वतःच्या ऐपतीप्रमाणे चिरकालीन स्मरणाची व्यवस्था सतीचे वंशज करींत, असें दिसतें. गुजराथेंत अनेक स्त्रिया सती गेल्या असून त्यांच्या नांवाचें असें एखादें स्मारक नसावें हें शोचनीय आहे. अगदी अलीकडे अलीकडे म्हणजे सन १८४० च्या सुमारास बडोदें येथे कै. वा. भास्करराव विठ्ठल यांची जन्मदात्री माता व श्रीमंत अण्णासाहेब आंबेगांवकरांची पितामही अशा दोन साध्वी सती गेल्या हें प्रसिद्ध आहे. ईश्वरकृपेने दोनहि घराणीं आज चांगलीं संपन्न आहेत. त्यांनी या सतींचीं स्मारकें अवश्य करावींत. किंबहुना ज्या ज्या कुटुंबांत अशीं सतींचीं उदाहरणें असतील त्यांनी निदान इतरांच्या माहितीसाठी तरी शक्त्यनुसार त्यांचीं स्मारकें करावींत हें इष्ट आहे.

५ सतीची बंदी कायद्याने झाल्यापासून सती जाण्यास लागणाऱ्या लोकोत्तर सहनशीलतेचीहि ओळख जनता विसरून गेली आहे. आत्मवध करून घेण्यास विलक्षण धाडस व कायमची निराशा कारणीभूत असतात. शस्त्राने शिरःछेद करून घेणें, उंचावरून उडी टाकून जीव देणें, पाण्यांत बुडून प्राण देणें, विषप्राशन करणें इत्यादि प्रकारच्या आत्मवधांत व जीवंतपणीं स्वतःस जाळून घेण्यांत फार अंतर आहे. अग्नीच्या ज्वाळा शरीरास चाटीत असतांना इतर निर्जीव वस्तूंप्रमाणे जळून जाणें हें लोकोत्तर सहनशीलतेचें लक्षण होय. सती जाणाऱ्या स्त्रीचा शब्द कानीं पडूं नये अशी समजूत

आहे. कित्येक जातींत आजहि वाद्यें वाजवीत प्रेतयात्रा काढितात. त्यावरून प्रेतावरो-बर वाद्यें वाजविण्याचा हेतु उघड दिसतो. कदाचित् त्या त्या जातींत सतीची चाल असेलहि. मराठ्यांत वाद्यें वाजवीत प्रेतें नेतात, परंतु मराठ्यांत सती जाण्याचा प्रघात विशेष जोरांत असावा असें वाटत नाही. शाहूबरोबर मुद्दाम एक पत्नी सती घाल-विली असा आरोप नानासाहेब पेशव्यांवर आहे. पेशव्यांच्या घराण्यांत सतीचें उदा-हरण प्रसिद्ध नसल्यामुळे दूरदर्शी माधवराव पेशव्याने रमाबाईस सती जाण्याचा उप-देश केला असावा.

६ प्रत्यक्ष युद्धांत शत्रूला वार करण्याची ईर्षा तरी योध्याला असते व त्या ईर्षे-मुळेच त्याला समाधानहि असणें संभवनीय आहे. सतीला फक्त इहलोकाचा प्रत्यक्ष त्याग व पतीच्या जीवाचें परलोकीं सान्निध्य एवढेंच काल्पनिक ध्येय असतें. यामुळे सतीचें धैर्य योध्याच्या धैर्यशालित्वाहूनहि श्रेष्ठ ठरतें.

७ सहगमन व अनुगमन असे सती जाण्याचे दोन प्रकार आहेत.पति दूर ठिकाणीं मृत झाला तर त्याच्या पादुका किंवा अशीच एखादी वस्तु घेऊन त्याची पत्नी स्वतःस जाळून घेई याला अनुगमन असें म्हणत. अर्थात् असा प्रसंग विशेषेंकरून लढाई-प्रसंगीं हटकून येई.

८ रजपूत स्त्रिया जोहार करीत असत हें प्रसिद्धच आहे.परंतु जोहार करण्याचें मुख्य कारण भावी राजकीय आपत्ति हें तरी असें. सती जाण्याच्या वेळीं पतिनिधना-शिवाय स्त्रीला कोणतेंहि दुःख नसे. कांहीहि असलें तरी स्वतःस भस्म करून घेणाऱ्या स्त्रियांचें धैर्य लोकोत्तर ठरतें यांत संशय नाही.

९ कोणत्याहि काळीं सरसहा सर्वत्र सती जात नसत. त्यामुळे बहुतेक विधवांस बळजबरीने जाळून टाकीत असत. अर्थात् कायद्याने फक्त मुद्दाम जाळण्याचाच निषेध केला आहे. खुनास फाशीची शिक्षा असतांनाहि खून होतातच. परंतु सतीच्या काय-द्याचा भंग झाल्याचें मात्र आढळत नाही. यावरून स्पष्ट दिसतें की, हा कायदा व्हावा अशीच जनतेची इच्छा होती. असो.

१० ' सती जाण्याची चाल बंद करण्याबद्दल हेन्री रॉबर्टसन् यांचें पुण्याच्या शास्त्रीमंडळीस पत्र ' या मथळ्याखाली इतिहाससंग्रह, ऐतिहासिक टिपणें, भाग २ यांत पृष्ठ ३२ ते ३५ वर छापिलें तें पुढीलप्रमाणे आहे.

११ "इ.स.१८१८मध्ये पुणें येथे इंग्रजी अम्मल झाल्यानंतर पहिले कलेक्टर हेन्री डंडास रॉबर्टसन् साहेब हे झाले. हे फार थोर मनाचे होते. यांनी लोकांशीं फार गोडी-गुलाबीने वागून इंग्रजी राज्याबद्दल लोकांच्या मनांत आदरबुद्धि उत्पन्न केली. ह्या काळीं सती जाण्याचा प्रघात होता. व पुण्यास राधाबाई या नांवाची बाई ता. ११ सप्टेंबर १८१९ रोजीं सती गेली. तिचा भयंकर प्रकार पाहून ही चाल बंद करण्याबद्दल रॉबर्टसन् साहेब यांनी पुण्याच्या शास्त्रीमंडळाची एक सभा भरविली व त्यांना ही चाल

बंद करण्याबद्दल विनंति केली. ती पुढील पत्रांत नमूद आहे. हें पत्र बरेंच मनोरंजक आहे, सबब येथे दिलें आहे.

॥ श्री. ॥

वेदशास्त्रसंपन्न समस्त शास्त्री यांचे मजलसींत कॅप्टन हेन्री डंडास रॉबर्टसन् साहेब बहादुर मॅजिस्ट्रेट, सुभा पुणें, यांचें बोलणें की, जी सती भाद्रपद वद्य ८ शनिवारीं गेली, त्या सतीचे हाल झाले. ते हाल या मजलसींत जितके आहेत त्यांनी पाहिले असते तरी त्यांचे मनांत येतें कीं, असें पुन: कोणासहि होऊं नये. येविषयीं आम्हास मदत करते त्यास हल्ली आमचे दिलांत येतें की, सती जावयाचा दस्तूर फार खराब आणि तुमचें शास्त्रांत असें लिहिलें नाही की, सती मुकरर जावी, असेंहि नाही. गेल्यास कांही चिंता नाही, इतकेंच मात्र आहे. ऐसियास ही गोष्ट अशी पुन: होऊं नये. यास्तव, शास्त्रांत जी रीत लिहिली आहे, त्या रीतीनें जावें. हल्ली शास्त्राची उलट रीत करून जातात. त्यास आम्ही गैररीतीने जाऊं देणार नाही. याजकरिता येविषयीं आम्ही सरकारांत लिहून बंदोबस्त करूं. यांत तुम्हांस वाईट लागूं नये. तुमचे मनांत येईल की, सरकार मना करूं लागल्यास निरुपाय. त्यास येविशीं सरकार बंदोबस्त करूं लागल्यास, सरकारास कांही अवघड नाही, परंतु सरकार असें मनांत आणितें की, ज्या जातीचा तो धर्म आहे, तो मना करण्याचें कारण नाही. परंतु सती जाते तिचे असे हाल होतात, हें कांही चांगलें नाही. हल्ली या मजलसींत वृद्ध आहेत. त्यांच्याहि दिलांत असें असेल की, ऐसा दुर्लौकिक होतो, त्यापेक्षा बंद जाहल्यास बहुत चांगलें ऐसें आलें असेल. ऐसीयास या गोष्टीचा बंदोबस्त सरकारांतून जाहल्यास आम्हांस कांही वाईट लागणार नाही. ऐसी सल्ला तुम्हीं सगळ्यांनी दिल्यास तुमची आब्रु सारे हिंदुस्थानांत बहुत होईल, आणि ब्राह्मणधर्म वरकड सारे गोष्टींत दयाधर्म आहे, आणि सती जाण्याविषयींच मात्र बहूत सक्ति आहे, ऐसें इतर जातीचे लोक यांचे दिलांत येतें. आणि तुमचे शास्त्रांत असें लिहिलें नाही की, सती गेली नाही तरी तिची बेअब्रु आहे, व बेदस्तुर होतो असेंहि नाही, व हल्ली लोकांतहि सती गेली नाही तरी तिची आब्रु गेली असें कोणी बोलत नाही. असें असतां हल्ली बायको सती जाते याची सबब तीन प्रकारची आहे. एक त्या बायकोचा भ्रतार मृत्यु पावतो, त्या वेळेस त्या स्त्रीस अत्यंत दु:ख होऊन तिचा दिल बहुत कठिण होऊन ती जात्ये. व दुसरी सबब की, घरामध्ये स्त्रीचा भ्रतार नित्य म्हणत असतो की, माझी मातुश्री सती गेली, तिची बहुत आब्रु आणि लौकिक फार चांगला झाला, असें म्हणत असतो. तेणेंकरून त्या स्त्रीच्या मनांत येतें कीं, कदाचित् मी अशीच गेलें तर माझाहि असाच लौकिक व आब्रु फार होईल. असें चित्तांत येऊन ती सती जाते. तिसरी सबब की, आपला पती मृत्यु पावला, आता आपणास कांही आधार नाही. सती जावें तरी धैर्य नाही. परंतु चिंता नाही. मांडव अथवा कोषा करून वरती लांकडें बहुत घालतात. तो मांडव तोडल्यानंतर जीव कांही राहावयाचा नाही, व कदाचित् मन फिरल्यास बाहेर

निघूं शकत नाही. मग कांही तरी होवो. ऐशा तीन सबबेने बायका आपला दिल सक्त करून जातात. तेसीवाय सती जाते वेळेस तिजला मांडव करून त्याजवर फार लांकडें मोठीं मोठीं घालून तो मांडव तिचे अंगावर एकदां तोडून पाडावा, असें तुमचे कोणतेंहि शास्त्रांत निघणार नाही. शास्त्रांत इतकेंच की, तृणाची पर्णकुटिका करून त्यांत प्रवेश करावा असें असेल, आणि कदाचित् त्यांतून बाहेर निघाली असतां त्यास थोडें प्रायश्चित्त देऊन पुनः शुद्ध करून जातींत घ्यावी असेंहि शास्त्रांत आहे. हल्ली राधाबाई सती गेली, तिने आपले पतीचे लोभाने त्याजबरोबर सती जावें म्हणून निश्चयेंकरून सती गेली. ते वेळेस आंत जाऊन आपले हाताने अग्नि लावून घेतला. तेव्हा अग्निज्वाळा अंगास लागूं लागल्या, ती आंच सोसवेना. सबब बाहेर निघाली. ते वेळेस तिने पुनः हिंमत बांधून पुनः त्या अग्नीजवळ आली, परंतु आंत जाण्याची हिंमत झाली नाही. असें समजून त्या बाईचे दीर जवळ होते त्यांनी तिला जबरदस्तीने पुनः आंत टाकिली. त्यास तुमचे शास्त्रांत असें कांही लिहिलें नाही की, सती बाहेर निघाली तरी पुनः जबरदस्तीने टाकावी. असें नसतां हें केलें, हें शास्त्राच्या उलट होतें. याजकरिता आमच्या दिलांत असें मुक़रर येतें की, हा दस्तूर बहुत खराब आहे. तेव्हा अशी गोष्ट पुनः होऊं नये; व आम्हांस मंजूरहि आहे की, अशी खराब चाल पुनः होऊं देऊं नये. यास्तव, पुनः आम्हीं असें होऊं देणार नाही. राधाबाईस तिचे दीराने अग्नींत लोटल्यावर पुनःहि निघाली, ते वेळेस तिचे हाल असे झाले कीं तिचे अंगाची कातडी जळून मांसाचे गोळे बाहेर निघून पायांतूनहि रक्त चाललें. हें तुमचे पाहिल्यांत आलें असतें तरी तुमचेहि दिलांत येतें की, ब्राह्मणाचा दयाधर्म आहे त्याच्या हा फार उलट प्रकार होतो. असें समजून तेच वेळेस तुम्हीं सर्वत्रांनी म्हटलें असतें की, हें झालें असें कदापि होऊं नये. आता हल्ली जे मजलसींत बसले आहेत त्यांनी तिचे हाल पाहून व ऐकून दिलांत आणीत असतील की, जर करिता आपली बायको, तिची माया आपणावर जरी बहुत आहे, तथापि मुलालेंकराची आई ती, असे हाल करून घेऊन सती जावयाची हिंमत तिला होईल, असें एक क्षणभर देखील कोणाचे दिलांत येणार नाही. राधाबाईस जळतेवेळेस तिजला हिंमत झाली, तशी हिंमत या पाठीमागे कोणासहि झाली नसेल; व पुढेहि कोणास होणार नाही. कारण की, अर्धी जळाली असतां पुन्हा अग्नीजवळ कांपत कांपत आली. यास हल्ली या मजलसींत कोण शक्य आहे की, इतकी हिंमत करूं शकेल ! सारांश हाच की, शास्त्रामध्ये सती मुक़रर जावी असें निघणार नाही. व सती जाऊन माघारी पुन्हा निघाली असतां तिजला जबरदस्तीने आंत टाकून द्यावी अगर तोडून टाकावी असें नाही. तुम्ही म्हणाल की, शास्त्र नाही परंतु आचार बहुत दिवसीं आहे, की पुन्हा माघारी निघूं देऊं नये. त्यास हा आचार बहुत खराब आहे. कारण की, तुमचे शास्त्रांत दुसरे आचार किती सांगितले आहेत ! ते आचार हल्लीं सोडून देऊन मनस्वी अनाचार करितात. त्यांस कोणी पाहात नाही, व त्यांचा बंदोबस्त करावा या विषयींची फिकीर

कोणीहि करीत नाही. सतीविशीं शास्त्रार्थ असतां त्याप्रमाणे वहिवाट करीत नाही. दुसरें, सती गेल्याने स्वर्गप्राप्ति आहे असें शास्त्रांत लिहिलें आहे असें तुम्ही म्हणाल, तरी निश्चयेंकरून जी जाते आणि इमान शाबूत राखते ती स्वर्गास जाते. परंतु अशी कोणी नाही की, अग्नीचा स्पर्श अंगास जाहलियावर तेंच इमान शाबूत राहतें असें नाही. तेव्हा अग्निस्पर्शसमयीं बुद्धीस भ्रंश होऊन नंतर इहलोकहि नाही व परलोकहि नाही, असें होतें. ऐशियास कोणतेहि माणसाचे दिलांत नाही की, आपले खुशीने अग्नींत ठरून जळून घ्यावें. असें कदापि कोणते काळीं घडणार नाही. कोणतेहि दयावंत माणसास जळण्याचें दुःख खुद्दास अनुभव आल्याशिवाय विचार करूं शकत नाही. ऐसियास तुमचे दिलांत या गोष्टीचा विचार काय आला असेल? आम्हांवर मेहेरबानी करून, तुम्ही सर्वांनी मिळून असा बंदोबस्त करावा की, अशी गोष्ट पुनः आमचे दृष्टीस पडूं नये. त्या बायकोस पुनः ज्यानें टाकिली, त्यास दया आहे असें कोणी बोलणार नाही, व शास्त्रांतहि टाकावी असें नाही. त्यास ज्या शकसाने हें केलें, त्यास मुकरर सजा व्हावी, व आम्हास मंजूर आहे की त्यास सजा द्यावी. शास्त्रकर्ते मोठे मोठे होऊन गेले, त्यास बहुत दया होती. त्यांनी सर्व गोष्टीचा विचार करून त्यांत असा बंदोबस्त केला असेल की, सतीच्या मनांत बाहेर निघावयाचें जाहल्यास तिला बाहेर निघण्याविषयीं फुरसत असावी. कारण की, जिचें इमान शाबूत राहत नाही, तिने बाहेर निघावें हें चांगलें असें जाणून तृणाच्या पर्णकुटिकेचा कायदा त्यांनी केला. परंतु तुम्हीं आतां शास्त्राची आज्ञा उलट करून, आपले मगरुरीने दया सोडून देऊन, त्या सतीस मारतां. त्यास तुमचे शास्त्रांत असेंहि आहे की, सती एक वेळ बाहेर निघाली असतां, तिला जो वांचवील त्यास बहुत पुण्य आहे. हे शास्त्रार्थ तुम्हांस माहित आहे काय? आम्हांस ठाऊक नाही व आम्हांस मंजूर नाही की, आम्हीं तुम्हांस समजावें. परंतु आम्हांस मुनासब आहे की, हा खराब दस्तुर मना केल्याने तुमचे शास्त्राचे उलट होत नाही. तेव्हा आम्हीं ही गोष्ट होऊं देणार नाही. पण तुम्हीं दयावंत आहां, आणि साऱ्यांचे दिलांतहि आहे की, हा दस्तुर बहुत खराब आहे; हा मोडावा. परंतु तुम्हांस या गोष्टीची शरम आहे. याजकरितां तुम्हीं आमची अर्जी ऐकून घेऊन हा दस्तुर खराब आहे, हा मोडल्यास आम्हांस वाईट लागणार नाही, अशी खातरी करावी. म्हणजे येविषयींचे बंदोबस्ताविषयीं सरकारांत लिहून पाठवूं. अशी खातरी तुम्हीं केल्यास तुमची अब्रु, दया व धर्माविषयीं फार होईल. परंतु सती कोणतेहि तऱ्हेने न जावी याविषयींची खातरी करणें ही तुमचे मर्जीची गोष्ट आहे. आतां इतकें तुम्हीं समजावें की, आजपासून जी सती जाणार, तिनें शास्त्राचा जो कायदा तृणाची पर्णकुटिका करून जावें असें आहे, त्याप्रमाणे जावें. तें न होतां शास्त्राच्या उलट होऊं लागल्यास आम्हीं होऊं देणार नाही. कदाचित् शास्त्रमार्गाप्रमाणे एखादी सती गेली आणि पुन्हा अग्नींतून बाहेर निघाली, तर तिला जो कोणी जबरदस्ती करून आंत टाकील किंवा तोडून टाकील त्या शकसास आम्हीं

खुनी असा जाणून, त्याचें पारिपत्य मुनासब आहे त्याप्रमाणे केलें जाईल. "

१२ वरील पत्रांत बहुतेक महत्त्वाचे मुद्दे येऊन गेले आहेत. सतीच्या बंदीचा कायदा झाला त्याला कारण मुख्यतः राजा राममोहनराय होत, हें आपण विसरतां नये. या कायद्याला शंभर वर्षे होऊन गेलीं असल्याने या चालीचा ऊहापोह आपण आज केला तर तो शांतपणाने विवेचिला जाईल असें वाटतें.

१३ दादोजी कोंडदेवाचा प्राण जातांच त्यांच्या पत्नीनेहि इहलोकाचा त्याग केला हें प्रसिद्धच आहे. पण अशीं उदाहरणें क्वचित घडतात, म्हणून सतीची चाल सुरू झाली असावी. ही चाल केव्हा सुरू झाली हें निश्चितपणें सांगणें कठिण आहे. सीथियन लोकांपासून ही चाल हिंदूंनी घेतली असावी असा व्हिन्सेन्ट् स्मिथचा तर्क आहे. तो म्हणतो " The scanty evidence as to Tascilan institutions taken as a whole suggests that the civilization of the people was compounded of various elements-Babylonian, Italian, Scythian and Vedic. Suttee probably was a Scythian rite introduced from Central Asia" परंतु हिरोडोटसचा इतिहास सूक्ष्म-पणें पाहिला म्हणजे सीथियन आणि थ्रीशियन यांपैकी एकाहि जातींत अशी सतीची चाल नव्हती हें स्पष्ट दिसतें. राजेलोक मरण पावल्यावर त्यांच्या प्रेमपात्रास सुद्धा बळी देत असत. परंतु त्यावरून तीं प्रेमपात्रें सती जात असत असें म्हणतां येत नाही. अलेक्झांडरच्या सैनिकांना पंजाबांत सतीचे देखावे दिसले असें म्हणतात. परंतु मृता-बरोबर मृताच्या पत्नीचा बळी देणें व पत्नी सती जाणें याला निरनिराळे शब्द इंग्रजी भाषेंत नसल्याने हा गोंधळ झालेला आहे. हा गोंधळ नसून तीं सतीचींच द्योतकें आहेत असें मानिलें तर ग्रीक पुराणांतूनहि अशींच उदाहरणें दाखवितां येतील. लॉर्ड कशाला टेनिसन् कवीने " Death of Demon या काव्यांत असेंच एक उदाहरण दिलेंहि आहे. असो. फिजी, तांगानिका, चीन, अफ्रिका व अमेरिका येथेहि हिंदुस्थानां-तील सतीच्या चालीप्रमाणेच चाल होती; असें कित्येक लेखक समजतात, परंतु तेंहि खरें नाही. प्रेमातिशयामुळे या ठिकाणच्या कांही स्त्रिया देहत्याग करीत होत्या एवढेंच खरें आहे. ज्या विधीला आपण सती जाणें असें म्हणतों तो कोठेहि व केव्हाहि अस्तित्वांत नव्हता असें आजच्या प्रसिद्ध इतिहासावरून दिसतें. सतीच्या चालीबद्दल अकबराचे उद्गार पुढील आशयाचे आहेत.

"It is a strong commentary on the magnanimity of men that they should seek their deliverance through the self-sacrifice of their wives." ( Aini Akbari ).

१४ सारांश, ही सतीची चाल वाईट आहे असें अकबरापासून मुसलमान राज्य-कर्त्यांच्या लक्षांत आलें होतें. आणि त्यांनी ती नाहीशी करण्याचे प्रयत्नहि चालविले होते असें पुढील उताऱ्यावरून दिसेल. तो उतारा मंडेल्स्लोच्या प्रवासवृत्तांतून घेतला आहे. हा जर्मन प्रवासी सन १६३८–३९ मध्ये पश्चिम हिंदुस्थानांत प्रवास करून गेला. पुढील उतारा पृष्ठ ४२–४४ पर्यंतच्या पानांवरील आहे.

"Mandelslo was soon joined by two of the English merchants of the factory at Cambay who offered to take him the next morning to a place near the city where an Indian widow was to burn her-self and become a Sati. The woman's husband was a Rajput who had been killed near Lahor, upon news of which she declared her determination to put an end to her life. The Governor of Cambay had for a long time opposed her desire since it was the policy of the Mogul government and its officers to abolish by degrees this heathenish and barbarous custom. He pretended that as the news of her husband's death had not been confirmed, he could not give his consent to the action which she contemplated and for which there might be cause to repent afterwards. His object was to see whether the lapse of time would abate her passion to follow her husband into the other world. At last, finding that she was becoming more and more insistant in her resolve, he permitted her to comply with the practices of her religion. Mandelslo here correctly describes the imperial attitude towards this ancient custom. No Hindu widow could, since Akbar's time, immolate herself without the formal sanction of the governor. But the latter could only advise and delay his decision; if the woman remained firm he was bound to grant the permission.

The young woman, who had decided to sacrifice herself to show her love for her husband, was not more than twenty years of age. But she came up to the place prepared for the funeral pyre with so much self-control and cheerfulness so unusual in the person who is faced with inevitable death that Mandelso was much inclined to believe that she dulled her senses with a dose of opium. The description which he gives of the melancholy scene, and of the procession accompanying the woman, is similar to the accounts given by other old travellers who witnessed such sacrifices in India. Having looked upon the pyre with a certain amount of disdain, the young widow took leave of her kindred and friends and distributed among them her rings and bracelets and other ornments. 'I was' says the German traveller, 'something near her on horseback, with the two English merchants, and I think she percieved in my countenance that I pitied her, whence it came that she cast me one of her bracelets which I had the good hap to catch and still keep in remembrance of so extraordinary an action.

१५ वरील उताऱ्यावरून स्पष्ट दिसतें की, सतीच्या बंदीचा कायदा मोंगल पादशाहीपासून घडला जात होता. धार्मिक आचारविचारांत कायद्याने लोकमतानुरूप फेरफार करणें हेंच दूरदर्शी राज्यकर्त्यांचें धोरण असतें. त्याप्रमाणे हा कायदा सन १८२९ पर्यंत हळूहळू अस्तित्वांत येऊन नंतर त्याने आपलें रूप प्रकट केलें एव- ढेंच इतिहासावरून दिसतें.

# और्ध्वदेहिक



[ लेखक—**ना. गो. चापेकर** ]

प्रेताचें वाहन अमुकच प्रकारचें पाहिजे असा शास्त्राचा निर्बंध दिसत नाही. सध्या बांबूच्या काठ्यांच्या केलेल्या तिरडीवर धालून प्रेत नेण्याची वहिवाट आहे. प्रयोगकार शिबिका शब्द वापरतात. शिबिका म्हणजे पालखी. परंतु आडवें प्रेत ठेवण्याइतकी लांब पालखी असे काय? नसल्यास बसलेल्या स्थितींत प्रेत नेण्याची वहिवाट पुरातन असण्याचा संभव आहे. वाहक चार असतात. तिरडीच्या आकाराला अनुसरून तितके असणें अवश्यहि आहे. तिरडीवर प्रेत उताणें ठेवतात. गुरवांत मात्र संन्याशाच्या प्रेताप्रमाणे तिरडीवर बसलेल्या स्थितींत प्रेत ठेवतात. संन्याशाला टोपलींत घालून नेतात म्हणून दोन वाहकांनी काम भागतें. प्रेतापुढे अग्नि नेण्याची वहिवाट सर्व जातींत आढळते ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. ज्या जातींत प्रेत जाळीत नाहीत तर पुरतात त्या जातींतसुद्धा विस्तवाचें मडकें प्रेतापुढे हातांत धरून क्रियाधिकारी चालत असतो. महार, चांभार, हपसाणी, बुरूड, ठाकूर, गुरव इतक्या जातींत प्रेत पुरण्याची चाल आहे. तथापि हे लोक पेटलेली गोवरी प्रेताबरोबर नेतातच. ह्यामध्ये शिष्ट जातींचें अनुकरण करण्याची इच्छा प्रतीत होते. ह्याच्या उलट प्रेतें जाळणाऱ्या जातींसंबंधाने प्रयोगकार दाहगर्तेचा उल्लेख करतात. सध्या मात्र खळगा कोणी खणीत नाही. परंतु मन्त्राने भूमीची प्रार्थना करतातच. पुरणारे लोकसुद्धा अग्नि नेतात ह्यावरून "ब्राह्मणी" धर्माची प्रथा सर्व समाजाकडून कशी उचलली जात होती तें दिसून येईल. प्रेतासमवेत जाणाऱ्या इसमांनी मुक्तकेश व उपवीत असें जावें असें शास्त्रकार सांगतात. परंतु ही चाल लुप्त झालेली दिसते आणि ह्याचें कारण शास्त्राविषयी अज्ञान हेंच होय.

दुसरी सर्वसामान्य चाल म्हणजे प्रेताबरोबर शिजविलेला भात घराहून घेऊन जाण्याची होय. ब्राह्मणेतर सर्व जातींत ही चाल आहे. हा भात प्रेताच्या ओठांवर ठेवून आलेलीं सर्व माणसें त्याच्यावर पाणी सोडतात. हें ब्राह्मणांच्या पिंडदानतिलांजलीसारखें आहे. मेलेला मनुष्य जिवंत असतो, त्यास खावें प्यावें लागतें अशा समजुतीने अन्न आणि उदक देण्याची चाल पडली. पिंडदान व तिलांजली हें ह्या चालीचें संस्कृत स्वरूप होय. ह्या भाताला धुंदेरा असें म्हणतात. ह्या शब्दावरून ब्राह्मणांचें अनुकरण करून ही चाल ब्राह्मणेतरांत पडली असावी असें म्हणतां येणार नाही. ह्याच भाताला पुढे उत्थापन पिंड म्हणून मानण्यांत आलें. ब्राह्मणांत प्रेताबरोबर भात नेण्याची वहिवाट ह्या गांवांत नाही. परंतु कोंकणांत म्हणजे रत्नागिरी जिल्ह्यांत कांही ठिकाणीं आपस्तंबांत प्रेत घरांतून बाहेर काढल्यावर श्राद्ध करतात. ह्या श्राद्धांतील पिंड ( पिठाचा गोळा ) तिरडीवर प्रेताजवळ अगर प्रेतावर ठेवतात.

गरुड पुराणांत मरणसमयीं सहा पिंड दहन करावे असें सांगितलें आहे: ( १ ) मृत्यु आला असेल त्या ठिकाणीं ( २ ) दारांत ( ३ ) चव्हाट्यावर ( ४ ) विसाव्याच्या जागीं ( ५ ) काष्ठांच्या राशीवर आणि ( ६ ) प्रेत ठेवल्यावर ( ? )—संचयने. अलीकडे हे उत्क्रांतिपिंड कोणी देत नाहीत. सातारा प्रांतांत कित्येक ठिकाणीं विश्रांतिश्राद्ध करण्याची वहिवाट आहे. रस्त्यावर प्रेत ठेवून पिंड व तिलांजली देतात. प्रेत उचलण्याच्यापूर्वी दगडाच्या राशींत प्रेतास दिलेला पिंड झाकून ठेवतात.

दुसरी ध्यानांत ठेवण्यासारखी चाल म्हणजे अग्निहोत्र्याशिवाय बाकी सर्वांचें प्रेत चितेवर उपडें ठेवून जाळणें ही होय. ही चाल सध्या लुप्त झाली आहे. अग्निहोत्राची उपकरणें अग्निहोत्र्याबरोबर

जाळावयाचीं असतात म्हणून अग्निहोत्र्याला उताणा चितेवर ठेवावा असें शास्त्रकार सांगतात. कारण, दोन अरणी प्रेतावर ठेवावयाच्या असतात. आता अग्निहोत्र्याचा नियम सर्वांसच लागू केला आहे अनुपनीत द्विज व शूद्र ह्यांचें प्रेत तरी शास्त्राप्रमाणे उपडें म्हणजे अधोमुख ठेविलें पाहिजे, पण प्रचात मात्र तसा नाही. 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' ! सर्व वर्णांतल्या स्त्रियांस मात्र उताण्या दहन कराव्या असें शास्त्र-वचन आहे. ब्राह्मण स्त्रियांचें प्रेत मंत्राग्नीने दहन करतात. स्त्रियांना वेदाचा अधिकार नाही म्हणून कोणत्याहि स्त्रीचें और्ध्वदेहिक वस्तुतः वैदिक मंत्रांनी न होतां पुराणोक्त मंत्रांनी व्हावें. परतु ब्राह्मण स्त्रियांचे सर्व संस्कार वैदिक मंत्रांनीच होतात. तिला स्वतः कर्म करावयाचें असल्यास मात्र वेदमंत्र म्हणत नाहीत.

प्रेतदहनांत स्त्री व पुरुष ह्यांत आणखी एक भेद केला जातो. पुरुषाला प्रेताच्या मस्तकाकडून व स्त्रीच्या प्रेताला पायांकडून अग्नि द्यावा असें प्रयोगकार लिहितात (पुंसःशिरोदेशे स्त्रियाः पाददेशेऽग्निं प्रज्वाल्य ). परंतु ब्राह्मणेतर समाजांत सर्व स्त्री-पुरुषांच्या प्रेताला पायांकडून अग्नि लावण्याची वहिवाट आहे. ब्राह्मणांमध्ये स्त्रियांच्या संबंधाने वरील नियम अद्यापिहि पाळला जातो. शूद्रकमलाकर " शिरः स्थानेऽग्निं दद्यात् " म्हणजे मस्तक आधीं पेटवावें असेंच सांगतो. असें असून पायांकडून प्रज्वलन करण्याची रूढि सर्वत्र असलेली आढळते हा चमत्कार आहे. कदाचित् हीच ह्यांची मूळची चाल असावी. " पद्भ्याम् शूद्रोऽजायत " हा तर्क ह्या चालीवरून तर केला नसेल ! अग्नि देतांना ब्राह्मणेतरांत प्रेताकडे पाठ करतात हा एक विशेष आहे. ह्यालाहि शास्त्राचा आधार नाही. घटस्फोट करण्याची रूढि सर्व जातींत आहे. ज्या जातींत प्रेतें पुरतात त्या जातींतहि मडकें फोडून आंतील पाणी खळग्यामोंवतीं शिंपडण्याची वहिवाट आहे. घट फोडणें हें मनुष्याचा प्राण गेल्याचें दर्शक आहे. चितेमोंवतीं पाणी शिंपण्याचा हेतु विस्तव विझवून टाकण्याचा असला पाहिजे. गुजराथेंत चितेचा अग्नि पाण्याने विझवून नंतरच सर्व मंडळी स्मशानांतून परतते. प्रेत पुरणाऱ्या जाती हा जलसिंचनाचा विधि केवळ अनुकरणबुद्धीनेच करीत असल्या पाहिजेत. गुजराथेंत कित्येक ठिकाणीं प्रेताबरोबर कुऱ्हाड घेऊन जाण्याची वहिवाट आहे. ही कुऱ्हाड तिरडीवर प्रेताच्या मस्तकाशीं ठेवतात. प्रेत विसर्जन झाल्यावर ती घरीं परत घेऊन येतात. कुऱ्हाड घेण्याचा उद्देश असा सांगतात की, प्रेत स्मशानांत जिवंत झालेंच तर त्यास कुऱ्हाडीने मारतां यावें. जिवंत झालेलें प्रेत पिशाच समजतात. ह्या बाजूला ही चाल नाही.

अश्म्याला निष्कारण मान्यता देण्यांत आली आहे. अश्म्यांत जीव वास करतो ही समजूत त्यास कारणीभूत झाली आहे. अश्म्याचा उपयोग घट फोडणें व तिलांजलि देणें ह्याकरताच केला जातो. हा दगड संस्कार करून घेत नाहीत. घटस्फोटाची क्रियाहि वैदिक नाही. घटस्फोटाचे वैदिक मंत्र नाहीत. ज्या दगडाने घटस्फोट करतात त्याचा आणि तिलांजलीचा कांही संबंध नाही. उदक सोडण्याकरता आधार लागतो. स्मशानांत पाषाणाशिवाय दुसरें काय मिळणार ? म्हणून " ततःपाषाणपृष्ठे तु सर्वैर्देयं तिलोदकम् " दगडावर तिलांजलि सोडावी असें प्रयोगकार म्हणतात. जमिनीवर किंवा दर्भावरहि उदक सोडूं नये असें शास्त्र आहे. एतद्विषयक हारीताचें वचन शूद्रकमलाकरांत उद्धृत केलें आहे तें असें:—
" पात्राद्वा जलमादाय स्वयं पात्रांतरे क्षिपेत् । जलपूर्णेऽथवा गर्ते न स्थले न तु बर्हिषि "

प्रेत जमिनीवर ठेवूं नये म्हणून त्याला दगडाचा आधार घेत असावे. इसोना हा जो शब्द कातकरी ह्या दगडाला लावतात तो अश्मन् ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा. ह्या दगडांत जीव आहे ही कल्पना कातकऱ्यांची व इतर हिंदूंची सारखीच दिसते. ह्यामध्ये कोणी कोणाची उसनवार केली आहे हें ठरविण्यास पाहिजे तितका पुरावा अद्यापि उपलब्ध होत नाही.

म्हणून ज्या दगडाने घट फोडला तोच दगड घेऊन त्याच्यावर तिलांजलि द्यावी असें जें ब्रह्म-कर्माच्या पोथ्यांतून लिहिलेलें आहे तें अज्ञानजन्य दिसतें. क्रियेला पहिल्या दिवसापासून अखेरपर्यंत एकच पदार्थ असावेत अशा समजुतीने एकच अश्मा उपयोगांत आणण्याची चाल पडण्याचा संभव आहे. प्रेतयात्रेहून मंडळी परत घरीं आली म्हणजे घरांत शिरतांना दारांत दगड ठेवून त्याच्यावर पाय देऊन जावयाचें असतें. येथे सुद्धा अश्म्याचा उपयोग आधारासारखाच केला जातो. ही चाल सध्या नष्ट झालेली दिसते. तात्पर्य, कार्यानुसार निरनिराळा अश्मा घेण्यांत कांहीच आक्षेपार्ह आहे असें नाही.

आधार घेतल्याशिवाय नुसत्या जमिनीवर बसूं नये अथवा उभें राहूं नये असा निर्बंध असल्याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. लग्नांत मुलीला सहाणेवर उभी करतात. सहाण हा दगडाचाच तुकडा होय. आसनावांचून कोणीहि हिंदु जमिनीवर बसत नाहीं. तसेंच विवाहहोमाच्या प्रसंगीं वधूचें अश्मारोहण असतेंच. पाट्यावर वधूला उभी करून ह्या अश्म्यावर चढ आणि अश्म्याप्रमाणे तूं स्थिर हो (अश्मेव त्वं स्थिरा भव) अशा अर्थाचा मन्त्र ब्राह्मण म्हणत असतात. ह्यावरून अश्म्यावर आरूढ होणें हें स्थिरत्वाचें अथवा निश्चलत्वाचें निदर्शक असावें असें वाटतें. मरणानंतर १० दिवस प्रेतपिंड देतात त्या प्रसंगीं पाषाणावर विष्णुपूजन करण्याची चाल आहे (पाषाणाग्रे विष्णुं संपूज्य). ह्यांत पाषाण आधारभूत दिसतो. पाषाणावर देवतापूजन करण्याची वहिवाट अरुंधतीव्रतांतहि आढळते. ह्यांत सहाणेवर तांदूळ पसरून त्यांवर देवता मांडतात व पूजतात.

कातकरी लोकांचा दहनविधि विचार करण्यासारखा आहे. ह्या लोकांत ब्राह्मणाचा प्रवेश नाहीं. असें असून त्यांच्या और्ध्वदेहिक चालीरीति आमच्या चालीरीतींचें स्पष्टीकरण करण्यास उपयोगी पडतील अशा आहेत. वेशीपर्यंत स्त्री-पुरुषाचें प्रेत बायकांनी आणण्याची वहिवाट इतरत्र आढळत नाहीं. ही चाल ह्यांच्यांत कशी उत्पन्न झाली हा मनन करण्यासारखा प्रश्न आहे. ह्याच्या जवळ जवळ येणारी चाल म्हणजे महार-चांभारांत पुरुषाच्या प्रेतालाहि बायका खोबरें, तेल वगैरे लावतात ही होय. कातकऱ्यांत बायकांनी प्रेत वेशीशीं आणल्यावर तें जमिनीवर ठेवीत नाहीत. तेथे एक दगड ठेवतात. ह्या लहान दगडाच्या तुकड्यावर प्रेत राहणें शक्य नाहीं. म्हणून ओणव्याने दगडावर प्रेत धरतात. तेथे बायकांच्या हातांतून पुरुष तें प्रेत घेतात. येथे जो दगडाचा उपयोग करतात तो आमच्या अश्म्याप्रमाणेच आहे हे सहज ध्यानांत येण्यासारखें आहे.

कातकऱ्यांत प्रेताला मस्तकाकडून व पायांकडून एकदम अग्नि लावण्यांत येतो. इतर हिंदूंत ही चाल द्विधा झाली आहे हें वर आपण पाहिलेंच आहे. पळसाच्या पानांनी वारा घालण्याची पद्धति तर अगदी अस्सल वैदिक दिसते. "वातासो वांतु......" हा मन्त्र म्हणून प्रेताला वारा घालण्याची चाल इतर जातींत आहेच (ब्रह्मपलवैर्धितो वायुः कार्यः). पाण्याचें मडकें खांद्यावर घेऊन चितेभोंवतीं प्रदक्षिणा घालण्याची रीतहि कातकऱ्यांत आहे. ह्याशिवाय मडक्यांतलें पाणी सरणावर घालून अग्नि विझवण्याची वहिवाट मागे निर्दिष्ट केलेल्या गुजराथी लोकांच्या वहिवाटीशीं तंतोतंत जुळते. त्याचप्रमाणे गुजराथ प्रांतांतील प्रेताबरोबर कुऱ्हाड नेण्याच्या रूढीचा उल्लेख केला आहे. ही चाल कातकऱ्यांतहि थोड्याशा निराळ्या स्वरूपांत असलेली आढळते. स्मशानांतून परत आल्यावर मयताचा वारस वेशीवर इतरांच्या पुढे येऊन कुऱ्हाडीचें पात हातांत घेऊन उभा असतो. ह्या कुऱ्हाडीला हात लावून बाकीची सर्व मंडळी गांवांत प्रवेश करतात. मेलेला मनुष्य पिशाच रूपाने आला असतां त्याचा प्रतिकार करण्याचा हा उपाय दिसतो. कातकरी मूळचे गुजराथ प्रांतांत राहणारे असून तिकडून इकडे आले असावे असें ह्यावरून अनुमान करतां येण्यासारखें आहे.

प्रेताकडे पाठ करून चिता प्रज्वलित करण्याची पद्धति कातकऱ्यांप्रमाणे सर्व ब्राह्मणेतर समाजांत

आहे. वाणी, शिंपी इत्यादि पोटरपेक्षांत आहे इतकेंच नव्हे तर पांचाळांतहि ही चाल असल्याचें आढळलें. ब्राह्मणांत मात्र प्रेताकडे तोंड करूनच अग्नि देतात. पाठ करून अग्नि देण्यानें प्रेताची पाठवणूक तर सूचित केली जात नसेल ? बारशाच्या दिवशीं मुलाला पाळण्यांत घातल्यावर आई पाळण्याला पाठीनें झोका देते. येथें माझ्या पोटच्या मुलाला मी पाठहि देईन असें आई ध्वनित करते असें वाटतें. पाठ देणें म्हणजे आधार देणें. देशावर कित्येक ठिकाणीं ब्राह्मणांत आई प्रथम पोटानें व मग पाठीनें पाळण्याला झोका देते. ह्यावरून वरील तर्क खरा ठरण्याचा संभव आहे.

मरणोत्तर जी क्रिया करतात त्यांत प्रायश्चित्तें, तिलांजलि व पिंड, श्राद्धें आणि दानें इतक्यांचा अंतर्भाव होतो. मनुष्य मरतांच सहा प्रायश्चित्तांचें उदक सध्या सोडतात. ह्यांपैकी तीन प्रेताच्या शुद्धीकरता असून दुसरीं तीन क्रिया करणाराला अधिकारप्राप्ति व्हावी म्हणून असतात. खाणेंपिणें, स्पर्शास्पर्श, बाजेवर मरण इत्यादि दोषांच्या अपहारार्थ ( प्रेतस्य उच्छिष्टोच्छिष्टाधरोच्छिष्टोभयोच्छिष्टास्पृश्यस्पृष्टांतराळ-खट्वामरणादिजनितप्रत्यवायपरिहारार्थं ) असा संकल्प म्हणतात. दुसरा संल्कप "प्रेतस्य दाहाद्यधिकार-सिध्यर्थं पंचगव्यस्नानपूर्वकं कृच्छ्रत्रयप्रायश्चित्तमाचरिष्ये" अशा प्रकारचा असतो. दाह करण्यास कोणता अधिकार असावा लागतो तें सांगितलें नाहीं. प्रत्येक कर्माला आत्मशुद्धि पाहिजेच. उपनयन कर्मालाहि अधिकार प्राप्त करून घ्यावा लागतो. परंतु आत्मशुद्धि प्रायश्चित्तानें होते;आणि प्रायश्चित्तें दोष-परिहारार्थ असतात. दोष घडला आहे हें म्हणण्यापूर्वी कोणत्या गुणांची अवश्यकता होती हें सांगावें लागतें. "आत्मशुद्धिद्वारा पित्रादेरौर्ध्वदेहिकाधिकारसिद्धये" असाहि दुसरा संकल्प आहेच. "कार्षा-पणपरिमित द्रव्यदाना"नें ह्या प्रायश्चित्तांचा निर्वाह केला जातो.

हीं प्रायश्चित्तें सोडल्यावर क्षौर होतो. केसांत पाप किंवा मळ असतो म्हणून ते काढून टाकावयाचे असतात. "यानिकानि च पापानि ब्रह्महत्यासमानिच । केशानाश्रित्य तिष्ठंति तस्मात्केशान्वपाम्यहम्". ह्यावरून क्षौर करणें अपरिहार्य आहे असें दिसत नाहीं. तथापि वरील श्लोकांत सांगितलेल्या हेतूबद्दल निश्चित मत असल्याचें दिसत नाहीं. कारण, संकल्पांत 'पितुरन्त्यकर्माधिकारार्थं वपनं करिष्ये' असें म्हटलें आहे. ह्यावरून अन्त्य कर्माचा अधिकारच क्षौर केल्याशिवाय पोचत नाहीं असें होतें. संकल्पाचा व श्लोकाचा मेळ घालावयाचाच झाला तर केसांतील मळ काढून शुद्ध होऊन और्ध्वदेहिक कृत्याला लागावें इतकेंच फार तर म्हणतां येईल. असें मानलें तरी क्षौर अवश्यक कसा तें समजत नाहीं. एकंदरींत क्षौर कृताकृतच मानणें चांगलें. क्षौर न केला तरी त्यांत विशेष बिघडण्यासारखें नाहीं.

प्रेतदहनानंतर पहिल्या दिवसापासून १० दिवस तिलांजलि व पिंड देण्याची वहिवाट आहे. पहिल्या दिवसापासून क्रियेला सुरवात करावयाची असें निबंधकार सांगतात. पहिल्या दिवसाचा तिलांजलि "प्रेतदाहजनिततृषोपशमनार्थं" देतात. पुढे दहा दिवस हाच संकल्प म्हटला जातो. कित्येक वेळां तर भिक्षुक नुसते "तृषोपशमनार्थं" असें म्हणून तिलांजलि देववितात. तहानेकरतां पाणी म्हणून जलांजलि देत असले तरी पिंड मात्र क्षुधानिवारणार्थ म्हणून देत नाहीत. प्रत्येक पिंडानें शरीराचा कोणता ना कोणता तरी अवयव बनावा असा हेतु असतो. "शिरोवयवनिष्पत्यर्थं" पहिल्या दिवसाचा पिंड असतो. दुसऱ्या दिवसाच्या पिंडानें डोळे, कान व नाक हे अवयव तयार होतात. हात, हृदय, मान व तोंड तिसरे दिवशीं; पाठ, कुक्षि, कटि, नाभि, गुद, लिंग चौथे दिवशीं; मांड्या, गुडघे व पोटऱ्या पांचवे दिवशीं; घोटा, पादांगुलि व मर्मादि अवयव सहाव्या दिवशीं; अस्थि, मज्जा व शिरा सातव्या दिवशीं; नख, रोमादि अवयव आठव्या दिवशीं; मर्मवीर्यादि अवयव नवव्या दिवशीं; ह्या प्रमाणें शरीर तयार होतें. दहाव्या दिवसाचा पिंड "क्षुत्पिपासानिवृत्यर्थं" असतो. ही अवयवांची कल्पना गरुडपुराणावरून उचललेली दिसते. मातेच्या उदरांत ९ महिन्यांत गर्भाच्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या अवयवांचा अनुक्रम

भागवतांत ( स्कंध २ अ. २१ ) दिला आहे तो याहून निराळा आहे. हें दहा दिवसांचें कर्म प्रेतत्व जाऊन उत्तम लोकप्राप्ति व्हावी म्हणून करावयाचें असतें. प्रेतत्वांत शरीरावयवांचा नाश होतो असें मानण्यांत येतें. नऊ दिवसांच्या पिंडांनी प्राण्याचें शरीर पुनः बनून तो स्वर्गसुख भोगण्यास पात्र होतो अशी कल्पना दिसते. सूत्रांत या कर्मांचा उल्लेख नाहीं. यावरून ही वैदिक कल्पना नसून पौराणिक आहे असें उघड होतें. या कर्मांच्या कामीं वैदिक मंत्राचा उपयोग करीत नाहींत. ही पुराणोक्त क्रिया करतात. दशदिनक्रिया सुरू करण्याच्या पूर्वी स्मशानांत गेलेल्या सर्वांनी प्रेताला तिलांजलि द्यावयाची असते ती निराळीच. हे प्रेत, हें तिलोदक तुला पोचो असें म्हणून अश्म्यावर प्रत्येकजण उदक देतो. क्रिया करणारा मात्र "दाहजनित तृषोपशमनार्थ" वस्त्रोदक देतो. पाणी पिण्यास प्रेताचें तोंड अजून तयार व्हावयाचें आहे ! या उत्तरकार्यांत निरनिराळ्या कल्पनांची– त्या परस्परविरुद्ध असतांहि– खिचडी केलेली दिसते.

आता श्राद्धांचा विचार करूं. ( १ ) नव अथवा विषम श्राद्ध ( २ ) नग्नप्रच्छादन श्राद्ध ( ३ ) पाथेय श्राद्ध ( ४ ) अस्थिसंचयन श्राद्ध ( ५ ) रुद्रगण श्राद्ध ( ६ ) वसुगण श्राद्ध ( ७ ) पाथेय श्राद्ध ( ८ ) उदकुंभ श्राद्ध ( ९ ) एकोद्दिष्ट श्राद्ध ( १० ) सपिंडी ( ११ ) मासिकें अशीं श्राद्धें करतात किंवा केलीं पाहिजेत. नव-श्राद्धाला विषम श्राद्ध म्हणतात. कारण, तें विषम दिवशीं म्हणजे १।३।५। ७।९।११ या दिवशीं करावयाचें असतें. आपस्तंब शाखेचे लोक ११ व्या दिवशीं नवश्राद्ध करतात. हें समंत्रक करावें असें कित्येकांचें मत आहे. ऋग्वेदी शाखेचे लोक करीत नाहींत. या श्राद्धाला नवश्राद्ध का नांव पडलें समजत नाही. "प्रेतत्वविमोक्षार्थं नवश्राद्धं करिष्ये" असा संकल्प म्हणतात. "प्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या उत्तमलोकप्राप्त्यर्थं" असाहि दुसरा संकल्प शूद्रकमलाकरांत दिला आहे. प्रत्येक श्राद्धाच्या वेळीं हाच संकल्प म्हणावयाचा असतो. प्रेतत्व नाहींसें होण्यास ब्राह्मणांना अशा या सहा नव-श्राद्धांची अवश्यकता आहे असें मानावयाचें कीं काय ? एका श्राद्धानें प्रेतत्व जाणार नाही काय ? त्याच्याकरता शिवाय तिलांजलि व पिंडदान आहेतच. हें श्राद्ध ब्राह्मण सांगून करावें, परंतु सध्या चटावर म्हणजे कुशबटू बनवून करतात. नेहमीच्या श्राद्धाप्रमाणेच सर्व विधि करावयाचा असतो. फक्त गंध, पुष्प, धूप, दीप या श्राद्धांत वर्ज्य आहे. ब्राह्मणाला निमंत्रण देतांना म्हणावयाचा मंत्र वराह पुराणांत दिलेला शूद्रकमलाकरांत उद्धृत केला आहे तो असा:–"गतोऽसि दिव्यलोकं त्वं कृतांतविहितात्पथः । मनसा वायुभूतेन विप्रे त्वाहं नियोजये । पूजयिष्यामि भोगैस्त्वामेवं विप्रं निमंत्रयेत्" हे प्रेत तूं दिव्य लोकाला गेला आहेस. विप्राच्या ठिकाणीं मी आता तुझी स्थापना करतों. भोग देऊन मी तुझी पूजा करीन; असा वरील मंत्राचा अर्थ आहे. दिव्य लोकाप्रत गेलेल्या प्राण्याला उत्तम लोकाची प्राप्ति व्हावी म्हणून नवश्राद्ध करावयाचें ! दिव्य लोकाहून उत्तम लोक दुसरा कोणता आहे हें पुराणकार सांगत नाहींत. नवश्राद्धें अमंत्रक करतात. तसेंच, सपिंडीपर्यंतचीं सर्व प्रेतश्राद्धें लौकिकाग्नीवर करावीं हें आश्वलायनाचें मत ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

दुसरें नग्नप्रच्छादन श्राद्ध होय. हें पहिल्याच दिवशीं करावयाचें असतें. सर्वच प्रयोगकार हें श्राद्ध सांगत नाहीत. "प्रेतनिवृत्तिकामः प्रथमदिनविहितं नग्नप्रच्छादनश्राद्धं करिष्ये" असा कांहीसा असमंजसपणाचा संकल्प म्हणतात. प्राण्याला झाकण्याकरता वस्त्र मिळावें म्हणून हें श्राद्ध करण्यांत येतें असें नांवावरून वाटण्यासारखें आहे. परंतु "सोदकुंभं सघृतं सवस्त्रं यथाशक्तिकांस्यपात्र-सुवर्णरजतलोहतैलदक्षिणोपेतं सोपानत्कंसोदपात्रमुपतिष्ठताम्" असें म्हणून आमदान करतात. यावरून तेल, तूप, वस्त्र, सोनें, रुपें, पादत्राण वगैरे प्रवासास लागणारे सर्व पदार्थ मयताला दिले जातात हें उघड होतें. पाथेय श्राद्धांत पुनः याचाच पुनरुच्चार करतात. एकाच उद्देशानें दोन श्राद्धें का ठेविलीं समजत

नाही. नग्नप्रच्छादन श्राद्ध अमंत्रकच आहे. ह्या श्राद्धांत वस्तुतः वस्त्राचेंच प्राधान्य असावें, परंतु तसें दिसत नाही. कित्येक ठिकाणीं स्त्री मयत झाल्यास तिच्या नग्न प्रच्छादन श्राद्धाच्या समयीं पिंडास लुगडें देतात तें माहेराहून आलेलें असतें. उत्तर हिंदुस्थानांतील परदेशी लोकांत प्रत्येक स्त्री माहेरचा परकर बाळगते. मेल्यावर तोच परकर नेसवून तिचें प्रेत दहन करतात. ह्या दोनहि चाली एकाच कल्पनेंतून उत्पन्न झाल्या असल्या पाहिजेत. असो. ह्यानंतर अशी शंका येते की, प्रच्छादन करण्यास शरीरच अद्यापि तयार झालें नाही, मग वस्त्र देण्यांत हेतु काय?

ह्याशिवाय पाथेय श्राद्ध पहिल्या दिवशीं करावयास शास्त्रकार सांगतात, मनुष्यलोकांतून प्रेतलोकास जातां यावें म्हणून हें श्राद्ध करावयाचें असतें. मुख्य क्रियेचा उद्देश प्रेतत्वनिवृत्ति करणें हा असून ह्या श्राद्धाचा उद्देश प्रेतलोकाप्रत सुखानें जातां यावें असा आहे. पाथेय श्राद्ध केलें नाही तर प्रेतलोकाला जाणार नाही काय? मनुष्य मरणें आणि प्रेतलोकाला जाणें एकच. मनुष्य मेला की तो प्रेतलोकाला गेलाच. यमलोकासारखा प्रेतलोक काही निराळा आहे काय? प्रेतत्व आणि प्रेतलोक ह्यांत कांही भेद करतां येईल काय? शूद्रकमलाकरांत दिलेला संकल्प अगदीच त्याज्य वाटतो. "इह लोकं परित्यज्य गतोसि परमांगतिम्," आता परमगति प्राप्त झाल्यावर प्रेतलोक अथवा प्रेतत्व कोठें राहिलें? ह्यापेक्षा "प्रेतलोकगमनार्थं पाथेय श्राद्धं करिष्ये" हा संकल्प दगडाहून वीट बरी ह्या न्यायानें अधिक ग्राह्य म्हटला पाहिजे. हें श्राद्ध पुष्कळ ठिकाणीं केलें जात नाहीं. कांही प्रयोगकार ह्या श्राद्धाचा उल्लेख करीत नाहीत. प्रेतलोकाला जाण्याची खटपट करावयास नको. मनुष्य जन्मल्यावर मनुष्यलोकाला जाण्यासाठीं एखादें पाथेयश्राद्ध करावें लागतें काय? हेंहि श्राद्ध अमंत्रकच आहे. नग्नप्रच्छादन श्राद्ध व हें पाथेय श्राद्ध अनवश्यक आहे असें आम्हांस वाटतें.

सुतकांत पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या, सातव्या किंवा नवव्या दिवशीं अस्थिसंचयन करण्याविषयी शास्त्राची अनुज्ञा आहे. अस्थि गोळा करतात तेव्हा श्राद्ध करावें लागतें. ह्याला अस्थिसंचयन श्राद्ध म्हणतात. हें अमंत्रक आहे. तथापि अस्थिसंचयन समंत्रक असतें. स्त्रियांचे अस्थि स्त्रीकुंभांत व पुरुषांचे पुरुषकुंभांत ठेवावे असें प्रयोगाच्या पोथींत सांगितलें आहे. "स्तनरहितः कुंभः सस्तनी कुंभी" म्हणजे मातीचा घडा आणि कळशी अशी व्याख्या केली आहे. अस्थिसंचयन श्राद्ध हें प्रेतत्व घालविण्याकरिता करावयाचें असतें. त्याच्यापूर्वी प्रेताला भोजनार्थ मोठा भाताचा पिंड व पाणी पिण्याकरता जलानें भरलेला उदकुंभ देऊन नंतर स्मशानवासी रुद्र, अन्य प्रेतें व प्रेतसखे ह्यांस पिंड व तिलोदक देण्यांत येतें. ह्या प्रसंगीं प्रेताला छत्री, खडावा, पताका कां देतात तें समजत नाही. एकंदरींत हें श्राद्धहि न करणेंच चांगलें. अस्थिसंचयन मात्र समंत्रक असतें तें अवश्य करावें. श्राद्ध निरर्थकच दिसतें. तीर्थांत अस्थि टाकण्याच्या वेळींहि श्राद्ध करावें असें केशवपद्धतींत सांगितलें आहे. त्यास अस्थिनिक्षेपांग श्राद्ध म्हणतात.

ह्याशिवाय रुद्रगणश्राद्ध व वसुगणश्राद्ध अशीं दोन दुसरीं अमंत्रक एकोदिष्ट श्राद्धें करीत असतात. हीं अकराव्या अगर बाराव्या दिवशीं सपिंडीच्या पूर्वी करण्याची वहिवाट आहे. हीं श्राद्धें करण्याचा हेतु एकच; प्रेतत्वनिवृत्ति आणि उत्तमलोकप्राप्ति. अकरा रुद्र व आठ वसू ह्यांना उद्देशून हीं श्राद्धें करतात तेव्हा तीं सव्यानें करतात; परंतु रुद्ररूपी अथवा वसुरूपी प्रेताला उद्देशून केलीं तर अपसव्यानें करावीं लागतात. ध्रुव, अध्वर, सोम, आप, वानिल, अनल, प्रत्यूष, प्रभास हे आठ वसू होत. तथापि ह्यांचीच नांवें इतरत्र निराळीं आढळतात तीं धर, ध्रुव, प्राण, अर्क, अग्नि, दोष, वसु व विभावसु. वसु, रुद्र व आदित्य ह्या मृतांच्या देवता होत. परंतु आदित्यांच्या नांवानें श्राद्ध करण्यास कां सांगितलें नाही न कळे! अमंत्रक अशा सर्व श्राद्धांना फाटा दिला असतां कांही वावगें होणार नाही. ह्या दोनहि श्राद्धांत

पिंडदान, अर्घ्य वगैरे, अग्नौकरण नाही व श्राद्ध तर कृताकृतच सांगितलें आहे. असें असून इकडे हें श्राद्ध केलें जातें.

सपिंडी पूर्वीचें शेवटचें अमंत्रक श्राद्ध म्हणजे महैकोद्दिष्ट हें होय. हें प्रेताला उत्तम लोक मिळावा म्हणून ११ व्या दिवशीं करावयाचें असतें. उत्तम लोक प्राप्तीसाठी एका श्राद्धाने कां भागूं नये? एकाच फळाकरिता अनेक श्राद्धें सांगण्याचें कांहीच प्रयोजन नाही. हीं सर्व श्राद्धें केल्यावांचून प्रेतत्वनिवृत्ति व उत्तमलोकप्राप्ति हीं साध्य होत नाहींत असें कोणीहि शास्त्रकार म्हणत नाही. मग हा श्राद्धांचा अतिरेक निष्फळ नाही काय? हेंच विधान मासिकांच्या संबंधानेहि करतां येण्यासारखें आहे. कारण, हीं श्राद्धें प्रेतत्व घालविण्याकरताच आहेत. एक वर्षभर दर महिन्याला श्राद्ध करावयाचें असतें. ह्यावरून प्रेतत्व वर्षभर कांही केल्या जात नाही असेंच समजलें पाहिजे. प्रेतत्वनिवृत्ति सपिंडीकरणाने होते, "मेलनात्प्रेतशब्दस्तु निवर्तेत खगेश्वर" (ग. पुराण प्रे. खं. अ. २६) नुसत्या श्राद्धांनी होणार नाही, आणि सपिंडीने मृत पितृंत समाविष्ट होतो व त्याला पितृलोक प्राप्त होतो. "प्रेतत्वनिवृत्त्या पितृलोक प्राप्त्यर्थं" असा सपिंडीकरणश्राद्धाचा संकल्प म्हणतात. हा सर्व खटाटोप पितृलोकप्राप्तीसाठी करावयाचा असतो. 'उत्तम लोक' आणि 'पितृलोक' एकच असतील तर सपिंडीच्या पूर्वीचीं श्राद्धें निरर्थक होत असें म्हणावें लागतें. हे लोक निराळे असतील तर परस्पर विरुद्ध क्रिया आपल्या हातून घडतात ह्याचा विचार करणें अवश्य आहे. मासिकें १६ आहेत. दर महिन्याला एक अशीं बारा आणि शिवाय ऊन मासिक, ऊन षण्मासिक, ऊनाब्दिक आणि त्रैपाक्षिक अशीं चार मिळून एकूण १६ मासिकें होतात. १६ मासिकें झाल्याशिवाय सपिंडी करूं नये असें कांही ग्रंथकार सांगतात. परंतु ह्या मासिकांचा व सपिंडीचा अर्थाअर्थी संबंध दिसत नाही. हल्ली मासिक श्राद्धें वर्षभर कोणीच करीत नाहीत. अकराव्या दिवशीं मासिकें बोळवून १२ व्या दिवशीं सपिंडी उरकून घेतात. ह्याला अपकर्ष म्हणतात. म्हणजे पुढचें मागे ओढून घेणें. आपल्या कुळांतील मंगल कार्यांस प्रतिबंध होऊं नये म्हणून १२ व्या दिवशींच अपकर्षाने सपिंडी करण्याची चाल पडली आहे. "स्वगोत्रेऽप्यशुचिस्तावद्यावत्पिंडं न मेलयेत्" (ग. पु. प्रे. खं. २६). मासिकें एकोद्दिष्ट व अमंत्रक असतात हें सांगावयास नकोच. सपिंडीकरणश्राद्ध मात्र समंत्रक आहे. सपिंडी करणें म्हणजे मृताला पितरांत मिसळविणें होय. "प्रेतस्य पिंडं पित्रादिपिंडैः सह संयोजयिष्ये" असा उच्चार श्राद्धकर्ता करतो. विप्रानुज्ञा झाल्यावर कर्ता प्रेतपिंडाचे दर्भाने तीन भाग करतो आणि मंत्रपूर्वक तीन पिंडांत एका पिंडांत एक भाग ह्याप्रमाणे ते सामील करतो. ते तीन पिंड प्रेताचा पिता, आजा, पणजा ह्यांचे असतात. ह्याप्रमाणे मृत मनुष्य आपल्या वर्गांत समाविष्ट होतो. सपिंडी वर्षानंतरच करणें योग्य आहे. अपकर्षाने अगोदर करणें मूर्खपणाचें दिसतें. एक वर्षाची कालमर्यादा निरर्थक असेल तरच मात्र सपिंडीकरणाकरतां वर्षभर वाट पाहण्याची गरज नाही. परंतु वर्ष पुरें होण्यापूर्वी सपिंडी १२ व्या दिवशीं केली तरी मृताला पितृत्व प्राप्त होत नाही ही कल्पना अनेक ठिकाणीं व्यक्त केली आहे. म्हणून सपिंडी १२ व्या दिवशीं करण्याची पद्धति चुकीची आहे. प्रेतदेह वर्षभर असतो. (संवत्सरात्परं प्रेतदेहं परित्यज्य भोगदेहं प्रपद्यते. केशव). असें असूनहि ही चुकीची वहिवाट शास्त्रकारांनी हा कलियुगांतील आचार म्हणून मान्य केली आहे. "सपिंडीकरणस्य कलौ द्वादशाहे एव अनुष्ठानं." ह्याचें कारण देण्यांत आलें आहे तें 'अनन्त्यात्कुलधर्माणां पुंसां चैवायुषःक्षयात् अस्थितत्वा शरीरस्य द्वादशाहे प्रशस्यते." वहिवाटीचें शास्त्र कसें बनतें त्याचें हें एक आणखी उदाहरण!

ब्राह्मणादि सर्व जातींत अलीकडे ९ व्या दिवसापूर्वी कोणी क्रिया सुरू करीत नाहीत. तिसऱ्या दिवशीं बहुधा सर्व जातींत रक्षासंचयन केलें जातें. ज्यांच्यांत पुरण्याच्या रीतीमुळे राख भरण्याचें प्रयोजन नसतें त्यांच्यांत सुद्धा कांहीना कांही कृत्य तिसऱ्या दिवशीं असतेंच. उ. चांभारांत पुंजवणी म्हणजे

एक प्रकारचें श्राद्ध करण्याची वहिवाट आहे. बुरुड जातींत जातीला जेवण घालतात. सध्या ९ ते १३ हे क्रियेचे दिवस मुख्यतः होऊन बसले आहेत. ब्राह्मणेतरांत ९ व्या दिवशीं क्रिया करणारे चांभारच दिसतात. वाणी व गुजर ह्यांच्यांत १० व्या दिवसापासून आरंभ होतो तर आगरी व ठाकूर हे अकराव्या दिवसापूर्वी क्रियेला आरंभ करीत नाहीत. कातकरी एकच दिवस क्रिया करतात आणि ती बाराव्या दिवशीं करतात. ह्यांच्यांत लहान मुलांची क्रिया पांचव्या दिवशीं केली जाते हें विशेष आहे. एकंदरींत क्रियेचा मुख्य उद्देश प्रेतास अन्नोदक देणें हा दिसतो. कारण, सर्व जातींत पिंड व तिलांजलि देण्याची चाल दिसून येते. ह्याशिवाय प्रेताला जरूरीचे व आवडते पदार्थ देण्याची वहिवाट सर्वत्र आढळते. पायतण, छत्री वगैरे पदार्थांप्रमाणे दासहि देण्यांत येते. दासीदान हें प्रेताच्या उपभोगाचें साधन समजलें जातें. ह्यावरून मृत्यूनंतरहि आत्म्याला उपभोगक्षम असेंच शरीर असतें अशी सर्वत्र समजूत असल्याचें उघड दिसतें. मृत्यूबरोबर सर्व नाश होतो. आत्मा नाही, देह नाही असें कोणीहि मानीत नाही. सर्वनाशाची कल्पना स्वाभाविक दिसते, पण अनुभव विरुद्ध आहे.खाणें ,पिणें हें अवश्यक असल्यामुळे पिंड व तिलांजलि ह्यांस महत्त्व येणें साहजिक आहे. पहिली कल्पना म्हणजे सर्व वस्तूंचा उपभोग प्रेताला प्रत्यक्ष रीतीने करतां येतो म्हणून त्या प्रेतालाच अर्पण करण्यांत येतात. सती जाण्याच्या चालीचा उद्भव ह्याच कल्पनेंतून झाला असावा. ह्यानंतरची कल्पना म्हणजे येथेच उपभोग्य वस्तु दुसऱ्यास दिल्या असतां त्या प्रेताला पोंचतात उ. " श्राद्धे दत्तमन्नं द्विजशरीरे प्रविश्य पितरोभुञ्जते " ( ग. पु. ). ह्या कारणास्तव दानाचा प्रघात पडला. वर्षभर अन्नपाणी ब्राह्मणास देणें; जोडा, छत्री, काठी, पोथी, दासी वगैरेंचें दान करणें हा प्रकार ह्या दुसऱ्या कल्पनेचें कार्य होय. नवीन कल्पना निघाली तरी लुप्त कल्पनेने जन्म दिलेल्या चाली कायम राहिल्या. सती गेल्यानंतर दासीदान करण्याचें वस्तुतः प्रयोजन नाही. परंतु चालींच्या बुडाशीं असलेल्या कल्पना लोकांच्या स्मरणांतून जातात आणि ते पडलेल्या चाली मात्र चालू ठेवतात. सती जाण्याची रूढि अवैदिक आहे. वेदांत ह्या चालीचा उल्लेख आहे हें म्हणणें निराधार दिसतें. सहगमनाचें कृत्य अमंत्रकच असतें. जुने स्मृतिकार स्त्रीने सहगमन करण्याविषयीं सांगत नाहीत. दक्ष, पराशर व बृहद्विष्णु हेच स्त्रीला पतिमरणानंतर अग्न्यारोहण उचित आहे असें म्हणतात. 'पुराणोक्त अनेकफलप्राप्तये' पतिचितान्वारोहण मी करतें असा संकल्प स्त्रीने म्हणावयाचा असतो. ह्यांत श्रुतिस्मृतींत सांगितलेल्या फलप्राप्तीकरता मी सती जातें असा संकल्प नाही हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. हा संकल्प धर्मसिंधूंत दिला आहे. आमच्या समाजांत अवैदिक असंख्य चाली घुसल्या आहेत त्या चाळून बाहेर टाकणें अगत्याचें आहे. अथर्ववेदांत सतीच्या चालीचा उल्लेख असून ती फार पुरातन आहे असें वारंवार प्रतिपादन करण्यांत येतें. परंतु ही गोष्ट संशयातीत आहे असें म्हणतां येणार नाही. ज्या मंत्राचा निर्देश करण्यांत येतो तो असा— ' इयं नारी पतिलोकं वृणाना निपद्यत उप त्वा मर्त्य प्रेतम् । धर्मं पुराणमनुपालयन्ती तस्मै प्रजां द्रविणं चेह धेहि ॥ ( अ. १८।३।१ )

सायणाचार्यांनी ह्या मंत्राचा अर्थ सतीच्या चालीला अनुकूल असाच केला आहे. त्यांच्या वेळीं सती जाण्याचा प्रघात फार होता. तोच त्यांना ह्या मंत्रांत दिसला ह्यांत नवल नाही. परंतु त्यासाठी त्यांना शब्दांची ओढाताण करावी लागली आहे. सायणाचार्यांना मंत्राचा कांही तरी अर्थ लावणें भाग होतें. पण आपणांवर हें बंधन नाही. अर्थ नीट लागत नाही असें आपणांस म्हणतां येईल. प्रथमतः हें ध्यानांत ठेवलें पाहिजे की, हा मंत्र मर्त्याला उद्देशून रचला आहे मृताला उद्देशून रचला नाही.ह्या स्त्रीला ह्याच लोकीं प्रजा व द्रव्य दे अशी एका मर्त्याची (जिवंत मानवाची) मंत्रकर्ता प्रार्थना करतो. ह्याच मंत्रांत प्रेत शब्द निराळा वापरला आहे आणि तो ह्या मर्त्यालाच उद्देशून लिहिला आहे ह्यांत संशय नाही. मनुष्य जिवंत असल्यावाचून स्त्रीच्या ठिकाणीं प्रजा उत्पन्न कशी करणार ? सायणाचार्य म्हणतात, मेल्यानंतर पुनः जन्म घेऊन ह्या पृथ्वीतलावर तूं ह्याच स्त्रीला प्रजा व द्रव्य दे. ही ओढाताण करून हा अर्थ करावा लागतो. शिवाय

मर्त्य शब्दाचें स्वारस्य काय तें समजत नाहीच. ओढाताणच करावयाची तर दुसऱ्या रीतीनेहि करता येईल. ' हे मनुष्या ! पतिलोकाची इच्छा करणारी ( व ) प्राचीन धर्माप्रमाणे चालणारी तूं मेल्यावर (त्वा प्रेतम्) तुझ्या समीप येईल. ( म्हणून ) तूं हिला प्रजा व द्रव्य दे. ' निपद्यते ' हा भविष्यकाळ मान ण्यास हरकत नाही. वेदांतील मंत्र–विशेषतः अथर्व वेदांतील--निरनिराळ्या प्रसंगीं व एकेकच रचण्यांत आले असावे. पाठीमागून त्यांचें वर्गीकरण होऊन ते सूक्तांत ग्रथित केले असले पाहिजेत. शिवाय, अथर्व-वेदाला पूर्वी वेद मानीत नसत हें विसरतां कामा नये. आपणहि तसेंच केलें पाहिजे. अथर्ववेदांत वैदिक संस्कृति प्रतीत होणार नाही. असो. तात्पर्य इतकेंच की, सतीची वहिवाट अवैदिक आहे. शैव ग्रंथांत सती जाण्याचा तर निषेध केला आहे. उ. " भर्त्रासह कुलेशानि न दहेत्कुलकामिनीम् " " मोहाद्भर्तु-श्चितारोहाद्भवेन्नरकगामिनी " ( महानिर्वाण तंत्र उल्लास १०. )

ब्राह्मणेतरांत उत्तरक्रियेला ब्राह्मण क्वचित् लागतो. पुष्कळ जातींत उत्तरक्रिया कुंभारलोकांकडून केली जाते. आगरी, हुपसाणी, मोई, चांभार, परदेशी तेली ह्या जातींत कुंभारच क्रियेला प्रायः बोला-वतात. कुंभाराकडून क्रिया करून घेतली नाही तर मृतास मुक्ति मिळत नाही अशी ह्या लोकांची समजूत आहे. हिंदुस्थानांत पुष्कळ प्रांतांत ब्राह्मणेतर जातींत कुंभाराने उत्तरक्रिया करण्याची वहिवाट आहे. कित्येक ठिकाणीं लग्नहि ते लावतात. ह्यावरून कातकरीमहारांसारखा ह्यांचा स्वतंत्र समाज असण्याचा संभव आहे. मात्र हा वरिष्ठ दर्जाचा समाज असला पाहिजे. कुंभाराकडील पाणी पिण्याचा विशेष दोष मानीत नाहीत. पांडवांचें आख्यान क्रियेच्या वेळीं सांगत असतात. पांडव कुंभाराच्या घरीं राहिले होते ह्या व्यतिरिक्त अधिक संबंध कुंभारांचा व पांडवांचा दिसत नाही. ब्राह्मणांत गरूडपुराण वाचतात त्याप्रमाणे शूद्रांत कुंभार पांडवांचें आख्यान लावतात असें वाटतें. परंतु ह्या शिवाय शूद्रांकडे मृताचें उत्तरकार्य कुंभार करतात हें विशेष आहे. जे शूद्र ब्राह्मण बोलावीत नाहीत त्यांच्याकडे पिंडदानाचें कर्म कुंभारच करतो. कुंभाराला हा अधिकार कसा प्राप्त झाला हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. शूद्रांच्या लग्नांत न्हाव्याला महत्त्व असतें तर मरणोत्तर क्रियेंत कुंभारावांचून त्यांचें चालत नाही. शूद्रांच्या लग्नांतहि कुंभाराचें काम घाटावर असतें. तो कर्णीक तिंबतो, व ह्याच कारणास्तव त्यास बलुतें मिळत असतें. कांही ठिकाणीं कुंभारास राजा म्हणत असतात. ह्यावरून कुंभाराचा सामाजिक दर्जा मोठा आहे असें अनुमान करण्यास हरकत नाही. एका ब्राह्मणाला कुंभारकन्येपासून पुत्र झाला तोच शातवाहन अशी एक दंतकथा प्रचलित आहे. ह्या राजाने मातीचे हत्ती करून त्यांच्या सहाय्याने शत्रूचा पराभव केला अशी आणखी दुसरी दंतकथा आहे. कुंभाराचा राजघराण्याशीं संबंध लावणाऱ्या आख्यायिका त्यांच्या ह्या भिक्षुकीवृत्तीची उपपत्ति लावूं शकत नाहीत हें उघड आहे. अकराव्या दिवशीं कुंभार गणपतीच्या जन्माची कथा सांगतो तसेंच पांडवांचें आख्यान लावतो व दानांचें महत्त्व वर्णन करतो.

दानें केलीं असतां यमदूत पीडा देत नाहीत असें गरुड पुराणकार सांगतात. " यमदूताः महा रौद्राः करालाः कृष्णपिंगलाः । न पीडयंति दाक्षिण्याद्वस्त्राभरणदानतः ॥ " तसेंच " भोजनासनदानेन सुखं मार्गे भुनक्तिवै " दहा प्रकारचीं दानें देण्याची चाल आहे. ह्यांस दशदानें म्हणतात. ( १ ) गाय ( २ ) भूमि ( ३ ) तीळ ( ४ ) सुवर्ण ( ५ ) आज्य ( ६ ) वस्त्र ( ७ ) धान्य ( ८ ) गूळ ( ९ ) रौप्य ( १० ) मीठ हीं दश दानें होत. देवांना मीठ वर्ज्य आहे पण पितरांना तें प्रिय असल्याचें दश दानांत मिठाचा अंतर्भाव झाला आहे ह्यावरून दिसतें. हीं दानें मरतांना तशींच जन्माच्या वेळींहि द्यावयाचीं असतात व तीं अभ्युदयार्थ असतात. आतां आपण जन्माच्या वेळीं हीं दानें देण्याचें सोडलें आहे. सर्व दानांत वृषोत्सर्गाचें महत्त्व फार आहे. हा वैदिक विधि दिसतो. रुद्रस्वरूपी प्रेताच्या प्रेतत्वमुक्तीकरतां वृषोत्सर्ग करण्यांत येतो. ह्यावेळीं वैदिक मंत्रांनी हवन होतें. बैलाबरोबर कालवडहि सोडतात. वृषोत्सर्ग हें दान नव्हे. बैल सोडावयाचा असतो, कोणाला दान करावयाचा नसतो. हा वृष प्रेताला स्वर्गाला

नेवो अशी प्रार्थना करतात. परंतु त्याच्या बरोबरच सर्व गाईंना मी हा उत्तम पति दिला आहे अशा अर्थाचें वाक्यहि उच्चारतात. प्रयोगकार विसंगतीचा दोष मानीतच नाहीत असें दिसतें. वृषोत्सर्ग मेल्यावरच करावा असें नाहीं. जिवंतपणींहि करावयास प्रत्यवाय नसावा असें काम्य वृषोत्सर्ग म्हणून एक विधि सांगितला आहे त्यावरून अनुमान करतां येतें. पितरांच्या उद्धारार्थ वृषोत्सर्ग करतात. वेदीच्या समोर कालवडी व बैल यांचा विवाह करून पिंडदानयुक्त श्राद्ध केलें जातें. शिवाचें वाहन नंदी आहे. रुद्राप्रीत्यर्थ वृषोत्सर्ग करणें उचित होय. परंतु यमाचा आणि बैलांचा संबंध कसा येतो तें समजत नाहीं. यमाचें वाहन रेडा आहे. गाईबैलांपासून अविच्छिन्न संतति निर्माण व्हावी म्हणून गाईमध्ये बैलास सोडून द्यावयाचा असें संकल्पावरून दिसतें. पितरांची प्रार्थना आपण पुत्रांकरता करीत असतों. ह्यावरून गाईबैलांना संतति होते तशी आम्हां मानवांना होवो इतकेंच ह्या वृषोत्सर्गानें सूचित होत असावें. मनुष्यांप्रमाणें गाईबैलांचा विवाहविधि सांगितला आहे. " श्रीरुद्रस्वरूपिणे वृषाय वत्सतरीकन्यादानमहं करिष्ये " असा संकल्प सोडतात. विवाहानंतर बैलाच्या शेपटीवर तर्पण करतात. पिंडदानाचा संकल्प येणेंप्रमाणे ... "आत्मनश्चाकल्पं संतानाविच्छेदार्थं वृषस्य धर्मरूपस्य दक्षिणखुरे पिंडदानमहं करिष्ये" एका बैलाबरोबर चार गाई सोडावयाच्या असतात. " इमाः सरूपाः पत्न्यस्तु चतस्रस्तव गोपते । कल्पिताः क्रीडनार्थेच त्वया सार्धं व्रजंत्विमाः " एका पुरुषाला चार स्त्रिया करण्याची जी कल्पना तिचें मूळ ह्या प्राचीन आचारांत सापडण्याचा संभव आहे.

अकराव्या दिवशीं पिंडाला कावळा शिवला पाहिजे अशी सर्वांची समजूत आहे. ह्याचें कारण कावळ्याच्या वशीं येऊन पितर पिंडभक्षण करतात हा विश्वास होय. दिलेला पिंड कावळ्याशिवाय दुसरा कोण भक्षण करणार ? तेव्हां मृतमनुष्यच कावळा होतो ही कल्पना सुचणें स्वाभाविक आहे. कुंभाराच्या गाण्यांत ही कल्पना व्यक्तस्वरूप पावली आहे. "पितराच्या नांवीं लेका भाण भरावें. कागाच्या वंशीं येऊन आम्ही जेवून जाऊं." आमच्या मतें ही मूळची अनार्यांची कल्पना होय. ह्या पुढची सुधारलेली कल्पना म्हणजे कावळ्याला प्रत्यक्ष पितर न मानतां यमराजाचा दूत मानणें ही होय. काकबळी देतांना जो श्लोक म्हणतात त्यांत ही व्यक्त झाली आहे. कारण तेथें वायसाला यमदूत म्हटलें आहे.

तात्पर्य, वरील सर्व पौराणिक आचार हे अवैदिक असावे असें मानण्याकडे मनाचा कल होतो. सूक्तोक्त आचार वैदिक होत. सूत्रांत सपिंडीच सांगितली आहे. ह्या विधानाला प्रत्यंतर पुरावा कुंभाराच्या डाक क्रियेंत आढळतो. पांडवांच्या कथेंत पंडु मेल्यावर सपिंडी करूनहि त्यास गति मिळाली नाहीं. तो शिळा होऊन पडला. पुढें त्यांच्या पद्धतीनें जेव्हां क्रिया केली तेव्हांच पंडूचा स्वर्गांत प्रवेश झाला. " ब्रह्मा विष्णु काय बोले पांडव तुम्ही सुतकी; पंडु क्रिया केल्या नाहीं. धर्मदेव काय बोले दहाव्या दिवशीं सपिंडी केली, अकरावा प्रव्याग केला. पांडव आम्ही कैशी सुतकी " नंतर पुढे " गंगा आणली पंडुव्यागाला. तुळशी आणली, गायत्री आणली, शिंप्या कडचा कोरा शेरा आणला. कुलाल घरचा घट आणला. शेषकन्या आणली. कुळंब्या घरची कुंभमोत्या आणली. माळ्या घरची माळ आणली. मग शंभु त्यानें आणिला. गणपती, मारुती आणिला. गुरुजी त्यांनी आणिला. पांच पांडव आणिले. पंडुव्याग मांडिला. अकरावा प्रव्याग केला. पंडु गतीं तेव्हां गेला. " भारतांत जो वृत्तांत नाही तो ह्या कुंभाराच्या गाण्यांत सापडतो. ऐतिहासिक व सामाजिक दृष्ट्या हीं गाणीं फारच महत्त्वाचीं आहेत. अवैदिक लोकांचा स्वतंत्र धर्म होता. चातुर्वर्ण्यामुळे त्याचा अंशतः लोप झाला व अंशतः तो वैदिक समाजाच्या आचारांत समाविष्ट झाला.

कुंभाराच्या गाण्यांत तीन बोंबा मारण्याच्या चालीचा उल्लेख आहे. स्वर्ग, पृथ्वी व पाताळ ह्या तीनहि लोकांना मनुष्य मेल्याची वार्ता बोंब मारून कळवावी हा बोंबा मारण्यांत हेतु असतो असें दिसतें. पायाकडून अग्नि देणें, बिसाव्यावर खांदे--करी बदलणें, बरोबर धुंदेरा घेणें इत्यादि चालींचाहि निर्देश वरील गाण्यांत आढळेल. ह्यावरून ह्या सर्व चाली शूद्र समाजाच्या असाव्या असें वाटतें.



---

# मराठी भाषेंत 'ज्ञ'चें वर्णानुक्रमिक स्थान



( लेखकः— **गोविंद पांडुरंग पावशे**, सातारा. )

संस्कृत भाषेत आणि मराठी भाषेत वर्णमाला तत्त्वतः एकच आहे, पण व्यवहारतः त्यांच्यामध्ये भिन्नता आहे ती अशी की, संस्कृतात स्वर १३ आणि व्यंजनें ३३ मिळून ४६ वर्णे आहेत. आणि मराठींत स्वर १२ आणि व्यंजनें ३४ मिळून ४६ च वर्णे आहेत. संस्कृतात दीर्घ 'ॠ' अधिक आहे तर मराठींत 'ळ' व्यंजन अधिक आहे. याशिवाय मराठींत 'च, छ, ज, झ' यांचे उच्चार शुद्ध तालव्य व दन्त्य तालव्य असे दोन प्रकारचे आहेत. तथापि परिगणनेंत ते वर्णे अधिक धरलेले नाहीत.

**सूचनाः—** या लेखांत क्, ख्, ग् इ० व्यंजनें क, ख, ग इ० प्रकारें अकारान्त लिहिलीं असून त्यांना जो 'अ' स्वर जोडला आहे तो त्यांच्या स्पष्टोच्चारासाठीच जोडला असें समजावें. तथापि जेथे त्यांचें व्यंजनत्व विशेषतः स्पष्ट करावें लागलें तेथे मात्र त्यांच्याखालीं 'क्, ङ्, च्' अशीं पाय-मोड चिन्हें लिहिलीं आहेत.

ळ, हें व्यंजन संस्कृत वैदिक वाङ्मयांत ठिकठिकाणीं आढळतें, पण तें मूलभूत नसून मूळच्या 'ट, ड' किंवा 'ल' यांपैकी व्यंजनाच्या जागीं आदेश झालेलें असतें. म्हणूनच व्यंजनमालेंत त्याचा स्वातंत्र्याने समावेश केलेला नाही असें दिसतें. संस्कृत लौकिक भाषेंत 'ळ' व्यंजन मुळीच आढळत नाही. परंतु प्राकृत भाषांपैकी 'पैशाची' भाषेंत मात्र तें असून तें संस्कृतांतील 'ल'च्या जागीं आदेश झालेलें असतें असें स्पष्ट दिसत आहे. कारण त्याविषयीं '**लो ळः ॥ ४।३०८ ॥**' हें सूत्र हेमचंद्राने दिलें आहे. मराठींत 'ळ' युक्त शब्द पुष्कळ आहेत. त्यांतील 'ळ' प्रायः संस्कृतांतील 'ल'च्या जागीं आदेश झालेला असतो. तरी पण क्वचित् 'ट'च्या किंवा 'ड'च्या जागीं तो आदेश होतो. शिवाय, देशी शब्दांतहि तसें होणें शक्य आहे.

तें कसेंहि होवो, पण मराठींत त्याची गणना व्यंजनमालेंत पृथक्त्वाने करणें प्राप्त झालें व त्या-प्रमाणे लिपिकारांनी अथवा लेखकांनी व्यंजनमालेंत त्याचा समावेश केलाहि. पण त्यांनी त्याला 'आगन्तुक' समजून 'ह'च्याहि खालीं घातलें, यावरून त्यांनी त्याचा विचार केला नाही असें स्पष्ट होत आहे. तथापि त्याविषयीं ऊहापोह करणें येथे अप्रस्तुत असल्यामुळे मी तो करीत नाहीं, तरी पण येथे इतकेंच सांगून ठेवतों की, 'ळ' हा व्यंजनवर्ण 'स्पृष्ट' प्रयत्नवान् असल्यामुळे त्याला 'म'च्या खालीं (लगत) अर्थातच 'य'च्या वर स्थान द्यावें लागेल.

तें असो. पण संस्कृतांतील ३३ + १ (ळ) मिळून एकंदर ३४ व्यंजनांची मराठी व्यंजनमाला तयार झाली हें ठीकच झालें, पण त्यानंतर 'क्ष' आणि 'ज्ञ' हे जे दोन वर्ण त्यांनी त्या मालेंत गुंफले ते त्यांनी कोणत्या आधाराने अथवा कशा समजाने गुंफले याची यथातथ्य कल्पना करणें अवघड आहे. तथापि ते दोन्ही वर्ण संयुक्त नसून एकेरीच आहेत असाच त्यांचा समज झाला असावा, आणि त्याचें कारण असें संभवत आहे की, इतर कोणत्याहि व्यंजनांच्या संयोगांत त्यांची घटक व्यंजनें किंवा त्यांचीं प्रतीकें जशीं स्पष्ट दिसतात, तशीं 'क्ष-ज्ञ' यांच्या आकारांत त्यांचीं घटक व्यंजनें स्पष्ट दिसत नाहीत, किंबहुना कल्पनेंतहि येत नाहीत. शिवाय ती गोष्ट मराठीच्या व्याकरणशून्य काळांत घडली असल्यामुळे तिच्याविषयीं कोणालाहि शंका न येतां ती रूढ होऊन सर्वांच्या चित्तांत ठसून गेली असेल.

---

सदरील लेख पत्रिकेच्या प्रचलित शुद्धलेखनांत छापला आहे. —संपादक

परंतु अलीकडे मराठीचीं व्याकरणें तयार होऊन तीं प्रचलित झालीं आहेत व त्यांपैकी कोणत्याहि व्याकरणांत ' क्ष-ज्ञ ' हे असंयुक्त आहेत, अथवा ते संयुक्त असूनहि ते व्यंजनमालेंत जसे आहेत तसेच ठेवावेत असें कांहीच लिहिलें नसूनहि व्याकरणशून्य काळांत रूढ झालेली ती तात्यापंतोजीप्रणीत ३४ संख्यांकित व्यंजनमाला अद्यापि तशीच चालू राहवी; सर्व शिक्षकांनी ती विद्यार्थ्यांना परंपरेने पढवावी; त्या शिक्षकांवरील विद्वान अधिकारी लोकांना ती पटावी; या सर्व गोष्टी किती विलक्षण आहेत ! असो. तात्पर्य हेंच की, क्ष आणि ज्ञ हे दोन्ही दोन दोन व्यंजनांचे संयोग आहेत, म्हणून व्यंजनमालेंत त्यांना स्वातंत्र्याने गुंफिताच येत नाही. आणि म्हणून इतर कोणत्याहि व्यंजनांच्या ( असवर्ण किंवा सवर्ण ) संयोगाप्रमाणे ज्याच्या त्याच्या घटक व्यंजनांतील आद्य व्यंजनाच्या अनुक्रमणिकेंतच ज्या त्या संयोगाचा समावेश केला पाहिजे.

क्ष, ज्ञ हे जरी संयुक्त आहेत तरी त्यांना परंपरागत रूढीप्रमाणे व्यंजनमालेंत ठेवण्यास कांही प्रत्यवाय नाही, असें कांही ( थोड्या ) विद्वानांचें मत एका प्रसंगीं ( सभेंत ) व्यक्त झालें होतें. पण त्यांत तथ्य नाही असें त्याच प्रसंगीं उपस्थित असलेल्या बहुतेक विद्वानांचें मत पडलें. आणि क्ष, ज्ञ, यांना व्यंजनमालेंत गोवणें हें जरी अशास्त्रीय आहे तरी अभ्यासकांच्या सोईसाठी चालू रूढीच कायम ठेवणें इष्ट आहे, असें फक्त दोघां विद्वानांचें आग्रही मत व्यक्त झालें, पण त्यांतहि तथ्य नाही असें इतरांनी ठरविलें होतें.

आता यावर असा एक आक्षेप संभवनीय आहे की, ' ए, ऐ, ओ, औ ' हे चारी स्वर संयुक्त असूनहि जर त्यांना स्वरवर्णांच्या मालेंत पृथक्त्वाने गोवितात तर ' क्ष, ज्ञ ' या संयुक्त व्यंजन वर्णांनाहि व्यंजनमालेंत कां गोवूं नये ?

या प्रश्नाचें सविस्तर विवेचनपूर्वक उत्तर देण्यास येथे स्थलावकाश नाही. तथापि त्याचें थोडक्यांत उत्तर देतों तें असें की, ए, ऐ, ओ, औ हे स्वर संयुक्त नसून ते संधिस्वर आहेत हें मात्र खरें आहे. तरी पण ते ज्या स्वरांच्या संधीने झाले आहेत त्या पूर्व-पर स्वरांना ते ' एकादेश ' झाले आहेत. त्याविषयी ' एकः पूर्वपरयोः ॥ ६।१।८४ ॥ ( पाणिनि ) हें अधिकारसूत्र दिलें आहे. म्हणजे या सूत्राच्या अधिकारांतील गुण, वृद्धि, सवर्ण, दीर्घ इत्यादि सारे स्वरसंधि ' पूर्व-परां 'ना झालेले एकादेशच आहेत. अर्थातच 'ए, ऐ, ओ, औ' हे असंयुक्त व स्वतंत्र आहेत म्हणूनच त्यांना स्वरमालेंत गोविलें आहे. तसेंच स्वरमालेंत गोविलेले ' आ, ई, ऊ, ॠ ' हे स्वर, संधीने झालेले सवर्ण दीर्घ एकादेशच आहेत. हे आठ स्वर जर संयुक्त असते तर ते वर्जून ' अ, इ, उ, ऋ, ऌ ' ह्या ५ ह्रस्व स्वरांचीच स्वरमाला करणें प्राप्त झालें असतें. तात्पर्य हेंच की, ' क्ष, ज्ञ ' हे संधीभूत नसून संयोगीभूतच आहेत, म्हणून त्यांना व्यंजनमालेंत गोवताच येत नाही.

एथपर्यन्त केलेल्या विवेचनावरून क्ष आणि ज्ञ यांना त्यांच्या घटक व्यंजनांपैकी पहिल्या व्यंजनाच्या अनुक्रमणिकेंत यथायोग्य तेंच स्थान दिलें पाहिजे, हें तत्त्व सिद्ध झालें. व त्याप्रमाणें ' क्ष ' ला क-काराच्या अनुक्रमणिकेंत ( विल्हेवारींत ) ' क्श ' च्या नंतरचें स्थान दिलें पाहिजे. कारण त्याचे घटक वर्ण ' क्-ष् ' हे आहेत यांत वाद नाही. पण यांत दुसरी अवश्य विचारणीय गोष्ट आहे ती हीच की, त्याचा ' क्ष ' असा जो आकार प्रचलित आहे, त्याच्याऐवजी तो आकार ' क्ष ' असा प्रचलित केला म्हणजे कसल्याहि संशयाला कारणच राहणार नाही.

याप्रमाणे ' क्ष 'च्या वर्णानुक्रमिकस्थानाचा निर्णय झाला. पण ' ज्ञ 'च्या वर्णानुक्रमिकस्थानाच्या बाबतींत विद्वान लोकांमध्येच तीव्र मतभेद झाला आहे, तीं मतें अशीं:—

( १ ) ' ज्ञ 'चे घटक वर्ण ' ज्-ञ् ' हेच आहेत म्हणून त्याला ज-काराच्या अनुक्रमणिकेंतच घालणें योग्य आहे.

( २ ) 'ज्ञ'चा उच्चार जो श्रुत होतो त्यावरून त्याचे घटक वर्ण 'द्-न्-य्' हेच दिसून येत आहेत. म्हणून त्याला द-काराच्या अनुक्रमणिकेंतच घालणें योग्य आहे.

याप्रमाणे दोन प्रकारचीं मतें उत्पन्न झालीं आहेत. तेव्हा यांपैकी ग्राह्य कोणतें व अग्राह्य कोणतें याचा निर्णय करणें, हाच या लेखाचा मुख्य प्रतिपाद्य विषय आहे म्हणून आता त्याविषयी विवेचन करतों तें असें—

( १ ) उच्चारविषयक—

'**श्रुतानुमितयोः श्रुतसंबंधो बलवान्** ॥ ११३ ॥ ( **परिभाषेन्दुशेखर** ) अशी जी एक परिभाषा आहे ती प्रस्तुत विषयाशीं संबद्ध केली तर 'ज्ञ'चे घटक वर्ण 'द्-न्-य्' हेच समजावे लागतील. पण 'ज्ञ'चा 'द्न्य' हा एकच उच्चार होतो असें नसून स्थानपरत्वें त्याचे 'ग्य', 'ग्यँ' आणि 'ग्न्य' असे आणखी तीन उच्चार श्रुत होतात. ग्रामिक मराठींत तर 'द्यानू', 'देनू', 'द्यानबा' आणि 'ग्यानू', 'गेनू', 'ग्यानबा' असे उच्चार ऐकूं येतात. म्हणून उक्त परिभाषा प्रस्तुत विषयाशीं संबद्ध करणें व्यर्थ आहे.

कारण, वरील उच्चारांवरून पाहतां प्रस्तुत 'ज्ञ'चे घटक वर्ण 'द्-न्-य्', 'ग-य', 'ग्यँ' आणि 'ग्-न्-य' असे चार प्रकारचे मानावे लागतील. पण वस्तुतः ते कोणत्या तरी एकाच प्रकारचे असले पाहिजेत. किंबहुना ते या सर्वांहून निराळ्याच प्रकारचे असूं शकतील.

कारण, 'ज्ञ'च्या आकाराचें सूक्ष्मत्वाने अवलोकन केलें असतां त्यांत 'ज्-ञ्' यांची प्रतीकें दिसतात, पण 'द्-न्-य्' किंवा 'ग्-न्-य्' यांचीं प्रतीकें दिसत नाहीत. यावरून 'ज्ञ'चे घटक वर्ण 'ज्-ञ्' हेच असले पाहिजेत.

ङ, ञ, ण, न, म या पांच अनुनासिक वर्णांपैकी ज्यांच्या उच्चारांत नासिक्य ध्वनि ऐकूं येतो असे 'ङ, ञ' हे दोनच वर्ण आहेत. पण ज्यांना अनुस्वारादेश होतो असे संस्कृतांत 'न, म' हे दोनच वर्ण आहेत. ( मराठींतहि तेच आहेत. ) पण प्राकृतांत तसा वर्ण मुख्यत्वें 'म' हा एकच आहे. तथापि 'न, ङ' यांच्यापुढे व्यंजन असल्यास त्यांना विकल्पाने अनुस्वारादेश होतो असें 'वररुचीचें' मत आहे. ( **नङोर्हलि** ॥ ४।१४ ॥ ) आणि 'ङ, ञ, ण, न' यांच्यापुढे व्यंजन असल्यास त्यांना विकल्पें अनुस्वारादेश होतो असें हेमचंद्र म्हणतो ( **ङञणनोव्यंजने** ॥ १।२५ ॥ ). बरें, संस्कृतांत व मराठींतहि 'न, म' यांना त्यांपुढे व्यंजन असेल तेव्हाच अनुस्वारादेश होतो. ( याविषयीं एकच नियम नाही. )

तें असो. पण 'ञ्'च्या उच्चारांत जें विशिष्टत्व आहे तें हेंच की, त्यांतील नासिक्य (ँ) वर्ज केला असतां 'य्' मात्र शेष राहतो. म्हणजे, ँ + य् = ञ् असें त्याचें समीकरण होतें. दुसरें असें की 'ञ्' संयोगांत असला तरी तो त्या संयोगाच्या आरंभीं असत नाही. कारण तो तेथे उच्चारक्षम नसतो. 'ञ्' किंवा 'ङ्' हे कोणत्याहि शब्दाच्या आरंभीं नसतात, याचें कारण तेथे त्यांची उच्चारक्षमता, हेंच दिसत आहे.

कांही प्राकृतांत अयुक्त ( असंयुक्त ) 'ण' शब्दारंभीं असतो, पण तो संस्कृतांतील मूलभूत 'न' ला आदेशीभूत असतो ( **नो णः** ॥ २।३८ ॥ '**वर०**' ). पण मराठींत तो तसा नसतो. संस्कृतांत कांही धातू मात्र मूलभूत ण-कारादि ( णोपदेश ) आहेत. तरी पण प्रक्रियेच्या प्रसंगीं त्या 'ण'ला 'न' आदेश होतो ( **णो नः** ॥ ६।१।६५ ॥ धात्वादेर्नस्य णः स्यात् ॥).

ञ्, ण् हे असवर्णसंयोगांत असतांना त्या संयोगाच्या आरंभीं नसतातच. पण त्यांपैकी 'ञ्' हा तर अनारंभीं देखील क्वचितच असतो. त्याचें कारण, तशा संयोगाचा स्वाभाविक उच्चारच दुष्कर असतो, हेंच दिसत आहे. प्रस्तुत 'ज्ञ' हें एक त्याचेंच उदाहरण दिसत आहे. कारण त्याच्या उच्चार-

दौष्कर्यामुळेच त्याच्या ' ज्-ञ् ' या घटक वर्णांचे उच्चार अनेकदा विपरिणत झालेले दिसून येत आहेतच.

' ञ् 'चा उच्चार संयोगांतच अन्यथा होतो असें नसून तो असंयोगांतहि तसा होतो असें दिसत आहे. उदा०— विंचू, पंजा, वांझ इ० मराठी शब्दांतील अनुस्वाराला परसवर्णादेश केला तर तो नियमाप्रमाणे ' ञ् ' होऊन ते शब्द विञ्चू, पञ्जा, वाञ्झ असे लिहावे लागतील. पण त्यांतील ' ञ् ' चा उच्चार स्वाभाविकपणें ' न् ' होत असल्यामुळे तेच शब्द, निदान यथोच्चारवादी लेखक तरी विन्चू, पन्जा, वान्झ, असेच लिहितील. किंबहुना तशा लेखनामुळे भाषणांतहि ' न् 'चाच उच्चार दृढ होणें शक्य आहे. यावर अशी एक कल्पना उद्भूत होईल की, वरील मराठी शब्दांतील 'च, ज़, झ़' हे वर्ण दन्ततालव्य आहेत म्हणून तन्निमित्तक परसवर्णादेश 'न्' होणें स्वाभाविक आहे. अर्थातच अशा प्रसंगीं लेखनांत व भाषणांतहि ' न् 'चाच उपयोग करणें योग्य होईल. परंतु वरील कल्पना सयुक्तिक दिसत नाही. कारण, अनुस्वारापुढे च-कारादि शुद्ध तालव्य वर्ण असले तरी त्यामुळे त्याच्यामागील अनुस्वाराला तत्त्वतः होणारा जो परसवर्णादेश ' ञ् ' असतो त्याचें पर्यवसान उच्चारतः ' न् ' मध्ये होत असतें.

**सूचनाः**— येथून पुढे जे च-वर्गीय वर्ण कारणपरत्वें ( वरील ' च़, ज़, झ़ ' प्रमाणे ) अधो-बिंदुयुक्त लिहिलेले दिसतील ते ' दन्ततालव्य ' आहेत असें समजावें. उदा० पंचा — पञ्चा — पन्चा; गांजा — गाञ्जा — गान्जा; झंझा — झञ्झा — झन्झा ( झंझावात ) इ०

असा प्रकार संस्कृत शब्दांतहि होत असतोच. उदा० — पंचांग, गंजा, गुंजा इ० शब्द परसवर्ण आदेशयुक्त लिहिणें झाल्यास ते ञ्-कारयुक्त लिहावे लागतात व ते तसे लिहिले जातातहि. तथापि त्यांच्या उच्चारांचें पर्यवसान नकारांत होत असतेंच. त्याचें कारण, त्यांचें उच्चारदौष्कर्य हेंच असतें. दुसरें असें की, अशा प्रकारचे शब्द प्रायः अनुस्वारयुक्त लिहिण्याचा परिपाठच पडल्यामुळे त्या परस-वर्णाच्या उच्चाराकडे ( पञ्चांग इ० कडे ) दुर्लक्षच केलें जातें. किंबहुना कित्येकांना त्याची जाणीवहि असत नाही.

एथपर्यन्त केलेल्या उच्चारविषयक विवेचनाचें तात्पर्य हेंच की, ' ज्ञ 'चे घटकवर्ण वस्तुतः 'ज्-ञ्' हे दोन आहेत, पण त्यांच्या ' ज्ञ ' या संयोगाचा उच्चार स्वभावतः दुष्कर असल्यामुळे त्यांतील वर्णांचा विपरिणाम होऊन ' ज् 'चे ' द् ' आणि ' ग् ' असे दोन झाले, आणि ' ञ् 'चे तीन प्रकार झाले ते असेः—

( १ ) ' य '— याच्या घटनेंत ' ञ ' तील नासिक्य ( ँ ) अंशाचा लोप होऊन ' य ' मात्र शेष राहिला आहे.

( २ ) ' यँ '— याच्या घटनेंत ' ञ 'तील नासिक्य, अनुनासिक रूपानें ' य 'वर आरूढला आहे. ( हा उच्चार क्वचितच श्रुत होतो. )

( ३ ) ' न्य '— याच्या घटनेंत ' ञ 'तील नासिक्य आणि य-कार यांचा विकर्ष होऊन नासि-क्याचा ' न् ' + ' य ' = न्य झाला आहे.

याप्रमाणे ' ज्ञ 'चे घटकवर्ण ' ज्-ञ् ' हे असून त्यांच्या उच्चारांची अनेकधा झालेली विपरि-णति प्रतीत होत आहे.

**( २ ) ऐतिहासिकः—**

' ज्ञ ' या संयोगाचे घटकवर्ण आणि त्यांचे उच्चार यांच्यासंबंधाने जी विविधता दिसून येत आहे ती संस्कृत भाषेच्या उत्पत्तीपासूनच तशी आहे किंवा पुढे कधी उत्पन्न झाली याविषयी विचार

करणें जरूर आहे. पण तें काम माझ्या आवाक्यांत नसल्यामुळे मी तें इतिहाससंशोधकांवर हवालून त्यासंबंधाने साधारण तात्त्विक विवेचन करतों तें असें:—

आता उपर्युक्त प्रकारच्या विवेचनाचा उपक्रम करण्यापूर्वी अशी सूचना देऊन ठेवतों की, 'ज्ञ' या संयोगाचे घटकवर्ण व त्यांचे उच्चार हे मूलतः एकाच प्रकारचे असून पुढे कधी तरी त्यांत विविधता उत्पन्न झाली असें गृहीत धरून त्या काळापासूनच्या परिस्थितीसंबंधानेच हें विवेचन केलें जात आहे.

कोणतीहि भाषा जोंपर्यन्त केवळ मुखामुखीं बोलीच्या अवस्थेत असते तोंपर्यन्त, तिच्यामध्ये निरनिराळ्या प्रकारांनी उच्चारले जाणारे असे वर्ण किती आहेत व त्यांमध्ये ज्यांना स्वतःसिद्ध अक्षरत्व आहे व जे इतरांना असंयुक्त किंवा संयुक्त अक्षरत्व देतात असे वर्ण कोणकोणते व किती आहेत, त्यांच्याशीं संबद्ध होऊन अक्षरत्व पावणारे व त्या घटनेंत परस्परांशीं संक्रम होणारे असे इतर वर्ण कोण-कोणते व किती आहेत आणि त्या अक्षरांपैकी एकाच्या किंवा अनेकांच्या योगाने अर्थवान् शब्द कसे बनतात इत्यादि गोष्टींचें संशोधन करण्याची गरज लागत नाही. पण त्या मुखोद्गत बोलीला (भाषेला) जोंपर्यन्त स्थैर्य नसतें तोंपर्यन्त तिचा व्हावा तसा व तितका उपयोग होत नाही. तरी पण पुढे जेव्हा उपयोगाची गरज लागते तेव्हा त्या भाषेला स्थैर्य आणावें लागतें व तें आणण्यासाठी तिला मूर्तिमान् बनविणें प्राप्त होत असतें, आणि ती मूर्तिमत्ता म्हणजेच लिपि अथवा लेखनपद्धति होय.

याप्रमाणे जेव्हा लिपि निर्माण करण्याची गरज लागते तेव्हा वर सांगितल्याप्रमाणे त्या उच्चारित वर्णादिकांचें संशोधन करणें प्राप्त होत असतें. कारण त्याशिवाय त्या वर्णादिकांचे सांकेतिक आकार निःसंदिग्धतेने निश्चित करतां येणें शक्य नसते. लेखनामध्ये शक्य तितकी यथोच्चारता आणणें हेंच लिपिकारांचें मुख्य कर्तव्य असतें; व तशाप्रकारें लिपीची योजना केलेली असली म्हणजे तिच्या अभ्यासाने लेखन-वाचनाचें काम प्रायः व्यवस्थित होऊं लागतें.

परंतु लिपिकाराने त्या लेख्य वर्णांचे व असंयुक्त आणि संयुक्त अक्षरांचे सांकेतिक आकार कशाहि दक्षतेने व कौशल्याने निश्चित केले असले तरी, तदाधार पूर्वील भाषा ज्यांची जन्मभाषा असेल तशा अभ्यासकालाहि ज्या त्या वर्णादिकांचे आकार व उच्चार यांची बळकट ओळख अगोदर शिक्षकांपासून मुखपरिचयानेच करून घेणें अवश्यक असते. कारण आपल्या 'बालबोध' (देवनागरी) लिपींत देखील कांही संयुक्ताक्षरें लेखनांत यथानुक्रम नसतात. कांहींचे आकार विलक्षण असतात. 'र्' हें व्यंजन अक्षराच्या— माथ्यावर, तळाशीं, मागे आणि पुढे असें चार प्रकारांनी लिहिलें जातें. ह-कारयुक्त संयोगाचा उच्चार प्रायः संदिग्ध असल्यामुळे तो ह-कारपूर्व अथवा ह-कारोत्तर लिहिला जातो. अनेक संकेत एकाच चिन्हाने (शिरोबिंदूने) लिहिले जातात. याशिवाय कांही निराळे विलक्षण प्रकार आहेतच. तात्पर्य हें की, लेख्यवर्णादिकांचे उच्चार व त्यांचे सांकेतिक आकार यांच्या अभ्यासाच्या कामों विशेषतः परंपरागत मुखपरिचयाचाच उपयोग अगोदर होत असतो.

संस्कृत भाषा शेंकडों वर्षांपूर्वीपासून बोलण्याच्या प्रचारांत राहिलेली नसली तरी तिच्यांतील वैदिक व लौकिक वाङ्मयाच्या अध्ययनाध्यापनाची परंपरा अद्यापि अव्याहत चालू आहे. अर्थातच त्यांतील वर्णोच्चारांची अनुकरणपरंपराहि अव्याहत चालू आहे हें अगदी स्पष्ट आहे. म्हणून 'ज्ञ' या संयोगाच्या श्रुत होणाऱ्या पूर्वोक्त विविध उच्चारांपैकी 'द्न्य' (द्–न्–य) असा जो उच्चार आपल्या दक्षिण प्रांतांत सध्याहि ऐकूं येत आहे, तो त्या प्राचीन काळच्या आपल्या आद्य गुरूंपासून अनुकरण-परंपरेने चालत आला आहे, हें उघड होत आहे. तथापि तेवढ्यावरून त्यांनी 'ज्ञ'चे घटकवर्ण 'द्–न्–य' हेच मानिले होते असें मात्र समजतां येणार नाही.

कारण 'ज्ञ'चा उच्चार जसा 'द्न्य' हाच इकडे पूर्वपरंपरेने चालत आला आहे, तसाच जो

उत्तरप्रांतीं कोठें ‘ग्य’ कोठें ‘ग्यँ’ आणि कोठें ‘ग्न्य’ अशा रूपांनी चालू आहे, तो तरी त्यांच्या आद्य गुरूंपासून अनुकरणपरंपरेनेच चालत आला आहे हेंहि आहे.

या एकंदर विवेचनाचा निष्कर्ष हाच निघत आहे की, एकाच ‘ज्ञ’च्या उच्चारांत जी विविधता उत्पन्न झाली ती ज्या अर्थी प्रांतपरत्वें प्राचीन काळापासूनच झाली आहे त्या अर्थी त्या ‘ज्ञ’चे घटकवर्ण ‘ज्-ञ’ हेच असून त्यांच्या मूळ उच्चारांचा फरक होऊनच ती विविधता उत्पन्न झाली असली पाहिजे.

आता यावर असा आक्षेप येईल की, ‘ज्ञ’च्या ऐकूं येणाऱ्या कोणत्याहि उच्चारांत ज-कार व ञ-कार यांचे उच्चार जर किंचितहि प्रतीत होत नाहीत, तर ते ज-कार व ञ-कार ‘ज्ञ’चे घटकवर्ण आहेत असें कां मानावें ?

याचें उत्तर असें देतां येईल येईल की, कोणत्याहि वर्णांचा किंवा अक्षरांचा उच्चार, त्या वर्णांच्या किंवा अक्षरांच्या उच्चाराच्या कठीणपणामुळे किंवा उच्चारणसामर्थ्यानें योग्य जसाचा तसा होत नाही. तथापि प्रक्रियेच्या प्रसंगानें त्यांचें वास्तविक स्वरूप सहजगत्या कळून येतें. तेव्हां त्याप्रमाणे प्रस्तुत ‘ज्ञ’चें प्रक्रियेच्या दृष्टीने परीक्षण केलें तर त्याचे घटक वर्ण कळून येतील. म्हणून आता त्या दृष्टीने ‘ज्ञ’चे परीक्षण करून पाहूं.

‘उच्चारणसामर्थ्य’ म्हणून जें एक कारण वर दर्शविलें आहे, त्यांतील ‘सामर्थ्य’ या शब्दाचा अर्थ ‘व्यपेक्षा,’ म्हणजे वक्त्याची अनिच्छा, हाच येथे अपेक्षित आहे.

( ३ ) प्रक्रियाविषयकः—

संस्कृत भाषेंत कोणत्याहि धातूला अनद्यतनपरोक्ष भूतार्थी आख्यात ( लिट् संज्ञक ) विभक्ति लागतांना आणि तशा इतर कांही प्रसंगीं द्वित्व प्राप्त होत असतें. त्या द्वित्वांतील पहिल्या अवयवाला ‘अभ्यास’ म्हणतात. निरनिराळ्या प्रकारच्या धातूंना होणारे अभ्यास आणि त्यांची विधीयमान रूपें, यांच्या घटनाचे जे अनेक नियम आहेत त्यांत, ( १ ) एकस्वरात्मक आणि हलादि अशा धातूंच्या अभ्यासांत अनेक व्यंजनें असलीं तरी त्यांपैकी पहिलें मात्र शेष राहून इतर (एक किंवा अनेक ) लुप्त होतात, ( २ ) शेषव्यंजन वर्गांतील पहिलें किंवा तिसरें असल्यास तें कायम राहते, पण तें दुसरें असल्यास त्याच्या जागीं पहिलें होतें आणि तें चौथें असल्यास त्याच्या जागीं तिसरें होतें, आणि ( ३ ) अभ्यासाक्षराचा स्वर दीर्घ असल्यास तो ह्रस्व होतो; असे हे तीन सामान्य नियम आहेत.

या नियमांप्रमाणे ‘ज्ञा–अवबोधणें’ या धातूचा विधीयमान अभ्यास ‘ज’ असा होऊन त्याची (‘ज्ञा’ची ) उक्त भूतकाळीं प्र० पुरुषी ( आधुनिक तृ० पु० ) क्रियापदरूपें ‘जज्ञौ–जज्ञतुः जज्ञुः’ अशीं होतात. तसेंच त्याचें इच्छार्थक क्रियापद ‘जिज्ञासते’ असें होतें. आणि ‘जिज्ञासा’ असें नाम होतें. (यांत अभ्यासाच्या ‘अ’ला ‘इ’ आदेश अन्य नियमाने झाला आहे ). यावरून पाहतां ‘ज्ञा’ धातूंतील ‘ज्ञ्’ या संयोगाचे घटक वर्ण ‘ज्-ञ्’ हेच आहेत, हें अगदी स्पष्ट दिसून येत आहे. कारण ‘ज्ञ्’चे घटकवर्ण जर ‘द्-न्-य्’ असते तर ‘ज्ञा’चा अभ्यास ‘द’ होऊन त्याची ‘दज्ञौ’ इ० प्रकारचीं रूपें झालीं असतीं, पण तीं तशीं होत नाहीत.

आता यावरून असा प्रश्न उद्भवतो की, ‘ज्ञा’चे ग्या–ग्यँ–ग्न्या’ असे जे ग-कारादि उच्चार उत्तर प्रांतीं श्रुत होतात त्यांकडे अभ्यासप्रक्रियेच्या दृष्टीने पाहिलें तर ते उच्चार यथातथ्य दिसत आहेत’ कारण, ‘कुहोश्चुः ॥ ७।४।६२ ॥’ (पा० ) या नियमानें अभ्यासांत ‘ग’चा ‘ज’ होतो. उदा०– जगाम, जगाद–जगद, जिगमिषति इ० असें जर दिसत आहे तर हे श्रुत होणारे ग-कारादि उच्चार विपरिणामजन्य आहेत असें कां मानावें ?

याचें उत्तर असें आहे की, या विषयाचें परीक्षण करण्याची आणखी एक उत्तम सोय केली आहे. आदेशशास्त्र ही ती कसोटी आहे. म्हणून आता त्यावरून विचार करून पाहूं.

**(४) आदेशविषयकः—**

पाणिनीच्या व्याकरणांत '**स्थानेऽन्तरतमः : १।१।५०**' ॥ हा एक आदेशशास्त्राचा तात्त्विक सिद्धान्त असून 'कौमुदी'त, त्याचें विवरण — 'स्थानं च प्रसंगः' । 'प्रसंगे सति सदृशतमः आदेशः स्यात्' — असें केलें आहे. त्याचा भावार्थ असा की, कोणत्याहि स्थानीला विशिष्ट प्रसंगीं जो आदेश होतो, तो त्या स्थानीशीं अन्तरतम म्हणजे सदृशतम असतो.

पण तें आन्तर्य म्हणजे सादृश्य १ स्थानतः, २ प्रयत्नतः (आभ्यन्तर किंवा बाह्य), ३ कालतः आणि ४ अर्थतः अशा चार दृष्टींनी परीक्षावें लागतें. म्हणून त्याविषयी असा प्रश्न उपस्थित होतो की, विशिष्ट 'स्थानी' आणि त्याला होणारा आदेश यांमध्ये जर अनेक प्रकारचीं आन्तर्यें संभवतील तर त्यांपैकी कोणाला अधिक महत्त्व द्यावें?

या प्रश्नाचा निर्णय ज्या परिभाषेने केला आहे, ती परिभाषा **यत्रानेकविधमान्तर्यं तत्र स्थानत आन्तर्यं बलीयः ॥ १३ ॥ (परिभा० शेखर)** अशी आहे. हिचा तात्पर्यार्थ असा आहे की, स्थानी आणि आदेश यांच्यामध्ये कोणत्या तरी प्रकारचें सादृश्य असतेंच, पण जेथे अनेक प्रकारचीं आन्तर्यें संभवत असून त्यांत 'स्थानतः' आन्तर्य असेल तेथे स्थानतः आन्तर्यच बलिष्ठ असतें. म्हणून आदेशहि तदनुसार करावा लागतो अथवा झालेला असतो. असो.

आता वरील सिद्धान्त व तत्संबंधी परिभाषा यांच्या आधाराने अभ्यासनिमित्तक आदेश आणि इतर आदेश यांच्या तुलनात्मक परीक्षणावरून काय निष्पन्न होतें तें पाहूं.

'कुहोश्चुः' या नियमाने क-वर्गीयांना जे च-वर्गीय आदेश होतात ते अभ्यासांत मात्र होतात आणि त्यांत 'यथासंख्य'हि रहात नाही, कारण त्या क्रियेंत 'क, ख' या दोघांना 'च' आदेश होतो व 'ग, घ' या दोघांना 'ज' आदेश होतो. शिवाय त्यांच्यामध्ये जें सादृश्य आहे तें स्थानतः नसून प्रयत्नतः मात्र आहे. पण 'ज्ञा'ला होणारा जो 'ज' अभ्यास, तो आदेशीभूत नसून मूलभूतच आहे. या एकंदर कारणांमुळे 'ज्ञा'च्या श्रुत होणाऱ्या ग-कारादि उच्चारांना प्रामाण्य प्राप्त होत नाही.

आता 'ज्ञा' धातूला, अर्थातच 'ज्ञ' या संयोगाला होणाऱ्या आदेशासंबंधाने विचार करून पाहूं.

**'ज्ञाजनोर्जा ॥ ७।३।७९ ॥ (पाणिनिः)**

'अनयोर्जादेशः स्याच्छिति'। म्हणजे 'ज्ञा—अवबोधने' आणि 'जन् (ई) प्रादुर्भावे' या धातूंना अनुक्रमें 'श्ना', 'श्यन्' हीं सार्वधातुक (शित्) विकरणें लागतांना 'जा' हा आदेश होतो. उदा०— 'ज्ञा'—जानाति, जानीते. 'जन्'—जायते, जाते इ० यावरून 'ज्ञा'चे घटक वर्ण 'ज्—ञ्—आ' हेच आहेत, हें स्पष्ट दिसून येत आहे. कारण आर्धधातुक प्रत्ययांपूर्वी उक्त धातूचें 'ज्ञा' हें स्वरूप स्थिर असतें, पण सार्वधातुक प्रत्ययांपूर्वी तें विकृत होतें म्हणजे त्याच्यांतील 'ञ्'ला मात्र लोपादेश होऊन 'जा' हा अंशशेष राहतो. अर्थातच 'ज्ञा'च्या 'ज' या अभ्यासांत काय, किंवा 'जा' या आदेशांत काय, धातूचा आद्य 'ज्' निर्विकार स्थिर असून तो औपदेशिक (पाणिनिप्रणीत) आहे. म्हणून 'ज्ञ्'चे घटक 'ज्-ञ्' हेच सिद्ध होत आहेत.

'**चोः कुः ॥ ८।२।३० ॥**' (पा०) हा जो एक आदेश विधायक नियम आहे त्यावरून 'ज्'ला 'ग्' आदेश होणें शक्य आहे, पण प्रस्तुत 'ज्ञ'तील 'ज्'चा 'ग्' होण्याला हा नियम लागू होणें शक्य नाही. कारण या नियमाने ज्या च-वर्गीयाला क-वर्गीय आदेश होणार असेल तें च-वर्गीय व्यंजन पदान्तीं असावें लागतें, किंवा त्यापुढे 'झल्' (अंतस्थ व अनुनासिकाशिवाय) व्यंजन

असावे लागतें. पण प्रस्तुत 'ज्ञ'तील 'ज्' पदान्तीं नाही. आणि त्यापुढ असलेला 'ञ्' अनुनासिक म्हणून 'झल्' नाही.

आता प्रस्तुत 'ज्ञा' धातूला महाराष्ट्रींत (मुख्य प्राकृतांत) जे आदेश होतात त्यासंबंधाने विवेचन करतोः—

'ज्ञो जाण मुणौ' ॥ ७।१९।६५ ॥( वररुचिः ) ७।७ ॥ ( हेमचंद्रः )

याचा अर्थ असा आहे की, 'ज्ञा'-अवबोधने या धातूला ( कर्तरि, कर्मणि ) 'जाण' किंवा 'मुण' हे दोन आदेश होतात. उदा० —कर्तरि– जाणइ, मुणइ ( जानाति ); कर्मणि– जाणेइ, मुणेइ ( ज्ञायते ) अथवा जाणिअइ, जाणीअइ, जाणिज्जइ; मुणिअइ, मुणीअइ, मुणिज्जइ इ०

मराठींतहि 'जाण' याचें 'जाण' असें रूप होऊन त्यावरून ज़ाणतों, ज़ाणलें, ज़ाणितलें, ज़ाणील; ज़ाणिजते, ज़ाणिजलें, ज़ाणिजेल हीं क्रियापदें होतात. ज़ाणीव हें नाम होतें. तसेंच विशेषणें वगैरे इतर शब्दहि होतात.

नेणो, नेणतो, नेणीव, नेणता इ० शब्द अनुक्रमें न ज़ाणो, न ज़ाणतो, न ज़ाणीव, न ज़ाणता इ० शब्दांचे अपभ्रंश होतात, ते असे की, त्यांतील पहिल्या 'न'तील 'अ'चा, त्या पुढील 'ज़ा' सह 'ए' होऊन 'ने' असें तें अक्षर बनतें. म्हणजे त्यांतलें हें अक्षर 'नें'त विलीन होतें. उदाहरणार्थः—

'ओ बदरे देन ॥ १६ ॥'( वर० ) 'बदरशब्दे दकारेणसह आदेः अतः ओत्वं भवति। बोरं–बदरम्। येथे 'ब' या अक्षराचा 'अ' आणि त्यापुढील 'द' मिळून 'ओ' होऊन 'बोर' हा शब्द झाला असून तो मराठींतहि रूढ आहेच.

'ज्ञो ञः ॥ २।८३॥' ( हेम० ) 'ज्ञः संबंधिनः ञस्य लुग् वा भवति' ॥ म्हणजे शब्दाच्या अनारंभीं असलेल्या 'ज्ञ' या संयोगातील 'ञ्'चा विकल्पाने लोप होतो. उदा०-- (लोपपक्षे)- सव्वज्जो ( सर्वज्ञः ), अप्पज्जो ( आत्मज्ञः ), पज्जा ( प्रज्ञा ), अज्जा ( आज्ञा ) इ०. यावरून पाहतां 'ज्ञ'चे घटकवर्ण 'ज्–ञ्' आहेत, ही गोष्ट प्राकृत वैय्याकरणांनीहि सिद्ध केली आहे.

प्राकृत भाषेच्या स्वभावानुसार शब्दाच्या अनारंभीं असलेल्या प्रस्तुत 'ज्ञ्' या संयोगातील 'ञ्' या एका व्यंजनाचा लोप झाला, व शेष राहिलेल्या दुसऱ्या व्यंजनाला 'शेषादेशयोर्द्वित्वमनादौ' ॥ या नियमाने द्वित्व प्राप्त झालें, आणि तें द्वित्वापन्न व्यंजन 'ज्ज्' हें आहे, हें वरील उदाहरणांवरून दिसून येत आहे. अर्थातच 'ज्ञ्' चीं घटक व्यंजनें 'ज्–ञ् हींच आहेत.

या शिवाय 'पैशाची' इत्यादि प्राकृतांत प्रस्तुत विषयासंबंधी आदेशादिकाचे नियम आहेत पण ते उद्धृत करून त्यांच्या विवेचनाने लेखाचा विस्तार करणें बरें नाही असें वाटतें. तथापि 'ज्ञ'च्या घटक वर्णांचे श्रुत होणारे जे दकारादि व गकारादि उच्चार त्यांचा आदेशाच्या दृष्टीने जो विचार कर्तव्य आहे, तो आता करूं.

आता 'ज्ञ'चे घटकवर्ण 'ज्–ञ्' हेच आहेत ही गोष्ट सिद्ध झाली आहे. म्हणून 'ज्ञ'चे द-कारादि व ग-कारादि उच्चार मूलभूत नाहीत हेंहि सिद्ध झालें आहे. तेव्हा ते उच्चार 'ज्–ञ्' पासून आदेशाने झाले आहेत किंवा विपरिणामाने झाले आहेत हेंच पहावयाचें आहे.म्हणून आधी'ज्' संबंधाने विचार करूं.

'ज्ञ'पैकी 'ज्'ला 'ग्' आदेश होत नाही असा निर्णय पूर्वी याच प्रकरणांत 'चोः कुः' या सूत्राने केला आहे. आणि 'ज्'ला 'द्' आदेश, संयोगांत किंवा असंयोगांत कोठेहि होत नाही असें म्हणावें लागत आहे. कारण, त्याविषयी नियम कोठेहि दिसत नाही, आणि उदाहरणहि कोठे आढळत नाही. असो. आता 'ञ्'ला होणाऱ्या आदेशांचा विचार करूं.

संयोगांत अनादिस्थानीं ('ज्ञ' मध्ये) असलेल्या 'ञ्'ला लोपादेश मात्र होतो असें पूर्वी 'ज्ञोञः' या सूत्राने सिद्ध केलें आहे. अर्थातच त्या 'ञ्'पैकी कोणताहि ('य' इत्यादि) अंश लोप

राहत नाही, अथवा त्याला ' य ', ' यँ ' किंवा ' न्य ' हे आदेशहि होत नाहीत. वरं, तो ( ञ् ) परस-वर्णावस्थेत असतांना ' न् 'च्या रूपाने श्रुत होतो व दिसतो, तो वस्तुत: ' ञ् 'च असून उच्चारण-सामर्थ्याने ' न् ' उच्चारला जातो म्हणून तो तसाच श्रुत होतो व कोणाकोणाकडून लिहिला जातो, इतकेंच.

आता ' ज्ञ ' संयोगालाच होणाऱ्या आदेशांचा विचार करूं.

**' ज्ञो ञ्ञः पैशाच्याम् ॥ ४।३०३ ॥ ' ( हेम० )**

पैशाच्यां भाषायां ज्ञस्य स्थाने ञ्ञो भवति । उदा०— पञ्ञा ( प्रज्ञा ), सञ्ञा ( संज्ञा ), ञ्ञानं ( ज्ञानम् ) इ० येथे ' ज्ञ 'ला ' ञ्ञ ' हा द्वित्वापन्न असाच आदेश सांगितला. याचें कारण, हेंच संभवत आहे की, ज्ञान या शब्दाचें ' ज्ञ ' हें आद्याक्षरच असल्यामुळे, तेथें ' ञ् ' असा एकेरी आदेश सांगितला असता तर त्याला द्वित्व लाभलें नसतें व त्यामुळे ' ञ्ञान ' हा अपेक्षित शब्द सिद्ध झाला नसता. परन्तु कोणत्याहि प्राकृत भाषेचा स्वभाव आणि विशिष्ट शब्दांचें आवश्यक उच्चार-सौकर्य यांच्या विरुद्ध ' ञ्ञान ' असा शब्द उक्त भाषेंत कसा रूढ झाला असेल हें समजत नाही. उदाहरणार्थः—

**म्न ज्ञोर्णः ॥ २।४२ ॥ ( हेम० )** माहाराष्ट्री

अनयोर्णो भवति । उदा०— ' म्न ' – निण्णं ( निम्नम् ), पज्जुण्णो ( प्रद्युम्नः ), ' ज्ञ ' — णाणं ( ज्ञानम् ), सण्णा ( संज्ञा ), पण्णा ( प्रज्ञा ), विण्णाणं ( विज्ञानम् ).

येथे अनादिस्थानीं असलेल्या ' म्न ' किंवा ' ज्ञ ' यांना झालेल्या ' ण ' आदेशाला द्वित्व झालें आहे. पण ' ज्ञान ' यांतील ' ज्ञ ' आदिस्थानीं असल्यामुळे त्याला झालेल्या ' ण ' आदेशाला द्वित्व प्राप्त झालें नाही. म्हणून वरील सूत्रांतहि ' ञ ' असा ( एकेरी ) आदेश सांगितला असता तर त्याला आदेशत्वामुळे अनादिस्थानीं द्वित्व प्राप्त झालेंच असतें आणि आदिस्थानीं द्वित्व न होतां ' ञानं ' ( ज्ञानम् ) असा शब्द नियमाप्रमाणेच बनला असता व तो यथातथ्यहि ठरला असता. आपणांस यापासून जाणावयाचें तें हेंच की, संयुक्त ' ज्ञ 'ला त्याच्याशीं स्थानतः व प्रयत्नतः सदृशतम असलेला ' ञ ' हाच आदेश झाला. ' य, यँ किंवा ' न्य ' हे अनिष्ट आदेश आले नाहीत.

**राज्ञो वा चिञ् ॥ ४।३०४ ॥ (हेम० )**

याचा अर्थ असा की— राजन् या शब्दाचें ' राज्ञ ' असें जें रूप, त्यांतील ' ज्ञ 'ला विकल्पाने ' चिञ् ' ( पक्षे ' ञ ' ) आदेश होतो. उदा०— राचिञा ( राज्ञा ) लपितं; रञ्ञा ( राज्ञा ) लपितं; राचिञो ( राज्ञो ) धनं, रञ्ञो ( राज्ञो ) धनं. येथे ' ज्ञ 'ला झालेला ' चिञ् ' हा आदेशहि ' ज्ञ 'शीं स्थानतः व प्रयत्नतः सदृशतम झालेला असून त्याला इतर अनिष्ट आदेश झाले नाहीत हें यावरून स्पष्ट दिसून येत आहे.

एथवर केलेल्या आदेशविषयक विवेचनाचें तात्पर्य हें की, ' ज्ञ ' या संयोगाचे घटकवर्ण 'ज्-ञ्' हे असून त्यांच्या संयोगाचे ( ' ज्ञ' चे ) प्रांतपरत्वें जे द-कारादि किंवा ग-कारादि उच्चार श्रुत होतात ते ' ज्ञ ' या संयोगापासून किंवा त्याच्या घटकांपासून आदेशांनी बनलेले नसून विपरिणामांनीच बनलेले आहेत.

मराठी भाषेंत ' ज्ञ 'चें वर्णानुक्रमिक स्थान या विषयासंबंधाने उच्चार, इतिहास, प्रक्रिया आणि आदेश या चौकशीने ( ४ कसोट्यांनी ) संस्कृत, प्राकृत व मराठी यांना अनुलक्षून जें चतुर्विध विवेचन केलें आहे त्यावरून निर्णीत होत आहे तें असें की, ' ज्ञ ' हा संयुक्त आहे म्हणून मूल वर्णमालेंत त्याचा समावेश करूं नये. आणि त्याचे घटकवर्ण ' ज्–ञ् ' हेच आहेत, म्हणून कोणत्याहि वर्णानु

क्रमिक योजनेच्या कामीं त्याला ' ज 'च्या वर्णानुक्रमणिकेंतच यथायोग्य स्थान दिलें पाहिजे. त्याच्या प्रचलित आकारांत ' ज्–ञ् 'चीं प्रतीकें सूक्ष्मत्वानें प्रतीत होत आहेत म्हणून त्याच्या ह्या आकारांत बदल करणें नलगेच.

आता शेवटीं, मानवी भाषेच्या दृष्टीनें आदेशशास्त्राची व्यापकता आणि निसर्गाधिष्ठानता जेणें-करून प्रत्ययास येईल असें एकच उदाहरण येथें थोडक्यांत स्पष्ट करून ( विवरून ) हा लेख समाप्त करीत आहें, तें उदाहरण असें—

इंग्रजी भाषेंतील know ( नो ) या धातूचें संस्कृत भाषेंतील ' ज्ञा ' धातूशीं अर्थतः सादृश्य असून उच्चारतः सादृश्य दिसत आहे. यावरून पाहतां ' नो ' हा धातू ' ज्ञा ' धातूपासून आदेशानें बनला असावा असें दिसत आहे. वस्तुतः हा त्यांचा यदृच्छायोग आहे. तथापि त्याविषयी ऊहापोह करतों तो असा:-

' **एकदेशविकृतमनन्यवत्** ' या परिभाषेनें प्रथमतः संस्कृत ' ज्ञा 'चा इंग्रजी ' ज्ञो ' झाला. नंतर ' **चोः कुः** ' या नियमाच्या अतिदेशानें त्या ' ज्ञो 'चा ' ग्नो ' झाला. आणि मग:— ' **चूलिकापैशाचिके तृतीयतुर्ययोराद्यद्वितीयौ** ॥ ४।३२५ ॥ ' ( **हेम०** ). ( चूलिकापैशाचिक-नामक प्राकृतांत वर्गांतील तिसऱ्याला पहिला वर्ण, आणि चौथ्याला दुसरा वर्ण, असे आदेश होतात. उदा०– गिरितटम्–किरितटं । जीमूतः–चीमूतो । निर्झरः–निच्छरो । ढक्का–ठक्का. इ० ). याप्रमाणे ' ग्नो 'चा ' क्नो ' झाला. आणि शेवटीं त्यांतील ' क् ' म्हणजे ' k 'चा उच्चार मात्र निघून जाऊन ' नो ' इतकाच उच्चार अवशेष राहिला. ही गोष्ट लेखनांत तो ' k ' अद्यापि दिसत आहे त्यावरून स्पष्ट होत आहे.

या बाबतींत आणखी बरेंच लिहिण्यासारखें आहे पण आता तें न लिहितां अपेक्षेहून अधिक विस्तृत झालेला हा लेख समाप्त करतों.

---

# किरातार्जुनीय काव्यांतील सुभाषितें

( लेः— प्र. धों. कानिटकर )

१ नहि प्रियं प्रवक्तुमिच्छन्ति मृषा हितैषिणः । अर्थः— स्वामीच्या हिताविषयी इच्छा करणारे पुरुष प्रिय परंतु असत्य असें भाषण करण्याची इच्छा करीत नाहीत.

२ हितं मनोहारि च दुर्लभं वचः । अर्थः— हितकर व आनंददायक असें ( एकच ) भाषण दुर्लभ आहे. ( उपदेश बहुधा असतो. )

३ अनार्यसंगमात् वरं विरोधोऽपि समं महात्मभिः । अर्थ :— दुर्जनांच्या संसर्गापेक्षा महात्म्याशीं विरोध असणें अधिक बरें.

४ अहो दुरन्ता बलवद्विरोधिता । अर्थः— बलिष्ठाशीं केलेल्या विरोधाचा परिणाम वाईट होणारच.

५ व्रजन्ति ते मूढधियः पराभवं भवन्ति मायाविषु ये न मायिनः । अर्थः— कपटी लोकांबरोबर जे कपटाने वागत नाहीत त्या मूर्खांचा पराभव होतो. ( शठं प्रति शाठ्यं–या न्यायाने वागावें. )

६ अमर्षशून्येन जनस्य जंतुना न जातहार्देन विद्विषादरः । अर्थः— ज्याला कधींहि कोप येत नाही अशा पुरुषाच्या प्रेमाची किंवा रागाची किंमत सारखीच.

७ निवसन्ति पराक्रमाश्रया न विषादेन समं समृद्धयः । अर्थः— संपत्ति पराक्रमसाध्य आहे, अनुत्साहाने मिळत नाही. ( साहसे श्रीः प्रतिवसति; जहिं साहसु तहिं सिद्धि. )

८ लघुयन् खलु तेजसा जगन्न महानिच्छति भूतिमन्यतः । अर्थः— स्वतेजाने जगाला तुच्छ मानणारा तेजस्वी पुरुष दुसऱ्याच्या मदतीने आपला उत्कर्ष साधण्याची इच्छा करीत नाही. ( तेजस्वी पुरुष परायत्तवृत्ति नसतो. )

९ ज्वलितं न हिरण्यरेतसं चयमास्कन्दति भस्मनां जनः । अर्थः— (लहान) धगधगीत निखाऱ्यावर लोक पाय ठेवीत नाहीत परंतु भस्माचा ( मोठा ) ढीग असला तरी खुशाल तुडवितात. (मानी लोक पराभवाची वेळ आली असतां प्राण देतील, परंतु स्वतेज नष्ट होऊं देणार नाहीत. नष्टतेज होऊन प्राण वाचविल्यास भस्माच्या ढिगाप्रमाणे त्यांची अवनति होते. )

१० प्रकृतिः खलु सा महीयसः सहते नान्यसमुन्नतिं यया । अर्थः— तेजस्वी पुरुषांचा स्वभावच असा असतो की, ते परोत्कर्ष कधीच सहन करीत नाहीत. (शत्रूचा निःपात करणें हाच तेजस्वी पुरुषांचा पुरुषार्थ होय ).

११ सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् । अर्थः— विचार केल्याशिवाय कोणतीहि क्रिया करूं नये; कारण अविचारापासून अनेक आपत्ति उद्भवतात.

१२ अनपायि निबर्हणं द्विषां न तितिक्षा सममस्ति साधनम् । अर्थः—स्वतःचा अपाय न होतां शत्रूंचा विनाश करणारें क्षमेसारखें दुसरें साधन नाही.

१३ मदमानसमुद्धतं नृपं न वियुंक्ते नियमेन मूढता । अतिमूढ उदस्यते नयान्नयहीनादपरज्यते जनः ॥ अर्थः— दर्प आणि अहंकार यांनी समुद्धत झालेल्या राजाच्या ठिकाणीं मूढता नियमाने वियोग करीत नाही. अतिमूढ राजा नीतिमार्गापासून च्युत होतो; व नीतिभ्रष्ट राजावर प्रजाहि प्रेम करीत नाही.

१४ अणुरप्युपहन्ति विग्रहः प्रभुमन्तः प्रकृतिप्रकोपजः । अखिलं हि हिनस्ति भूधरं तरुशाखान्तनिघर्षजोऽनलः ॥ अर्थः— राजाच्या अंतरंगांतील अमात्य व शिष्ट यांच्या कोपापासून उत्पन्न झालेलें वैर अल्प जरी असलें तरी राजाचा समूळ नाश करितें. याला दृष्टान्तः– पर्वतावरील वृक्षशाखांच्या परस्पर घर्षणापासून उत्पन्न होणारा अग्नि त्या सबंध पर्वताची राखरांगोळी करतो.

१५ मतिमान् विनयप्रमाथिनः समुपेक्षेत समुन्नतिं द्विषः । सुजयःखलु तादृगन्तरे विपदन्ता ह्यविनीत-संपदः ॥ अर्थः— नीतिभ्रष्ट शत्रूच्या उत्कर्षाची शहाण्या पुरुषाने उपेक्षा करावी; कारण अशा दुर्विनीत शत्रूच्या एखाद्या मर्मावर आघात केल्याने त्याचा सहज पराभव करितां येतो. नीतिभ्रष्टांच्या उत्कर्षाचा शेवट अवनतींत होत असतो.

१६ वीतस्पृहाणामपि मुक्तिभाजां भवन्ति भव्येषु हि पक्षपाताः । अर्थः—विरक्त आणि मुमुक्षु अशा पुरुषांचें सुद्धा साधूंच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न होतें.

१७ असाधुयोगा हि जयान्तरायाः प्रमाथिनीनां विपदां पदानि । अर्थः— दुर्जनसंसर्ग हा केवळ जयविघातक आहे इतकेंच नसून तो अनर्थकारक आपत्तींचें माहेरघरच होय.

१८ प्रकर्षतंत्रा हि रणे जयश्रीः । अर्थः— जो सर्व बाजूंनी– योद्धे, सैन्य, शस्त्रास्त्रें वगैरे– शत्रूपेक्षा संपन्न असतो त्यालाच युद्धांत यश मिळतें.

१९ मात्सर्यरागोपहतात्मनां हि स्खलन्ति साधुष्वपि मानसानि । अर्थः— द्वेष आणि स्नेह यांनी ज्यांचे स्वभाव दूषित झाले आहेत अशा पुरुषांचीं मनें साधूंच्या ठिकाणीं सुद्धा विकारवश होतात.

२० न हींगितज्ञोऽवसरेऽवसीदति । अर्थः— इंगित (हृद्गतभाव) जाणणारा योग्य वेळेला बोलल्याशिवाय राहत नाही.

२१ न रम्यमाहार्यमपेक्षते गुणम् । अर्थः— स्वभावसुंदर वस्तूला आरोपित गुणांची अपेक्षा नसते.

२२ गुणाः प्रियत्वेऽधिकृता न संस्तवः । अर्थः—प्रेम उत्पन्न होण्याला गुणच कारणीभूत होतात, चिरपरिचयाची अपेक्षा नसते.

२३ प्रायेण सत्यपि हितार्थकरे विधौहि । श्रेयांसि लब्धुमसुखानि विनान्तरायैः॥ अर्थः—साधारणतः आपलें कर्म हितार्थकर असलें तरी सुद्धा विघ्नांशिवाय यशःप्राप्ति

होणें अवश्य आहे. ( कारण प्रत्येकाला सर्व ठिकाणीं अकारण वैरी असतात. )

२४ संधत्ते भृशमरतिं हि सद्वियोगः । अर्थः—सज्जनांचा वियोग अतिशय अस्वस्थता ( मानसिक ) उत्पन्न करितो.

२५ महते रुजन्नपि गुणाय महान् । अर्थः—सज्जनांनी केलेल्या पीडेपासून मोठा फायदाच होतो. ( महत्कृता पीडापि शुभावहा ).

२६ नयवर्त्मगाः प्रभवतां हि धियः । अर्थः—श्रेष्ठ लोकांची बुद्धि नीतिमार्गानुसारी असते.

२७ स्वयशांसि विक्रमवतामवतां न वधूष्वघानि विमृषन्ति धियः । अर्थ—स्त्रियांना संकटांत घालावें अशी यशोधन पराक्रमी पुरुषांची बुद्धि नसते.

२८ युक्तानां खलु महतां परोपकारे कल्याणी भवति रुजत्स्वपि प्रवृत्तिः । अर्थः—परोपकारासक्त सज्जनांची प्रवृत्ति त्यांना पीडा देणाऱ्यांच्या ठिकाणीं सुद्धा हितकारिणीच असते.

२९ नाल्पीयान् बहुसुकृतं हिनस्ति दोषः । अर्थः—अल्प दोषामुळे मोठ्या उपकाराचा नाश होत नाही.

३० सा लक्ष्मीरुपकुरुते यया परेषाम् । अर्थः—संपत्तिवान जिचा उपयोग परोपकारार्थ करतो तीच खरी लक्ष्मी ( संपत्ति ).

३१ वसन्ति हि प्रेम्णि गुणा न वस्तुनि । अर्थः—गुण प्रेमाच्या ठिकाणीं असतात वस्तूंच्या ठिकाणीं नसतात. ( जें प्रेमस्थान तेंच गुणयुक्त; जें प्रेमस्थान नसेल तें गुणवत् असलें तरी निर्गुणच ).

३२ लंघ्यते न खलु कालनियोगः । अर्थः—दैवाज्ञा दुर्निवार आहे.

३३ आत्मवर्गहितमिच्छति सर्वः । अर्थः—सर्व स्ववर्गाच्या (जातीच्या) हिताची इच्छा करितात.

३४ प्रेम पश्यति भयान्यपदेऽपि । अर्थः—भीतिस्थान नसून सुद्धा प्रेमाला त्या स्थानीं भय दिसतें.

३५ परिजनतापि गुणाय सद्गुणानाम् । अर्थः—सद्गुणी पुरुषांच्या सेवेने सुद्धा उत्कर्षच होतो.

३६ हरति मनो मधुरा हि यौवनश्रीः । मनोहर तारुण्यशोभा दुसऱ्याच्या मनाचें बलाने आकर्षण करिते.

३७ न हि महतां सुकरः समाधिभंगः । अर्थः—मोठ्यांचा समाधिभंग कोणालाहि करणें शक्य नाही.

३८ चलति नयान्न जिगीषतां हि चेतः । अर्थः—शत्रूंना जिंकण्याची ज्यांस इच्छा आहे त्यांचे मन नीतिभ्रष्ट होत नाही. ( मन क्रोधाने व्याप्त असल्यामुळे त्यांत शृंगाराला अवकाशच नसतो ).

३९ दुरधिगमा हि गतिः प्रयोजनानाम् । अर्थः—उद्दिष्ट कार्याचा परिणाम दुर्ज्ञेय असतो. ( कदाचित् कार्यसिद्धि होईल किंवा न होईल ).

४० अनुरागी युवतिजनः खलु नाप्यतेऽनुरूपः । अर्थः—अनुरागिणी व अनुरूप अशी स्त्री सहसा मिळत नाही.

४१ प्रभवति मंडयितुं वधूरनंगः । अर्थः —कोणत्याहि अवस्थेंत स्त्रिया असल्या तरी मदन त्यांना शोभा देण्यास समर्थ आहे.

४२ ज्वलयति महतां मनांस्यमर्षे न हि लभतेऽवसरं सुखाभिलाषः । अर्थः— धैर्यवान पुरुषांचें मन क्रोधाने जळत असतांना त्यांना सुखाची इच्छा करण्याला सवडच नसते. ( कारण रौद्ररस शृंगारविरोधी आहे ).

४३ अविज्ञातेऽपि बन्धौ हि बलात् प्रल्हादते मनः । अर्थः—मित्राची ओळख पटली नाही तरी सुद्धा त्याच्या विषयी आपल्या मनांत स्नेहभाव उत्पन्न होतो.

४४ सुलभा रम्यता लोके दुर्लभं हि गुणार्जनम् । अर्थः—जगांत सुंदर आकृति मिळणें सोपें आहे, परंतु गुण संपादन करणें दुर्लभ आहे.

४५ नान्तरज्ञाः श्रियो जातु प्रियैरासां न भूयते । आसक्तास्तास्वमी मूढा वामशीला हि जन्तवः ॥ अर्थः—संपत्तीला योग्यायोग्य विचारशक्ति नाही. यामुळे संपत्ती कोणाच्याहि ठिकाणीं अनुराग करीत नाही. तथापि, मूर्ख लोक अननुरक्त अशा संपत्तीच्या ठिकाणीं अनुरक्त होतात. यावरून पुरुष वक्रस्वभावाचे आहेत असें दिसतें.

४६ न्यायाधारा हि साधवः । अर्थः— सज्जन नीतीचा आश्रय करतात.

४७ असन्मैत्री हि दोषाय । अर्थः— दुष्टांची संगति अनर्थकारक होते.

४८ पुरुषस्तावदेवासौ यावन्मानान्न हीयते । अर्थः— जोपर्यंत कोणी स्वाभिमानशून्य होत नाही तोपर्यंतच तो पुरुष या संज्ञेस पात्र आहे.

४९ स पुमानर्थवज्जन्मा यस्य नाम्नि पुरःस्थिते । नान्यामंगुलिमभ्येति संख्यायामुद्यतांगुलिः ॥ अर्थः— गुणी पुरुषांची गणना करतांना ज्याचें नांव प्रथम घेऊन एक बोट घातलें व ज्याच्यानंतर पुनः दुसरें बोट घालतांच येत नाही, त्याच्याच जन्माचें खरें सार्थक झालें. ( अद्वितीय असेल तरच तो खरा पुरुष. )

५० अजन्मा पुरुषस्तावद्गतासुस्तृणमेव वा । यावन्नेषुभिरादत्ते विलुप्तमरिभिर्यशः ॥ अर्थः— जोंपर्यंत कोणी पुरुष शत्रूने हरण केलेलें यश शत्रूचा नाश करून परत मिळवीत नाही तोंपर्यंत त्या पुरुषाचा जन्मच झालेला नाही किंवा तो जिवंत असून मेल्यासारखा किंवा तृणतुल्य समजावा.

५१ अनिर्जयेन द्विषतां यस्यामर्षः प्रशाम्यति । पुरुषोक्तिः कथं तस्मिन् ब्रूहि त्वं हि तपोधन ॥ अर्थः— शत्रूचा निःपात केल्याशिवाय ज्याचा कोप शमन होतो त्याच्या ठिकाणीं ऋषि महाराज, पुरुष हा शब्द कसा लागतो हें आपणच सांगावें.

५२ नाम यस्याभिनन्दन्ति द्विषोऽपि स पुमान् पुमान् । अर्थः— ज्याचें नांव ऐकून वैरीसुद्धा माना डोलावतात तोच पुरुष पुरुष या संज्ञेला पात्र आहे.

५३ महतां हि धैर्यमविभाव्यवैभवम् । अर्थः— मोठ्या लोकांचें धैर्य अगाध सामर्थ्ययुक्त असतें.

५४ किमिवास्ति यन्न सुकरं मनस्विभिः । अर्थः— अशी कोणती गोष्ट आहे की, जी निश्चयी ( शहाण्या ) पुरुषांना सुकर नाही ?

५५ गुरुतां नयन्ति हि गुणा न संहतिः । अर्थः— गौरव गुणामुळे होतो, भव्य आकाराने होत नाही. ( अंतःसारात् हि गौरवं भवति नतु बाह्यात् स्थौल्यात् )

५६ किमिवास्ति यन्न तपसामदुष्करम् । अर्थ :— तपाच्या प्रभावाने सुकर होत नाही अशी कोणती गोष्ट आहे ?

५७ घ्नन्ति सहजमपि भूरिभियः सममागताः सपदि वैरमापदः । अर्थः— सर्व साधारण भयंकर संकटें स्वाभाविक वैराचा नाश करितात. ( सामाजिक संकटांत परस्पराविषयींचें वैर नष्ट होतें ).

५८ संवृणोति खलु दोषमज्ञता । अर्थः— अज्ञान दोषाला झांकून टाकतें. ( अज्ञस्य अपराधः न गण्यते ).

५९ सुदुर्ग्रहान्तःकरणा हि साधवः । अर्थः— सज्जनांचें अंतःकरण कधीहि प्रकंपित होत नाही.

६० दिशत्यपायं हि सतामतिक्रमः । अर्थः— सज्जनांचा अपमान केल्याने अनर्थ प्राप्त होतो.

६१ सतां हि वाणी गुणमेव भाषते । अर्थः— सज्जनांची वाणी गुणांचाच उच्चार करिते. ( परदोषांचा उच्चार करीत नाहीं ).

६२ व्रताभिरक्षा हि सतामलंक्रिया । अर्थः— स्वव्रताचें रक्षण हेंच सज्जनांचें भूषण आहे.

६३ भवत्यपाये परिमोहिनी मतिः । अर्थः— विनाशकालीं बुद्धिभ्रम होतो. ( विनाशकाले विपरीत बुद्धिः । )

६४ न दूषितः शक्तिमतां स्वयंग्रहः । अर्थः— वीरांनी इष्ट वस्तु बलात्काराने मिळविली तरी त्यांस दोष लागत नाही.

६५ प्रकृत्यमित्रा हि सतामसाधवः। अर्थः—दुर्जन सज्जनांचे स्वाभाविक शत्रू होत.

६६ सहापकृष्टैर्महतां न संगतं । अर्थः— दुर्जनांबरोबर सज्जनांची मैत्री होत नाही.

६७ अरुंतुदत्वं महतां ह्यगोचरः । अर्थः— सज्जन पीडिताला पीडा देत नाहीत.

६८ मुह्यत्येव हि कृच्छ्रेषु संभ्रमज्वलितं मनः । अर्थः— आपत्कालीं भयत्रस्त झालेलें मन विवेकशून्य होतें.

६९ स्वामापदं प्रोज्झ्य विपत्तिमग्नं शोचन्ति सन्तो ह्युपकारिपक्षम् । अर्थः— स्वतःच्या आपत्तीबद्दल सज्जनांना खेद होत नाही; परंतु आपल्या उपकारकर्त्यावर आलेली आपत्ती पाहून त्यांस खेद होतो.

# अभिप्राय

**हिंदू कायदा सुधारणा :–** ( ले. के. बा. गजेंद्रगडकर बी. ए., एल्एल्. बी., सातारा. किं. ६ आणे ) ही लहानशी लेखमाला लिहून श्री. गजेंद्रगडकरांनी फार मोठी कामगिरी बजावली आहे यांत शंका नाही. हिंदू कायद्यांत अनेक सुधारणा केल्या पाहिजेत, किंबहुना त्याची पुनर्घटनाच केली पाहिजे ही गोष्ट आता विचारी लोकांस पटत चालली आहे. परंतु कोट्यवधी लोकांचे हितसंबंध ज्याने सर्वतः नियंत्रित केले जातात अशा कायद्याची सुधारणा केवळ थोड्याशा लोकांच्या संमतीने होणें शक्य नाही व इष्टहि नाही. त्यासाठी बहुजनसमाजांत जागृति झाली पाहिजे. परंतु हिंदू समाजास या प्रश्नासंबंधी चालना देणें ही फार कठीण गोष्ट आहे. आपले सर्व धर्मशास्त्रग्रंथ संस्कृतमध्ये लिहिलेले, त्यांचा खल व अंमलबजावणीचा व्यवहार इंग्रजी भाषेंत होणार, तर उलट बहुजन समाज सर्वतः अशिक्षित व पुराणमतवादी. अशा स्थितींत साधारण शिक्षित माणसासहि समजेल अशा सोप्या भाषेंत लेख लिहून लोकांना चालू कायद्याची माहिती करून देणें व त्यांच्याकडूनच सुधारणेची मागणी करविणें, निदान सुधारणेस संमती देण्याइतकी त्यांची मनोभूमिका तयार करणें हा एकच मार्ग आहे. ह्याच मार्गाचा अवलंब करून ही बालबोध लेखमाला तयार केल्याबद्दल श्री. गजेंद्रगडकरांचें कोणीहि अभिनंदन करील.

प्रस्तुत निबंधमालेंत लेखकाने हिंदू कायद्यातील महत्त्वाच्या सर्व प्रश्नांची चर्चा केली आहे; व त्या कायद्यास धर्मग्रंथांचा कितपत आधार आहे हें दर्शवून आजच्या परिस्थितींत कायद्यांत कोणत्या सुधारणा ताबडतोब करणें इष्ट आहे याचें विवरण केलें आहे. लेखकाने सुचविलेल्या सर्वच सुधारणा प्रत्येकास पटतीलच असें नाही. 'बाप जिवंत असतांहि मुलास एकत्र कुटुंबांतील इस्टेटीचा हिस्सा मागतां यावा' असें पुष्कळ लोकांस वाटेल. या एकंदरींत प्रगमनशील लेखमालेंत ' अद्याप पन्नास वर्षें घटस्फोटाची पद्धत अमलांत येऊं नये' हें लेखकाचें मत पुष्कळांना बुचकळ्यांत पाडील; व सध्याच्या काळांत दत्तकपद्धतीची फारशी आवश्यकता राहूं नये हें मतहि बऱ्याच लोकांना पटणार नाही. परंतु कायद्यांतील सर्व अनिश्चितपणा व घोटाळा दूर करण्यासाठी त्याचें सूत्रीकरण ताबडतोब केलें पाहिजे. सगोत्र विवाह फक्त सात पिढ्यांपर्यंतच निषिद्ध, दत्तकावरील सर्व निर्बंध काढून टाकावे, विधवेस वाटणी मागण्याचा हक्क असावा, मिताक्षरांतील अविभक्तकुटुंबपद्धति नाहिशी करावी, वगैरे प्रश्नांवर दुमत होणें शक्य नाही. एकंदरींत पाहतां या लेखांतील सर्व सूचना प्रत्येकास एकदम पटण्यासारख्या आहेत किंवा नाहीत हा महत्त्वाचा प्रश्न नसून, सामान्य जनतेस या प्रश्नावर विचार करण्यास चालना मिळावी व सुधारणेची जरूरी लोकांना पटवून द्यावी हाच ह्या लेखांचा मुख्य हेतु आहे व तो लेखकाने चांगल्या तऱ्हेने पार पाडला आहे यांत शंका नाही.

प्रो. द्. ब. गोडबोले ( एल्एल्. एम्. )

# पुस्तकपरीक्षण



**अलंकारमंजूषा**—(लेखिका—कु० बाळूबाई खरे, पी. ए.):—कोणत्याहि शास्त्राची वाढ होत असतां मधून मधून त्या वाढीचा आढावा घेणें जरूर असतें. असें केल्याने पदरांत काय पडलें व पुढील मार्ग आक्रमण्याची दिशा कशी असावी वगैरे गोष्टी ध्यानांत येतात. कांही शास्त्रें अशीं आहेत कीं, त्यांच्या वाढीला मर्यादा असेल. भाषेसंबंधाचीं शास्त्रें अशा प्रकारचीं आहेत व अलंकारशास्त्र हें अशा प्रकारचेंच एक शास्त्र आहे. एका अभियुक्त भाषेंत जे अलंकार असतील तसेच अन्य भाषेंत असणार; तेव्हां संस्कृत भाषेंत जे अलंकार तेच व तसेच मराठींत असणार. क्वचित् फरक असूं शकेल. भाषेंत प्रकट करावयाच्या विचारांना शोभा आणण्याच्या तऱ्हा मर्यादितच असणार, म्हणूनच भाषेची ग्रंथसंपत्ति एकसारखी वाढत राहिली तरी अलंकारांची वाढ पुरी झालेली दिसेल. संस्कृतांत वेदभाषेपासून अलंकार प्रचारांत येण्यास सुरवात होऊन दीर्घकालाने त्यांची संख्या शंभरांवर गेली. अशा स्थितींत सिंहावलोकनन्यायाने उत्तरकालीन जगन्नाथ व नागोजीभट्ट यांसारख्यांना पूर्वींच्या अलंकारिकांच्या कार्याचें परीक्षण करून अलंकारांच्या संख्येची विचक्षणा करावी लागली व ती त्यांनी केलीहि. मराठींतील अलंकारशास्त्र सर्वस्वी संस्कृतांतूनच घेतलेलें आहे व त्यावर लेले, भागवत, भिडे वगैरे ग्रंथकारांचे मराठींत ग्रंथ झालेले आहेत. या ग्रंथांचा उद्देश मराठीच्या विद्यार्थ्यांस लक्षणोदाहरणांसह अलंकारशास्त्राची ओळख करून देणें हा असून तो त्यांनी पार पाडला आहे. यानंतरचें वरच्या दर्जाचें काम म्हणजे शास्त्राची शास्त्र या दृष्टीने शास्त्रीय चिकित्सा करणें हें ओघालाच येतें व तें काम सदरहू लेखिकेने फार उत्कृष्ट रीतीनें केलें आहे ही फार संतोषाची गोष्ट आहे.

काव्याची सांगोपांग चर्चा करणाऱ्या शास्त्राचें वास्तविक व्यापक नांव साहित्यशास्त्र हें होय. परंतु आपापल्या मताने रस, ध्वनि, अलंकार या काव्यांगांपैकीं एकेकाला ज्यास्त महत्त्व देणारांनी 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' या न्यायाने अंगप्राधान्य दर्शविणारीं नांवें साहित्यग्रंथांस दिलीं आहेत. रस हाच काव्याचा आत्मा आहे हा सिद्धांत बहुतेक मान्य असूनहि अलंकार या अंगाची चर्चा करतांना लक्षणें अलंकारांचीं बांधणें व त्यांची साधकबाधक चर्चा करणें या कामीं इतर अंगांच्या चर्चेपेक्षा बुद्धीच्या तार्किक कसरतीला पुष्कळच अधिक वाव असल्यामुळे, व काव्यचर्चेसारख्या, सहृदयता हेंच ज्याचें प्रमुख उपजीव्य अशा विषयाला न्यायमीमांसादि शास्त्रांच्या पंक्तीला बसविण्यास त्या शास्त्रांची न्यायघटित रुक्ष पद्धतिच योग्य अशी समजूत, सहृदयतेच्या पोटांत तर्काला हळुवारपणाने बसविण्याऐवजी तर्काचें दुर्भेद्य चिलखत सहृदयतेला लेवविणाऱ्या संस्कृ-

तांतील अलंकारिकांनीं करून घेतल्यामुळे, अलंकारांच्या प्रधान्यालाच ज्यास्त ऊत आला व संस्कृतांत अलंकार चर्चेवरच भर देणारे ज्यास्त ग्रंथ झाले. रसाचें प्राधान्य दर्शविणारा रसगंगाधरहि अलंकारांचीच चर्चा फार विस्तृत करतो; किंबहुना पूर्वग्रंथ-कारांनी ती त्यास करावयास भाग पाडलें. तात्पर्य, काव्यशास्त्र किंवा साहित्यशास्त्र ही संज्ञा कमी महत्त्वाची होऊन अलंकारशास्त्र हेंच नांव मराठींत रूढ झालें. साहजिकच मराठींतहि अलंकार चर्चेवरच ज्यास्त भर पडल्यामुळे आता त्या चर्चेचें स्वरूप ऐतिहासिक पद्धतीच्या चष्म्यांतून बघणें अवश्य झालें. म्हणूनच प्रस्तुत लेखिकीने अलंकारांच्या चर्चेपुरतीच ग्रंथाची व्याप्ति मर्यादित करून 'अलंकार मंजूषा' हा ग्रंथ निर्माण केला आहे. अलङ्कारांच्या स्वरूपाची व परम्परेची छाननी व्यापकपणें प्रो. काणे प्रो. बनहट्टी वगैरेंनी केलेली इंग्रजी भाषेंतच आहे व प्रो. काण्यांच्या साहित्य-शास्त्राच्या इतिहासास मराठी पोषाख चढला असला तरी त्यांत अर्थात्च निवळ अलंकारांची विस्तृत चर्चा असणें शक्य नव्हतें. म्हणूनच प्रस्तुत अलङ्कारमञ्जूषा ग्रंथाची अवश्यकता व मातबरी आहे. असो.

तीनशें एकतीस पृष्ठांच्या या ग्रंथाचीं एकंदर सोळा प्रकरणें आहेत. लेखिकेने पहिल्या प्रकरणांत थोडा पूर्वेतिहास या नांवाखाली अलङ्कारशास्त्राचा उगम, प्राचीन अलंकारशास्त्रकर्ते यांचा त्रोटक इतिहास व काव्यासम्बंधीं प्रमुख सिद्धांतांचें थोडक्यांत विवेचन केलें आहे. यांतील ग्रंथकारांच्या मालिकेच्या अखेरीस नागेशाचें नांव प्रमुखत्वाने यावयास पाहिजे होतें. तो जरी स्वतन्त्र ग्रंथकार नाही, तरी टीकाकाररूपाने का होईना, शास्त्रचिकित्सक म्हणून त्याची योग्यता मोठी आहे. तसेंच अलङ्कार-शास्त्राचा एकंदर ग्रंथविस्तार केवढा आहे याचीहि यथायोग्य कल्पना अधिक चांगली करून द्यावयास हवी होती. दुसऱ्या प्रकरणांत अलङ्काराचा इतिहास दिला आहे. त्यांत वेदवाङ्मयापासून उपमारूपकादि अलङ्कारांस सुरवात होऊन नाट्यशास्त्रांतील चार अलङ्कारांच्या कोंबापासून अलङ्कार वृक्षाच्या फांद्या वाढत वाढत अखेर त्यांची संख्या एकशें वीसांवर कशी गेली हें थोडक्यांत सांगितलें आहे व अलंकारशास्त्रांत प्रमुख स्थान व गौण स्थान कोणत्या ग्रंथकरांचें आहे तें सांगितलें आहे. पुढील सर्व विवेचन याच प्रकरणाचा विस्तार आहे असें म्हटल्यास चालेल. अलङ्कारांची वर्गवारी या तिसऱ्या प्रकरणांत अलङ्कारांचें वर्गीकरण कोणत्या भेदक तत्त्वानुसार (Principle of Division) जुन्या शास्त्रकारांनी केलें आहे, त्याची वाढ व परंपरा व लेखिकेने स्वतः केलेलें वर्गीकरण मतभेदांसह दाखविलें आहे. हें प्रकरण स्वतन्त्र विचारपद्धतीचें द्योतक आहे. संस्कृत ग्रंथकार, वर्ण्यविषयाची मोजदाद म्हणजे 'उद्देश' केल्यावर विभाजक किंवा भेदक तत्त्व कोणतें लावलें आहे व त्याचें तार्किक स्वरूप पराजाति किंवा Genus हिच्या पोटांत येणाऱ्या अपराजाति किंवा Species यांतील भेद दाखविणारे गुणधर्म हेच खरोखर (Principle of Division) जितकें स्पष्ट करून सांगावयास पाहिजे तितकें सांगत नाहीत. तर्कसंग्रह इत्यादि प्रकरणग्रंथांत ही उणीव

भासते. रसगंगाधरांत शृङ्खला, माला वगैरेंचे स्वरूप दाखविलें आहे, तेंच प्रस्तुत ग्रंथांत लेखिकेने सटीप व सटीक दाखवून स्वतन्त्र लघु प्रकरणाने त्याचें महत्त्व उघड केलें आहे. चौथ्या प्रकरणापासून अलङ्कारांच्या वास्तविक चर्चेस सुरवात करून शब्दालङ्कारप्रकरण लिहिलें आहे. पांचव्या प्रकरणांत उभयविध अलङ्कारांतील दुवा जो श्लेषालङ्कार तो वर्णिला आहे. याच प्रकरणांत वक्रोक्तीसम्बंधाने भिन्न भिन्न मतें सांगितलीं आहेत. चौथ्या प्रकरणाच्याच अखेरीस चित्रालङ्काराचें यथार्थ स्वरूप उघडें करून दाखवितांना कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक करून त्याची नासाडी करण्याच्या आमच्या सवयीची स्पष्टता केली आहे. रसार्थहीन शब्दचित्रकाव्याला 'पामरश्लाघ्य' हें जगन्नाथ पण्डिताने दिलेलें प्रशंसापत्र या प्रकरणाच्या अखेर नमूद करून ठेवण्यासारखें आहे. सहाव्या प्रकरणांत लोकन्यायमूलक अलङ्कारांचे चर्चेस सुरवात करून पुढील दहा प्रकरणांत तर्क, काव्य, शृङ्खला, विरोध, गूढार्थप्रतीति, सादृश्य, अभेद, भेदाभेद, संकर व रसरूपत्व इत्यादिमूलक न्यायांवर आधारलेल्या सर्व अलङ्कार संदर्भांची छाननी केलेली आहे. ही सर्वच चर्चा प्रौढ, विवेचक, सारग्राही व मूलग्राही, सांगोपांग व परिपूर्ण अशी अगदी निरलसपणें केलेली आहे. प्रथमतः विशिष्ट अलङ्काराचें लक्षण कोणीं केलें, त्याची वर्गवारी, लक्षणांत व वर्गवारींत पुढील लेखकांनी केलेले फरक, त्यांची युक्तायुक्तता व ग्राह्याग्राह्यता इत्यादि सर्व विषय मोठ्या कुशलतेने व विषयाची व्यूहरचना ( Marshalling of facts ) करून चर्चारूढ केले आहेत. यमकासारख्या अलङ्काराचे कितीहि भेद असोत, ते न कंटाळतां पाहून प्रत्येकाची वास्तपुस्त घेऊन ज्याची त्याची योग्यता ठरविली आहे. त्या त्या ठिकाणीं संस्कृत व मराठी जरूर तशीं उदाहरणें दिलीं आहेत. तथापि, अलङ्कारांतील भेद पुष्कळ वेळां सूक्ष्म व गुंतागुंतीचे असल्यामुळे उदाहरणें पुरीं झालीं असें वाटत नाही व कित्येकदा कांही अलंकारांचीं संस्कृतांत व विशेषतः मराठींत ठराविक उदाहरणें वगळून उदाहरणें आढळतील की नाही याविषयीं शङ्का येते. हा दोष अर्थात् त्या अलंकाराच्या विरळपणाचा आहे.

सदरहू ग्रंथांत संस्कृत साहित्यांतील अलंकारांचीच चर्चा आहे. तथापि बाहेरूनहि त्या चर्चेत एक दोन मुद्द्यांची भर घालतां येईल. अलंकार म्हटला म्हणजे काव्य हा त्याचा प्रांत व गद्यांत तो आला तरी गद्यास काव्यमयत्व आणण्यासाठी; परंतु शास्त्राचा प्रदेश त्यास अगदी वर्ज अशी सामान्य समजूत आहे व ती बहुतेक बरोबर आहे. तथापि उपमा, रूपक व दृष्टान्त हे अलंकारशास्त्राच्या प्रान्तांतहि बरेच वावरतांना दृष्टीस पडतात व तेथे त्यांचें कार्य शोभा आणावयाचें नसून अर्थाची फोड करणें व भाषेला सुबोधत्व आणणें हें होय. या दृष्टीने लक्षणेवर आधारलेला रूपकालंकार भाषेच्या विविधतेस फार मदत करतो. Idiom, म्ह० वाक्प्रचार ज्यांस म्हणतात त्यांत या रूपकाचाच विलास म्हणजे खेळ असतो. झक मारणें, आगलावेपणा, डोळ्यांत तेल घालणें, घशांत टाकणें, अशा शब्दप्रयोगांत रूपकें आहेत. शास्त्रीय

विषय सुगम करण्याच्या कामीं तर उपमा व तिचाच भाऊ दृष्टान्त किंवा मराठींतील दाखले यांनी तर संस्कृतांतील दर्शनवाङ्मयांत फार बहार केलेली आहे. सामान्यतः निवळ मराठी वाचकांची समजूत कीं ज्ञानेश्वर, तुकाराम हेच काय ते दृष्टान्तांचे आद्यप्रवर्तक पण ही दृष्टान्तपरम्परा किंवा सामान्यतः सादृश्यपरम्परा ही 'द्वासुपर्णा स युजा सखाया' किंवा 'तिरश्चीनो विततो रश्मिरेष' इत्यादि वेदांतील गहन विषय प्रतिपादनांतून उगम पावते व सूत्रकार, भाष्यकार व टीकाकार यांनी ती अखण्ड पुढे चालविली आहे. शबरस्वामी, पतञ्जली, शंकराचार्य वगैरे थोर ग्रन्थकारांचा दृष्टान्ताने विषय सुगम करण्यांत हातखंडा आहे. शास्त्रीय विवेचनाच्या, सामान्यबुद्धीच्या मनुष्यास वाटणाऱ्या सहारा वाळवंटांतील हे दृष्टान्त म्हणजे सरस प्रदेशच (Oasis) होत. व दुर्बोध विषय सुगम करण्यास व त्यांत रस भरण्यास शास्त्रकारांस त्यांची योजना करणें भाग पडलें. असो. दुसरा एक मुद्दा म्हणजे इंग्रजींतील कांहीं अलंकारांची संस्कृतांतील अलंकारांशीं तुलना हा होय. या दृष्टीने विरोधमूलक अलंकारांबरोबर इंग्रजींतील, Paradox Antithesis, epigram, irony, Satire, वगैरेची खुमारी संस्कृतमध्यें नाही असें पाहून चुकल्यासारखें वाटतें. संस्कृत कवींनी काव्यांत कल्पनेवर फार भर दिल्यामुळे व्यवहारांतील गुणदोष चटकदारपणें व खरमरीतपणें दाखवितांना उत्पन्न होणारे हे अलंकार संस्कृतांत ठळकपणें नजरेस पडत नाहीत. असो.

अखेरच्या उपसंहार या प्रकरणांत लेखिकेने अलंकारांच्या वास्तविक योग्यतेबद्दल यथार्थ विचार प्रकट केले आहेत. क्वचित् काव्यांत अलंकार नसतांहि (अनलङ्कृति पुनः क्वापि) काव्य रमणीय असूं शकतें असें मम्मटाने म्हटल्या काळापासून अलंकारांच्या पक्षपात्यांना असें वाटत आलें आहे कीं, रसध्वनीचे अभिमानी अलंकारांस अगदी तुच्छ लेखतात व या गैरसमजाचे प्रतिध्वनि अद्याप मधून मधून उठत आहेत. व रसाचे अभिमान्यांस अलंकारांच्या महत्त्वावर कधी कधी धडेहि देण्याचे प्रयत्न होतात. यावर इतकेंच सांगावयाचें कीं, रसध्वनि हा काव्याचा आत्मा मानल्यावर कसरतीच्या अलंकाराखेरीज काव्य नितान्तरमणीय असूं शकेल पण रस, भाव किंवा केन्द्रभूत विचार रमणीय नसेल तर नुसत्या शब्दांच्या कसरतीने किंवा कल्पनेच्या भराऱ्यांनी तितकासा उच्च दर्जाचा आनन्द होणार नाही. रस व अलंकार यांचा गाढ संगम जेथे होईल तेथे अर्थात् आनंदाचा परमोत्कर्ष होईल. 'चामर ढाळित पार्श्वी विनयें प्रेमें सदा उभी राहें। पाहें श्रीमुख, नेणें बसलें मी काय कीं उभी आहें.॥ किंवा—' कण्ठ गहिंवरें भरला भरली हृदयांत केशवा धडकी। येतें रडें वृथा कां, बा माझी प्रकृति काय रे रडकी॥ अशा पद्यांतील स्वभावोक्तींने (स्वभावोक्ति हा बौद्धिक कसरतीचा अलंकार नव्हे) जो आल्हाद होतो, तसा कल्पनांच्या उच्च भराऱ्यांनी केव्हांहि होणार नाही. कालिदासानेहि स्वाभाविक शोभा ही कृत्रिम शोभेपेक्षा कशी जास्त हृदयंगम असते हें पुढील श्लोकांत मार्मिकपणें दाखविलें आहे.

'तां प्राङ्मुखीं तत्र निवेश्य तन्वीं, क्षणं व्यलम्बन्त पुरो निषण्णाः।
भूतार्थ-शोभा-ह्रियमाण—नेत्राः, प्रसाधने सन्निहितेऽपिनार्यः ॥

पार्वतीला विवाहाचा साजशृङ्गार लेवविण्याच्या आधी तिच्या नैसर्गिक शोभेवर लुब्ध झालेल्या स्त्रिया थबकून राहिल्या असें या श्लोकांत वर्णन आहे. तात्पर्य, काव्याच्या स्वाभाविक शोभेची बहार कांहीं और आहे. याचा अर्थ असा नव्हे की, अलङ्कार तुच्छ आहेत. अलङ्कार रसाचे पार्षद आहेत. एखाद्या ठळक अलङ्कारानेच कवितावधूला शृङ्गारण्याऐवजी जेव्हा दागिन्यांच्या भाराखालीच तिचा जीव अर्धमेला केला जातो किंवा सरसत्वाची वाण अलङ्कारांनीच भरून काढण्यांत येते, तेव्हाच अलङ्कारिकांना इशारत द्यावी लागते. पञ्चमहाकाव्यांसारख्या संस्कृत काव्यांतील कविता महाभारत, रामायण व आंग्लभाषा किंवा ज्ञानेश्वर, तुकाराम यांच्या कवितेबरोबर वाचावी म्हणजे जगन्नाथासारख्या मार्मिकाने २००।३०० पानें केलेल्या अलङ्कारचर्चे-पेक्षा, रवीन्द्रनाथांच्या सूक्ष्म मनोवगाहित्वाने जर हृदयाचे तरंग छेडले असते तर किती मौज झाली असती असें म्हटल्याशिवाय राहवत नाही. तात्पर्य, रसाचें सौंदर्य व महत्त्व निरपेक्ष आहे व अलङ्कारांचें तेंच सापेक्ष आहे हाच सिद्धांत केव्हाहि निरप-वाद राहील असें आमच्या अल्प बुद्धीस वाटतें. असो.

अलङ्कारांच्या महत्त्वांतूनच अलङ्कारांच्या संख्येचा प्रश्न पुढे येतो. पूर्वग्रंथकारां-पेक्षा आपण कांहीं तरी नवी शकल काढली या बुद्धीने उत्तर आलङ्कारिकांनी कित्ये-कदा नवीन अलङ्कार मानले आहेत. जगन्नाथ व नागेश यांनी अलङ्कारांची संख्या छाटण्याचा पुष्कळ प्रयत्न केला आहे व तो यथायोग्यच आहे. तथापि, जुन्याच्या कित्येक अभिमान्यांस ही गोष्ट पटणार नाही. शिवाय, संस्कृतांत आता कोणी आणखी अलङ्कारांची भर घालील असें नाही. तेव्हा मराठींत आपण ही संख्या किती मानावी याचेंच महत्त्व जास्ती आहे. या दृष्टीने कित्येक अलङ्कारांचीं भाषान्तरित उदाहरणें न घेतां निवळ मराठी कवितेंत ते अलङ्कार नसतील तर त्यांस फाटा देण्यास हरकत असूं नये. दुसरा प्रश्न म्हणजे अनेक मुख्य मानलेल्या अलङ्कारांस एकाच अलङ्काराचे पोटभेद मानावयाचे की काय ? पण या भेदांचें अलङ्कारत्व मान्य केल्यावर तो मुख्य मानणें किंवा गौण मानणें याने संख्येचा प्रश्न सुटलासें म्हणतां येईल असें नाही. थोडक्यांत आता संस्कृतांतील अलङ्कारांची संख्या आहे तशीच राहूं द्यावी हेंच ठीक. असो.

सदरहू ग्रंथ लेखिकेने प्रदेयागमा परीक्षेस 'प्रबंध', ( Thesis ) म्हणून लिहि-लेला असूनहि तो उत्कृष्ट उतरला आहे व मराठींतील अलङ्कारांवरील 'आकर' ग्रंथ हा मान त्याला देण्यास हरकत नाही. संस्कृतांतील रसगंगाधराचें स्थान त्याला मराठींत देतां येईल. जगन्नाथाचीं उदाहरणें मात्र स्वतःचीं आहेत. पण प्रस्तुत लेखिकेची विवे-चनशैली जगन्नाथाप्रमाणेच तर्ककर्कश व सूक्ष्म आणि व्यापक आहे. भाषेचा ओघ

अस्खलित व गंभीर असून न्यायाधीशाप्रमाणे मुद्द्यांचा भराभर विचार करून प्रश्न निकालांत काढण्याची शैली प्रशंसनीय आहे. वाक्यें लहान व सुटसुटीत असल्यामुळे अवच्छिन्न–अवच्छेदकांनी मस्तक छिन्नभिन्न करणाऱ्या भाषापद्धतीनेच तार्किक विचार केला पाहिजे ही समजूत लटकी पडते. मात्र क्वचित् मराठी व्याकरणाच्या दृष्टीने चुका आहेत. उ० पान २० वर. 'पण पुढे अलङ्कार वाढूं लागल्यावर विशिष्ट अलङ्कारांना विशिष्ट क्षेत्र नेमून दिलें गेलें व अलङ्कार-विभाग पाडले.' या वाक्याच्या अखेरीस 'अलङ्कारविभाग पाडले' याच्या ऐवजी 'पाडले गेले' असें पाहिजे. पा. २८९ वर 'उपमाप्रपंचांत घातल्यामुळेच वामनाची आक्षेप व विशेषोक्ति यांच्या व्याख्या इ०' या वाक्यांत 'वामनाची' या एकवचनाऐवजी 'वामनाच्या' असें अनेकवचन पाहिजे. असो.

ग्रंथकारापासून काय मिळालें आहे तें पाहिल्यावर आणखी पाहिजे असलेला वरप्रसाद मागून ठेवण्यास हरकत नाही. ग्रंथ लिहिणें व त्याहूनहि तो प्रसिद्ध करणें हें पैशामुळे फार कठीण असतें हें खरें; तथापि, उणीव कशाची आहे हें बोलून ठेवण्यास हरकत नाही. या दृष्टीने निवळ मराठी कवितांतून निरनिराळ्या अलङ्कारांचीं प्रत्येकीं १०।१५ उदाहरणें देणारा असा उदाहरणांच्या संग्रहाचा एखादा ग्रंथ अवश्य आहे. कारण व्याख्यांच्या चिकित्सेपेक्षा किंवा तीनंतर उदाहरणांनीच अलङ्कारांची खरी मौज समजते. असो. प्रस्तुत ग्रंथ लिहून मराठी साहित्यशास्त्राच्या मन्दिराच्या एका प्रमुख व भव्य दालनाची सुंदर उभारणी करून आपल्या मातृभाषेंत एका अभियुक्त ग्रंथाची भर घातल्याबद्दल लेखिकेचें अभिनंदन करून हें परीक्षण पुरें करितों.

वि. ह. निजसुरे

# शुद्धिभ्रमखंडननिरास



(लेखक-गो. कृ. मोडक)

(मागील अंकावरून समाप्त)

(ग) **आभासनिरास**—नेत्र–नेढें, अष्ट–आठ इत्यादि शब्दांतील रूपांतरें मराठीच्या शीलास अनुसरून आहेत. तर चरित–चरित्र, संपुट-संपुष्ट इत्यादि रूपांतरें गैरसमजुतीने सोप्याच्या स्थानीं कठीण आल्यामुळे दोषार्ह आहेत. एवं रूपांतरें द्विविध ठरतात, मराठीच्या शीलास अनुरोधी व विरोधी. पैकीं अनुरोधी रूपांतरांची चर्चा त्यांचे इष्टत्व ठरविते, तर विरोधी रूपांतरांची चर्चा त्यांचें त्याज्यत्व प्रतिपादिते. 'पदरीं पडलें, पवित्र झालें' या पौरुषहीन प्रवृत्तीस अनुसरून सर्वच रूपांतरें कोणी पसंत करील; तर कोणी इष्टांचें समर्थन व अनिष्टांचें खंडन करील. भाषेंत अनिष्ट रूपांतरें राहणें किंवा तीं भाषेंतून लोपणें, हें कांही अंशीं सरकारच्या म्हणजे शाळाखात्याच्या व कांही अंशीं जनतेच्या स्वाधीन आहे. अर्थात् अनिष्ट रूपांना गचांडी देणें, माझ्यासारख्याच्या हातची गोष्ट नाही. खंडनकारासारख्यांनी इष्टानिष्ट लिखित रूपें सारासार विचार न करितां खुशाल स्वीकारावीं. त्यांना प्रतिबंध कोण करणार? बॅ. सावरकर हजर या यवनी शब्दाच्या स्थानीं उपस्थित (किंवा संनिहित) शब्द योजावा म्हणून वारंवार सांगत असतांहि त्या शब्दाचा स्वीकार न करणारे हरीचे लाल आहेतच की नाही?

१३. (क) **विधान**—'आजपासून मरेपर्यंत' याअर्थी हल्ली योजण्यांत येणाऱ्या **आजन्म** शब्दाचें स्थानीं **आजीव** शब्द योजावा. कारण, आजन्म याचा अर्थ जन्मापासून किंवा कदाचित् 'जन्मापर्यंत' असा होईल. पण मरेपर्यंत हा विवक्षित अर्थ त्याने लक्षणेशिवाय द्योतित होणार नाही.

(ख) **खंडनाभास**—जन्म याचा अर्थ जीवितावधि असा घेतां येईल. असे प्रयोगहि संस्कृत व मराठी या उभय भाषांत आहेत. करितां आजन्म हा शब्द विवक्षितार्थबोधक आहे. अर्थात् त्यास सदोष ठरविण्यांत रा. मोडक फार घसरले आहेत.

(ग) **आभासनिरास**—जन्म याचा अर्थ जीवितावधि असा सिद्ध करण्यास, खंडनकारांनी बरींच उदाहरणें दिलीं आहेत. पण या उदाहरणांची मुळीच जरूर नाही. जन्म याचा अर्थ लक्षणेने जीवितावधि केव्हाहि होईलच. येथे प्रश्न असा की, जीवितावधि हा ज्याचा मुख्यार्थ आहे असा जीव शब्द आजीव अशा समासांत न योजतां, जन्म असा का योजावा? प्राथमिकार्थबोधक शब्द असतांना, मुद्दाम इतर शब्द योजून, त्याचा लाक्षणिक अर्थ धरून निर्वाह करण्याचा द्राविडी प्राणायाम योग्य नाही. लक्ष-

णेचा आश्रय करावा लागतो (व तो योग्य कारणाशिवाय)· याचाच अर्थ शब्दाच्या सदोषत्वाची स्वीकृति. उत्तम पक्ष म्हणजे शब्दाने केव्हांही श्रुतमात्र होतांच विवक्षितार्थ बोधित केला पाहिजे. विवक्षित अर्थाची विलंबोपस्थिति ही दोषास्पदच होय. भव याचे स्थानीं भवानीपति हा शब्द योजिल्याने, भव हाच अर्थ व्यक्त होतो. पण तो अर्थ व्यक्त करण्यास उच्चारितपूर्व भव शब्दाला आणखी जोड देऊन वाचकाचा घोटाळा मात्र होतो. भव एतद्बोधितच अर्थ जर सांगावयाचा, तर भवानीपति एवढें लंबें रूप कशाला? ज्याअर्थी रूप वाढविलें आहे, त्याअर्थी भवाहून इतर व्यक्ति बोधित होत असावी, अशी अनिष्ट शंका वाचकाचें मनांत येते. अशाच रीतीने आजीव हा शब्द इष्टार्थाचा बोध करण्यास सिद्ध असतांना, त्याचें स्थानीं आजन्म शब्द योजिल्याने कांही तरी निराळा अर्थ विवक्षित असावा, अशी शंका मनांत येते. आजीव म्हणजे जीविता-वधिभर, संपूर्ण आयुष्य व्यापून; तेव्हा आजन्म या शब्दाने कांही तरी निराळा अर्थ विवक्षित असला पाहिजे, असा तर्क मनांत येऊन, त्याचा अर्थ सामान्यतः 'जन्मा-पासून' असा होतो. लक्षणेचा आश्रय करावा तेव्हाच, म्हणजे 'सिद्धस्य गतिश्चिन्त-नीया' या वचनानुसार, म्हणजेच अनिर्वाह पक्ष म्हणून, आजन्म याचा अर्थ आजीव असा करावा लागतो. अर्थात्, जो शब्द श्रुतमात्र होतांच इष्टार्थ व्यक्त करितो तो शब्द चांगला, की जो शब्द आपला मुख्यार्थ सोडून लक्षणेचा आश्रय करूनच इष्टार्थ बोधित करितो तो चांगला, याचा निर्णय वाचकांनीच करावा. 'वैद्याने त्या रोगी स्त्रीचें पाणिग्रहण करून नाडी पाहिली' यांतील पाणिग्रहण हा शब्द मी सदोष म्हटल्यास खंडक म्हणणार पाणिग्रहण शब्दाचा (प्रथमोपस्थित) विवाह हा अर्थ सोडून (विलंबो-पस्थित) 'हातास स्पर्श करणें' हा अर्थ घ्यावा, व पाणिग्रहण हा शब्द येथे शुद्ध मानावा. अर्थाचा बोध विलंबाने करणाऱ्या शब्दापेक्षा, तो अर्थबोध जो शब्द तत्काल करील तोच केव्हाहि चांगला. जन्म म्हणजे जन्म. म्हणून आजन्म याचा प्रथमोपस्थित अर्थ 'जन्मापासून' असा होतो, व विलंबोपस्थित अर्थ 'आयुष्यभर' असा होतो. हाच उक्त-रोक्त विवक्षित अर्थ आजीव शब्दाने तत्काल उपस्थित होतो. अर्थाची तत्कालोप-स्थिति व विलंबोपस्थिति यांतील सरसनिरसपणा वाचक जाणतीलच.

१४. (क) **विधान**—कला हा शब्द चंद्रबिंबाच्या सोळाव्या अंशाचा वाचक आहे· चंद्र कलांनीयुक्त झाल्याने तो पूर्ण होतो. या गोष्टीस अनुलक्षून सकल याचा अर्थ पूर्ण असा भाषेंत प्रवृत्त झाला.

(ख) **खंडनाभास**—सकल म्हणजे पूर्ण हें समीकरण सिद्ध करण्यास चंद्रा-कडे जाण्याचें कारण नाही. कला म्हणजे 'कोणताहि अंश' असा अर्थ कोशकारांनी दिला आहेच.

(ग) **आभासनिरास**—अमका अर्थ कोशकारांनी दिला आहे, एवढें पाहूनच त्यावर संतोष मानणारे लोक पाहून त्यांची कींवच करावीसें वाटतें. **दृश्याच्या पली-कडे काय?** ही अंतर्बुभुत्सा ज्याजवळ नाही, त्याने शब्दशास्त्राच्या चिकित्सेची चर्चा

न केलेलीच बरी. सकल याचा अर्थ पाहण्यास खंडनकारांनी कला शब्द तरी कां पहावा! सकल म्हणजे सगळा असा अर्थ कोणत्याहि संस्कृत–मराठी कोशांत सांपडेल. कोशकारांचें वाक्य म्हणजे ब्रह्मवाक्य; त्याने तो अर्थ कोठून आणला, इ. अन्वेषणाचा प्रयत्न चिकित्सकांनी अवश्य केला पाहिजे. खंडनकारच लिहितात, कला याचा अर्थ 'सोळावा अंश' असा आहे व 'कोणताहि अंश' असा आहे. येथेच विचारी मनुष्य आपणास असा प्रश्न करील की, या दोन अर्थांत काय संबंध आहे? विशेषसामान्यसंबंध या अर्थांत दिसून येत नाही काय? असा विचार केल्यास कोणाहि विद्वानास सकल या शब्दास संपूर्ण हा अर्थ देण्यांत चंद्रबिंबाचा विचार करणें सर्वस्वी अवश्य असेंच वाटेल. एक सदृश उदाहरण घेऊं–मुलगा म्हणतो 'मीं सबंध प्रश्नपत्रिका सोडविली', 'गाईने गवताची सबंध पेंढी खाल्ली.' येथे दोन्ही ठिकाणीं सबंध याचा अर्थ पूर्ण असाच आहे. सबंध याचा अवयवार्थ बंधा-सहित असा आहे. गवताच्या पेंढीचा बंध गवताचाच असतो. तेव्हा त्या पेंढीसंबंधाने सबंध म्हणजे संपूर्ण हा अर्थ अवश्यशः सिद्ध होतो. पण प्रश्नपत्रिकेला बंध असतो काय? नाही. मग तदभावीं सबंध हे विशेषण तिला कसे लागणार? गवताच्या पेंढीच्या उदाहरणांत सबंध म्हणजे संपूर्ण हें जें समीकरण सिद्ध झालें, तें भाषेंत रूढ होऊन बसलें. ही माझी विचारसरणी निर्मत्सर अशा मनुष्यास पटेल. पण खंडनकार म्हणणार 'हा काय खटाटोप! सबंध म्हणजे संपूर्ण हा अर्थ तर कोशांत आहेच.' अशांचें समाधान कसें करणार? अल्पानें संतुष्ट आणि अल्पाने असंतुष्ट यांचें जमणेंच शक्य नाही.

१५. (क) **विधान**—कानाडोळा करणें म्हणजे दुर्लक्ष करणें. हें समीकरण भाषेंत रूढ होण्यास इसापनीतींतील एकडोळ्या हरिणीची गोष्ट कदाचित् आधारभूत असेल.

(ख) **खंडनाभास**—वरील समीकरण भाषेंत रूढ होण्यास एखाद्या गोष्टीचें कारण नाही, लक्षणेनेच निर्वाह होईल.

(ग) **आभासनिरास**—ज्या त्या ठिकाणीं 'लक्षणेने निर्वाह करूं पाहणें म्हणजे तत्वजिज्ञासेच्या मुळावरच कुऱ्हाड घालणें होय. विवक्षित अर्थाचें समर्थन उपायांतराने नच झाल्यास अनिर्वाहपक्ष म्हणूनच केवळ लक्षणेचा अवलंब करावा. खंडकांची दृष्टि सर्व काम लक्षणेनेच भागवावयाची आहे. आपापली दृष्टि धरून ठेवण्यास जो तो स्वतंत्र आहे.

## भाग ३ रा.

१ **एक आरोप**—रा. निजसुरे म्हणतात 'लक्षणेचीं उदाहरणें म्हणून गंगायां घोषः, आयुः घृतं, अशीं उदाहरणें रा. मोडकांनी द्यावयास हवीं होतीं.' उदाहरणें कोणतीं घ्यावीं व कोणतीं न घ्यावीं, हा ज्याच्या त्याच्या आवडीचा प्रश्न आहे. बेडकाला कूपामध्ये किनाऱ्या-किनाऱ्याने पोहणें, उड्या मारणें वगैरे आवडतें; माशांना नदींत पोहणें आवडतें; तर मगरांना अफाट दर्यामध्ये विहार करणें आवडतें. हा

भेद निसर्गनिर्मित आहे. याबद्दल बेडूक व मगर यांनी परस्परांस नांवें ठेवण्याचें कारण नाही.

२ रा. महादेव हरि म्हणजेच अण्णासाहेब मोडक यांसहि सुचवावेसें वाटतें कीं, तुम्ही आपल्या थोर मनास अनुसरून मोडक व निजसुरे या दोन्ही पक्षांच्या मतांबद्दल आपली प्रशस्ति व्यक्त केली आहे. पण सामाजिक व्यवहारांतील सर्वच गोष्टी शास्त्रीय वादांत उपयुक्त ठरत नाहीत. 'रामाय स्वस्ति, रावणाय स्वस्ति' अशा प्रकारची मोघम भाषा शास्त्रास संमत नाही. 'मोडक हरो वा निजसुरे हरो' याची विशेष किंमत नाही. शास्त्रीय सत्य,–निर्विकल्प शास्त्रीय सत्य, कोणाच्या मतांत आहे, हें आपण स्पष्ट सांगावें. शास्त्रदृष्टि ही नेहमी निर्णयकर्कशच असली पाहिजे.

३ उपसंहार—भाषाशुद्धीकरणासंबंधी माझीं मतें वर्ष २,–अंक ३,–मध्ये दिलीं आहेत, त्यांहून नवीन असें आज कांही सांगितलें नाही. तरी पण हा एवढा खटाटोप रा. निजसुरे यांच्या सूक्ष्मदर्शित्वाच्या अभावामुळे घडला. आपण लिहावें एका भावनेने व वाचक भेटावा विरुद्ध भावनेचा; म्हणजे असाच प्रकार व्हावयाचा. याबद्दल तक्रार कोणाकडे करणार ? ईश्वराकडे. हीच तक्रार पुढीलप्रमाणे करून हा लेख संपवितों.

इतरतापशतानि निजेच्छया वितर तानि सहे चतुरानन ।<br>
अपटुदक्षु तु तत्त्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख ॥

---

# महाराष्ट्र-साहित्य संमेलनाचें अभ्यासक्रममंडळ

या मंडळाची बैठक पुणें येथे भा. इ.सं. मंडळांत ता. २४-६-३२ रोजीं झाली. सभासदांपैकी रा. ना. गो. चापेकर ( अध्यक्ष ); प्रो. वा. म. जोशी, प्रो. द. वा. पोतदार व प्रो शं. दा. पेंडसे उपस्थित होते. रा. जामेकर लोकशिक्षणाचे संपादक यांस नवीन सभासद करून घेण्यांत आलें. नंतर मॅट्रिकपासून एम्. ए. पर्यंतच्या परीक्षांच्या मराठीच्या प्रश्नपत्रिकांची संख्या व त्यांचे विषय खालीलप्रमाणे ठरविण्यांत आले.

१ मॅट्रिक, प्रीव्हिअस् व इंटर या परीक्षांना प्रत्येकीं गद्य व पद्य अशा दोन दोन प्रश्नपत्रिका असाव्या.

२ बी. ए. च्या पास कोर्सला चार प्रश्नपत्रिका असाव्या. आणि ऑनर्स कोर्सला या चार आणि अधिक तीन मिळून सात प्रश्नपत्रिका असाव्या.

३ एम्. ए. ला आठ प्रश्नपत्रिका असाव्या.

४ मराठी विषयांतील एम्. ए. च्या प्रश्नपत्रिका सोडविण्याऐवजीं संशोधनात्मक प्रबंध लिहूनहि एम्. ए. होतां यावें.

५ बी. ए. च्या पास कोर्सच्या चार प्रश्नपत्रिकांचे विषय:- ( १ ) गद्य ( २ ) पद्य ( ३ ) निबंध ( ४ ) विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर, न. चिं. केळकर, खाडिलकर, पांगारकर, कोल्हटकर, वा. म. जोशी, आपटे व गडकरी यांपैकी एक ग्रंथकार.

टीपः— ज्या विद्यापीठांत बी. ए ला इंग्रजीसुद्धा एकंदर तीन विषय घ्यावे लागत असतील तेथे मराठी विषयाला पहिल्या तीनच प्रश्नपत्रिका असाव्या व चौथीचा समावेश एम्. ए. च्या सहाव्या प्रश्नपत्रिकेंत करावा.

६ बी. ए. ऑनर्सच्या वरील चार प्रश्नपत्रिकांशिवाय अधिक असणाऱ्या तीन प्रश्नपत्रिकांचे विषय ( ५ ) संस्कृत-प्राकृत, ( ६ ) निबंध, नाटक किंवा कादंबरी यांपैकी एक वाङ्मय प्रकार व ( ७ ) प्राचीन गद्य किंवा पद्य.

७ एम्. ए. च्या आठ प्रश्नपत्रिकांचे विषयः— ( १ ) गद्य ( २ ) पद्य ( ३ ) कोणत्याहि एका कालविभागांतील गद्य आणि ( ४ ) पद्य ( ५ ) कोणताहि एक वाङ्मय प्रकार ( ६ ) एक जुना ( किंवा नवा ) ग्रंथकार ( ७ ) संस्कृत प्राकृत ( ८ ) भाषाशास्त्र.

वरील परीक्षानुसार तयार केलेली मराठींतील अभ्यासयोग्य पुस्तकांची कच्ची यादीः—

## मॅट्रिक

### गद्य

१ रासेलस-कृष्णशास्त्री चिपळुणकर

२ वाचन-भाटे

३ मुलांस उपदेश-आपटे

४ नानांचा अधिकारयोग-खरे

५ चांदण्यांतील गप्पा-काशीबाई कानिटकर

६ बाजीरावाचें चरित्र-बापट

७ धोममहाबळेश्वर वर्णन-उदास

८ माझें व्यापक शिक्षण } गुणाजी
९ आत्मोद्धार } गुणाजी

१० दादाभाई नौरोजी यांचें चरित्र-फडके

११ महात्मा गांधीचें चरित्र-अवंतिकाबाई गोखले

१२ आनंदीबाई जोशी-काशीबाई कानिटकर

१३ भाटे यांचीं प्रवासवर्णनें

१४ माझा युरोपांतील प्रवास-डॉ. गुणे
१५ इ. सं. राजवाडे यांचें चरित्र-साने
१६ हेन्री फोर्ड-पेठे
१७ अशोकाचें चरित्र-वा. गो. आपटे
१८ जातक कथा-जोशी
१९ तेरा भिक्षुणी रत्नें-भागवत
२० माझा प्रवास (१८५७ ची हकीकत)—गोडसे भटजी
२१ वासुदेवशास्त्री खरे यांचीं नाटकें
२२ हरिभाऊ आपटे यांच्या संक्षिप्त कादंबऱ्या
२३ प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांच्या ग्रंथांतील निवडक वेचें

### पद्य

१ प्राचीन व अर्वाचीन कवींच्या काव्यांतील सोपे व सुसंघटित वेचें

## प्रीव्हिअस् आणि इंटरमीजिएट्

### गद्य

१ विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र—चिपळूणकर
२ बाजीरावाचें चरित्र-बेहेरे
३ चक्रवर्ती नेपोलिअन-भावे
४ श्रीकृष्ण चरित्र } वैद्य
५ श्रीराम चरित्र } वैद्य
६ आमच्या आयुष्यांतील आठवणी-रानडे
७ विष्णुशास्त्री यांचे वाङ्मयविषयक निबंध
८ मौजेचे चार प्रहर-न. चिं. केळकर
९ महाराष्ट्र-वाङ्मय-ओक
१० निबंधलेखन आणि अनुवाद-प्रो. केळकर
११ मराठी वाङ्मयाचा अभ्यास-आपटे
१२ मराठी भाषेचे वाक्प्रचार आणि म्हणी-भिडे
१३ वेणीसंहार } परशुराम तात्या गोडबोले
१४ उत्तरराम चरित्र } परशुराम तात्या गोडबोले
१५ महाराष्ट्र-शाकुंतल-गोडबोले
१६ सुदाम्याचे पोहे-कोल्हटकर
१७ हरिभाऊ आपटे यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या
१८ खाडिलकरांचीं गद्य नाटकें
१९ गॅरिबाल्डीचें चरित्र-न. चिं. केळकर
२० कान्हूर ऊर्फ इटलीचा रामदास-मुंडले

### पद्य

१ रुक्मिणी स्वयंवर-एकनाथ
२ श्लोक केकावली } मोरोपंत
३ गदापर्व } मोरोपंत
४ मंत्ररामायण } मोरोपंत
५ मनाचे श्लोक-रामदास
६ नीति-वैराग्य शतकें व इतर स्फुट प्रकरणें } वामन
७ नल-दमयंती स्वयंवर-रघुनाथ पंडित
८ गंगावर्णना-चिंतामणि पेठकर
९ बाष्पांजलि-आगाशे
१० पदवीचा पाडवा-मोगरे
११ नाना फडणीस काव्य-राधारमण
१२ राष्ट्रीय कविता-बेहेरे
१३ विदर्भ वीणा
१४ विनायकाची कविता
१५ महाराष्ट्र शारदा

## बी. ए.

### गद्य

१ भाऊसाहेबांची बखर
२ आगरकरांचे निबंध
३ गद्यगुच्छ-केळकर
४ साहित्यसंग्रह-परांजपे
५ लो. टिळक यांचें चरित्र खंड १ -केळकर
६ आपटे यांच्या सामाजिक कादंबऱ्या
७ दुर्दैवी रंगु-वैद्य
८ केळकर यांचीं नाटकें
९ गडकरी यांचीं नाटकें
१० खरे यांचे ऐतिहासिक लेखसंग्रहाचे खंड
११ काव्य आणि काव्योदय-पटवर्धन

१२ काव्यचर्चा
१३ काव्यविचार–रविकिरणमंडळ
१४ लेखनकला व लेखन व्यवसाय–आपटे
१५ प्रतिमा साधन–फडके
१६ सुभाषित आणि विनोद–केळकर
१७ गडकरी यांचा विनोद–भावे
१८ गोविंदाग्रज–हर्षे
१९ मराठी रंगभूमि–कुळकर्णी
२० मराठी भाषेची घटना–जोशी
२१, २२ मराठीची सजावट–मुजुमदार
२३ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार–पोतदार
२४ अलंकार चंद्रिका–गोरे
२५ अर्थालंकार निरूपण–भिडे
२६ महाराष्ट्र नाटककार–गडकरी
२७ तुकाराम चरित्र–पांगारकर
२८ आधुनिक कविपंचक–माडखोलकर
२९ आगरकरांचें चरित्र–अळतेकर
३० मुक्तेश्वर चरित्र आणि काव्यविवेचन–पांगारकर
३१ अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक–खानोलकर
३२ वाटिका–वा. बा. केळकर
३३ कांचनमृग–खांडेकर
३४ गडकरी व्यक्ति व वाङ्मय–खांडेकर
३५ इतिहासविहार, ३६ आधुनिक मराठी वाङ्मय विवेचन–न. चिं. केळकर

## पद्य

१ ज्ञानेश्वरांची प्रभावळ–पांगारकर
२ ज्ञानेश्वरवचनामृत–रानडे
३ समर्थसंजीवनी–पांगारकर
४ मुक्तेश्वराचें सभापर्व
५ रुक्मिणीहरण–सामराज
६ द्रोणपर्व, ७ सभापर्व, ८ आर्या केकावली–मोरोपंत
९ यशवंतराव महाकाव्य–खरे
१० रे. टिळकांची कविता
११ केशवसुत
१२ गडकरी–गोविंदाग्रज
१३ दत्त
१४ यशोधन–पेंढरकर
१५ आनंदगीत–टेकाडे
१६ तांबे यांची कविता
१७ गोमांतक-महाराष्ट्र-भाट
१८ गोविंदकवींची कविता
१९ कमला काव्य–सावरकर–विजनवासी
२० काव्यकांतार–खापर्डे
२१ सुधारक–माधव जूलियन
२२ कांचनगंगा–गिरीश
२३ रेंदाळकरांची कविता
२४ भावतरंग–मायदेव
२५ महाराष्ट्र शारदा–केळकर
२६ सृष्टीचे बोल–बेहेरे
२७ हृदयतरंग–आपटे
२८ अभिनवकाव्यमाला

# एम्. ए.

## ( गद्य )

१ पंचतंत्र
२ राजवाडे यांच्या खंडांतील शिवकालीन खंड
३ सभासदाची छत्रपतीची बखर
४ अमात्यांचें आज्ञापत्र
५ ब्रह्मेन्द्रस्वामी धावडशीकर चरित्र आणि पत्रव्यवहार–पारसनीस
६ काव्येतिहाससंग्रह–पत्रें, यादी वगैरे
७ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड ३
८ शिवाजीचें सप्त प्रकरणात्मक चरित्र–चिटणीस
९ अनेक विद्यामूलतत्त्वसंग्रह
१० हिंदुधर्म आणि सुधारणा
११ ब्राह्मण आणि त्यांची विद्या
१२ गीतारहस्य
१३ टिळकांचे केसरींतील लेख, भाग ४
१४ मोरोपंतचरित्र आणि काव्यविवेचन–पांगारकर
१५ मयूरकाव्य विवेचन–बनहट्टी
१६ मराठे आणि इंग्रज–केळकर

१७ माझें रामायण—तुळजापूरकर
१८ रागिणी } वा. म. जोशी
१९ सुशिलेचा देव }
२० मालतीमाधव—राजवाडे

## नाटकें

२१ किर्लोस्करांचीं नाटकें
२२ देवलांचीं नाटकें
२३ कोल्हटकरांचीं नाटकें
२४ निबंधावली } वि. शा. वि. गुर्जिली
२५ निबंधसंग्रह }
२६ नाट्यशास्त्र—केतकर

## मराठी वाङ्मयाचा इतिहास.

२७ महानुभावादि मराठी वाङ्मय
२८ महाराष्ट्रसारस्वत
२९ मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड १—पांगारकर

## भाषाशास्त्र

३० वैद्य यांचे निबंध व भाषणें
३१ ज्ञानेश्वरीची प्रस्तावना } राजवाडे
३२ ज्ञानेश्वरीचें व्याकरण }
३३ प्रौढबोध व्याकरण—जोशी
३४ शास्त्रीय मराठी व्याकरण—दामले
३५ व्याकरणावरील निबंध—चिपळुणकर
३६ भाषाशास्त्र आणि मराठी भाषा—कुलकर्णी
३७ मराठी भाषा उद्गम व विकास—कुलकर्णी
३८ प्राकृत भाषेची विचिकित्सा-भागवत
३९ निबंधमाला—चिपळुणकर
४० निबंधमालेचें स्वरूप व कार्य—पांगारकर
४१ मराठ्यांचें संबंधानें चार उद्गार—भागवत
४२ न. चिं. केळकर यांचीं बडोदा, यवतमाळ व उज्जयनी येथील संमेलनांतील भाषणें.

## अलंकार व छंद

४३ काव्यालोचन—केळकर
४४ रसप्रबोध—माकोडे
४५ अलंकार मंजूषा—बाळूताई खरे
४६ अभिनव काव्यप्रकाश—जोग
४७ छंदोरचना—पटवर्धन

## निबंध

४८ इतिहास मंजिरी—आपटे
४९ हरिवंशाची बखर
५० राजवाडे यांचा रामदासावरील निबंध
५१ पेशव्यांची बखर
५२ निवडक लेख—ना. गो. चापेकर
५३ महाराष्ट्र-धर्म-भट
५४ संस्कृत कविपंचक—चिपळुणकर
५५ संकीर्ण लेख—डॉ. केतकर
५६ डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्या
५७ ज्ञानेश्वर चरित्र आणि काव्यविवेचन —पांगारकर
५८ एकनाथ ,, ,, ,, ,,
५९ महाराष्ट्र नाट्यकला व नाट्यवाङ्मय—दंडवते

## पद्य

१ ज्ञानेश्वरी
२ शिशुपालवध
३ वच्छहरण
४ ऋद्धिपूरवर्णन
५ विवेकसिंधु
६ नामदेव—आजगांवकर
७ एकनाथी भागवत
८ एकनाथी रामायण
९ आदिपर्व—मुक्तेश्वर
१० दासबोध
११ रामदासाची कविता
१२ करुणाष्टकें
१३ तुकाराम वचनामृत रानडे
१४ यथार्थदीपिका—वामन पंडित
१५ समर्थप्रताप
१६ हरिविजय—श्रीधर
१७ भक्तिविजय—महिपति
१८ कृष्णविजय—मोरोपंत
१९ आदिपर्व—मोरोपंत
२० देवनाथाची-कविता—साठे
२१ दयाळनाथाची कविता—साठे
२२ विठ्ठलाचें रुक्मिणीहरण
२३ मध्वमुनीश्वराचीं पदें
२४ निरंजन माधवाची कविता
२५ निळोबाची गाथा
२६ ऐतिहासिक पोवाडे—य. न. केळकर

२७ रामजोशी
२८ प्रभाकर
२९ होनाजी बाळ
३० अनंत फंदी
} यांच्या लावण्या

### आपटे यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या

१ उष:काल
२ सूर्योदय
३ मध्यान्ह
४ सूर्यग्रहण
५ वज्राघात
६ कालकूट
७ चंद्रगुप्त
८ केवळ स्वराज्यासाठीं
९ गड आला पण सिंह गेला
१० म्हैसूरचा वाघ

### डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्या

१ आशावादी
२ गोंडवनांतील प्रियंवदा
३ परागंदा
४ ब्राह्मणकन्या
५ गांवसासू

### वा. म. जोशी

१ रागिणी
२ नलिनी
३ सुशीलेचा देव
४ नवमल्लिका
५ आश्रमहरिणी

### कोल्हटकरांचीं नाटकें

१ जन्मरहस्य
२ प्रेमशोधन
३ सहचारिणी
४ मतिविकास
५ मूकनायक
६ वीरतनय
७ परिवर्तन
८ शिवपाविश्य
९ श्यामसुंदर
१० श्रमसाफल्य

### न. चिं. केळकर यांचीं नाटकें

१ अमात्यमाधव
२ कृष्णार्जुन युद्ध
३ वीरविडंबन
४ चंद्रगुप्त
५ तोतयाचें बंड

### वासुदेवशास्त्री खरे यांचीं नाटकें

१ गुणोत्कर्ष
२ तारामंडळ
३ शिवसंभव
४ सत्त्वपरीक्षा
५ उग्रमंगल

### आपटे यांच्या सामाजिक कादंबऱ्या

१ जग हें असें आहे
२ पण लक्ष्यांत कोण घेतो
३ भयंकर दिव्य
४ मधली स्थिति
५ मायेचा बाजार
६ कर्मयोग
७ गणपतराव
८ मी
९ यशवंतराव खरे
१० रूपनगरची राजकन्या

### खाडीलकरांचीं नाटकें

#### गद्य

१ कांचनगडची मोहना
२ कीचकवध
३ प्रेमध्वज
४ बायकांचें बंड
५ भाऊबंदकी
६ सवाई माधवरावाचा मृत्यु

#### संगीत

१ द्रौपदी
२ मानापमान
३ स्वयंवर
४ मेनका
५ विद्याहरण

### विनोदी वाङ्मय

१ सुदाम्याचे पोहे
२ संपूर्ण बाळकराम–गडकरी
३ थालीपीठ–मराठे
४ कॅ. लिमये
५ प्रो. चिंतामणराव जोशी
६ बोचट बाण–बेहेरे

# साभार पोंच

**स्वातंत्र्य कथा** :— ( ले. प्र. श्री. ना. हुद्दार, नागपूर, किं. ४ आणे अभिनव-ग्रंथमाला पुष्प १४ वें) ' अभिनव-भारत' साप्ताहिकांतील अमेरिका, आयर्लंड, कोरिया इ. प्राच्य व पाश्चात्य राष्ट्रांनी मिळविलेल्या स्वातंत्र्याच्या इतिहासाचें पुनर्मुद्रण.

**मधुसंचय**:— ( संग्राहक वासुदेवसुत कारेकर; प्र. भारत कविमंडळ, कोल्हापूर, किं. ६ आणे ) विविधपद्यमालेंतील ८ वें पुष्प.

**नर्मदा**:— ( ले. प्रभाकर केशव ठोसर, प्र. समाज-गौरव ग्रंथमाला, ३०७ ठाकुरद्वार, मुंबई २; किं. १। रु. ) भाव आणि मंडळी, बुकसेलर्स, मुंबई यांनी नवीनच काढलेल्या समाज-गौरव ग्रंथमालेंतील पहिलें पुष्प. अभिप्राय सवडीनुसार.

**पूर्णेंदु मासिक**:— ( सं. व प्र. दत्तात्रेय गोविंद आपटे, भुसावळ, वा. व. २। रु. ) चैत्र १८५४ पासून हें ३० पानांचें लहान मासिक निघूं लागलें आहे. वऱ्हाड-खानदेशांतील होतकरू लेखकांना वाव द्यावा हा उद्देश वावगा नाही. तथापि वऱ्हाड न घेतां नुसता खानदेशच घेणें चांगलें. लेख, कविता, गोष्टी लहान पण सुंदर असतात. या लहान आकारांत लेखक-वाचकांची भूक न भागून तो मोठा भरीव करण्याची संपादकाला लवकरच उमेद व ऐपत यावी असें इच्छितों.

**सुबोध**:— वर्ष २ अंक ९ वा. ( सं. सां प्र. कंटक, मुरगांव हारबर (गोवा), वा. व. ३ रु. ). प्रतिपद् चंद्रकलेप्रमाणे हें गोमांतकांतलें मासिक विकास पावतांना पाहून आनंद होतो. चालू अंकांतहि नांवाजलेल्या लेखकांचे विविध विषयांवर लेख आहेत. शेवटीं केळकरप्रशस्ति-पुरवणी जोडली आहे. ' गोमांतकांत मराठी नियत-कालिकें अल्पजीवि कां ! ' यावर काही अनुभवी संपादकांचें विवेचन मननीय वाटेल. ' गोमांतकीय सुप्रसिद्ध लेखक ' या मालेंत पहिलें चरित्र श्री. द. व्यं. पै यांचें असून अशी माला निःसंशय गोमांतक साहित्याला उपयुक्त वाटेल.

—

# भंडारी लोकांच्या लग्नांतील गाणीं.

( पुढे चालू )

( संग्राहकः—विष्णु सदाशिव सोहोनी. )

महाराष्ट्र—साहित्य—पत्रिकेच्या गेल्या अंकांत ह्या लेखाच्या पहिल्या भागांत भंडाऱ्यांच्या लग्नसोहळ्याचें वर्णन दिलें होतें. यापुढे सोहळ्यांतील निरनिराळ्या प्रसंगीं म्हटलीं जाणारीं गाणीं देत आहें. गाणीं जशा म्हणतात तशींच लिहून घेतलेलीं आहेत. भाषाशुद्धीचा प्रयत्न केलेला नाही. लोक जें बोलतात ती भाषा. सामान्यतः अपरिचित अशा भंडारी बोलींमधील कांही विशिष्ट शब्दांचे अर्थ टीपांमध्ये दिले आहेत. कांही पालुपदांवर ज्या ठिकाणीं " ( २ ) " अशा खुणा आहेत ते भाग दोन दोनदां म्हटले जातात. गाण्यांत नांवें कांहीतरी परंतु भंडारी लोकांत प्रचलित असणारीं घातलेलीं आहेत. अशा ठिकाणीं नवऱ्याचें, नवरीचें अगर नातलगांचें जें नांव असेल तें घालून गाणीं म्हटलीं जातात. महाराष्ट्रांतील भाषिक व सामाजिक बाबतींतील जिज्ञासूंना खालील संग्रहाचा थोडाबहुत उपयोग होईल अशी आशा बाळगून हा लेख पुरा करतों.

## १ लग्नाचें साहित्य तयार करतांना म्हणावयाच्या ओंव्यांपैकी कांही.

मंडपाचे दारीं, घोडा खंकारला। येजमानी आला आदितनाथ ॥ १ ॥ लांबीच्या आदितनाथा छत्रीघोडे धाडा । जवळच्या चवाठ्या[१] साद घाला ॥ २ ॥ आमची वसरी[२] तेलातुपान धाली । पुरावच्या[३] आली महालक्ष्मीबाई ॥ ३ ॥ बोलवा बोलवा गांवीच्या चवघी । पांचवी गे उभी महालक्ष्मीबाई ॥४॥ हळदिन भरली वाटी दिली महालक्ष्मीच्या हातीं। उतरली घाटी गुळेंगांवची ॥ ५ ॥ उंच घाला मंडप कुड घाला जाईचा। भोवानीबाईचा जानीवसा ॥ ६ ॥ खांदावरी कुन्हाडी कुठे जातो वऱ्हाडी। मंडपाला मेढी चंदनाच्या ॥ ७ ॥ मंडपाला मेढे घालावे दुसरे । अहेरा रूसले, नवऱ्या, बहिणी तुझ्या ॥ ८ ॥ पांईचे तोडे गे देतों गे बहीणी । चल माझे मंडपीं सोभनाला[४] ॥ ९ ॥ कडू गे कारलीं, गोडी गे दुधवली । महालक्ष्मीबाईचे भांगीं विस्तारली ॥ १० ॥ सिपसी[५] गे महालक्ष्मीबाई ताम्याचे कळसे । फुलायेती घोंसे मोतीयांचे ॥ ११ ॥ महालक्ष्मीबाई गे नेसली हिरव्या रंगाचा। फूल आणूं गेली कळंबाचा ॥ १२ ॥ खळखळया नदींत सांडीला उरमल[६]। तान्हेला सरदार ढेव्या लाड ॥ १३ ॥ खळखळया नदींत सांडली पुतळी। भरतारा वाटली[७] महालक्ष्मीबाई ॥ १४ ॥ सखो गे नोवरा

---

१ एक देव २ ओसरी ३ पुरवठ्याला ४ शोभा आणण्याला ५ शिंपतेस ६ रुमाल ७ समोवती

बाजारपेठ धुंडे । खंजीराला गोंडे रेशमाचे ॥ १५ ॥ सद्याची नोवरी ढोपरा खालती । मोतियां पेळती भांगोभांगीं ॥१६॥ उंबराचां फूल नाहीं येवढ्या देशांत । महालक्ष्मीच्या केसांत उगावलां ॥ १७ ॥ महालक्ष्मीबाई यजमानीण नेसली घागरा । बसली आगरा नारळीच्या ॥ १८ ॥ महालक्ष्मीबाई यजमानीण नेसली घागरा । बसली आगरा पोफळीच्या ॥ १९ ॥ देवकी माता बोले सीता माझी ल्हान । करंदीचां पान खेळूं गेलां ॥ २० ॥ सीता माता बोले सीता माझी वाढली । पत्रिका धाडली रामचंद्रा ॥ २१ ॥ सीतेचे म्हाळके[1] बसूं घाला डाळीये[1] । पुसती कुळीये जनकाची ॥ २२ ॥ उडाला पकशीं[3] पांक[4] लागती बाभळी खुटा । रामाला हो सीता भाळीयेली ॥ २३ ॥ आगरी नारळ मलबारी खोबरां । बारक्या गे वाण्यानीं साठीयेलां[5] ॥ २४ ॥ जानकी गे वाणणी काय तुझे दुकानीं । आमचे दुकानीं सर्व सोनां ॥ २५ ॥ त्यांगे सोनीयाची करावी जतन । नवरी नोवऱ्याला पवीतर[6] ॥ २६ ॥

आजुबाजू दरवाजा । गाडी येते घोड्याची ॥ गाडी येते घोड्याची । नवऱ्या बारक्या बाळाची ॥ १ ॥ बारक्या बाळ नऊरा । तुझे बंधु कांना आला ॥ आमचा बंधु चाकरवाला । त्याचे मागुनी येती गाड्या ॥ २ ॥ आजुबाजू दरवाजा । तुझे बहिणी कां ना आल्या ॥ आमच्या बहिणी लेंकुरवाळ्या । त्यांच्या मागून येती गाड्या ॥ ३ ॥ बारक्या बाळा नऊरा । तुझे वऱ्हाडी कां नाहीं आले ॥ गेले सालीं दुकाळ पडला । गिरणींत लाविला ॥४॥ बारक्या बाळा नवऱ्या । त्यांच्या गिरणीचें नांव काई ॥ शाल मेळी आकंड बारी । गिरणीचें नांव ॥ ५ ॥

**टीपः**—पहिल्या ओंव्या देवादिकांवरून आहेत. ह्या वरील व दुसऱ्या अनेक चात्रट वर्गांतल्या आहेत. त्या लिहून घेतल्या नाहीत.

## २ कुळाला हळद लावतांना म्हणावयाचें.

अरत्यान[7] परत्यान[7] कारण[7] गेली एक वेळ गेली मंडपाशीं, [ २ ] मंडपदारचे मुरत[8]—मेढी, [ २ ] तुजेवर भार कशाचा [ २ ] माझ्यावर भार मंडपाचा [ २ ] दारीं मंडप मोतियांचा [ २ ]

ब्राह्मणांत देवदेवक ठेवतात तसें भंडाऱ्यांत कूळ ठेवायची चाल आहे. कूळ ठेऊन झालें म्हणजे सोहेर-सुतक वगैरे विघ्नांची बाधा होत नाही. कुळासाठीं कळंब, मारवेल, शिवर, पांगारा कोंच वगैरे झाडें मुहूर्तमेढीला बांधण्याची चाल आहे.

## ३ कूळ ठेवावयाच्या वेळीं म्हणावयाचें

गण यावें गणपती, । आंबे पराऱ्यास येती ॥ यादेव गेले सरतेराती । गेले कौंडळाहोपुरीं ॥ तव ते सीतेजानकेनी, । हातीं माळा घेउनी उभी ॥ एक माळ वाहाली कृष्णा गोवळ्या, । तंव ते ब्राह्मण जप बोलती ॥ हरिचंद्राची तारामती । महादेवाची

१ मागणी करणारे २ हातऱ्या ३ पक्षी ४ पंख ५ साठवला ६ पवित्र.

७, ७, ७, आजूबाजूच्या घरीं आमंत्रणासाठी, ८ मुहूर्त.

पारबती ॥ पांच पांडवांची दुरपदी । शंभुदेवाची गिरजाई ॥ निळूरायाची धनवंती । असे पांच मिळुनी ॥ नवऱ्या हळद चढविती ॥

हेंच गाणें कुळाला, देवाला हळद "चढवायच्या" वेळीं म्हणावयाचें.

## ४ देवकाशीं कांजण[1] मांडतांना म्हणावयाचें

सोन्याचे कुदळी । रुप्याची पावडी ॥ कुंभाराच्या पुत्रांनीं खणा[2] जो देखिली॥ खणा जो देखोनी । माती जो खणीली ॥ ती माती खणूनी । माऱ्या[3] दुर्ज्यांनीं ॥ मस्तकीं वाहाली । खळाचे चौकोनी ॥ खयेरी[4] टोण्यानीं । माती जो चेंचिली ॥ माऱ्या चाळण्यानीं । माती जो चाळीली ॥ सूर्याचे कीरणीं । माती जो वाळविली ॥ गंगेचें उदकीं । माती जो भिजविली ॥ ती माती भिजवूनी । माती जो मळीली ॥माती जो मळोनी । उंडा जो रंचीला ॥ उंडा जो रंचूनी । आंवा जो घातीला ॥ फात्याचे फतेरात्रीं । आवा जो निभजेला ॥ फात्याचे फतेरात्रीं । ती कांजीण निभजली ॥ ती कांजण घेऊनी । कुंभाराच्या पुत्रांनी ॥ ती कांजण घेऊनी । हिंडत धुंडत ॥ आला यजमानाचें घरीं । यजमान्या हो दादा ॥ सोड पदरींचा दाम । तुम्हां घरीं काम ॥ ते हो कांजणीचा । ती कांजणी घेऊनी ॥ देवकाशी मांडिली । देवकाशी मांडूनी ॥ केळयानीं भरीली । देवकाशी मांडूनी ॥ फोफळानी भरीली । देवकाशी मांडूनी ॥ हळखुंडांनी भरीली । देवकाशी मांडूनी॥ पानांनी भरीली। देवकाशी मांडूनी॥ पोवितरान[5] भरीली । देवकाशी मांडूनी॥

## ५ नवऱ्याची रेघ धरावयाच्या वेळीं म्हणावयाचें

सारवी सामती । कणा घाली रांगोळी ॥ पाट मांडी चंदनी । इथे बस रे माळीया[6] ॥ मंडपाचे दारीं । दिवा जळे मोराचा ॥ जांवई थोराचा । रेघ धरी ॥ रेघ जो धरीतां । वस्तरा खरखर ॥ काळीज थरथर । माळीयाचा ॥

## ६ अहेर करावयाच्या वेळीं, पगडी बांधतांना म्हणावयाचें

दारीं मंडप मोत्यांचा (२) खालीं हातरली चटकी (२) त्यावर बैसले जांवई (२) करंदुलीचा करंद पाना (२) वरमाय नेसली मोगरवाणा (२) कन्यादान करू आले मंडपादारीं, कन्यादान कायी केला (२) आंगव्येचे जोड जावया पेराव केला.

दारीं मंडप मोत्यांचा (२) खाली हातरली चटकी (२) त्यावर बैसले जांवई (२) जांवई रुसे सासरा पुसे (२) काहो जांवया रुसयेले (२) कन्यादान कायी केला (२) धोतराचा जोड जावया पेराव केला. कन्यादान करू आले मंडपादारीं.

## ७ नवरामुलगा वधूच्या घरीं आला म्हणजे म्हणण्याची कित्येक ठिकाणीं चाल आहे

तोडिली उंसाची भारी । टाकले मंडपाचे दारीं ॥ यजमानणी बाहेर येगे । दिरा

---

१ करा धरतात त्याप्रमाणे मातीचें भांडें व त्यावर नारळ २ खाण ३ म्हारऱ्या ४ खैराच्या ५ पवित्रकाने ६ न्हावी

जांवई पा[1] गे ॥ काय पाहूं हिरा जांवई । जसा येरंडाचा फोकें[2] ॥ काय पाहूं हिरा जांवई । जसा गुलाबाचा फूल[3] ॥

करंदुलीचा करंदपाना (२) वरमाय नेसली मुगेवाणा (२) ॥ कन्येदान करूं आले मंडपादारीं ॥ कन्येदान काई केला (२) । धोतराचे जोड जावया पेराव केला ॥ करंदुलीचा करंदपाना (२) । वरमाय नेसली मुगेवाणा (२) ॥ कन्येदान करूं आले मंडपादारीं ॥ कन्येदान काई केला (२) आंगरख्याचे जोड जांवया पेराव केला ॥

असेंच पुन्हा पुन्हा म्हणून पगड्यांचे जोड, आंगठ्येचे जोड इ० पेराव केला.

## ८ नवरा रुसून बसतो तेव्हा म्हणावयाचें

दारीं हातरली चटई (२) त्यावर बैसले जांवई (२) जांवई रुसे सासरा पुसे (२) काहो रुसले जांवयानों (२) ॥ धोतराचे जोड मामानीं । हलक्ट आणीले ॥

असेंच प्रत्येक वस्तूसंबंधीं जांवई म्हणावयाचा

## ९ अंतरपटावर उभीं असतांना म्हणावयाचें

मंडपीं दिवा लावा (२) । बाबा आंदग बोला (२) ॥ मंडपीं दिवा लावा ॥ दीन[4] लेकी दीन लेकी । एक परातींचें जोड (२) ॥ परातींचें जोड बाबा (२) एक भिजूनी जाती ॥ दिले घेतल्याचे (२) एकेकरतीं[5] होती ॥

मंडपीं दिवा लावापासून सुरवात करून, परातीचे जोड याच्या ठिकाणीं, कळशांचे जोड, इ० शेवटपर्यंत म्हणायचें. पुन्हा मंडपीं दिवा लावापासून सुरवात करून ताब्याचे जोड, एक समईचे जोड, एक तटाचे जोड, एक जांबाचे[6] जोड वगैरे आंदणाचे जिन्नस संपेपर्यंत म्हणावयाचें.

## १० "लगीन" लागतांना म्हणावयाचीं

नगरा भोवत्या लागल्या राई (२) । असमन फुलती हो जाई (२) ॥ राम येंचितो[7] हो कळा (२) । लक्षुमण भरीतो हो दुर्व्या[8] (२) ॥ सीता गुंफिती हो माळा (२) । लवकर लवकर गुंफा याला ॥ भरली लगनाची येला[9] । मांडीयेले अंतरपाट ॥ वर्म्यान येढलं[10] वर्मसूत । भटान बांधलं मंगळसूत ॥ जन बोले लगन लागे । इघन[11] टळे सावधान ॥

नगरा बाहीर (२) । बाबा काय वाजतो ॥ भल्याचा पुतर (२) । लेकी पर्णाया येतो ॥ पर्णाया येऊनी (२)। बाबा काई[12] आणीतो ॥ पर्णाया येऊनी। शेल्याचे पदरीं (२) ॥ लेकी खटवाचे जोड (२) । आणीतो शेल्याचे पदरीं ॥ खटवाचे जोड बाबा (२) । पहूनी जाती ॥ भल्याच्या पुतरानीं । शोधूनी घावी ॥ खेळत रांगत बाबा । सोडूनी गेली ॥

---

१ पहा २, ३. यजमानणीला आवडेल त्याप्रमाणे उपमा द्यावयाची. ४ देईन ५ कीर्ति ६ पेल्याचा. ७ वेंचितो. ८ परड्या. ९ वेळा. १० वेढिलें. ११ विघ्न. १२ काय.

असें पुन्हा पुन्हा प्रत्येक दागिन्याचें नांव घेऊन सर्व दागिने संपेपर्यंत म्हणावयाचें. दागिने—खटवा, तोडे, गोखरूं, भोंवरपाटल्या, पुतळे, तळप, कापसाखळया, नागकेतक डोईतली, हरडा इ.

आवशीचा चादणें । फात्याचा[1] सोपा[1] (२) ॥ सोप्यावर टाकीला । बाज्या[1] हो ॥ बाज्यावर पहुडला । भिवा नऊरा ॥ धोंडीबाई घालीत्ये । वारा हो ॥ वारा जो घाली । तों बापान पाहीली ॥ धोंडी माझी वरजोगी । झाली हो ॥ वरजोगी होऊनी । वराला दिली ॥ धोंडी माझी दिसते । नक्षत्र की हो ॥

दारींचा पिंपळ । सळसळ वाजे (२) ॥ तिथे खेळती । शांती नवरी (२) ॥ खेळत रांगत । बापान पाहीली (२) ॥ शांती आमची । उपर[4] झाली हो ॥ उपर होऊनी । वराला दिली. ॥ हेंच पुनः पुनः, आईनें पाहीली । भावाने पाहीली । चुलत्याने पाहीली । बहिणीने पाहीली ॥ इ० नातलगांनीं पाहिली म्हणून, " शांती आमची । उपर झाली हो ॥ उपर होऊनी । वराला दिली ॥ " इ० म्हणावयाचें.

घाटावरना आला जोगी (२) । उतरला गोरचचिंचेखालीं[5] (२) ॥ मिळवि[?] तीन धोंडे (२) । वर ठेवली चवथी चरवी (२) ॥ वाजविली मुरली पोवा[6] । नाद गेला गिरजे कानीं (२) ॥ धावत गेली आईजवळी (२) । आई मीं जातां गोसाव्याचा मठ पहायाला ॥ नको जाऊं माझे लाडके लेकी (२) । आंदण देतों गाया म्हशी (२) ॥ संग्या देतों चौघी दासी (२) । बारा वर्षां तप केला तोड्यांसाठीं ॥

## ११ चौकावर [ माच्यावर ] बसलीं असतांना म्हणावयाचीं.

चांदणें रात्रीं बाई । आंगण कोणी सिंपिलाहो [२] ॥ आंगण सिंपिला । सीता नोवरीनें बाईहो [२] ॥ आंगणांत टाकीले । मोतियाचे चौक हो [२] ॥ चौकावर बसला । येसा नवरा बाळा हो [२] ॥ ह्याचे सोहोळे कोणी । येवढे मांडिले हो [२] ॥ त्याचे सोहोळे बापान । त्याच्या मांडिले हो [२] ॥ याप्रमाणे, त्याचे सोहोळे, आईन त्याच्या मांडिले हो, भावान त्याच्या मांडिले हो इ० नातीं असतील तितकीं पुनः पुनः म्हणावयाचें.

अहो मोरा अहो मोरा [२] । तुझीं पिसां साडेबारा [२] ॥ एक दिवस गेला । रत्नागिरी सेरा[7] [२] ॥ रतनागिरीचे । अहे माळणी [२] ॥ तुम्ही पुसा हो चाळणी [२] ॥ हा मूळ कोण गे । माउलीचा [२] ॥ वर्णीबाईचे पोटीचा [२] । काशीबाईचे पाठीचा [२] ॥ फटेबाईचा भरतार [२] । येसा हो नवरा एक हिरावंत ॥

---

१ पडाटेचें. २ उजाळनें, उं ढ. ३ बाज खाट. ४ उपवर. ५ गोरखचिंच. ६ पावा, बासरी, ७ शहरा.

## १२ दागिने घालतांना म्हणावयाचीं.

सोनारा संकरसेटी[1] [२] । साळ्यावरल्या[2] वस्ती[3] कीर्ती [९] ॥ उघडा दिरबाची[4] पेटी [२] । आम्हा घरीं निकड मोठी [२] ॥ पाय भरले खटावानीं[5] । भांग भरिला मोतियानीं ॥ सोनारा संकरसेटी । साळ्यावरल्या वस्ती कीर्ती ॥ पाय भरले तोडियानीं । भांग भरला मोतीयानीं ॥

असें पुनः पुनः म्हणून,

पाय भरले खवळानीं । भांग भरला मोतींयानीं ॥ हात भरले पाटल्यांनी । भांग भरला मोतींयानीं ॥ हात भरले वाळियांनी । भांग भरला मोतींयानीं ॥ हात भरले गोखरूंनी । भांग भरला मोतींयानीं ॥ गळा भरला पुतळ्यानीं । भांग भरला मोतींयानीं ॥ गळा भरला तळपांनी । भांग भरला मोतींयानीं ॥ कान भरिले कापयानीं[6] । भांग भरला मोतींयानीं ॥ कान भरिले बाळयानीं[7] । भांग भरला मोतींयानीं ॥ डोय भरली फुलींयांनी । भांग भरला मोतींयानीं ॥ इत्यादि.

नागचाफा भूयचाफा । मधी चमेलीचा रोपा ॥ चमेलीच्या रोप्याखालीं [२] । आवडी नार उभी [२] ॥ तोडियांचा भार झाला [२] । तिला उबारा आला [३] ॥ धर्म्या रे बांधवा [२] । घाला विझवुणीं[9] वारा [२] ॥ हात घालावा अनारशांत । काढिले खटवांचे जोड ॥ लेग तूं शांताबाई । तुझा पती अजांन[10] हाई ॥ हात घालावा अनारशांत । काढिले खवलाचे जोड ॥ लेग तूं शांताबाई । तुझा पती अजान हाई ॥ असें दर दागिन्याच्या वेळीं म्हणावयाचें.

## १३ वरात निघावयाच्या अगोदर मुलीच्या घरीं लोण[11] उतरतांना म्हणावयाचें

नवऱ्या तुमची हो अस्तुरी । लोण कौतुक उत्तरी ॥ नवऱ्या तुमची हो आई । लोण कौतुक उत्तरी ॥ नवऱ्या तुमची मेव्हणी । लोण कौतुक उत्तरी ॥ नवऱ्या तुमची हो बहीण । लोण कौतुक उत्तरी ॥ नवऱ्या तुमची हो भावजय । लोण कौतुक उत्तरी ॥

असेंच पुनः लग्न होऊन ("उलगून") वधूवरें वधूच्या माहेरीं येतात तेव्हा लोण उतरतांना म्हणतात.

## १४ "करो घेऊन असता त्येचो मान"

आणा आणा गायत्रीचें शेण । धरतरे सारवण घाला ॥ आणा आणा कणो रांगोळी । धरतरे कणो जो घाला ॥ आणा आणा चंदनीपाट । करवल्ये बसकार घाला ॥ आणा आणा पांचही पाना । करवल्येची ओटी जो भरा ॥ आणा आणा पांच सुपाऱ्यो । करवल्येची ओटी जो भरा ॥ आणा आणा पांच हळखुंडां । करवल्येची ओटी जो भरा ॥ आणा आणा पांच पोळयो । करवल्ये ओटी जो भरा ॥ आणा आणा

---

१ शंकरशेटी. २ साळ्यावरल्या. ३ वस्ता. ४ द्रव्याची. ५ खटवांनी. ६ कापांनी ( एक प्रकारचा दागिना ). ७ बाळ्यांनी. ८ फुलांनी. ९ विंझण – पंखा. १० अज्ञान. ११ लोण उतरणें = लिंबलोण करणें – दृष्ट काढणें.

नारळ तांदूळ । करवल्येची ओटी जो भरा ॥ करवली सम्मान कीजो । मोत्यां जडकिली बाजो. ॥

## १५ लोण उतरतांना म्हणावयाचें.

आंबिया वनामधीं । बऱ्याफुलल्या कस्तुरी ॥ कौतुकीं लोणउतरीं । नवऱ्या तुमची अस्तुरी[1] ॥ नेसली शांबरशाल[2] । कपाळीं कुंकू लेली लाल ॥ बाशिंगें बेगडीचीं । वर काय मुखऱ्या ढाळ देती ॥ आंबिया वनामधीं । बऱ्या फुलल्याहो जाई ॥ कौतुकी लोण उतरी । नवऱ्या तुमची हो आई ॥ नेसली शांबरशाल । कपाळी कुंकू लेली लाल ॥ आंबिया वनामधीं । बऱ्या फुलल्याहो कसू ॥ कौतुकी लोणउतरी । नवऱ्या तुमची हो सासू ॥ आंबिया वनामधीं । बऱ्या फुलल्या हो केळणी ॥ कौतुकी लोण उतरीं । नवऱ्या तुमची हो मेवणी ॥ आंबिया वनामधीं । बऱ्या फुलल्याहो बाजी ॥ कौतुकी लोण उतरी । नवऱ्या तुमची हो आजी ॥

## १६ वरात जातांना म्हणावयाचें

तिन तांदळाच्या केल्या हो राशी । ववर चालला देवकापाशीं ॥

कांजीण, केळीं 'सुपाऱ्यो', 'हळखुंडा', पोवितर इ० वधू मांडीवर बसली म्हणजे पांचवेळां उसपायचें.

## १७ दार धरायच्या वेळीं म्हणावयाचीं

दारच धरुनी उभी । उभी इंद्राची रंभा ॥ अगे तूं इंद्राची रंभा । जरा मागाशी हो गे ॥ पायींचे तोडी लेगे । जरा मागाशी हो गे ॥ नइ आम्हा तोडयाचीं चाड । आम्हां भाचीची चाड ॥

वरील दोन ओळी पुनः पुनः म्हणून तोडयाप्रमाणें दुसरे अनेक दागिने देऊं करावयाचे व बहिणीने त्याची " आम्हा नई चाड " " आम्हा भाचीची चाड " असें म्हणावयाचें.

दारींच्या हो रांजणा । तुला काठच हो नाहीं ॥ बाया[3] लेकी मागूं आली । तिला ओठच हो नाहीं ॥ दारींच्या अहो केळी । तुला कोंका हो नाहीं ॥ बाया लेकीं मागूं आली । तिला खोपाच हो नाहीं ॥ दारीचे अहो केळी । तुला पानच हो नाहीं बाया लेकी मागूं आली । तिला मानच हो नाहीं ॥ इ० थट्टा.

गांवींचे हो पाटला । सर्व मिळुनी हो याहो ॥ बाया लेंक मागूं आली । तिला साकशी[4] रहा हो ॥ गांवींचे हो गुरवांनो । सर्व मिळूनी हो या हो ॥ गांवींचे फोदारा[5] । सर्व मिळून हो याहो ॥ बाया लेंक मागूं आली । तिला साकशी रहा हो ॥

---

१ स्त्री. २ पितांबर. ३ बहीण—बहिणीला बाया म्हणून हाक मारतात. ४ साक्षी. ५ फौजदारा.

# परिषद्वार्ता

घटना कमिटीच्या अहवालाबरोबर ता. २५ सप्टेंबर १९३२ रोजीं परिषदेची विशेष साधारण सभा भरेल अशी सूचना-पत्रकें सर्व सभासदांकडे पाठविलीं होती, पण नंतर परिषदेचे सन्मान्य अध्यक्ष श्रीमंत सरदार माधवराव किबेसाहेब याना त्या दिवशीं हजर राहता येत नसल्याबद्दलची त्यांची तार आल्यामुळे त्यांच्याच सांगण्यावरून ही सभा तहकूब केली व तसे केसरी, ज्ञानप्रकाश, महाराष्ट्र वगैरे वृत्तपत्रांतून जाहीर केलेंच आहे. आता ही तहकूब राहिलेली सभा ता. १६ आक्टोबर रोजीं भरणार असून त्याचीं सूचनापत्रें सर्व सभासदांकडे पाठविलींच आहेत.

-- २ --

गोव्याच्या साहित्य संमेलनात समेलनाचे चिटणीस श्री. दत्तात्रय व्यंकटेश पै यांनी जाहीर केल्याप्रमाणे संमेलनाबरोबर भरलेल्या ग्रंथप्रदर्शनासाठीं लेखक-प्रकाशकांकडून आलेलीं पुस्तकें व नियतकालिकें जीं लेखकांनी परत नेलीं व जीं स्वागत मंडळाने ठेवून घेतलीं तीं सोडून सुमारे ८०० पुस्तकें व नियतकालिकें परिषदेकडे चिटणीसाकडून नुकतींच देणगीदाखल आलीं आहेत. या देणगीबद्दल आम्ही स्वागतमंडळ व चिटणीस यांचे फार आभारी आहोंत.

प्रत्येक संमेलनाने या गोष्टीचें अनुकरण केल्यास परिषदेजवळ एक चांगला एकत्रित असा मराठी वाङ्मयावरील अर्वाचीन पुस्तकांचा संग्रह राहून त्याचा उपयोग सभासदांस व इतर लेखकांसहि चांगला होणार आहे.

-- ३ --

मागील संमेलनांचे राहिलेले अहवाल म्हणजे गोव्याच्या व हैद्राबादच्या संमेलनांचे होत. कळविण्यास आनंद वाटतो की, गोंयें संमेलनाचा अहवाल बहुतेक छापून तयार झाला आहे असें चिटणीस कळवितात. व हैद्राबादच्या संमेलनाचाहि अहवाल स्वागत-मंडळ पुण्यास छापीत आहे असें समजतें. तेव्हा कोल्हापूरच्या संमेलनापर्यंत हे दोन्हीहि अहवाल प्रसिद्ध होतील अशी आशा वाटते.

# पुस्तकपरीक्षण

**आहारचिकित्सा शिक्षकः**— लेखक--श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि बी. ए. चीफ ऑफ् औंध. प्रकाशक--नारायण बळवंत चव्हाण, ज्ञानमित्र, शनवार, पुणें.

आहार हा विषय सार्वत्रिक महत्त्वाचा आहे. मनुष्याने आपला आहार, रुची, भूक इत्यादि सहज वृत्तीवरूनच आरंभीं ठरविला असला तरी समाज-घटनेपासून त्याला कांही नियमित स्वरूप प्राप्त झालेलें आहे. हें स्वरूप कितपत योग्य आहे, त्यापासून आपलें हित झालें आहे कीं नाही, होत असल्यास तें टिकवावें आणि वाढवावें कसें, होत नसल्यास तें संपादन कसें करावें हा विचारी माणसापुढे प्रश्न उत्पन्न होतो. तो सोडविण्यास हें पुस्तक शिकवील अशी अपेक्षा प्रस्तुत पुस्तकाच्या नावावरून उत्पन्न होते. ती त्याच्या वाचनाने कितपत सफल होते याविषयीं मत देण्यापूर्वी पुस्तकाच्या एकंदर प्रतिपादनाचा सारांश येथे थोडक्यांत सादर करूं.

या पुस्तकांत २४ लहान लहान प्रकरणें आहेत. त्यांत व्यक्ति-दृष्ट्या आहार कसा ठरवावा यासंबंधी उपस्थित होणाऱ्या बहुतेक मुद्यांचा परामर्ष घेतलेला आहे. विषय प्रवेशांत आणि पुढे सुद्धा ठिकठिकाणीं सुधारणेच्या अन्नद्रव्यावर आणि ते सेवन करण्याच्या अमंगळ रीतीवर चांगलेच कोरडे ओढले आहेत. आहारद्रव्यामध्ये अग्रपूजेचा मान हवेला देऊन प्राणायाम आणि नमस्कार या व्यायामांची प्रशंसा केली आहे. अन्नद्रव्यामध्ये 'विटामीन' किंवा 'जीवनद्रव्यें' यांना आद्यस्थान देऊन आधुनिक इंग्रजी वाङ्मयांत आढळणारीं कोष्टकें दाखल केलीं आहेत. 'अमृतान्न' या विषयास एक स्वतंत्र प्रकरण दिलेलें आहे. कच्चें किंवा असंस्कृत म्हणजे अमृत अशी व्याख्या देऊन अमृतान्न हेंच श्रेष्ठ असें प्रतिपादन केलें आहे. तथापि कांही अन्नावर वाफेचा संस्कार करणें हें इष्ट आहे असें लगेच सांगून हा संस्कार देण्याचें उत्तम साधन म्हणजे कुकर असें सांगितलें आहे. सामान्यतः आरोग्याविषयी लिहितांना आहारदोष हेंच अनारोग्याचें मुख्य कारण असें सांगून योग्य आहारासंबंधी एक नियमावलि दिली आहे. शाखाहार हा मांसाहारापेक्षा श्रेष्ठ असें निश्चित मत ठिकठिकाणीं गोवून दिलेलें आहे.

ग्रंथकार श्रीमंत औंधकर यास दैववशात् उत्तम शरीरसंपत्ति लाभलेली असून ती त्यांनी चांगली प्रयत्नपूर्वक वाढविलेली आहे, ही गोष्ट सर्व विश्रुत आहे. अशा अधिकारी लेखकाने स्वतःच्या आहारविहारासंबंधाने विधाने प्रसंगवशात् ग्रंथांतून ठिकठिकाणीं सांगितलेलीं आहेत तीं वाचकांस पुष्कळच बोधप्रद होतात यांत शंका नाही. तथापि एका व्यक्तीचा अनुभव दुसऱ्यास जशाच्या तसाच कधीच उपयोगी पडावयाचा नाही. प्रथमतः त्यांतील रहस्य वेचून काढावयास पाहिजे आणि शक्य तितक्या

अधिक व्यक्तींच्या अनुभवाच्या संगतीने नियम ठरवावयास पाहिजेत. या रीतीस शास्त्रीय रीत असें म्हणतात. एकपक्षी मनुष्याचा आहार आणि दुसऱ्या पक्षी त्याचे आनुषंगिक गुण, त्याची परिस्थिति आणि त्याचे आरोग्य, बल व आयुष्य यांचे अनुभव मिळतील तितके अधिकांत अधिक जमा करून त्यांचें परस्परावलंबित्व अजमावून काढणें हें आरोग्यशास्त्राचे नियम घालून देणाराचे प्रथम कर्तव्य आहे. पाश्चात्य देशांतील सर्वमान्य ग्रंथकारांनी हें काम आगाऊ करून ठेवलेलें आहे. परंतु प्रस्तुत ग्रंथकारांनी त्याजकडे लक्ष्य दिलेलें नाही, आणि स्वतःही अशा तऱ्हेचा उद्योग केलेला नाही. आहार-घटकासंबंधी ५-२५ वर्षांपूर्वी रूढ असलेली माहिती जशीच्या तशीच पुस्तकांत उतरून दिली आहे आणि उतारा घेतानाहि कांही ढोबळ चुका केलेल्या आहेत. त्यांचा बराचसा भरणा बाराव्या प्रकरणामध्ये वाचकांस पाहावयास सापडेल. वाचकांनी हें प्रकरण मुद्दाम नजरेखालीं घालावें अशी त्यास विनंती आहे.

या बाराव्या प्रकरणाचें नांव "आहार पदार्थ आणि आहार प्रमाण" असें आहे. यांत आहार पदार्थांचे सुप्रसिद्ध रासायनिक घटक प्रोटीड, फॅट, कार्बोहाइड्रेट यांचें वेगवेगळ्या जिनसांमधील प्रमाण दाखविणारे आकडे दिले आहेत. ज्वारी-बाजरींतील प्रोटीडचे आकडे आणि शेंगदाणे व मांस यांतील कार्बोहायड्रेटचे आकडे अनुक्रमें ९, १० चे जागीं ५, १ आणि १ चे जागीं ७५, ७० असे पडले आहेत. या चुकांबद्दल लेखकापेक्षा मुद्रक किंवा प्रकाशक अधिक दोषी असण्याचा संभव आहे. हें खरें असलें तरी वाचकाचा त्यामुळे घोटाळा उडाल्या वाचून राहणार नाही. म्हणून त्याचा उल्लेख होणें अगदी जरूर आहे. शरीरवस्तु तसेंच शरीरबलही आपणाला आहारापासून मिळतें. बल किंवा चालन सामर्थ्य हें जड सृष्टीमध्ये उष्णतेपासून मिळूं शकतें. १९ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास चालनासामर्थ्य आणि उष्णता यांचें यत्ताप्रमाण प्रथमतः शास्त्रकारांनी यथासांग ठरवून घेतलें, तेव्हांपासून सामर्थ्याचे मोजमाप उष्णतेच्या रूपाने करण्याचा शास्त्रीय प्रघात पडलेला आहे. या प्रघातास अनुसरून इंग्रजी पुस्तकांमधून अन्नद्रव्यांचें उष्म-मोल देण्याची वहिवाट आहे. त्या वहिवाटीप्रमाणे प्रस्तुत पुस्तकांत आकडे देऊन त्यांचा थोडा खुलासा करण्याचा प्रयत्न केलेला आहे. परंतु तो मुळीच साधलेला नाही. " १५० तोळे उष्णतांश उत्पन्न होईल इतकें अन्न खावें " असें पुस्तकांत म्हटलें आहे. परंतु त्याचा अर्थच कांही होत नाही. ३००० उष्णतांश म्हणजे ३००० कॅलोरी असें अगोदरच्या वाक्यांत दिलें आहे. आतां हें उष्णतांश तोळ्यांनी कसें मोजावें हें मोठें गूढच आहे. तें उकलण्याकरता पुढलें वाक्य वाचावें तर तें जास्तच बुचकळ्यांत पाडतें. तें वाक्य असें " या उष्णतेने अच्छेर पाणी चांगलें उकळेपर्यंत तापेल " उकळेपर्यंत खरें पण कोठपासून ? तें समजल्याखेरीज यत्ता कशी ठरणार ? खरें पाहूं जातां ३००० कॅलोरी ( ही किलो कॅलोरी समजावी असा संकेत आहे ) उष्णतेने ३० किलोग्राम ( किलोग्राम = ८५° तोळे ) पाणी ०° पासून १००° पर्यंत तापेल असा अर्थ द्यावयास पाहिजे होता.

याच्याच पुढील वाक्यांत पण मारणाऱ्या माणसाच्या आहाराचें उष्ममोल ९००० कॅलोरी असें दिलें आहे. तेंही चुकीचें आहे. माणसाचा मोठ्यांत मोठा दैनिक आहार म्हणजे ४००० उष्ममोलाचा दिला आहे. ९००० उष्ममोलाचा आहार म्हणजे पाण्या-खेरीज ३॥ पौंडाचा हिशोब बसतो. रोजीं ३॥ पौंड निव्वळ धान्य किंवा ३॥ पौंड पेढे म्हणजे किती आहार होतो याचा वाचकांनी कल्पना करावी म्हणजे झालें. असो. याच्याच पुढे ग्रंथकाराने आहाराचें प्रमाण सारांशाने म्हणून दिलें आहे तें असें "सबब ४००० अंश उष्णता होईल इतकें म्हणजे सरासरी दोन ते अडीच पौंड अन्न खावें. शिवाय एक पौंडपर्यंत फळें. त्यांत पांच तोळे तूप, त्यांत बदाम वगैरे पौष्टिक पदार्थ असल्यास उत्तमच." यांत देखील पहिला ४००० चा आकडा ठीक आहे. पुढील पौंडाचे आकडे भरमसाट आहेत. कदाचित् त्यांत पाण्याचा समावेश असेल, परंतु तसे असल्यास तें मुद्दाम उल्लेखल्याखेरीज समाजणार तरी कसें?

आहारांतील घटकाविषयी ग्रंथकार म्हणतात "माणशीं एका दिवसांत ४ औंस प्रोटीड १५ औंस कार्बोहैड्रेट व २ औंस फॅट इतका आहार असला म्हणजे बस्स" या आहा-राचें एकंदर मान पाहिलें तर तें २१ औंस म्हणजे १॥ पौंडाच्याहि आंत बसतें असें वाचकांच्या ध्यानांत येईल. या वाक्यावरील मुख्य आक्षेप त्यांतील वर्गवारीसंबंधी आहे. येथे दिलेली प्रोटीडची यत्ता जर बरोबर असेल तर शाकाहार हा कोता आहारच ठरणार ही गोष्ट ग्रंथकारांच्या ध्यानांत आली आहे असें दिसत नाही. शाकाहारच निरपवाद श्रेष्ठ असें तर ग्रंथकारांनी जिकडे तिकडे लिहिलें आहे. तें जर खरें असेल तर दैनिक आहारांतील प्रोटीडचा आकडा त्यांनी दिला आहे त्याच्या निम्म्याहूनहि कमी करावा लागेल असें साध्या सोध्या हिशोबानी त्यांचें त्यांनाहि दिसून येईल. तें पाहण्याची त्यांनी तसदी घ्यावी म्हणजे झाले. धान्याहारांत जर २१ औंसांत ४ औंस प्रोटीड आणावयाचें तर सर्वच आहार उडीद, हरबरा किंवा भूइमूग अशा धान्याचा किंवा निवळ खव्याचा करावा लागेल. कारण त्यांतच सर्वांहून आधिक म्हणजे २०-२५ टक्के प्रोटीड असतें. हें सगळे पचनीं पडतें असें गृहीत धरलें तरी एकेक पौंड दाणे, किंवा खवा लागेल. नुसत्या गव्हाचा आहार करू म्हटलें तर ४० औंस म्हणजे २॥ पौंड कणीक खावी लागेल. बाजरी जोंधळ्याचा तर विचार सुद्धा सोडलाच पाहिजे !! धान्याहार हिणकस म्हणून ग्रंथकारांनी ठरवला असता तर त्यांच्या विधानास हरकत घेण्याचें कारण नव्हतें. परंतु त्यांनीं त्याचाच पुरस्कार केलेला आहे, म्हणून हे आक्षेप त्यांजवर येतात. त्यांनीच दिलेल्या आकड्याप्रमाणे उष्ममोल जमवावें तर घटक प्रमाण जुळत नाही आणि घटक प्रमाण जुळवावें तर उष्ममोल जमावयाचें नाही अशी आपत्ति उत्पन्न होते.

ग्रंथकारांना जर स्वतःचाच आहार उत्तम असें सुसंगीत रीत्या सिद्ध करावयाचें होतें तर त्यांनी स्वतःचा आहार त्यांतील घटकांच्या मोजमापासहित उतरून द्यावयास पाहिजे होता आणि त्यावरून निघणारें घटकप्रमाण हेंच इष्ट प्रमाण असें प्रतिपादन

करावयास पाहिजे होते. म्हणजे त्यावर निसंगतीचा आक्षेप घेण्यास जागा राहिली नसती. फक्त हा अनुभव फार मर्यादित आहे इतकाच दोष राहिला असता. परंतु तसें न करतां आकडयांच्या बाबतींत त्यांनी मांसाहारी लोकांच्या आहारावरून ठरविलेल्या इंग्रजी ग्रंथांतील आकडयावर भिस्त ठेवली म्हणून ही फसगत झालेली आहे. वास्तविक पाहतां आधुनिक इंग्रजी लिखाणहि नीट न्याहाळून पाहिलें तर त्यांत सुद्धा अल्प प्रोटीड आरोग्यावह आहे अशा विषयी सशास्त्र पुरावा सापडतो. गेल्या शतकामध्ये जेव्हा प्रथमत: आहाराची रासायनिक छाननी झाली तेव्हा ती मांसाहारी युरोपियनानी खत:च्या आहाराचीच केली. त्यावरून काढलेल्या आकडयांत ४ औंस ही प्रोटीडची योग्य मर्यादा आहे असें शास्त्रज्ञाचें मत झालें होतें. उष्ण देशामध्ये ही मर्यादा बरीच कमी केली पाहिजे असें मत त्या वेळीं देखील निघालेलें होतें. परंतु ते प्रायोगिक अनुभवाच्या कसोटीस त्यांनी लावून पाहिलेलें नव्हतें. हल्ली तें काम झालेलें असून उष्णप्रदेशांत २०,२५ टक्केपर्यंत ती मर्यादा उतरविली पाहिजे असें त्यांचेंहि मत ग्रंथांतरीं प्रकट झालेलें आहे. आकडेच उतरून घ्यावयाचे होते तर निदान या ग्रंथकारांचे तरी घ्यावयाचे होते ते प्रस्तुत ग्रंथकारांना सर्वस्वी अनुकूल असेच आहेत.

मांसाआहाराहून शाकाहार श्रेष्ठ हें जसें ग्रंथकारांचें एक ठाम मत आहे तसेंच हविष्यान्न हें उत्तम अन्न असेंही त्यांचें ठाम मत आहे. या मताच्या समर्थनार्थ त्या अन्नावर राहणाऱ्या व्यक्तींच्या आरोग्य बलादिकांचा हवाला देणें हेंच अर्थात् शास्त्रीय पद्धतीस अनुरूप होतें. परंतु तसें न करतां त्यांनी एक चमत्कारीक प्रमाण पुढे केलें आहे. म्हशीच्या तुपापेक्षा गाईचें तूप श्रेष्ठ असें त्यांनी ठरविलें आहे, आणि त्याला आधार असा दिला आहे की, शरीरांत म्हशीच्या तुपापासून मूत्राम्ल (युरिक आसिड) उत्पन्न होतें आणि गाईच्या तुपापासून होत नाही. हा शोध मात्र अजब आहे खरा. मूत्राम्ल हें रसायनदृष्ट्या नत्रघटित द्रव्य आहे आणि तूप—मग तें गाईचें असो किंवा म्हशीचें असो—हें नत्रवर्ज द्रव्य आहे. हल्लीच्या प्रायोगिक अनुभवावरून तरी निदान तुपापासून मूत्राम्ल निर्माण होणें शक्य नाही. तें शक्य झालें असल्यास पूर्वीच्यांचे अनुभव कोठे चुकले तें दाखवून देऊन नवीन अनुभव आणून देण्याची तयारी केली पाहिजे तसा स्वानुभवाचा पुरावा ग्रंथकारांनी दाखविला नाही.

सामान्यत: जगाच्या आणि विशेषत: आपल्या देशाच्या आरोग्याला उतरती कळा का लागली याबद्दल ग्रंथकारांचे मत असें आहे:—" शास्त्राची जसजशी वाढ व प्रगति होत गेली आणि रोगावर सिरमच्या वगैरे इंजेक्शन्स निघाल्या तसतशीं रोगांचाहि पण जास्त वाढ आणि फैलाव होत गेला. आपल्या देशांत नसणारे असे कांही रोग आपल्याकडे पाश्चात्य विद्येबरोबर हल्ली आलेले आहेत. या रोगांच्या वाढीचें कारण एकच असलें पाहिजे व तें हें की, आपलें आहारांत कांही तरी चुकत असलें पाहिजे खास." निर्मळ अंत:करणाने इतिहासाकडे जो पाहील त्याला वरील विधानांत सत्याचा अंश फार करून आढळणार नाही. पाश्चात्य राष्ट्रें आज निदान ३०० वर्षें

विद्यासेवेचें खडतर व्रत अंगिकारून आपल्या आरोग्याबाबत चांगली जागरूक झालेली आहेत, आणि त्यांनी या अवधींत इतर अनेक बाबतीप्रमाणे याहि बाबतींत निःसंशय पुढे पाऊल टाकलेलें आहे. चढेल तो पडेल या न्यायाने प्रगतीच्या जिन्या-वर चढतां चढतां एकाद दुसरी पायरीची घसरगुंडीहि झालेली आहे हें खरें, परंतु हेंहि तितकेंच खरें आहे की, घसरगुंडी होत आहे हें त्यांनी तेव्हाच जाणून प्रयत्नपूर्वक आपला झोक सावरलेला आहे. व्हिटामीनसंबंधी हल्लीं जो बोलबाला चाललेला आहे त्यावरून हें चांगलें निदर्शनास येण्याजोगे आहे. कृत्रिम आहाराने कांही दुष्परिणाम होतात हें दिसून येतांच त्यांनी त्याच्या प्रतीकारार्थ भगीरथ प्रयत्न चालविले आहेत. शास्त्रनिष्ठा आणि यत्ननिष्ठा या दोन गुणावर आज पाश्चात्यांनी जग जिंकलें आहे. कांही रोग पाश्चात्य विद्येच्या बरोबरच आपल्या देशांत आले आहेत असें ग्रंथकार म्हण-तात. परंतु वस्तुस्थिति अशी आहे की, ते विद्येच्या अगोदरच आलेले आहेत. पाश्चात्य विद्या आद्याप आपल्या देशांत आलेली नाही. तिची नुसती सावली पडलेली आहे.

या ग्रंथापूर्वी चारदोन पुस्तकें आहार या विषयावर झालेलीं आहेत. परंतु ती साधारण जनतेपैकी कोणीना कोणी लिहिलीं आहेत. प्रस्तुत ग्रंथाचे कर्ते हे एक विद्वान् संस्थानिक आहेत हें लक्ष्यांत आणतां सामुदायिक आहाराविषयी त्यांत कांही प्रतिपादन असावें अशी सहजच अपेक्षा होते. व्यक्तीच्या आहाराबद्दल पुष्कळ उहा-पोह झाला, परंतु त्यांतून निघालेले विचार जर आचारांत आणावयाचे तर त्यांतल्या अर्ध्या अधिक गोष्टी समाजाधीन राहतात. जनसमुदायाच्या आहारांत कोणत्या जिनसा किती किती असाव्या, त्या कशा पैदा कराव्या, यासंबंधी पुष्कळ विचार व्हावयास पाहिजे आहेत. त्याच्या अभावी जनतेच्या हातांत सत्ता येऊनहि तिचा उपयोग करतां येणार नाही. येवढयाच करता विद्या आम्हाला पाहिजे आहे. मग ती पाश्चात्या-कडून आली तरीहि कांहीं बिघडत नाही. या शाखेवर मराठींत पुस्तक नाही, आणि म्हणूनच नवीन ग्रंथ लिहिणारांनी इकडे मुद्दाम लक्ष द्यावें अशी सूचना आहे. परीक्षण विषयक पुस्तकांत या शाखेचा समावेश नसल्यामुळे आधिक लिहिणें योग्य नव्हे. असो. एकंदरींत एका अत्यंत उपयुक्त विषयाला चालना मिळण्याजोगें पुस्तक लिहून मराठी वाङ्मयांत भर घातल्याबद्दल ग्रंथकाराचे आभार मानून हे परीक्षण पुरें करतों.

म. वि. आपटे

---

# अभिप्राय

**साहित्य-तोरणः**— ( सं. ना. म. भिडे व ना. वि. देव. प्र. रा. गो. कानडे, ५४ शुक्रवार, पुणें २. किं. २॥ रुपये ) भोर संस्थानांतील लेखकांचे विविध बहुरंगी लेख— एकूण ७८, या साहित्य-तोरणांत गुंफिले असून, हें तोरण किंवा प्रवेशद्वार संस्थानाची कीर्ति व शोभा निःसंशय वृद्धिंगत करणारें ठरेल. सह्याद्री-नगाच्या कुक्षींत सुखाने वास करणारा, पूर्वेस पुण्याकडे आणि वर मुंबईकडे तोंड करून पाहणारा, मावळ पोटांत घेऊन शिवकालीन इतिहासाला प्रसविणारा, तथापि आधुनिक जगद्विकासाकडे पाठमोरा न होणारा हा भोर प्रांत, भारताच्या संस्थानी नभोवितानांतील एक लहानसा रत्नदीप म्हणतां येईल. ९२५ चौरस मैल क्षेत्रफळ, त्यांत ५०२ गांवें व सुमारे दीड लाख प्रजाजन, इतकाच सारा पसारा; डोंगर, दऱ्या, खोरीं, जंगल, नद्या, नाले या सर्व संस्कृतीच्या दळणवळणांतील नैसर्गिक अनेक अडचणी; पण राजकृपेच्या आनुकूल्यामुळे शंभरावर साहित्य-सेवक आपली सेवा लेख-निविष्ट केल्यामुळे अखिल महाराष्ट्राला परिचित झाले. हातांत लेखणी न धरण्याच्या विनयी बाण्यामुळे आणखी कितीतरी अपरिचित राहिले असतील ? असो. या तोरणा-मुळे संस्थानाची कूस कशी विद्याप्रसू आहे हें एकदम स्पष्ट दिसून येतें.

लेखांचे, कथात्मक ( ९ ), कविता ( १० ), चरित्रात्मक ( ५ ), चर्चात्मक ( १० ), तात्त्विक ( ९ ), भाषावाङ्मयात्मक ( ८ ), ललितकलात्मक ( ६ ), वर्णना-त्मक ( १० ), शास्त्रीय ( ३ ) व शैक्षणिक ( ८ ) असे ठोकळ वर्ग पाडतां येतात. या प्रत्येक वर्गांत एक दोन लेख विचारपरिप्लुत व वाचनीय आहेत. उदा० विद्यार्थिनी आणि गृहिणी; प्रेममीमांसा व कौटुंबिक सुख; अपभ्रंश भाषा आणि ज्ञानेश्वरीपूर्व-कालीन अपभ्रंश वाङ्मय; काव्यप्रवेश; ग्रामोद्धार इ० करमणुकीचें वाचन ज्यांना आवडतें त्यांच्यासाठी ' खरें सौंदर्य ', ' लक्ष्मीपूजन ' या सारख्या सुंदर गोष्टी आहेत. ' युरोपांतील मजा ', ' सिंधी स्त्रियांची राहणी ', हे लेख समाजनिरीक्षकांना पटतील. काव्य, नाट्य, चित्र इत्यादि कलांच्या अभ्यासकांनाहि यांत त्यांच्या सनुभूतीचे विषय आढळतील.

श्री. महादेव हरी मोडक, त्यांचे कनिष्ठ बंधु सुप्रसिद्ध कवि कै. माधवानुज व कै. प्रो. हरिभाऊ लिमये हे आधुनिक युगांतील आद्यवाङ्मय भक्त म्हणतां येतील. ज्ञानप्रकाशाचे संपादक व प्रसिद्ध मार्मिक लेखक श्री. बापुराव आंबेकर, विख्यात वैय्याकरण गो. कृ. मोडक व साहित्याचार्य रंगाशास्त्री रड्डी याच पिढींत पडतील. प्रसिद्ध वाङ्मयपरीक्षक श्री. ना. म. भिडे, प्रो. डॉ. प. ल. वैद्य, नव्या काळाचे खंदे वाङ्मयवीर न. र. फाटक, बडोद्याचे वकील पण हेटाळणीचा विनोद करण्यांत कुशल

१ रा. रा. मा. दा. अळतेकर, २ रा. रा. जि. कृ. परूळकर, ३ रा. रा. स. रा. खांदेवाले, ४ रा. रा. य. रा. दाते, ५ रा. रा. श्री. म. वर्दे, ६ डॉ. कुरुळकर, ७ रा. रा. सुंदरराव वैद्य, ८ रा. ब. दा. ग. पाध्ये.

ता. २७ च्या सभेंत आधिक निवडलेले.

९ रा. रा. न. र. फाटक, १० रा. रा. ग. गं. जांभेकर, ११ रा. रा. न. चिं. केळकर, १२ रा. रा. के. ल. ओगले, १३ रा. रा. पां. वा. काणे, १४ रा. रा. वसंतराव स. राऊत, १५ रा. रा. चिं. ग. कर्वे, १६ रा. रा. कृ. पां. कुलकर्णी व १७ रा. रा. माधवराव पटवर्धन, चिटणीस, शिवाय १८ अध्यक्ष व १९ कार्याध्यक्ष.

(इ) वरील कमिटीच्या सभा पुण्यास भराव्या. सभा बोलावण्याचें वगैरे काम रा.रा. य. रा. दाते आणि कृ. पां. कुलकर्णी यांनी करावें. नेमलेल्या कमिटीने, परिषदेच्या हैदराबाद येथे संमेलनप्रसंगीं भरलेल्या व नंतर मुंबई येथे ता. २० मार्चला भरलेल्या व आज ता. २७ मार्च रोजीं भरलेल्या परिषदेच्या सभांत झालेले ठराव व इतर गोष्टी या सर्व विचारांत घेऊन मग आपल्या योजना, शिफारसी वगैरे निश्चित कराव्या. आपला रिपोर्ट, शिफारसी इ. ता. १५ जूनचे आंत तयार करावींत.

(ई) वरील सर्व कामांविषयी शेवटचे ठराव, निकाल वगैरे करावयासाठी परिषदेची विशेष अशी वार्षिक सभा मुंबई येथे ३१ जुलई १९३२ चे आंत भरवावी.

(उ) (ई) मध्ये निर्दिष्ट केलेली परिषदेची सभा अध्यक्ष व कार्याध्यक्ष यांनी बोलवावी. कमिटीचे सर्व रिपोर्ट वगैरे त्यांसच सादर केले जावे.

सदरहू ठराव आमचेकडे तारीख १३ एप्रिल १९३२ रोजीं दाखल झाला.

त्या ठरावाप्रमाणे व तारीख २७ मार्च १९३२ रोजीं मुंबई येथे भरलेल्या सभेमध्ये जी चर्चा झाली होती तीस अनुसरून सदरहू ठरावांतील निरनिराळीं कामें करण्याकरिता पोट–कमिट्या नेमण्याकरिता म्हणून परिषदेचे उपाध्यक्ष व कमिटींतील एक प्रमुख सभासद श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या सल्ल्याने तारीख २९।४।३२ रोजीं कमिटीच्या सर्व सभासदांकडे पुढील निमंत्रणपत्रिका पाठविण्यांत आली.

जा. नं. ४६६

महाराष्ट्र शब्द-कोश कचेरी,
४९५, शनवार, पुणें.
पुणें, ता. २९।४।३२

सा. न. वि. वि.

मुंबई येथे तारीख २७।३।३२ रोजीं भरलेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सर्व साधारण सभेंत पास झालेल्या ठरावाप्रमाणे पुनर्घटना व पुढील व्यवस्था करण्यासाठी जी कमिटी नेमली गेली त्या कमिटींत सभासद बरेच असल्यामुळे तिच्या पोटकमिटया नेमून त्यांकडे निरनिराळीं कामें वाटून द्यावीं असे धोरण त्यावेळीं दर्शविण्यांत आलें होतें. त्याप्रमाणे पुढे दिल्याप्रमाणे पोटकमिटया नेमण्यांत याव्या असें सुचविण्यांत येत आहे.

या कमिटयांत दाखविलेल्या नांवांत कांही कमीजास्ती करावें अशी आपली सूचना असल्यास तसें कळवावें व आपलें नांव ज्या कमिटींत आहे तींत आपण काम करावयास तयार असल्याचें संमतिपत्र पाठवावें.

अशा तऱ्हेच्या कमिटया नेमाव्या असा ठराव करण्याकरिता सर्व कमिटीची सभा ता. ८ मे १९३२ रोजीं पुणें येथे महाराष्ट्र शब्दकोश कचेरींत सायंकाळीं ६ वाजतां भरविण्यांत येणार आहे. त्यावेळीं आपणास सवड असल्यास समक्ष यावें नाही तर संमतिदर्शक पत्रक पाठवावें अगर कांही सूचना करावयाच्या असल्यास त्या पाठवाव्या. कळावें हे विनंती.

आपले,
य. रा. दाते
कृ. पां. कुलकर्णी

## १ जमाखर्च व हिशोब कमिटी

१. प्रो. अळतेकर, २. रा. जि. कृ. परुळकर, ३. रा. न. र. फाटक, ४. रा. खादिवाले, ५ डॉ. कुरुळकर,

या मंडळींनी पूर्वीच्या कमिटीचा रिपोर्ट विचारांत घेऊन १९२८–१९२९पर्यंतचे हिशेब तयार करावे, व खालील मंडळीशीं पुढील सालचे हिशोब करण्यांत सहकार्य करावें.

६. रा. कृ. पां. कुलकर्णी, ७. रा. चिं. ग. कर्वे.

यांनी वरील मंडळीशीं सहकार्य करून त्यांनी तयार केल्यानंतरच्या वर्षांचे हिशेब तयार करावे.

ट्रस्टी व खजिनदार यांनी वरील कमिटीकडे आपले हिशोब पाठवावे.

## २. नियम कमिटी

१. रा. ब. पाध्ये, २. प्रो. अळतेकर, ३. प्रो. काणे, ४. रा. ना. गो. चापेकर, ५. रा. कृ. पां. कुलकर्णी, ६. प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन, ७. रा. य. रा. दाते.

## ३ साहित्यपत्रिका कमिटी

१. श्री. स. मा. वि. किबे (अध्यक्ष), २. रा. ना. गो. चापेकर, ३. रा. ब. पाध्ये, ४. रा. न. चिं. केळकर, ५. रा. कृ. पां. कुलकर्णी, ६.रा. चिं. ग. कर्वे,

सदरहू निमंत्रण पत्रिकेप्रमाणे शब्दकोश कचेरींत सभा होऊन तींत हजर असलेल्या सभासदांच्या व पत्रद्वारें रा. ब. पाध्ये, प्रो. अळतेकर, रा. काणे, रा. परुळकर व रा. ओगले यांच्या आलेल्या सूचनांचा विचार करून पुढील विनंतीपत्रांत दर्शविल्याप्रमाणे पोटकमिटया नेमाव्या असें ठरलें. त्याप्रमाणे सर्व पोटकमिटयांतील सभासदांस त्यांच्या कमिटीच्या कामासंबंधाने सूचना करण्याकरिता व बैठकीच्या सोईस्कर तारीख सुचविण्याकरिता पुढीलप्रमाणे विनंतीपत्र पाठविण्यांत आलें.

## पुनर्घटना कमिटीचा वृत्तांत

महाराष्ट्र शब्द-कोश कचेरी,
४९५ शनवार, पुणें.
ता, १७।५।३२.

सा. न. वि. वि.

पूर्वी कळविल्याप्रमाणे ता. ८ मार्च १९३२ रोजीं परिषदेने नेमलेल्या कमिटीची बैठक होऊन तीमध्ये पुढीलप्रमाणे पोटकमिटया नेमण्यांत आल्या आहेत. या सभेपुढे मांडण्याकरिता रा. ब. पाध्ये, प्रो. अळतेकर, रा. काणे, रा. परुळकर, रा. ओगले यांजकडून कांही सूचना आल्या होत्या व श्रीमंत किबेसाहेब यांजकडूनहि संमतिपर पत्र आलें होतें.

वरील सर्व सूचनांचा विचार करून पुढीलप्रमाणे कमिटया नेमण्यांत आल्या आहेत:—

### १. हिशोब कमिटी

१. श्री. चापेकर, २. श्री. सुंदरराव वैद्य, ३. रा. ब. पाध्ये, ४. श्री. परुळकर, ५. प्रो. अळतेकर, ६. रा. खांदेवाले, ७. रा. कुरुळकर, ८. रा. न. र. फाटक, ९. रा. के. ल. ओगले, १०. रा. वसंतराव राऊत, ११. रा. कुलकर्णी, १२. रा. कर्वे, १३. रा. पटवर्धन.

### २. नियम कमिटी

१. रा. ब. पाध्ये, २. श्री. ना. गो. चापेकर, ३. प्रो. अळतेकर, ४. प्रो. काणे, ५. श्री. य. रा. दाते, ६. रा. कृ. पां. कुलकर्णी, ७. रा. श्री. म. वर्दे, ८. रा. ग. गं. जांभेकर, ९. रा. मा. त्र्यं. पटवर्धन, १०. श्री. न. चिं केळकर.

### ३. साहित्यपत्रिका कमिटी

१. श्री. स. किबे, २. श्री. केळकर, ३. श्री. चापेकर, ४. रा. कुलकर्णी, ५. रा. ब. पाध्ये, ६. प्रो. अळतेकर, ७. रा. काणे, ८. रा. जांभेकर, ९. रा. कर्वे.

आपलें नांव ... ... कमिटीवर आहे. तरी आपण आपल्या योजनेचा कच्चा खर्डा करून पाठविल्यास कमिटीपुढे मांडण्यास सोईस्कर होईल. तरी आपण आपल्या सूचना लवकर पाठविण्याची मेहेरबानी करावी.

पोटकमिटयांची व सर्व कमिटींची एकत्र बैठक पुणें येथे लागोपाठ २।३ दिवस करावी अशी सूचना बऱ्याच सभासदांकडून आली आहे. तीस अनुसरून सभा मे २२ ता. पासून ३१ ता. या दरम्यान केव्हा तरी बोलवावी असा विचार आहे; तरी आपणास कोणते दिवस सोईस्कर होतील हें कळविल्यास शक्य तितक्या अधिक लोकांच्या सोईच्या तारखा ठरविणें सोईचें होईल. तरी आपण उलट टपालीं आपणास

कोणते दिवस सोइस्कर होतील तें कळवावें, म्हणजे त्याप्रमाणे निमंत्रणें पाठविण्यास ठीक पडेल.

कळावें, हे विनंती.

आपले,
य. रा. दाते
कृ. पां. कुलकर्णी

याप्रमाणे आलेल्या सूचनांनुसार पोटकमिटयांची व सर्व कमिटीची सभा पुढे दिलेल्या निमंत्रणानुसार बोलाविण्यांत आली.

महाराष्ट्र शब्द-कोश कचेरी
आ. नं. ५०१
४९५, शनवार, पुणें-२.
ता. २५ मे १९३२.

## सूचना

सा. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या ता. २७ मार्च रोजीं भरलेल्या सभेमध्ये नेमलेल्या कमिटीचा व त्या कमिटीने नेमलेल्या पोटकमिट्यांची सभा शनिवार, रविवार व सोमवार ता. ४, ५ व ६ जून रोजीं महाराष्ट्र शब्दकोश कचेरींत भरणार आहे. तरी आपण त्यावेळीं अवश्य उपस्थित व्हावें अशी विनंती आहे.

शनिवारची सभा सायंकाळीं ४-३० वाजता भरेल व पुढे सर्वांच्या सोयी-प्रमाणे सकाळीं किंवा दुपारीं सभा भरतील.

आपणास कांहीं सूचना करावयाच्या असल्यास त्या अगोदर पाठविल्यास सोईचें होईल. कळावें हे विनंती.

आपले,
य. रा. दाते
कृ. पां. कुलकर्णी

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या तारीख २७ मार्च रोजीं भरलेल्या साधारण सभेत झालेल्या ठरावाप्रमाणे नेमलेल्या कमिटीची सभा निमंत्रणाप्रमाणे शनिवार, रविवार व सोमवार तारीख ४, ५ व ६ जून १९३२ रोजीं लागोपाठ तीन दिवस रोज सकाळीं भरली. त्या सभेस रा. ब. दा. ग. पाध्ये, प्रो. मा. दा. अळतेकर, श्री. न. चिं. केळकर, प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन, रा. पां. वा. काणे, रा. ग. गं. जांभेकर, रा. कृ. पां. कुलकर्णी, रा. चिं. ग. कर्वे, रा. य. रा. दाते हे सभासद हजर होते. डॉ कुरुळकर हे पहिल्या दिवशींच्या बैठकीस येऊं शकले नाहीत; परंतु ते रविवार व सोमवारच्या बैठकीस हजर होते.

प्रारंभीं रा. ब. पाध्ये यांनीं श्री. तात्यासाहेब केळकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना केली व तिला प्रो. अळतेकर यांनी अनुमोदन दिलें. ही

सूचना सर्वानुमतें पास होऊन अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर या कमिटीकडे सोपविलेल्या कामासंबंधीचा साधारण सभेचा ठराव प्रथम वाचून दाखविण्यांत आला.

नंतर तारीख ८।५।३२ रोजीं भरलेल्या सभेचा वृत्तांत व त्या सभेंत नेमलेल्या पोट-कमिट्यांतील गृहस्थांचीं नांवें वाचून दाखविण्यांत आलीं.

यानंतर निरनिराळ्या पोट-कमिट्या निरनिराळ्या कामाकरिता नेमण्यांत आल्या असल्या तरी ज्याअर्थी थोडेच सभासद हजर आहेत त्याअर्थी सर्व कमिटीचीच सभा चालू ठेवून सर्व प्रश्नांवर चर्चा व ठराव करावे असें ठरलें.

नंतर श्री. सरदार किबेसाहेब यांजकडून व रा. सा. चापेकर यांजकडून सभेस हजर राहतां येत नाहीं अशा मजकुराचीं पत्रें आलीं होतीं तीं वाचून दाखविण्यांत आलीं.

यानंतर निरनिराळ्या प्रश्नांवर चर्चा होऊन पुढील ठराव मंजूर करण्यांत आले:—

**सामान्यः—**

**ठराव** १. या कमिटीचे रा. य. रा. दाते व कृ. पां. कुलकर्णी यांस चिटणीस नेमण्यांत आलें आहे.

**ठराव** २. या कमिटीच्या कामाकरिता लागणारा सर्व खर्च साहित्य परिषदेच्या पैशांतून करावा.

**हिशेबासंबंधीं:—**

**ठराव** ३. ज्याअर्थी साहित्य परिषदेचें दप्तर व इतर कागदपत्र सध्या उपलब्ध झालेले दिसत नाहींत त्याअर्थी साहित्य परिषदेच्या अधिकारी मंडळीपैकी ज्या मंडळीचा कागदपत्रांशीं संबंध येण्याचा संभव होता अशा सर्व मंडळींस कागदपत्रासंबंधी विचारणा करावी.

विशेषतः खालील गृहस्थांस त्यांच्या नांवापुढे नमूद केलेल्या गोष्टींबद्दल खुलासा मागावा.

१. श्री. नानासाहेब चापेकर—आपण अधिकार स्वीकारतांना दप्तरसंबंधी कोणते कागदपत्र ताब्यांत घेतले, व सोडतांना कोणाजवळ दिले किंवा कोणाजवळ होते यासंबंधी माहिती.

२. श्री. न. र. फाटक—परिषदेसंबंधी पत्रव्यवहार, दप्तरसंबंधी इतर कागदपत्र, परिषदेच्या सभांचें प्रोसीडिंग बुक इ.

हें प्रोसीडिंगबुक अमुक गृहस्थाकडे आहे असें आपण रा. ब. पाध्ये यांजजवळ बोललां होतां असें त्यांचें म्हणणें आहे तरी तें प्रोसीडिंगबुक किंवा त्या गृहस्थाचें नांव, पत्ता वगैरे.

३. श्री. के. ल. ओगले—दप्तरच्या कागदपत्रासंबंधी ते कोणाजवळ होते इ. माहिती.

४. श्री. सुंदरराव वैद्य–" ट्रस्ट डीड " जमाखर्चाचे उतारे, हिशोबासंबंधी असलेले कागदपत्र, पूर्वीचे ताळेबंद अगर त्यासंबंधी आपणाकडे कोणी कांही पाठविले असल्यास ते कागदपत्र अगर त्यासंबंधी माहिती.

५. श्री. जि. कृ. परुळकर–हिशेबाचे ताळेबंद वगैरे आपणाकडे आले असल्यास त्यासंबंधी माहिती.

६. श्री. धैसास–आपण मुंबईस कागदपत्र आणण्यास गेलां होतां तेव्हां आणलेले कागदपत्र अगर त्यासंबंधी माहिती.

७. सेक्रेटरी मुं. मराठी ग्रंथ-संग्रहालय–आपल्या कचेरींत कागदपत्र असून ते न्यावयास कोणी आलें होतें काय ? अगर कोणास आपण स्वाधीन केले काय वगैरे.

८. श्री. ज. र. घारपुरे–श्री. नानासाहेब चापेकर यांचा राजीनामा आपणाकडे आला काय ?

९. श्री. रा. का. तटणीस--आपण चिटणीस असतांना आपणाजवळ कांही कागदपत्र होते काय ? किंवा राजीनामा दिल्यावर आपण कोणाच्या स्वाधीन केले काय ?

१०. श्री. स. मा. वि. किबे–सर्वसामान्य.

[ टीप. वरील ठरावाप्रमाणे पुढे दिल्याप्रमाणे सामान्य मजकुराचीं व त्यांत वर नमूद केल्याप्रमाणे विशिष्ट गृहस्थांस विशिष्ट मजकूर घालून रजिस्टर्ड परत पावतीचीं पत्रें पाठविलीं होतीं त्यांस उत्तरादाखल रा. सुंदरराव वैद्य यांजकडून हिशेबासंबंधी कांही आंकडे, रा. धैसास यांजकडून कांहीं जुन्या पत्रव्यवहाराचे कागदपत्र वगैरे श्री. किबेसाहेब, रा. चापेकर व सेक्रे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय यांजकडून आपणाजवळ कांही कागदपत्र नसल्याबद्दल उत्तरें आलीं. बाकीच्या गृहस्थांकडून कांहीच उत्तर आलें नाही. ]

महाराष्ट्र शब्द-कोश कचेरी,
४९५ शनिवार, पुणें.

सा. न. वि. वि.

तारीख २७ मार्च रोजीं साहित्य परिषदेने नेमलेल्या कमिटीची बैठक पूर्वी कळविल्याप्रमाणे शब्दकोश कचेरींत ता. ४।६।३२ रोजीं सायंकाळीं भरली होती.

त्यावेळीं एक असा ठराव पास करण्यांत आला आहे की, ज्याअर्थी साहित्यपरिषदेचें दप्तर व इतर कागदपत्र सध्या उपलब्ध झालेले दिसत नाहीत त्याअर्थी साहित्य परिषदेच्या अधिकारी मंडळींपैकी ज्या मंडळींचा कागदपत्राशीं संबंध येण्याचा संभव होता अशा सर्व मंडळींस पत्रद्वारें कागदपत्रासंबंधी विचारणा करावी.

त्याप्रमाणे आपणास विनंति करण्यांत येत आहे की, आपणाकडे साहित्य परिषदेच्या दप्तरासंबंधी, हिशेबासंबंधी वगैरे कांही कागदपत्र असल्यास ते सर्व कागदपत्र किंवा त्यासंबंधी कांही माहिती असल्यास किंवा कमिटीस उपयोगी होईल अशी कांही

म्हणून महाराष्ट्रांत माहीत असलेले कादंबरीकार वा. वि. जोशी इत्यादि तोरणांतील मालाकार त्या पुढील पिढींतले सर्वत्र गाजलेले लेखक आहेत. यावरून केवळ 'गांवच्या गांवांत गाढवी सवाष्ण' हा न्याय लागू करून तोरणाची स्तुति करण्याचें कारण पडणार नाही. तर एखाद्या कसलेल्या मासिकाच्या विशेषांकांत जसे विविध विषय व विविध वाङ्मयक्षेत्रांतील विद्वान चमकतात तसें या साहित्याचें प्रकाशन झालें आहे. ही संस्थानची वाङ्मयीन पहाणीच म्हणता येईल. प्रत्येक संस्थानाने या स्तुत्य उप-क्रमाचें अनुकरण अवश्य करण्यासारखें आहे. श्रीमंत युवराज भाऊसाहेब व त्यांच्या विदुषी पत्नी यांचे हात तोरण बांधण्यांत प्रत्यक्ष (अप्रत्यक्ष आहेत यांत शंकाच नाही) नाहींत ही उणीव वाचकांना पूर्वापेक्षेमुळे फार भासते. निदान निर्झरणींतला एखादा पाट तोरणाखालून गेला असता तरी ज्याचें हें रम्य तोरण आहे त्या भावी साहित्य प्रासादाविषयींच्या गोड कल्पनेंत सुखदायी भर पडती. दरसाल संस्थानचें म्हणून असेंच एकेक पुस्तक निघावें ही संस्थानाबाहेरच्या मित्रांची सदिच्छा येथे प्रकट करणें वावगें होणार नाही.

चिं. ग. कर्वे

**वाङ्मय–श्री–खंडः**—(संपादक व प्रकाशक डॉ. रामचन्द्र चिंतामण श्रीखंडे, कोल्हापूर, किं. २ रुपये.)

यदि रामा यदि च रमा यदि तनयो विनयधी गुणोपेतः। तनये तनयोत्पत्तिः सुरवर नगरे किमाधिक्यम्॥

आमच्या इकडे इंग्रजी शिक्षण सुरू होऊन जवळ जवळ १०० वर्षे झालीं. ह्या शिक्षणाचे परिणाम जर मापावयाचे असतील तर त्या कामीं श्री. श्रीखंडे ह्यांच्या वाङ्मय–श्री–खंडासारखे ग्रंथच उपयोगी पडतील. शिक्षणाचें अपेक्षित कार्य कोणतें असें कोणी विचारल्यास त्यास ह्या कोल्हापूरच्या श्रीखंडे कुटुंबाकडे बोट दाखवितां येईल. सर्व बहीणभावडें सुविद्य, विनयशील, उद्योगी व बुद्धिमान् असल्यावर उद्धृत केलेल्या श्लोकांत कवीने म्हटल्याप्रमाणे असल्या कुटुंबापुढे स्वर्ग सुद्धा तुच्छ वाटेल.

प्रस्तुत ग्रंथांत कै. डॉ. शंकरराव श्रीखंडे व त्यांच्या विद्यमान बंधुभगिनी आणि आप्त ह्यांच्या लेखांचा व संस्कृत मराठी कवितांचा संग्रह केला आहे. हें सर्व लिखाण प्रसिद्धीकरिता म्हणून जन्मास आलेलें नाही, ही गोष्ट विचारांत घेतली म्हणजे त्याची किंमत किती आहे ह्याची कल्पना करितां येईल. ह्या सर्व लेखांत विनोद, सभ्यता, बहुश्रुतता, मार्मिकता इत्यादि गुण प्रत्ययास येतात. अशीं कुटुंबें आपल्या समाजांत किती असतील ह्याचा प्रत्येकाने आपल्या मनाशीं विचार करावा. सारा वाचुनि ग्रंथ वाटत मना श्रीखंड होणें बरें!

डॉ. रामचन्द्र चिंतामण श्रीखंडे ह्यांनी हा ग्रंथ प्रसिद्ध करून महाराष्ट्रापुढे एक अनुकरणीय कित्ता ठेविला आहे. प्रस्तुत पुस्तकाने सरस्वती मंदिराचें एक नवीनच

दाखून खोलल्यासारखें झालें आहे. अशा प्रकारची कौटुंबिक ग्रंथ-निष्पत्ति पहिलीच आहे असें वाटतें. डॉ. शंकरराव ह्यांची स्वप्नसभेची हकीकत त्यांचा विनोद व मार्मिकता सिद्ध करते. ह्यांतील सर्वच कवींचीं काव्यें उच्च दर्जाचीं आहेत. तुलना करणेंच अशक्य. " तोलावया ठाव मिळे न माला !

असो. हें पुस्तक वाचीत असतां काळ फार आनंदाचा गेला. ह्याबद्दल मी संपादक डॉ. रामभाऊ श्रीखंडे ह्यांचा फार आभारी आहें.

ना. गो. चापेकर.

**समाजदर्शन**—(ले. सौ. इंदिराबाई पेंडसे, प्र. सी. वा. फडणीस. २२९ सदाशिव, पुणें, किं. १ रु.) या पुस्तकांत सात सुंदर लघुकथा ग्रथित केल्या असून, ह्यांपैकी मानापमान, बलिदान, दैवयोग व शेतकरीण या विशेष चटकदार व स्वतंत्रपणें मोठ्या कुशलतेने रंगविल्या आहेत. केवळ मराठी वाङ्मयाचा दीर्घ व्यासंग ठेवल्याने एखाद्या सामान्य शिक्षित स्त्रीलाहि कशी प्रौढ लेखनपद्धति व स्वतंत्र विचाराची दिशा सहज साध्य होते याचें उदाहरण म्हणून प्रस्तुत पुस्तकाचें देतां येईल. साहित्य-पत्रिकेचे मुद्रक व आर्यसंस्कृति मुद्रणालयाचे कार्यकुशल व्यवस्थापक श्री. सीतारामपंत फडणीस याच्या भगिनी, या समाजदर्शनाच्या लेखिका श्री. सौ. इंदिराबाई यांचे आम्ही या प्रथम ग्रंथनिर्मितीबद्दल अभिनंदन करून, त्यांनी यापुढे असाच व्यासंग चालू ठेवावा अशी आग्रहाची विनंती करतों.

चिं. ग. कर्वे

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## २७ मार्च १९३२ रोजीं म. सा. परिषदेने नेमलेल्या

# पुनर्घटना कमिटीचा वृत्तांत



दक्षिण हैदराबादमध्ये १९३१ च्या मे महिन्यांत जें महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें १५ वें अधिवेशन झालें त्यावेळीं साहित्य परिषदेच्या घटनेप्रमाणे संमेलन भरावयाच्या जागीं जी एक साहित्य परिषदेची साधारण सभा व्हावयाची असते तिची सूचनापत्रें जरी छापून तयार झालेलीं आढळतात तरी प्रत्यक्ष पाठविलीं गेलीं नव्हतीं. तथापि, संमेलनामध्ये साहित्य परिषदेची एक साधारण सभा भरविण्यांत आली व तींत कांही ठराव मान्य करण्यांत आले. त्यांत नियामक मंडळाची योजना व साहित्य-परिषदेची कचेरी पुणें येथे नेणें या दोन गोष्टी प्रमुख होत्या.

या सभेची रीतसर सूचना सर्व सभासदांकडे गेलेली नसल्यामुळे या सभेंत झालेलें कार्य नियमानुसार झालें नाही असें मत असलेल्या कांहीं मंडळींनी या गोष्टीचा व हिशोब, साहित्यपत्रिकेची व्यवस्था इत्यादि गोष्टींचा विचार करण्याकरिता साहित्य परिषदेची एक खास साधारण सभा बोलवावी असें विनंतीपत्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष व कार्याध्यक्ष यांजकडे पाठविलें. या पत्रावर २३ सभासदांच्या सह्या होत्या.

अशा प्रकारचें पत्र आल्यानंतर बोलवावयाची सभा अनेक कारणांमुळे मार्च १९३२ पर्यंत बोलाविता आली नाही व ती मार्च महिन्याच्या २७ तारखेस भरविण्यांत येईल असें साहित्य पत्रिकेच्या एका अंकांत प्रसिद्ध करण्यांत आलें. दरम्यान खास सभेची मागणी करणाऱ्या २३ सभासदांनी आपल्या मागणीप्रमाणे सभा भरविली गेली नाही म्हणून वर्तमानपत्रद्वारा जाहीर निमंत्रण देऊन परिषदेची खास साधारण सभा ता. २० मार्च रोजीं भरविली व तींत वरील बाबींचा विचार करून पुढील कार्य करण्याकरिता एक कमिटी नेमली.

मध्यंतरीं परिषदेच्या अधिकारी मंडळींनी त्याच बाबींचा विचार करण्याकरिता ता० २७ मार्च १९३२ रोजी परिषदेची खास साधारण सभा भरविण्यांत येईल अशा निमंत्रणपत्रिका पाठविल्या होत्या. त्याप्रमाणे ता० २७ मार्च १९३२ रोजीं मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत परिषदेची एक खास साधारण सभा भरविण्यांत आली.

त्या ठिकाणीं तारीख २० मार्च रोजीं हजर असलेले सभासद व ता० २७ मार्च रोजीं हजर असलेले सभासद यांच्यामध्ये, दोन्ही सभांपुढे एकाच स्वरूपाचे प्रश्न असल्यामुळे, कांही तडजोड व्हावी म्हणून परिषदेचे अध्यक्ष श्री. स. मा. वि. किबे,

उपाध्यक्ष श्री. न. चिं. केळकर, कार्याध्यक्ष श्री. ना. गो. चापेकर व ट्रस्टी श्री. रा. ब. दा. ग. पाध्ये यांनी थोडा वेळ विचारविनिमय करून कांही ठराव तडजोडीच्या स्वरूपाचे सभेपुढे मांडले व ते मंजूर करण्यांत आले.

त्या ठरावांपैकी एक ठराव पुढें दिल्याप्रमाणे होता.

(अ) दक्षिण हैद्राबाद येथे गेल्या मे महिन्यांत महाराष्ट्र साहित्य संमेलन भरलें त्यावेळीं व त्यानंतर आजपावेतों महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ज्या सभा वगैरे झाल्या व परिषदेसंबंधी ज्या गोष्टी घडून आल्या त्यावरून परिषदेच्या सभासदांमध्ये तिच्या हिताहिताच्या कांही जिव्हाळ्याच्या गोष्टी, बाबी इत्यादि विषयीं तीव्र मतभेद असल्याचें दिसून आलें आहे; करितां ह्यापुढे परिषदेचें काम स्नेहसलोख्यानें चालावयासाठी कोणच्या योजना कराव्या तें विचार विनिमय करून ठरविण्यासाठी त्याचप्रमाणे, विशेषेंकरून खाली नमूद केलेल्या गोष्टी करण्यासंबंधीची सर्व व्यवस्था करण्यासाठी आणि तत्संबंधी पुढे काय करावयाचें ह्याबद्दलहि योजना ठरविण्यासाठी, आणि सदर योजना, शिफारसी वगैरे पुढील परिषदेच्या साधारण सभेपुढे मंजूरीसाठी ठेवण्याची व्यवस्था करण्यासाठी खाली कलम (आ) मध्ये नांवें दिलेल्या गृहस्थांची एक कमिटी नेमली जावी.

विशेषेकरून करावयाच्या वगैरे गोष्टी:—

(१) इ. स. १९२६ पासून १९३१ अखेर परिषदेच्या सामान्य व ट्रस्ट फंडाचा संपूर्ण हिशेब व कामकाजाचा रिपोर्ट तयार करणें व सदर हिशेब ऑडिट करून घेणें.

(२) सदर हिशेब पुढे ठेवण्यासाठी व नवें अधिकारी मंडळ नेमण्यासाठी आणि वार्षिक वृत्तांताची मंजूरी इत्यादि नेहमींचीं कामें करण्यासाठी व पुढे कलम ३ व ४ मधील बाबीसंबंधीच्या शिफारसी योजना इत्यादींचा विचार करण्यासाठी वगैरे परिषदेची विशेष अशी वार्षिक सभा भरविणें.

(३) सभेच्या कचेरीसंबंधी निश्चित अशी योजना सुचविणें.

(४) सभेच्या घटनेंत व नियमांत काय फेरफार करणें इष्ट आहे ह्यासंबंधी शिफारसी करणें.

(५) महाराष्ट्र साहित्य पत्रिका पुढे चालू ठेवावयाची की नाही त्याचा विचार करून ठेवावी असें कमिटीस योग्य वाटल्यास तिजसंबंधी संपादकत्वादि व्यवस्था कोणच्या स्वरूपाची असावी इ. विषयी शिफारसी करणें.

(आ) कलम (अ) प्रमाणे नेमल्या जाणाऱ्या कमिटींतील सभासदांचीं नांवें:—

मुंबईत २३ सभासदांच्या निमंत्रणाने ता. २० मार्च रोजीं भरलेल्या परिषदेच्या सभेंत नेमलेल्या कमिटीचे ८ सभासद:—

माहिती आपणास असल्यास वरील पत्त्यावर ८ दिवसांचे आंत पाठविण्याची कृपा करावी. कळावें हे विनंती.

आपला,

य. रा. दाते

**ठराव ४.** रा. ब. पाध्ये यांनी ट्रस्टींचा हिशेब तयार करवून आणला आहे. त्यावरून एक हिशेबाचें पत्रक तयार करून द्यावें.

( त्याप्रमाणे रा. ब. पाध्ये यांनी पत्रक तयार करून दिलें. )

**ठराव ५.** ट्रस्टींचे हिशेब, साहित्यपत्रिकेंतील आकड्यांवरून रा. कुलकर्णी वगैरेंनी तयार केलेले हिशेब व इतर कोणीकडून हिशोबासंबंधीं आकडे किंवा माहिती आल्यास ती एकत्र करून, रा. दाते व कुलकर्णी यांनी आजच्या अध्यक्षांच्या सह-कार्याने एक हिशोबाचें पत्रक व अहवाल तयार करावा व तो कमिटीच्या सभासदां-कडे पाठवून नंतर एक कमिटीची सभा बोलवावी.

**साहित्यपत्रिका**

यासंबंधी बरीच चर्चा झाल्यानंतर पुढील ठराव मंजूर करण्यांत आले.

**ठराव ६.** चालू वर्षापुरते पत्रिकेचे सर्व अंक सध्याच्या स्वरूपांत काढावें. पुढील वर्षाकरिता सभासदेतरांकडून वर्गणी घेऊं नये.

**ठराव ७.** यापुढे साहित्यपत्रिकेचें स्वरूप पुढील अंदाजपत्रकाच्या धोरणाने आखावें.

१. ऑफिसखर्च रुपये ६००. भाडें १२०. कारकून ३००. नोकर, पोष्ट इ. १८०. २. ग्रंथोत्तेजन रुपये ३००. ३. त्रैमासिक रुपये ८००.

त्रैमासिकाचा पहिला अंक वार्षिकाच्या स्वरूपाचा सुमारे ८० पृष्ठांचा काढावा. त्यामध्यें त्या वर्षांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचा परिचायक आढावा, वाङ्मयसंस्थांची माहिती, जगांतील वाङ्मयाचा ओघ कोणत्या दिशेने चालला आहे इत्यादि माहिती, सभासदांची यादी, अहवाल वगैरे मजकूर असावा. इतर अंक सुमारें ५६ पृष्ठांचे असावे.

**ठराव. ८.** कै. बा. अ. भिडे यांचें पुस्तक परिषदेने आपल्या खर्चाने एकदम छापावें. त्याचा खर्च ट्रस्टींनी द्यावा.

प्रो. अळतेकर यांनी आपलें पुस्तक स्वतःच्या खर्चाने छापावें व परिषदेच्या सभासदांस तीनचतुर्थांश किंमतीस द्यावें. परिषदेस ५ प्रती द्याव्या. पुस्तकाचा मालकी हक्क प्रो. अळतेकर यांजकडे राहावा.

प्रो. ह. बा. भिडे यांसहि प्रो. अळतेकर यांचेप्रमाणे स्वतःचें पुस्तक छापण्यास परवानगी द्यावी.

**ठराव ९.** कै. बा. अ. भिडे यांचें पुस्तक वरीलप्रमाणे सध्याच्या स्वरूपांत छापावें. त्याच्या ५०० प्रती काढाव्या. त्याची किंमत सभासदांस बारा आणे व इत-रांस एक रुपया ठेवावी.

यानंतर साहित्यपरिषदेची घटना व नियम यासंबंधी चर्चा होऊन पुढे (परिशिष्ट १) दिल्याप्रमाणे दुरुस्त केलेली घटना व नियम मंजूरीसाठी मांडावे असें ठरलें.

त्यानंतर रा. ब. पाध्ये ( ट्रस्टी ) यांजकडून ट्रस्टसंबंधी पैशाचे व ते कार्याध्यक्ष असतांपर्यंतचे हिशेब आले होते ते, अळतेकर कमिटीने तयार केलेले हिशेब एकत्र करून त्यांचा विचार करण्याकरिता सर्व कमिटीच्या सभासदांची सभा पुढे दिलेल्या निमंत्रणाप्रमाणें बोलाविण्यांत आली.

महाराष्ट्र शब्दकोश कचेरी,
४९५ शनिवार, पुणें—२.
ता. १७ जुलै १९३२.

सा. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पुनर्घटना कमिटीची बैठक रविवार तारीख २४ जुलै १९३२ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां पुणें येथे महाराष्ट्र शब्दकोश कचेरींत ( जमखिंडीकरांचा वाडा ) भरणार आहे. त्यावेळीं हिशोब व अहवाल कमिटीपुढे ठेवण्यांत येईल. तरी आपण त्यावेळीं हजर असावे अशी विनंती आहे.

आपले,
य. रा. दाते
कृ. पां. कुलकर्णी
चिटणीस.

वरील निमंत्रणाप्रमाणे भरलेल्या सभेस रा. ना. गो. चापेकर, रा. सुंदरराव वैद्य, रा. जि. कृ. परुळकर, प्रो. अळतेकर, रा. ग. गं. जांभेकर, डॉ. कुरुळकर, रा. य. रा. दाते, रा. कृ. पां. कुलकर्णी व रा. चिं. ग. कर्वे हजर होते.

श्री. तात्यासाहेब केळकर हजर नसल्यामुळे रा. चापेकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना प्रो. अळतेकर यांनी केली व तीस रा. परुळकर यांनी अनुमोदन दिलें.

यानंतर पुढे आलेल्या हिशोबासंबंधी चर्चा होऊन पुढील ठराव सर्वानुमतें मंजूर करण्यांत आले.

**ठराव १.** रा. परुळकर यांनी कमिटीचे सभासद म्हणून कमिटीने तयार केलेले हिशोब व्यवस्थेशीर मांडून साधारण सभेपुढे ठेवण्याकरिता द्यावे.

**ठराव २.** महाराष्ट्र साहित्य परिषदेची सर्व साधारण सभा रविवार तारीख २५ सप्टेंबर रोजीं मुंबई येथे मराठी ग्रंथसंग्रहालयांत दुपारीं १-३० वाजतां भरवावी व तीपुढें या कमिटीचा अहवाल व हिशोब ठेवावे.

या ठरावाप्रमाणे रा. परुळकर यांनी पाठविलेले दुरुस्त हिशोब व ट्रस्टीकडील हिशोब पुढे परिशिष्टांत (परिशिष्ट २) दिले आहेत.

य. रा. दाते
कृ. पां. कुलकर्णी
चिटणीस

## परिशिष्ट १

## घटना व नियम

१. नांव—महाराष्ट्र–साहित्य–परिषद्.

२. परिषदेचें वर्ष—१ जानेवारी ते ३१ डिसेंबर असें मानलें जाईल.

३. परिषदेची कचेरी—परिषदेची कचेरी मुंबईला किंवा परिषदेच्या एकंदर सभासदांच्या दोनतृतीयांश मताने ठरेल तेथे राहील. कचेरीची जागा बदलणें झाल्यास सर्व सभासदांचीं लेखी मतें मागवून त्यांतील आलेल्या शेंकडा ६० टक्के बहुमताने ठरेल त्या ठिकाणीं कचेरी ठेवावी.

टीपः—हीं मतें परिषदेने जोड कार्डाने मागवावीं.

४. उद्देश–मराठी भाषा, वाङ्मय व साहित्य यांच्या अभिवृद्ध्यर्थ प्रयत्न करणें, उपाय योजणें व इतर रीतीने झटणें आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणें हे परिषदेचे प्रधान उद्देश आहेत.

५. साधनें—वरील उद्देश साधण्यासाठी खाली दिलेले उपाय आणि वेळोवेळीं योग्य व इष्ट वाटतील ते दुसरे उपाय योजिले जावे.

(अ) मराठी ग्रंथकारांचें, प्रकाशकांचें आणि मराठी भाषेविषयी आस्था बाळगणारांचें, होतां होई तों दरसाल संमेलन भरविणें.

(आ) मराठी भाषेचें व्याकरण, इतिहास व कोश तयार करणें, आणि तसेंच सर्व विषयावर मराठी भाषेमध्ये चांगले ग्रंथ लिहवून प्रसिद्ध करणें, किंवा तत्प्रीत्यर्थ उत्तेजन व साहाय्य देणें आणि मराठी वाचकांना सर्व प्रकारचें ज्ञान सुलभ करविणें.

(इ) शास्त्रीय विषयांची परिभाषा ठरविणें आणि इतर साहित्य सभांच्या सहकारित्वाने पारिभाषिक कोश तयार करणें.

(ई) प्राचीन काव्यें, इतिहास, महत्त्वाचे लेख आणि हरएक प्रकारच्या ऐतिहासिक वस्तु यांचा संग्रह करणें आणि त्यांचें संशोधन व प्रकाशन करणें अगर करविणें.

(उ) मराठी भाषा व वाङ्मय व्यापक आणि सर्वसंग्राहक होईल असे प्रयत्न करणें.

(ऊ) प्राचीन व अर्वाचीन मराठी ग्रंथकारांची माहिती मिळविणें व त्यांची चरित्रें प्रसिद्ध करणें.

(ए) आधुनिक भाषाशास्त्राच्या पद्धतीने मराठी भाषेचें अध्ययन व संशोधन करविणें आणि त्याचा प्रसार करणें.

(ऐ) मराठी भाषा व साहित्य यांचा व्यासंग वाढविण्याकरिता युनिव्हर्सिटी व दुय्यम शाळा यांतील परीक्षांत व शिक्षणक्रमांत शिष्यवृत्ती व पारितोषकें ठेवण्याची तजवीज करणें.

(ओ) देशी भाषा व साहित्य यांची हरएक प्रकारें उन्नति करण्यासाठी इतर साहित्य संस्थांशीं सहकारित्वानें कार्य करणें.

ठिकठिकाणीं परिषदेच्या शाखा व साहित्यसभा स्थापन करणें, आणि सामान्यतः परिषदेचे उद्देश सिद्धीस नेण्याकरिता जरूर वाटतील तीं सर्व कार्यें करणें.

६ परिषदेचे सभासद खालीलप्रमाणे ४ प्रकारचे असतील:—

१. आश्रयदाते– परिषदेस १००० किंवा अधिक रुपये देणारे.

२. तहाह्यात सभासद–परिषदेस ५० किंवा अधिक रुपये देणारे.

३. साधारण सभासद–वार्षिक वर्गणी रु. ३ किंवा अधिक देणारे.

४. सन्मान्य सभासद-अलौकिक विद्वत्ता, महाराष्ट्र भाषेची विशेष सेवा वगैरे गुणासाठी परिषदेच्या साधारण सभेने मुद्दाम निवडलेले गृहस्थ व स्त्रिया.

७. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अधिकारी–खाली लिहिल्याप्रमाणे असतील:—

(अ) अध्यक्ष, (आ) पांच उपाध्यक्ष, (इ) नियामक मंडळाचे ५० सभासद, (ई) कार्यकारी मंडळ १२ सभासद, (उ) एक किंवा दोन खजिनदार, (ऊ) एक किंवा दोन हिशेब तपासनीस.

टीपः–वरील सर्व अधिकारी दोन वर्षांनी निवडले जातील.

(ए) परिषदेच्या फंडाचे ट्रस्टी तीनहून अधिक नाहीत इतके.

टीपः—ट्रस्टींमध्ये रिकामी झालेली जागा नियामक मंडळाने भरावी.

## कार्यकारी मंडळ

८. परिषदेच्या कामाची व्यवस्था कार्यकारी मंडळाकडे राहील. कार्यकारी मंडळाने आपणामधून निवडावयाचे अधिकारी तेः—(अ) कार्योपाध्यक्ष, (आ) दोन चिटणीस. अध्यक्ष, कार्याध्यक्ष, ज्येष्ठ कोशाध्यक्ष, ज्येष्ठ निधिधारक, त्रैमासिक संपादक हे कार्यकारी मंडळाचे स्थानतः (अधिकारतः) सभासद गणले जातील. कार्यकारी मंडळांतील एखादी जागा रिकामी झाल्यास ती पुढील निवडणुकीपर्यंत भरण्याचा अधिकार सदर मंडळास आहे.

९ सर्व निवडणुकी द्विवार्षिक असाव्या व त्या पत्रद्वारे कराव्या. वार्षिक सभेच्या आधी दोन महिने वर्तमानपत्रद्वारे जाहीर करून सूचितांचीं नांवें त्यांच्या लेखी संमतीसह मागवावी. सभेच्या आधी एक महिना निवडणुकी व्हाव्या व त्या सभेच्या वेळीं जाहीर कराव्या.

१०. परिषदेच्या नियामक मंडळाची व कार्यकारी मंडळाची सभा कार्याध्यक्ष यांनी किंवा त्यांच्या संमतीनें चिटणीस यांनी बोलवावी. अध्यक्ष यांस परिषदेची कोणतीहि सभा बोलावण्याचा अधिकार आहे.

११. जरूर लागेल तेव्हा परिषदेची व कार्यकारी मंडळाची सभा बोलावण्याचें काम परिषदेचे अध्यक्ष, कार्याध्यक्ष व चिटणीस यांचें आहे. शिवाय, परिषदेच्या २० सभासदांनी किंवा कार्यकारी सभेच्या पांच सभासदांनी मागणी केल्यास त्याप्रमाणे परिषदेची अगर कार्यकारी मंडळाची विशेष सभा एक महिन्याचे आंत भरविलीच

पाहिजे, न भरविली तर सदर मागणी करणाऱ्या सभासदांनी आपल्या सहीच्या निमंत्रणपत्राने सभा बोलवावी. अशा साधारण किंवा विशेष सभेंत निमंत्रणपत्रांत लिहिलेल्या व्यतिरिक्त दुसरें काम केलें जाणार नाही.

१२. सभासदांची नोंद व हक्कः—नवीन सभासद होऊं इच्छिणारांनी ठरविलेल्या नमुन्याप्रमाणे अर्ज करावा. त्यास कार्यकारी सभेची संमति मिळाल्यावर आणि वार्षिक वर्गणी आल्यानंतर अशा नवीन उमेदवारांचीं नांवें सभासदांच्या यादींत नोंदण्यांत येतील. मात्र कोणत्याहि साधारण सभेंत मत देण्याचा अधिकार सभासद झाल्यानंतर तीन महिन्यांनी प्राप्त होईल.

## मत देण्याचा अधिकार

१३. परिषदेच्या कोणत्याहि साधारण सभेंत मत देण्याचा अधिकार जे सभासद नियमाप्रमाणे सभासद नोंदले गेले असून तीन महिन्याचा अवधि गेला असेल त्यांसच राहील. दोन वर्षांची वर्गणी ज्याची थकली असेल त्या सभासदास मत देण्याचा अधिकार राहणार नाही. अशा सभासदास मागील थकलेली वर्गणी सर्व घेऊन पुन्हा सभासद करावें.

१४ नियामक मंडळाची एक सभा वार्षिक सभेच्या वेळीं भरवावी.

### नियामक मंडळाचीं कामेंः—

(अ) कार्यकारी मंडळाने तयार केलेलें अंदाजपत्रक विचार करून मंजूर करणें.

(आ) कार्यकारी मंडळाला वार्षिक कार्याची दिशा दाखवून देणें.

(इ) साधारण सभेपुढे मांडावयाच्या प्रश्नांचा विचार करणें.

सर्व वर्गणी वसूल करावयाचें काम चिटणीस व खजिनदार (कोशाध्यक्ष) यांचें आहे. प्रत्येक पावतीवर खजिनदाराची सही असेल. वसूल झालेली सर्व रक्कम खजिनदाराकडे जमा झाली पाहिजे. खर्चाकरिता चिटणिसांनी खजिनदाराकडून रकमा मागून घ्याव्या. चिटणीसाजवळ ५० रुपयांपेक्षा जास्त रक्कम असूं नये.

१५. कार्यकारी सभा बोलाविण्यास सवड नसेल तेव्हा जरुरीचीं कामें सभासदांचे लेखी अभिप्राय मागवून करतां येतील.

१६. महाराष्ट्र साहित्य परिषदेचें दप्तर, पत्रव्यवहार व इतर सर्व कामें मराठींत चालतील. परिषदेच्या कार्यकारी सभेच्या व इतर विशिष्ट सभांच्या कामाची नोंद स्वतंत्र पुस्तकांत लिहून ती त्या त्या सभांच्या पुढील बैठकींत मंजूर झाली पाहिजे. परिषदेचें दप्तर व कागदपत्र पाहणें झाल्यास चिटणीसांचे सोईप्रमाणे व कार्याध्यक्षांचे परवानगीने कोणत्याहि सभासदास पाहतां येईल.

१७. परिषदेच्या व कार्यकारी मंडळाच्या सभा परिषदेची कचेरी असलेल्या ठिकाणीं नियम ३ प्रमाणे जेथे ठरेल तेथे भरतील. महाराष्ट्र साहित्य संमेलन

जेथे भरेल तेथे परिषदेची एक साधारण सभा भरेल. परिषदेच्या प्रत्येक सभेची सूचना सभासदांस आगाऊ १५ दिवस दिली पाहिजे. तहकूब राहिलेल्या सभेस गणसंख्येची जरुरी नाही. परिषदेचे सभेस १५, नियामक मंडळास १० व कार्यकारी मंडळाच्या सभेस ४ अशी गणसंख्या असावी.

१८. परिषदेच्या द्रव्यनिधीचे तीन वर्ग असतीलः—

( १ ) आश्रयदाते व तहाहयात सभासदांच्या वर्गण्याः–सदरहू रक्कम कायम निधि म्हणून समजण्यांत येईल.

( २ ) साधारण सभासद, संलग्न व सहकारी संस्था यांच्या वर्गण्या, किरकोळ देणग्या व इतर उत्पन्न, आणि

( ३ ) विशेष कार्याकरिता दिलेल्या देणग्या, पारितोषकें वगैरे रकमा.

टीपः—यांपैकी पहिल्या वर्गांतील रकमा कायम निधींत जमा होतील. दुसऱ्या वर्गांतील रकमा व पहिल्या वर्गांतील रकमेवरील व्याज किंवा नफा खजिनदाराकडे भरून तो नित्य व नैमित्तिक खर्चाकडे लावण्यांत येईल. तिसऱ्या वर्गांतील रकमा होतां होईल तों दात्यांच्या इच्छेप्रमाणे व शर्तीप्रमाणे खर्च कराव्या. तशा खर्च न झाल्यास आणखी एक वर्ष वाट पाहून त्या परिषदेच्या कायम निधींत सामील करण्यांत याव्या.

१९. हिशेब तपासनिसांनी तपासलेला व कार्यकारी सभेने मंजूर केलेला जमाखर्चाचा तक्ता परिषदेचे वार्षिक सभेचे पूर्वी १५ दिवस सभेचे निमंत्रणासोबत प्रत्येक सभासदाकडे पाठविला पाहिजे. परिषदेचे कामाचा वार्षिक अहवाल व जमाखर्च वार्षिक सभेंत मंजूर झाल्यानंतर कायम समजण्यांत येईल.

२०. परिषदेकडे आलेल्या सर्व पैशांचा विनियोग परिषदेने केलेल्या पोट नियमान्वयें करण्याचें काम कार्यकारी मंडळाचे आहे. कायम निधि व स्थावर मिळकत ट्रस्टींच्या नांवें असावी व त्यांच्याच ताब्यांत राहावी. कायम निधि व्यतिरिक्त बाकीचा सर्व पैसा खजिनदाराकडे राहावा. कायम निधीवरील व्याज ट्रस्टींनी कार्यकारी मंडळाच्या मागणीप्रमाणे वेळोवेळीं खजिनदाराच्या स्वाधीन करावें. वर्गणी व सर्व प्रकारच्या रकमा चिटणीसांनी वसूल कराव्या. व वरील नियमाला अनुसरून ट्रस्टी व खजिनदार यांचेकडे जमा कराव्या. ट्रस्टी, खजिनदार आणि चिटणीस यांनी आपल्या ताब्यांत असलेल्या पैशांचा हिशोब ठेवावा.

२१. परिषदेची वार्षिक सभा फेब्रुवारी अखेरीच्या आंत भरवावी. सदर सभेंत अहवाल, हिशोब, पुढील वर्षाचें अंदाजपत्रक व निवडणुकी जाहीर करणें आणि दुसरी कार्यक्रमांत निविष्ट केलेलीं असतील अशीं कामें होतील. संमेलनाच्या वेळीं व स्थळीं जी साधारण सभा भरेल त्यावेळीं कार्यकारी मंडळाच्या सूचना व इतर सभासदांच्या कार्यकारी मंडळाकडे आलेल्या सूचना यांचा सभेच्या कार्यक्रमांत समावेश

केला पाहिजे. विचार विनिमय व झालेल्या ठरावांची अंमलबजावणी कार्यकारी मंडळाकडून व्हावी.

२२. परिषदेचे उद्देश सिद्धीस नेण्याकरिता किंवा दुसऱ्या कोणत्याहि विशिष्ट कार्याकरिता जरूर वाटल्यास एक किंवा अनेक पोटकमिट्या किंवा विशिष्ट मंडळ्या नेमण्याचा अधिकार परिषदेचे साधारण सभेस आहे.

२३. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्याशीं सहानुभूति असणाऱ्या अशा वाङ्मयविषयक संस्था (१) संलग्न संस्था किंवा (२) सहकारी संस्था म्हणून परिषदेशीं जोडून घेण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील. ह्या दोन्ही तऱ्हेच्या सभांसंबंधी अटी, नियम वगैरे करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

## संमेलनें व प्रदर्शनें

२४. महाराष्ट्र साहित्य-परिषदेचें उद्दिष्ट कार्य उत्तम रीतीने व्हावें म्हणून ठिकठिकाणच्या लोकांमध्ये जागृति उत्पन्न करून भाषाविषयक प्रयत्न वाढविण्याकरिता दरसाल महाराष्ट्र भाषा बोलणारांचीं संमेलनें, साहित्यविषयक ग्रंथांचीं व वस्तूंचीं प्रदर्शनें तसेंच साहित्यचर्चा करण्याकारिता विशेष अधिवेशनें घडवून आणणें अवश्य आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेने, किंवा परिषदेचे परवानगीने कोणत्या तरी संलग्न संस्थेने असें संमेलन किंवा प्रदर्शन शक्य तर दरसाल भरविलें पाहिजे. असें न झाल्यास महाराष्ट्र साहित्य परिषदेने भरवावें. अशीं संमेलनें किंवा प्रदर्शनें भरविण्याची सर्व जबाबदारी परिषदेची कचेरी असेल त्या गांवीं कार्यकारी सभेवर व इतरत्र त्या त्या ठिकाणच्या सभांवर राहील, व तत्प्रीत्यर्थ स्वागत मंडळी, स्थानिक चिटणीस वगैरे विशिष्ट कार्यकर्ते लोक नेमण्याचें कामहि त्या त्या सभांचे आहे.

२५. संमेलनांत मंजूर झालेले ठराव कार्यकारी मंडळाने परिषदेपुढे विचारार्थ ठेवावे.

## इतर बाबी

२६. या नियमांना अनुसरून परिषदेचीं हरएक प्रकारचीं कामें मुक्रर होण्याकरिता पोट नियम वेळोवेळीं लागतील तसे कार्यकारी मंडळाने करून परिषदेच्या पुढील साधारण सभेंत मंजूर करून घ्यावे. व या नियमांचा बाध नसेल तर, सदर पोटनियमांप्रमाणे केलेलें सर्व काम कायदेशीर समजलें जाईल.

२७. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या उद्देशांत व घटनेंत फेरफार करणें झाल्यास परिषदेच्या वार्षिक सभेंत पूर्वसूचना देऊन किंवा त्यासाठी बोलाविलेल्या विशेष सभेंत हजर असलेल्या सभासदांच्या ३/५ बहुमताने करता येईल. बाकी सर्व कामांचा बहुमताने निर्णय होईल. साधारण सभेंत जे ठराव पसार होतील त्यांस कोणत्याहि तऱ्हेने विरोध येईल असे ठराव ६ महिनेपर्यंत पुढे आणले जाऊं नयेत.

२८. परिषदेनें बक्षिसें दिलेले निबंध, लेख व पुस्तकें परिषदेच्या खर्चाने किंवा आश्रयाने छापलेले ग्रंथ व लेख आणि परिषदेतर्फे प्रसिद्ध होणारें मासिक किंवा ग्रंथमाला परिषदेच्या सभासदांस कार्यकारी मंडळ ठरवील त्याप्रमाणे सवलतीचे दराने मिळतील,व त्याचें उत्पन्न येईल तें परिषदेच्या खजिन्यांत जमा होईल.

२९. परिषदेकडे आलेले लेख, ग्रंथ, वस्तू वगैरेवर परिषदेची मालकी राहून कार्यकारी सभा ठरवील तेथे त्यांचा एकत्र संग्रह केला जाईल. हा संग्रह परिषदेचे सर्व सभासदांस, आणि इतर लोकांस कार्यकारी मंडळ वेळोवेळीं ठरवील त्याप्रमाणे पहावयास सापडेल.

## संलग्न–संस्थांसंबंधी नियम.

३०. साहित्याचे उन्नतीसाठी स्थापन झालेल्या ज्या संस्थांना महाराष्ट्र साहित्य परिषदेचे हेतु व नियम मान्य असतील व ज्यांचे हेतु परिषदेच्या हेतूंना विसंगत नस तील, अशा संस्थांना त्यांच्याकडून मागणी आल्यास त्यांस संलग्न संस्था म्हणून जोडून घेण्यांत येईल.

३१. संलग्न संस्थांनी नोंदणी फी ५(पांच) रुपये परिषदेच्या निधीसाठी द्यावी व पुढे दरवर्षी एक रुपया फी द्यावी.

३२. संमेलन ज्या ठिकाणीं भरवावयाचें असेल त्या ठिकाणीं संमेलनाची व्यवस्था संलग्न संस्थेने करावी.

३३. प्रत्येक संलग्न संस्थेला परिषदेच्या उद्देशास अनुसरून कार्यकारी मंडळाला सूचना करण्याचा हक्क आहे व कार्यकारी मंडळाने त्यांचा विचार केला पाहिजे.

३४. संलग्न संस्थेच्या अंतर्गत व्यवस्थेशीं महाराष्ट्र साहित्य परिषदेचा कोणत्याहि प्रकारचा संबंध राहणार नाही.

## सहकारी संस्था

३५. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्याशीं सहानुभूती असणाऱ्या संस्था त्यांनी तशी इच्छा प्रदर्शित केल्यास,परिषदेशीं सहकारी संस्था म्हणून घेण्याचा व त्यासंबंधी अटी वगैरे ठरविण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

## वरील प्रकारच्या संस्थांना लागू असणारे सामान्य नियम

३६. संलग्न व सहकारी संस्था यांचे नोंदणी अर्ज मान्य करण्याचा अधिकार महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळास आहे. मात्र अशा नोंदलेल्या संस्था कमी करण्याचा ठराव पुढील परिषदेच्या साधारण सभेपुढे मंजुरीसाठी ठेवला पाहिजे.

३७.सहकारी किंवा संलग्न-संस्था यांपैकी कोणीहि संमेलन भरविल्यास त्यासाठी होणाऱ्या जमाखर्चाचा हिशोब निराळा ठेवून तो संमेलन झाल्यानंतर तीन महिन्यांच्या आंत परिषदेच्या कार्यकारी सभेकडे पाठवावा.

# परिशिष्ट २

## ट्रस्ट फंडाच्या ट्रस्टींकडून ता. ३१ डिसेंबर १९२६ अखेर एक वर्षाच्या हिशेबाचा तक्ता. तक्ता नं. १

**जमा**

१८६६--७--९ ता. ३१ डिसेंबर १९२५ अखेर शिल्लक :—

१७५३—७—९ इंपिरियल बँक ऑफ इंडिया सेव्हिंग बँक शाखा

११३—०—० हातीं

८२८-१०-७ सिक्युरिटी व शेअरवरील व्याज (इंपिरियल बँक सेव्हिंग बँक खात्यांत जमा केले ते).

४०—०—० सेक्रेटरीकडून आले ते (रौप्य-पदकाकरिता)

२७३५—२—४ एकूण बेरीज

**खर्च**

८००—०—० सेक्रेटरी यांस संमेलनासाठी दिले ते

४०—०—० संमेलनासाठी रौप्यपदकें केलीं त्याची किंमत

३६—०—० किरकोळ खर्च (पाध्ये यांनीं केला तो):— टेबल व कपाट

३—४—६ बडोदा संमेलन रिपोर्ट

१५—०—० मुंबई संमेलनाचे वेळीं हारतुरे, गाडीभाडें वगैरे

२४—८—० छपाई, बिलबुकें वगैरे

५—०—६ नाशिकहून एक सभा बोलाविली त्याबद्दल टाईपरायटिंग व पोस्टेज

१८११—५—४ वर्ष अखेर शिल्लकः—

१६८२—२—४ इंपिरियल बँक ऑफ इंडिया सेव्हिंग बँक शाखा

१२९—३—० हातीं (पाध्ये यांच्या)

२७३५—२—४ एकूण बेरीज

हिशेब तपासला. तो बरोबर आहे. मला जी जी माहिती पाहिजे होती ती ती मला मिळाली आहे. खाली दर्शविलेल्या सिक्युरिटीज् व शेअर्स (१४००० दर्शनी किंमतीच्या) इंपिरियल बँक ऑफ इंडियांत ट्रस्टींच्या नांवें ठेवलेल्या आहेत व त्याबद्दलच्या बँकेच्या पावत्या मी पाहिल्या आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | टक्के वॉरलोन ... ... ... ... | रु. १५०० | (दर्शनी किंमत) |
| ५॥ | ” ” बाँडस् ... ... ... | १०२०० | ” ” |
| ८ | ” शेअर्स सेंट्रल प्रॉव्हिन्सिस रेल्वे कंपनी लिमिटेड | ८०० | ” ” |

३ " तापी व्हॅली रेल्वे कंपनी लिमिटेड ... ... १५०० " "

१४००००

( सही ) जे. के. परुळकर
हिशेबतपासनीस

वा. ग. पाध्ये
पुणे ५-६-३२

---

## इ. स. १९२७ ते १९३१ ह्या पांच वर्षांचा ट्रस्ट फंडाचा हिशेब ट्रस्टींकडून आला तो :— तक्ता नं. २

ता. १ जानेवारी १९२७ ला ट्रस्टींपाशीं असलेली जमा:—

( १ ) ट्रस्टफंड-कायमनिधि इंपिरियल बँक ऑफ इंडियापाशीं ठेव.

| | |
|---|---|
| १ वॉर बॉंड २८ चे दर्शनी किंमत रु. | १०२००—०—० |
| २ ग. प्रॉ. नोटा ५ टक्के " " | १५००—०—० |
| ३ सी. पी. व तापी व्हॅली रेल्वे शेअर | २३००—०—० |
| एकूण दर्शनी किंमत रुपये चौदा हजार | १४०००—०—० |

( २ ) ट्रस्ट फंडावरील व्याज ( इंपिरियल बँक

| | | |
|---|---|---|
| ऑफ इंडिया सेव्हिंग बँकमध्ये ) | रु. | १६८२—२—४ |
| ट्रस्टींपाशीं ... ... | " | १२९—३—० |
| एकूण अठराशें अकरा रुपये पांच आणे चार पै | | १८११—५—४ |

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| १८११—५—४ | शिल्लक ता. १।१।१९२७ ला | १४१७—८—० | बँकेमार्फत बोनस १४३५ रु. आले त्यांतून सरकारी रोखे रु. १५०० दर्शनी किंमतीचे घेतले त्याचे |
| ५४७-१४-४ | व्याजाचे १९२७ सालचे | ६—६—० | बँकेचे कमिशन |
| १४३५—६—० | वॉर बॉंड १०२०० चे ४ टक्के गव्हर्नमेंट लोन १९३४–३७ चे. यांत रूपांतर केल्याबद्दल बोनस मिळालें तें | ०—२—६ | बँकेचा पोस्ट चार्ज १९२८ |
| ६६६—६—९ | व्याजाचे १९२८ सालचे | ०—५—० | " " " १९२९ |
| ६७०—५—१ | " १९२९ " | ०—५—० | " " " १९३० |
| ६७६—५—२ | " १९३० " | १५०—०—० | न. र. फाटक सेक्रेटरी यांस चेक नं. ए ६७४७३/ता. ७, १।५।१९२७ |
| ६५७-११-६ | " १९३१ " | | |
| ६४६५—६—२ | एकूण जमा चौसष्टशें पांसष्ट रुपये सहा आणे दोन पै. | | |

| जमा | खर्च | |
|---|---|---|
| | २४५–०–० | मा. दा. आळतेकर यांस चेक नं. २६७४७४/ता. ७, ९।५।१९२७ रु. २०० पुस्तकांसाठी व रु. ४५ वाङ्मय सेवामंडळाला देणगी |
| | १०००–०–० | ना. गो. चापेकर कार्याध्यक्ष यांस चेक नं. ए ६८०५/ता. २।४।१९२८ |
| | ५००–०–० | ना. गो. चापेकर यांस चेक ए ६८०६/ता. १।५।१९२८ |
| | ५००–०–० | ना. गो. चापेकर कार्याध्यक्ष व ट्रेझरर रा. एस्. बी. वैद्य, चेक नं. ए ६८१२/ता. ९।७।१९२९ |
| | ५००–०–० | ना. गो. चापेकर चेक नं. ए ६८२२/२९।८।३० |
| | ३३३–९–६ | कार्याध्यक्ष रा. ब. पाध्ये यांस १९२७ साली दिले (तक्ता नं ४ मध्ये सामील पहा) |
| | ४६५३–४–० | एकूण खर्च |
| | १८१२–२–२ | बाकी शिल्लक |
| | ६४६५–६–२ | |

ता. ३१ डिसेंबर १९३१ ला ट्रस्टींपाशीं असलेली जमा ट्रस्ट-फंड कायमनिधि.

| | | | |
|---|---|---|---|
| दर्शनी किंमत रुपये | १०२००-०-० | (अ) | चार टक्के गव्हर्मेंट लोन १९३४–३७ |
| ” | १५००–०–० | (२) | ” ” ” |
| ” | १५००–०–० | (३) | गव्हर्मेंट प्रॉ. नोटा ५ टक्के |
| ” | २३००–०–० | (४) | सी. पी. व तापी व्हॅली रेल्वे शेअर्स |
| ” | १००–०–० | (आ) | सरदार आंग्रे फंड |
| | १५६००–०–० | | ट्रस्ट फंड से. व्याज वगैरे |

रु. १४६१–८–८ इंपिरियल सेव्हिंग बँकेंत

३५०–९–६ करंट अकौंट

१८१२–२–९ शिल्लक

———

## मुंबई महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या विद्यमाने भरलेल्या ११ व्या साहित्य-संमेलनाच्या जमाखर्चाचा हिशोब सेक्रेटरी रा. फाटक व रा. रायकर यांनीं तयार केला होता तो. :— तक्ता नं. ३

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| ८०४ | डॉ. रायकर यांच्याकडे ट्रस्टी व ट्रेझरर यांजकडून आलेली रक्कम. | १५५–५–० | गाडी भाडें. |
| ४२८–८–० | वर्गणी, तिकीटविक्री व देणग्या यांच्या स्वरूपांत जमा झालेली रक्कम. | ८५–८–० | पोस्टेज. |
| २५–४–० | डॉ. रायकर यांनी केलेल्या खर्चाची रक्कम. | २८१–९–३ | प्रतिनिधींचा भोजन खर्च |
| ४००–०–० | रा. ब. पाध्ये यांनी हिशोब पुरा करण्यासाठी दिलेली रक्कम | २५९–४–३ | किरकोळ–( यांत बोर्ड, बॅजेस, हारतुरे, स्टेशनरी, दिवाबत्ती, हमाली या सर्वांचा समावेश आहे. ) |
| १६५७-१२-० | | २६४–०–० | फर्निचर. |
| | | ७५–०–० | भेटीदाखल. |
| | | ४०–०–० | पदकें. |
| | | २९-१४-० | डॉ. रायकर यांचा किरकोळ खर्च. |
| | | ३८०–०–० | छपाई. |
| | | ३०–०–० | देणगी ( वाङ्मयसेवा मंडळ ) |
| | | १६००–८–६ | एकूण. |
| | | ३१-१५-६ | तपशील सांपडत नसलेली रक्कम |
| | | २५–४–० | डॉ. रायकर यांचा जमेबाहेरचा खर्च. |
| | | १६५७-१२-० | |

## रा. परुळकर यांच्या सल्ल्यानें तयार केलेला ता. ३१ डिसेंबर अखेर १९२६–२७ सालांचा जमाखर्च

### तक्ता नं. ४

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| १५०–०–० | ट्रस्टींकडून मिळालेले. | २५–४–० | १९२६ सालअखेर खर्चाची बाकी. |
| २४५–०–० | ” ” | ३२७-१२-० | साधनांच्या अभावी ज्या रकमांचा तपशील मिळत नाही अशा:— रु. १५० रा. रा. |
| १५००–०–० | ” ” | | |
| ४९२–९–० | वर्गणीचे जमा. | | |
| २३८७–९-० | | | |

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| | | | फाटक यांजकडे (अनामत), रु. १७७-१२-० इतर. |
| | | १०८५--२--० | परिषदेच्या पहिल्या तीन अंकांचें छपाईचें बील. |
| | | २००-०--० | रा. रा. अळतेकर यांस पुस्तकाच्या लेखनाबद्दल. |
| | | ४५--०--० | वाङ्मयसेवामंडळाला देणगी. |
| | | १००--०--० | परिषदेच्या कचेरीचें वार्षिक भाडें (नवंबर १९२७ ते आक्टोबर १९२८ पर्यंत). |
| | | ६०--०--० | वाङ्मयसेवा-मंडळाला देणगी. |
| | | ८२-६--३ | कारकून व गडी यांचा पगार. |
| | | ९४-९-० | छपाई. |
| | | १७--३-३ | फर्निचर. |
| | | ९६-९-९ | टपाल व रेल्वे खर्च. |
| | | २--२-६ | स्टेशनरी. |
| | | १--८--० | किरकोळ |
| | | २५०--०-३ | शिल्लक १९२८ अखेर. |
| | | २३८७-९-० | |

---

## अळतेकर कमिटीने तयार केलेला १९२८ सालचा जमाखर्च तक्ता नं. ५

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| १५००-०--० | रा. ब. पाध्ये यांचेकडून. | १०८५-२--० | पत्रिकेच्या पहिल्या तीन अंकांचें छपाईचें बील. |
| ४८९-९--० | वर्गणीचे जमा. | २००--०--० | रा. अळतेकर यांस पुस्तकाच्या लेखनाबद्दल. |
| १९८९-९-० | | ६०--०-० | वाङ्मयसेवामंडळाला १९२७ सालाबद्दल देणगी, |

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| | | १००--०--० | परिषदेच्या कचेरीचें वार्षिक भाडें ( नवंबर १९२७ ते आक्टोबर १९२८ ). |
| | | ८२--६--३ | कारकून व गडी यांचा पगार. |
| | | ९४--९--० | छपाई. |
| | | १७--३--३ | फर्निचर. |
| | | ९६–९--९ | टपाल व रेल्वे खर्च. |
| | | २–२--६ | स्टेशनरी. |
| | | १–८--० | किरकोळ. |
| | | १७३९--८--९ | |
| | | २५०--०--३ | शिल्लक. |
| | | १९८९--९--० | |

---

## १९२९ सालचा जमाखर्च
## तक्ता नं ६

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| २५०–०–३. | मागील सालची शिल्लक. | १४३३-१३-३ | पहिल्या वर्षाचा चौथा व दुसऱ्या वर्षाचे पहिले तीन पत्रिकेचे अंक छपाई. |
| १४४२–७–०. | वर्गणी. | २०---८-० | स्टेशनरी. |
| ५००–०–०. | रा. ब. पाध्ये यांजकडून. | १५३---७-० | टपालखर्च. |
| २१९२–७–३. | | १५७---०-० | कारकून व गडी. |
| | | ८०---५-० | छपाई. |
| | | २---८-० | किरकोळ. |
| | | १८४७---९-३ | |
| | | ३४४-१४ ० | शिल्लक. |
| | | २१९२--७-३ | |

या साल अखेरची शिल्लक रु. ३४४--१४--०. यानंतरच्या ( कमेटीबाहेरच्या ) हिशेबांत ओढली आहे. ती धरून १९३१ एप्रिल अखेर शिल्केंत तफावत पडत नाही असें दिसेल. या ( १९२९ ) सालअखेरच्या शिल्केंत ( प्रत्यक्ष व कागदी ) कमिटीला ७० रु. ची तफावत दिसून आली.

वरील हिशेबांच्या कमिटींत श्री. अळतेकर, श्री. दु. भा. वैद्य, श्री. ग. वि. लाड, व श्री. स. रा. सांडिकले हे असून चिटणीस श्री. फाटक, कार्याध्यक्ष, श्री. वासेकर व ऑडिटर श्री. परुळकर यांची तिला मदत होती. तेव्हा त्या कमिटीचा हिशोब मान्य करूनच पुढे चालण्यास आम्हांला हरकत दिसत नाही.

---

## १९३० सालचा जमाखर्च

### ( अळतेकर कमिटीनंतरचा हिशोब )

### तक्ता नं. ७

| जमा. | | खर्च. | |
|---|---|---|---|
| ३४४-१४-० | शिल्लक १९२९अखेर आळतेकर कमिटीच्या हिशोबांतील. | १४२९-१२-० | छपाई. |
| ५००-०-० | व्याज. | १८०-८-० | टपाल. |
| १००-०-० | देणगी ग्रंथोत्तेजक मंडळ इंदूर यांजकडून. | १००-०-० | भाडें. |
| ९-४-० | अंकविक्री किरकोळ. | २-५-० | सादील. |
| ७१६-८-० | वर्गणी वसुली. | ०-१४-० | किरकोळ. |
| ०-१२-० | व्ही. पी. खर्च वसुली. | १७१३-७-० | |
| २-८-० | देणगी किरकोळ. | | |
| १६७३-१४-० | | | |
| ३९-९-० | खर्चाकडील. | | |
| १७१३-७-० | | | |

---

## १९३१ एप्रिल अखेर

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| ९४-८-० | वर्गणी वसुली. | ३९-९-० | मागील सालचा खर्च. |
| ९-०-० | अंकविक्री. | ५४-८-० | छपाई. |
| १०३-८-० | | २-१०-६ | टपाल. |
| | | ९६-११-६ | |
| | | ६-१२-६ | शिल्लक. |
| | | १०३-८-० | |

हैद्राबाद संमेलनापूर्वी परिषदकचेरीकडे रु. ६-१२-६ एवढीच शिल्लक होती.

---

## १९३१ ( मे ते डिसेंबर अखेर )
### ( नवीन कार्यकारी मंडळाच्या कारकीर्दीतील जमाखर्च ).

**जमा.**

| रक्कम | तपशील |
|---|---|
| ३१–४–० | ना. गो. चापेकर. |
| २३४–९–६ | देणगी. |
| १३७९–४–० | वर्गणी. |
| २०–०–० | बँक. |
| १६६५–१–६ | |

**खर्च.**

| रक्कम | तपशील |
|---|---|
| २९६–०–० | ना. गो. चापेकर. [अनामत] |
| ८३०–८–० | छपाई. |
| ३८–०–० | पगार-कारकून. |
| १४५–७–३ | टपाल. |
| ६६–५–० | प्रचार. |
| २०७–०–० | मुं. भा. वैद्य, खजिनदार. ( अनामत ) |
| २५–०–० | बँक. |
| ११–०–६ | सादील. |
| ०–२–९ | ग्रंथ (ज्ञानप्रकाश अंक खरेदी). |
| ०–१४–० | पार्सल. |
| १४–०–० | सामान |
| २–५–० | हमाली |
| २–०–० | अंक वाटणावळ |
| ०–४–० | बट्टा |
| ०–८–० | पोस्त |
| १६३९–६–६ | |
| २५–११–० | शिल्लक सालअखेर |
| १६६५–१–६ | |

हा जमाखर्च ऑडिटर श्री. ग. स. मराठे यांनी तपासला आहे.

य. रा. दाते
कृ. पां. कुलकर्णी
चिटणीस

[ आर्यसंस्कृति-मुद्रणालय, पुणें ]

प्राथमिक व दुय्यम शाळांतील वाचनालयांकरिता मुंबई सरकारने मंजूर केलेलें

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष ५ वें, अंक ४ था

## अनुक्रमणिका







# विनंती.

कांहीं अपरिहार्य अडचणीमुळे अंकाच्या प्रसिद्धीस विलंब होत आहे ह्याबद्दल दिलगिरी वाटत आहे. हा अंक जवळ जवळ संमेलनांकच असल्यामुळे टाइपांत जुळलेले कांहीं चांगले लेख ह्या अंकात समाविष्ट करतां आले नाहीत. ते येत्या वर्षप्रतिपदेच्या अंकांत घातले जातील त्याबद्दल लेखक क्षमा करतील. नवीन वर्ष सुरू झालें आहे. सदस्यांनी परिषदेची वर्गणी लवकर पाठविण्याची कृपा करावी.

संपादक
महाराष्ट्र साहित्य पत्रिका.

ग्रंथ लिहिणें झाल्यास, आपल्या काळची लौकिक बोली कशीहि असली, तरी ग्रंथकर्त्यांच्या ग्रंथाची भाषा प्राचीन ठराविक भाषेप्रमाणे असे. इ. स. पहिल्या शतकांतील पाली ग्रंथकार व इ. स. पांचव्या अगर दहाव्या शतकांतील पाली ग्रंथकार यांची ग्रंथभाषा तंतोतंत एकच आहे, असें म्हणण्यास हरकत नाही. यामुळे पालीची स्थितीहि संस्कृत भाषेसारखी झाली; आणि संस्कृतापासून उच्चारभेदाने व व्याकरणभेदाने पालीपेक्षा जास्त प्रमाणांत विभक्त झालेल्या लौकिक बोली बळावत चालल्या व त्यांची तळी बऱ्यास हिंदुधर्मी राजाश्रित संस्कृत पंडितांनी व जैन ग्रंथकारांनी उचलली. यामुळे या भाषा इ. पू. तिसऱ्या शतकापासून ग्रंथांत डोकावूं लागल्या आणि त्यांची चलती सुमारें इ. स. दहाव्या शतकापर्यंत होती. यांना 'प्राकृत' ही संज्ञा आहे. प्राकृत शब्दाच्या व्युत्पत्तीविषयी अनेक मतें आहेत तीं अशीं:—

[ १ ] 'संस्कृत' ही 'प्रकृति', आणि तिच्यापासून विकाररूपाने उत्पन्न झालेली भाषा ती 'प्राकृत'[1]. यावर आक्षेप असा आहे की, 'संस्कृत' म्हणजे 'संस्कार करून नीट नेटकें केलेलें;' म्हणून प्राकृतापासूनच संस्कृत झालें असें म्हणणें अधिक शोभेल. कारण, ज्याच्यावर मखलाशी करण्यांत येतें, तें मूळ रूप संस्कारापूर्वी हयात असलेंच पाहिजे.

[ २ ] प्रकट–पअख–पाअड–प्राकृत[2]. 'प्रकट' म्हणजे प्रकृतिप्रत्ययाची खटपट केल्याशिवाय अर्थ कळणारें. 'प्राकृत' हा शब्द 'संस्कृत' शब्दाच्या पंगतीस शोभणारा कृत्रिम जोडीदार बनविलेला आहे. या व्युत्पत्तीवर असें म्हणतां येईल की, एक तर 'प्राकृतांत' प्रकृतिप्रत्ययाची खटपट नाही, असें वास्तविक म्हणतांच येत नाही. शिवाय, 'प्रकट' हा शब्द 'संस्कृत' शब्दाच्या अर्थानुरोधाने सरळ व प्रत्यक्ष प्रतिद्वंदी होऊं शकत नाही. 'संस्कृत' हा शब्द मात्र साहजिक आणि 'प्राकृत' हा शब्द कृत्रिम' या कोटीक्रमास आधार नाही; आणि निराधार संभावना करणें असेल, तर ती याच्या उलट कां करूं नये!

[ ३ ] 'प्रकृति' म्हणजे मूळ सहज स्वरूप अगर धर्म! व्याकरण संस्कारहीन सामान्य जनतेंत वाणी आपल्या सहज स्वभावाने स्वैर खेळत असते; आणि हें तिचें प्रकृतिस्वरूप म्हणजेच 'प्राकृत', व पाणिनीच्या परंपरेचा उजळा देऊन शुद्ध राखलेली भाषा ती 'संस्कृत'. ही शेवटची व्युत्पत्ति आमच्या दृष्टीने विशेष सयुक्तिक वाटते.

प्राकृताचाच उल्लेख पाणिनीनंतर तीनशें वर्षांनी झालेल्या वार्तिककार कात्यायनाने केलेला आहे. प्राकृत भाषेंतील अत्यंत जुनें काव्य [ सत्तसई ] इ. स. पहिल्या शतकांत संपादण्यांत आलें. प्राकृताचें आजमितीस ज्ञान असलेलें जुन्यांत जुनें व्याकरण वररुचीने इ. स. तिसऱ्या शतकांत रचिलें, असें संशोधकांचें मत आहे. इ. स. दहाव्या शतकापर्यंत प्राकृत भाषांत ग्रंथरचना होत होती. म्हणजे 'प्राकृत' भाषा आरंभापासूनच 'पालीच्या' बरोबरीने लौकिकांत व ग्रंथांत संचार करीत होत्या हे सिद्ध आहे.

वररुचीने चार प्राकृत भाषांचें व्याकरण रचिलें आहे. त्या भाषा माहाराष्ट्री, पैशाची, मागधी व शौरसेनी या होत. या सर्व संज्ञा देशनामोत्पन्न आहेत. परंतु यावरून त्या त्या

---

१ वररुचि प्रभृति प्राकृत व्याकरणकार. २ रा. रा. भागवत, प्राकृत भाषेचा विचिकित्सा, पु. ३, ६

भाषा विवक्षित देशांतच चालू होत्या असें नाही. संस्कृत नाटकांमधून या सर्व भाषा येतात. नाटकांतील पात्रांचा विचार केला, तर तीं बहुतेक सर्व एकाच प्रांतांत नांदत असणारीं, परंतु निरनिराळ्या संस्कृतीचीं व दर्जाचीं आढळतात. आणि यामुळेच त्यांच्या भाषेंत भेद उत्पन्न होतो. असें दिसतें, कीं, प्राकृत भाषांपैकीं माहाराष्ट्री[1] ही खरी शिष्टभाषा होती. हिचा उपयोग विशेषतः काव्यग्रंथांत[2] केला जाई, व आरंभींचे या भाषेंतील काव्यग्रंथ महाराष्ट्र[3] देशांतच झाले असले पाहिजेत. कारण, असें असल्याशिवाय या भाषेला हें नांवच मिळणें शक्य नाही. या माहाराष्ट्रीपासून विभ्रष्ट झालेले अशिष्ट भेद बहुसंख्य होते. त्यांपैकीं तीनच—म्हणजे शौरसेनी, मागधी व पैशाची—पात्रभेदानुसार नाटकग्रंथांत योजण्यांत येत असत. ज्याप्रमाणे आज खान-देशी, वऱ्हाडी, घाटी, कोंकणी, कानडी, धेडगुजरी इत्यादि नांवें आपण मराठीच्या विभागांना देतो, त्याप्रमाणेच महाराष्ट्रीच्या विभ्रंशांना शौरसेनी वगैरे नांवें देण्यांत आलीं, हे भाषाविभ्रंश महाराष्ट्रांतील निरनिराळ्या समाजवर्गांत चालू होते आणि त्यांच्या बोबडेपणाचें अगर विकृतीचें विशिष्ट लक्षण ज्या ज्या प्रांतांतील अगर देशांतील लोक भाषेशीं विशेषतः जुळतें आढळलें, त्या त्या प्रांतांवरून अगर देशांवरून या माहाराष्ट्रीच्या विभ्रंशभेदांस हीं नांवें देण्यांत आलीं असावीं. परंतु लौकिक बोलीच्या चंचल स्वरूपामुळे हें भाषाभेदाचें प्रकरण चोहोंच्या आंकड्यावर स्थिर होऊन टिकणें शक्य नव्हतें. त्यामुळे चाराचे पांच, पांचाचे सहा, असें होतां होतां जवळ जवळ एकवीस प्राकृत भाषांचा उल्लेख आढळतो. परंतु हे सर्व भेद सरसहा ग्रंथांत—नाट्यग्रंथांत सुद्धा—आले आहेत असें आढळत नाही. मृच्छकटिकाचा टीकाकार पृथ्वीधर हा 'महाराष्ट्री, शौरसेनी, अवन्तिका, प्राच्या, व मागधी' या पांचांचा उल्लेख करितो. शेषकृष्ण आपल्या प्राकृत चंद्रिकेंत

महाराष्ट्री तथाऽऽवन्ती शौरसेन्यर्धमागधी ।
बाल्हीकी मागधी चैव षडेता दाक्षिणात्यजाः ॥

असा दाक्षिणात्यांमधील सहा प्राकृतांचा उल्लेख करितो. भरताच्या नाट्यशास्त्रांत सात भाषांचा उल्लेख आहे.—

मागध्यवन्तिजा प्राच्या शूरसेन्यर्धमागधी ।
बाल्हिका दाक्षिणात्या च सप्तभाषाः प्रकीर्तिताः ॥ १७।४८

असो. प्राकृत व्याकरणकार पालीचा मुळीच उल्लेख करीत नाहीत. माहाराष्ट्रीलाच ते 'प्रकृष्ट प्राकृत' लेखितात, व इतर प्राकृत भाषा तिच्यापासून उद्भवल्या, असें समजतात, आणि याच कारणास्तव शेषकृष्ण पंडित प्राकृत भाषांना 'दाक्षिणात्यजाः' म्हणतो. माहाराष्ट्री-

---

१ सर्वासुभाषास्विह हेतुभूतां भाषां महाराष्ट्रभवां पुरस्तात् । निरूपयिष्यामि यथोपदेशं श्रीरामशर्माहमिमां प्रयत्नात् ॥ ( रामतर्कवागीश, प्रा० क०, स्तबक १ ). २. नाटकादौ बहुप्रकारप्राकृतप्रपञ्चेषु चतस्र एव भाषा प्रयुज्यन्ते । "शौरसेन्यवन्तिका प्राच्या मागध्यः ।" महाराष्ट्र्यादयः काव्य एव उपयुज्यन्ते । ( मृच्छ० उपोद्घाते पृथ्वीधरः ). ३ महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः । सागरः सूक्तिरत्नानां सेतुबंधादि यन्मयम् ॥ ( काव्यादर्शे दण्डी ).

तील चारच[1] ग्रंथ आजकाल उपलब्ध आहेत. (१) हालसातवाहनकृत[2] 'गाथासप्तशती' (२) कालिदासीय[3] 'दहमुहवहो', (३) वाक्पतिराजकृत[4] 'गौडवहो', आणि (४) राजशेखरकृत[5] 'कर्पूरमंजरी'. या रीतीने बौद्ध प्रचारक पालीचा फैलाव करीत असतांच, हिंदूंच्या व जैनांच्या वाङ्मयप्रयत्नांनी प्राकृत भाषा बनल्या. ही हिंदुस्थानांतील तिसरी भाषाविषयक उत्क्रान्ति होय.

वरील कलमांत मूळ माहाराष्ट्री प्राकृताच्या चार, पांच, सहा, सात अशा क्रमाक्रमाने वाढतवाढत जवळजवळ एकवीस भाषा झाल्याचे उल्लेख आढळतात, हें दर्शविलें आहे. इ. स. तिसऱ्या शतकाचे सुमारास प्राकृत वैय्याकरण वररुचि याने माहाराष्ट्री, पैशाची, मागधी, शौरसेनी या ग्रंथभाषांचीं लक्षणें बांधल्यावर, अर्थात् या भाषांना एकप्रकारचें स्तब्धत्व आलें. तोंडी व्यवहारांत यांचें स्वरूप कालक्रमाने निरनिराळ्या समाजवर्गांत निरनिराळ्या रीतींने वेषान्तर पावत होतें. परंतु या भाषांत जे ग्रंथ होत ते मात्र व्याकरणानियमानुसार शुद्ध भाषेत लिहिले जात; म्हणून इ. स. दहाव्या शतकांत लिहिणारा राजशेखर पहिल्या शतकांतील हालसातवाहनाची माहाराष्ट्री भाषा लिहितो. परंतु ही माहाराष्ट्री तिसऱ्या चवथ्या शतकापासूनच लोकव्यवहारांतून गेल्यासारखी झाली होती, व माहाराष्ट्रीप्रभृति प्राकृतचतुष्कापासून अपसृष्ट व विभ्रष्ट झालेल्या अनेक बोली फैलावून त्या प्रथम संसाराचें हुबेहूब चित्र जें नाट्यवाङ्मय त्यांत चमकूं लागल्या. इ. स. दुसऱ्या तिसऱ्या शतकांत झालेल्या भरताच्या नाट्यशास्त्रांत या प्रांतिक भाषांचा 'विभ्रंश[6]' किंवा 'देशभाषा[7]' असा उल्लेख केलेला आढळतो. या देशभाषांत देशी छंदांत[8] कवनें रचिलीं जात व त्यांचा नाटकग्रंथांत[9] प्रवेश होई. भरताने या भाषांना 'विभाषा' हें नांव दिलें असून, त्याने सहा[10] विभाषांचा उल्लेख केलेला आहे. मृच्छकटिकाचा टीकाकार पृथ्वीधर हा या विभाषांना 'अपभ्रंश' हें नांव देतो; व त्यांची संख्या पुष्कळ असली तरी त्यांपैकी चारच[11] अपभ्रंश नाट्यग्रंथांत येतात अशी माहिती सांगतो. इ० स० सहाव्या शतकांतील भामह[12] याने अपभ्रंशाचा ग्रंथभाषा म्हणून उल्लेख केलेला आहे. इ० स० सातव्या आठव्या

---

१ या चार ग्रंथांशिवाय श्वेतांबर जैनांचे बरेच ग्रंथ जैनप्राकृतांत आहेत. जैनप्राकृत म्हणजे जवळजवळ महाराष्ट्री प्राकृतच आहे. पैशाची प्राकृतांत गुणाढ्य नांवाच्या महाराष्ट्रीय प्रतिभाने 'बृहत्कथा' नांवाचा प्रचंड ग्रंथ लिहिल्याचें प्रसिद्ध आहे. जरी मूळ ग्रंथ उपलब्ध नाही, तरी क्षेमेन्द्र व सोमदेव यांनी केलेले त्याचे संक्षिप्त संस्कृत उलथे प्रसिद्ध आहे. मॉ. लाकोट यांना एक तिसरा उलथा मिळाला आहे, असें प्रो. पां. वा. काणे कळवितात. २ इ० स० पहिलें शतक. ३ इ० स० पांचवें शतक. ४ इ० स० सातवें शतक. ५ इ० स० दहावें शतक. ६ त्रिविधं तच्च विज्ञेयं नाट्ययोगे समासतः। समानशब्दैर्विभ्रष्टं देशीमतमथापि वा ॥ नाट्यशास्त्र १७।३. ७ एवमेतत्तु विज्ञेयं प्राकृतं संस्कृतं तथा। अत ऊर्ध्वं प्रवक्ष्यामि देशभाषा प्रकल्पनम् ॥ कित्ता, १७।१४. ८ अथवा छन्दतः कार्या देशभाषा प्रयोक्तृभिः। कित्ता, १७।४६. ९ नानादेश समुत्थंहि काव्यं भवति नाटके। कित्ता, १७।४७. १० शबराभीर चण्डाल सचरद्रविडोड्रजाः। हीना वने चराणांच विभाषा नाटके स्मृताः ॥ कित्ता, १७।४९. ११ अपभ्रंशप्रपञ्चेषु चतस्र एव भाषा प्रयुज्यन्ते। "शकारी चाण्डाली शाबरी ढक्कदेशीयाः। १२ शब्दार्थौ सहितौ काव्यं गद्यंपद्यं च तद्द्विधा। संस्कृतं प्राकृतं चान्यदपभ्रंश इति त्रिधा ॥

शतकांत झालेल्या काव्यादर्शकार दण्डीने अपभ्रंशाबरोबर मिश्रभाषाप्रकारांचा ग्रंथभाषा[1] म्हणून उल्लेख केलेला आहे. नवव्या शतकांतील काव्यालंकाराचा कर्ता रुद्रट[2] याने देशभेदाने अनेक अपभ्रंश उत्पन्न झाल्याचें नमूद केलें आहे; व रुद्रटाचा टीकाकार नमिसाधु ( इ० स० अकरावें शतक ) याने अपभ्रंशाचीं लक्षणें लोकांच्या प्रत्यक्ष वाग्व्यवहारावरूनच जाणावीं, असें सांगून या अपभ्रंशाचें मिश्र, अनियमित व चंचल स्वरूप सुचविलें आहे. राजशेखर आपल्या काव्यमीमांसेत काव्याच्या विराट्पुरुषाचें वर्णन करीत असतां, म्हणतो की, "शब्दार्थौ ते शरीरं, संस्कृतं मुखं, प्राकृतं बाहुः, जघनमपभ्रंशः, पैशाचं पादौ, उरो मिश्रम्" या एकंदर ऊहापोहावरून इतकें स्पष्ट निश्चित होतें की, इ० स० च्या तिसऱ्या शतकांत प्राकृत भाषांचे अपभ्रंश लोकांत प्रवेश बळावत चालले होते, व ते प्रथमतः नाट्यग्रंथांत हीन संस्कृतीच्या पात्रांच्या तोंडीं चमकूं लागले. आस्ते आस्ते या अपभ्रंशांचा प्रवेश काव्यग्रंथांत होऊन, त्यांना शिष्टत्व येऊं लागलें. आणि त्यांचीं व्याकरणें रचण्यांत येऊं लागलीं. परंतु एकंदरींत हे अपभ्रंश बहुसंख्याक व चल प्रकृतीचे होते. अर्थात् त्यांतील कांहींना मात्र शिष्टत्व मिळून ते कायम ठशाची ग्रंथभाषा बनले.

अपभ्रंशवाङ्मय[3] गेल्या दहा पंधरा वर्षांतच प्रकाशांत आलेलें आहे आणि तेंहि फारसें अवाढव्य आहे असें नाही. दहा वर्षांपूर्वी भाषाकोविदांना ज्ञान असलेल्या अपभ्रंश वाङ्मयाची पुंजी अगदींच तुटकी होती. ( अ ) विक्रमोर्वशीयम् नाटकाच्या चौथ्या अंकांतील कांही भाग ( आ ) प्राकृत पिंगल, ( इ ) हेमचंद्राच्या व्याकरणांत आलेलीं कांही उदाहरणें, ( ई ) हेमचंद्रकृत कुमारपालचरित ऊर्फ प्राकृत गद्याश्रय काव्य, ( उ ) 'कालकार्य कहा' सारख्या कांही जैन आख्यायिका, आणि ( ऊ ) सरस्वतीकंठाभरणासारख्या व्याकरणग्रंथांत व त्यांवरील टीकांत आलेलीं तुटक उदाहरणें, इतकाच अपभ्रंश वाङ्मयाचा प्रपञ्च दहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध होता. परंतु गेल्या दहा वर्षांत बरेंच अपभ्रंशवाङ्मय उघडकीस आलें आहे, तें येणेंप्रमाणेः-- ( १ ) धनपालकृत भविसयत्तकहा[4], ( २ ) महेश्वरसूरिकृत संजममंजरि, ( ३ ) संजममंजरीवरील हेमहंसमूर्गीची टीका, ( ४ ) पुष्फदन्तकृत तिसट्टि महापुरिसगुणालंकार,[5] ( ५ ) नयनन्दिकृत आराधना, ( ६ ) योगीन्द्रदेवकृत परमात्मप्रकाश, ( ७ ) वरदत्तकृत वइरसामि चरिउ[6], ( ८ ) पांच सात 'संधि' आणि 'रास' या नांवाचे छोटे ग्रंथ. यांशिवाय कुमारपाल प्रतिबोध, उपदेशतरंगिणी, इत्यादि तीन चार ग्रंथांत अपभ्रंशवाङ्मयांतील लांबलचक उतारे आढळांत येतात.

---

१ तदेत द्वाङ्मयं भूयः संस्कृतं प्राकृतं तथा । अपभ्रंशश्च मिश्रं चेत्याहुरार्याश्चतुर्विधम् ॥ संस्कृतं नाम दैवी वागन्वाख्याता महर्षिभिः । तद्भवः तत्समो देशीत्यनेकः प्राकृतक्रमः ॥ आभीरादिगिरः काव्येष्वपभ्रंश इति स्मृताः । शास्त्रेतु संस्कृतादन्यदपभ्रंश तयो दितम् ॥ ११३२, ३३, ३६. २ प्राकृत संस्कृत मागध पिशाच भाषाश्च शौरसेनीच । षष्ठोऽत्र भूरिभेदो देशविशेषादपभ्रंशः ॥ २।१२. ३ अपभ्रंशवाङ्मयासंबंधीची येथील माहिती धनपालविरचित "भविसयत्त कहा" या ग्रंथास जोडलेल्या कै० पां. दा. गुणे, पीएच्. डी. यांच्या प्रस्तावनेच्या आधारें दिली आहे. ४ गायकवाड प्राच्य ग्रन्थमाला, अंक २०, ५ भांडारकर संस्थेतील डेक्कन कॉलेज संग्रह. ६ पाटण व खंबायत.

आजपर्यंत उपलब्ध झालेले अपभ्रंशग्रंथ बहुतेक सर्व गुजरात, काठेवाड व मारवाड या प्रांतांतीलच आहेत. महाराष्ट्रांतील अपभ्रंश ग्रंथ अद्याप उघडकीला आलेले नाहीत. पुढलें भविष्य कांहींच करतां येणार नाही. उपलब्ध असलेल्या सर्व अपभ्रंशग्रंथांमध्ये एक विशेष आढळून येतो, तो हा की, त्यांतील पद्यांत सर्वत्र अंत्य यमक आहे. संस्कृत अगर प्राकृत वाङ्मयांत हें बहुतेक आढळतच नाही असें म्हटलें तरी चालण्यासारखें आहे. यावरून असें दिसतें की, अपभ्रंशभाषांमधून रचलेलीं गाणीं लोकांत पुष्कळ आवडीचीं होतीं, आणि अशा गाण्यांत मधुरता येण्याला अन्त्य यमकाची अत्यंत जरूरी असते; त्यामुळे जेव्हा अपभ्रंश भाषांत काव्य-ग्रंथ होऊं लागले, तेव्हा या गाण्यांचे अनुकरण करून अपभ्रंशकवींनी या अन्त्य यमकाचा स्वीकार केला, व ती प्रथा पुढे कायम झाली.

असो. याप्रमाणे कांही अपभ्रंश प्राकृतभाषांच्या स्तब्धावस्थेंत शिष्टत्व लाभून ग्रंथभाषा झाली, ही हिंदुस्थानांतील भाषाविषयक चवथी उत्क्रान्ति होय.

७ अपभ्रंशाचे कांही प्रकार मात्र ग्रंथभाषेंत प्रविष्ट झाले, हें वरील कलमांत नमूद केलेंच आहे. परंतु ग्रंथभाषेंत न येणारे असे अनेक अशिष्टप्रचार देशोदेशीं व प्रांतोप्रांतीं प्रचलित होते व त्यांमध्ये ग्रंथभाषेपासून अधिकाधिक अपभ्रष्ट होण्याची सहजक्रिया अनवरत चालू होती. या अपकृष्ट अपभ्रंशांतून अर्वाचीन देशभाषांचा संभव झाला, व इ० स० दहाव्या शतकापासून या भाषा लेखांत चमकूं लागल्या. बंगाली, हिंदी, पंजाबी, सिंधी, गुजराती, ओढी व मराठी ह्या अर्वाचीन मुख्य देशभाषा होत. ही भाषाविषयक पांचवी उत्क्रान्ति होय.

८ इतर अर्वाचीन देशभाषांप्रमाणे मराठीभाषा ही अपभ्रंशांपासूनच परिणतिक्रमाने उत्पन्न झाली असें मानण्यास पुढीलप्रमाणे कारणें आहेत.—( अ ) संस्कृत शब्दांचीं मूळरूपें बदलत बदलत, ज्या वेषांत तीं अपभ्रंशांत आढळतात, तींच रूपें जरा अधिक सैल होऊन बहुशः मराठींत कायम झालेलीं दिसतात. कांही शब्दांत ह्या परिणतक्रियेचें पाऊल मराठीने पुढेहि नेलेलें आढळतें; परंतु अपभ्रंशांच्या मागे मराठीभाषा सहसा जात नाही. याचा अर्थ असा की, जेथे माहाराष्ट्री वगैरे प्राकृत भाषांतील शब्दरूपांचें परिवर्तन होऊन तीं अपभ्रंशांत निराळीं बनलीं, तेथे मराठीने प्राकृतरूपें संक्रमणावस्थेंतील अतएव अग्राह्य ठरवून, अपभ्रष्ट रूपेंच शिष्ट ग्राह्य गणलीं आहेत. याचे कांही दाखले मागे प्र. ३, क. ७ मध्ये प्रसंगतः दिलेले आहेत. हीं संक्रमणावस्थेंतील कांही रूपें अव्वल जुन्या मराठींत आढळतात, ही गोष्ट खरी आहे. परंतु शिष्टग्रंथकारांत तीं आस्ते आस्ते कमी होत गेलेलीं दिसतात, आणि आजमितीस तर तीं शिष्ट भाषेंतून अजीबात लुप्त झालीं आहेत. ( आ ) रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांच्या "ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण" या अत्यंत महत्त्वाच्या ग्रंथांत ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषेच्या आंतररचनेचा धागा त्या भाषेपूर्वी प्रचलित असलेल्या अपभ्रंश भाषांशीं कसा जुळलेला आहे, हें स्पष्ट केलें आहे. प्रो. गुणे यांचेहि या विषयावरील विविधज्ञान विस्तारांत (इ.स. १९२३) प्रसिद्ध झालेले लेख हाच मुद्दा शाबीत करितात. ( इ ) मराठीच्या जन्मापासून तिच्या काव्याला अन्त्य यमकाचें सुंदर लेणें लाभलें आहे. मराठीप्रमाणे बंगाली, गुजराती वगैरे अर्वाचीन देशभाषांतहि अन्त्य यमकाचा प्रसार हाडींमासीं खिळलेला दिसतो. हें अंत्य यमक या भाषांनी

अपभ्रंश वाङ्मयांतून मिळविलें आहे. अपभ्रंशाचें बहुतेक सर्व वाङ्मय अंत्य यमकयुक्त आहे. संस्कृत, पाली व प्राकृत यांत हा प्रकार नाही. ( ई ) अपभ्रंश वाङ्मय विशेषतः आठव्यापासून अकराव्या शतकापर्यंत उत्पन्न झालेलें आहे. आणि या काळाच्या लागोमाग शेंदोनशें वर्षांनी मराठी वगैरे देशभाषांत घटीवघोटीव ग्रंथांतराति होऊं लागली. अर्थात् देशीभाषांचा संभव अपभ्रंशांतूनच झाला, असें म्हटल्यावाचून सुटकाच नाही.

९ मराठीभाषेचा उद्भव प्रत्यक्ष अपभ्रंश भाषांतून झालेला आहे, हें वर नमूद केलेंच आहे. परंतु बौद्धांची धर्मभाषा जी पाली तिचाहि तिच्या प्रकृतीवर बराच परिणाम झालेला आहे. भाषेच्या आंतर घटनेंत व्याकरणप्रक्रियेप्रमाणेंच 'आदेशप्रकरणाचा 'हि समावेश होतो. शब्दाच्या मूळ वर्णांत कोणत्याहि प्रकारचा वर्णभेद होऊन, त्यांचें जें रूपांतर होतें, त्यास 'आदेश' म्हणतात. तेव्हा संस्कृत शब्द पाली–प्राकृत–अपभ्रंश या परंपरेने अगर स्वतंत्र रीतीने मराठींत येत असतां, त्यांत कसे कसे आदेश झाले आहेत, हें भाषोत्पत्तीच्या दृष्टीने पहाणें अवश्य आहे. आंतररचनेचें एक अंग जें व्याकरणप्रक्रिया, त्याचा यथास्थित प्रपंच "ज्ञानेश्वरींतील मराठीभाषेच्या व्याकरणांत" रा. राजवाडे यांनी केला असल्यामुळे, त्याची पुनरावृत्ति न करतां, येथे फक्त आदेश प्रकरणाचा जरा विस्तारशः विचार करणें आवश्यक आहे.

१० प्रथमतः पाली व प्राकृतभाषा यांमध्ये आदेशप्रकरणीं ठळक भेद कोणते आहेत ते नमूद करणें जरूर आहे.

( अ ) पालीभाषेंत 'ळ'–कार आहे, तो प्राकृतभाषांत मुळीच नाही.

( आ ) पालीभाषेंत 'त'–कार व 'ण'–कार हे दोन्ही आहेत; माहाराष्ट्री, शौरसेनी व मागधी यांत फक्त 'ण'–कार आहे, आणि पैशाचींत फक्त 'न'–कार आहे.

( इ ) प्राकृतांत क, ग, च, ज, त, द, प, य आणि व हे नऊ वर्ण असंयुक्त असल्यास व शब्दाच्या प्रारंभीं नसल्यास, त्यांचा लोप होतो. असा वर्णलोप पालींत होत नाही.

( ई ) ख, घ, थ, ध आणि भ हे वर्ण असंयुक्त असून शब्दाच्या आरंभीं नसल्यास, ते बहुशः 'ह' हा आदेश प्राकृतांत घेतात. हा प्रकार पालींत क्वचित् घडतो.

( उ ) पालींत व प्राकृतांत फक्त 'स' हा एकच ऊष्मा आहे, परंतु मागधी, प्राकृतांत 'श' हा एकच ऊष्मा आहे. तसाच मागधीमध्ये 'र'–काराऐवजीं बहुशः 'ल'–कार येतो. शब्दारंभीं 'ज' असल्यास पालींत व प्राकृतांत त्यास 'य' आदेश होतो, परंतु मागधींत 'ज'च राहतो.

( ऊ ) अपभ्रंशांत स्त्रीलिंगी 'आ'–कारान्त नामांचा अन्त्य 'आ' प्रायः 'अ' होतो. उदा०—साल (शाळा), कमल (कमला). हा प्रकार पालींत व प्राकृतांत आढळत नाही.

( ए ) एखाद्या स्वरापुढे लागोपाठ 'अ' अगर 'आ' आल्यास अपभ्रंशांत त्याऐवजीं 'य' अगर 'या' हा आदेश येण्याचा बराच प्रचार आढळतो. उदा० —सं–सागर, प्रा.–साअर, अप.–सायर; सं.–प्रसाद, प्रा.–पसाअ, अप.–पसाय.

मराठीच्या आदेशप्रकरणावर कोणत्या भाषेची किती छाया पडलेली आहे, हे सामान्यतः समजण्यास वरील ठळक भेदप्रकार येथे पुरेसे आहेत.

११ वरील प्रकरणांत नमूद केलेले भेद बाजूस ठेवले, म्हणजे पाली, प्राकृत व अपभ्रंश या भाषांच्या आदेशप्रकरणांत फारच साम्य आहे. या भाषांतून आढळणाऱ्या शब्दविकृतीहून भिन्न अशा अनेक प्रकारच्या निराळ्या विकृति मराठींत घडून आलेल्या आहेत; यामुळे मराठीला अधिक मिश्र स्वरूप आलेलें दिसतें. हे शब्दविकार स्पष्ट समजावेत व मराठीचा या भाषांशीं या प्रकरणीं मेळ व तेढ कोठे आहे हें ध्यानीं यावें, म्हणून कांही शब्दांच्या याद्या पुढे पुरवणींत दिलेल्या आहेत.

१२ पुढे परिशिष्टांत सादर केलेल्या शब्दांच्या याद्या पाहिल्या म्हणजे मराठीभाषेच्या उत्पत्तीविषयीं भ्रान्ति पडण्याचें कारणच दिसत नाही. पाली, प्राकृत व अपभ्रंश याचे आदेशप्रकरणींचे सर्वच प्रकार मराठींत आढळतात. यापैकीं 'अपभ्रंश' हें प्राकृताचेंच परिणत स्वरूप आहे, आणि मराठीच्या धमन्यांतून अपभ्रष्ट प्राकृताचेंच रक्त प्रामुख्याने वहात आहे, हें उघड दिसतें. तरी पण पालीचीहि लकेर त्यांत ठळकपणें आहे. तिण (तृण), पाउस (प्रावृष्), पिळणें (पीडन), छकडी (शकटी), गूळ (गुड), अस्वल (ऋक्ष), रूख (वृक्ष) इत्यादि शब्द स्वच्छ पालीछापाचे आहेत; कारण या शब्दांची प्राकृतरूपें तण, पाउस, पीडण, साटी, रीस, वच्छ अशीं होतात. मराठींत हीं प्राकृतांतील रूपे आढळतात; परंतु पालीचीं खास रूपेंहि मराठींत आहेत, ही मुख्य मुद्याची गोष्ट आहे. पालीमध्ये ळ-काराचें वैशिष्ट्य आहे. तो वर्ण प्राकृतांत मुळीच नाही. परंतु शिष्ट मराठीचा या ळ-वर्णाकडे बराच कल दिसून येतो. दुर्मिळ, नळ, डाळिंब, ओंजळ, सांवळा, सळई, सोमळ, आळें, फळें, काजळ, मिळणें इत्यादि अनेक संस्कृतोद्भव शब्दांत ळ-कारच शिष्टमान्य आहे. जळ, मळीण, पडळ, जळधि, कमळ, सकळ, प्रज्वळित, पाळण, धवळ, प्रेमळ, इत्यादि शब्दांत तो वैकल्पिक आहे. कित्येक शब्दांत ल-कारा ऐवजीं ळ-कार घातल्यास अर्थ सर्वस्वींच बदलतो म्हणजे ते स्वतंत्र अर्थाचे स्वतंत्र शब्द होतात. उदा०—कळ, कल; गाल, गाळ; नील, नीळ; चूल, चूळ; बोल, बोळ; वेल, वेळ इत्यादि. तेव्हा मराठींतील ळ-काराचें महत्त्व चिंतनीय आहे.

आदेशप्रकरणाच्या दृष्टीने प्राकृत चतुष्टयांपैकी माहाराष्ट्री व शौरसेनी यांचे अगर यांच्या अपभ्रंशाचे अनुसंधानाने मराठी भाषा मुख्यत्वेंकरून थाटली आहे, तरी पण मागधी व पैशाची प्राकृतांचा संपर्क तिला नाही, असें नाही. पैशाचीशिवाय इतर प्राकृतांत ण-कार आहे, परंतु न-कार नाही. उलट, पैशाचींत न-कार आहे, पण ण-कार मुळीच नाही. 'गुणगणगणना' हें पैशाचींत 'गुनगनगनना' असें होतें. ही पैशाचीची लकब शिष्ट मराठींतहि बरेंच वेळां चमकते. ऊन (उष्ण), तहान (तृष्णा), कान (कर्ण), पुनीव (पूर्णिमा), जुनें (जीर्ण), कानाडोळा (काण), रान (अरण्य), जानवें (प्रा० जण्णोवई), विनंति (प्रा० विण्णंति), सुनें (प्रा० सुण्ण), सून (प्रा० सुण्हा) इत्यादि पुष्कळ शब्दांत संस्कृतांतील अगर प्राकृतांतील ण-काराऐवजीं न-कारच मराठींत शिष्टाभिमत आहे.

मागधी प्राकृताचा असा एक विशेष आहे की र-कार व स-कार यांबद्दल ल-कार व श-कार हे अनुक्रमें येतात. तसेंच संस्कृत 'स्थ' अगर 'र्थ' यांचा स्त होतो व 'ष्ट' चा 'स्ट' होतो. यापैकी कांही प्रकार मराठींत बऱ्याच शिष्टांच्या तोंडीं आढळतात, व क्वचित्

लेखांतहि[1] चमकतात; पण अशिष्टांच्या तोंडीं यांचा व्याप दांडगा आहे. शिष्ट ग्रंथभाषेंत मात्र हे प्रकार दुर्मिळ आहेत, परंतु अगदींच नाहींत असें नाहीं. ओशाळणें ( अपत्रपति ), मिसळ ( मिश्र ), घूर्णते ( घोळतो ), जोशी ( प्रा० जोइसी ), केशर ( केसर ), पेलणें ( प्रेरण ), हीं मागधीच्या अनुकरणाचीं उदाहरणें आहेत. कित्येक शब्दांत ही आदेशक्रिया विकल्पेंकरून होते. उदा०—वारवणें, वाळवणें; भरभर, भळभळ; खरणें, खळणें; सरभेसळ, सळमेसळ.

यावरून असें सहज अनुमान करितां येतें की, महाराष्ट्रांतील निरनिराळ्या प्रांतांत अगर एकाच प्रांतांतील निरनिराळ्या समाजवर्गांत या सर्वच भाषा एकाच वेळीं प्रचलित असाव्या, आणि त्यांच्या संमिश्रणानें उत्पन्न झालेल्या अपभ्रंशांपैकी जो अपभ्रंश शिष्टमान्य होऊन ग्रंथभाषेच्या पदवीस पोंचला, त्यासच दोनतीनशें वर्षांच्या कालान्तरानें 'मऱ्हाटी भाषा' हें नामाभिदान प्राप्त झालें. प्राकृत भाषाचे सर्व प्रकार निरनिराळ्या समाजवर्गांत एकेकाळीं रूढ होते, हें संस्कृत नाटकांवरून सिद्ध होतें. कालान्तरानें या भाषा लोकव्यवहारांतून लोपल्यावरहि संस्कृत नाटककारांनीं पूर्वपरंपरेस अनुसरून आपल्या पात्रांच्या तोंडीं या पूर्वकालीन भाषा घातलेल्या आहेत, हें कबूल आहे. तरी पण, प्रथमतः माहाराष्ट्रीप्रभृति प्राकृत भाषा जेव्हां नाटकांत येऊं लागल्या, त्यावेळीं त्या लौकिक व्यवहारांत असल्याच पाहिजेत, हें कबूल केल्यावाचून सुटका नाहीं.

१३ पुढे परिशिष्टांत दिलेल्या शब्दांच्या यादीवर नजर चाळली असतां, आणखी एक बाब लक्ष्यांत येते, ती ही की, मराठीमध्यें पूर्वीच्या प्राकृत ग्रंथभाषा व त्यांचे अपभ्रंश यांच्या द्वारें अपभ्रष्ट होऊन आलेल्या शब्दांचीं अंतिम रूपें जशीं आढळतात, तशींच संस्कृत शब्दांचीं स्वतंत्र रूपान्तरें झालेलींहि दिसून येतात. यांपैकीं पूर्वपरंपरेनें अंगवळवणीं पडून हाडींमाशीं खिळलेले शब्दापभ्रंश नियमित अर्थानें शिष्टांनीं मराठींत मान्य केलेले आहेत. पण मराठ्यांनीं नवीनच केलेले अपसृष्टीचे प्रकार अशिष्ट गणले जातात; आणि मूळ संस्कृत शब्द मात्र पूर्ण व्यापक अर्थानें शिष्ट भाषेंत योजण्यांत येत असतात. उदाहरणार्थ—मराठींत मार्ग, माग व मारग, अशीं तीन रूपें संस्कृत 'मार्ग' शब्दाचीं आढळतात. यांपैकीं 'मारग' हें रूप कोणीहि शिष्ट योजीत नाहीं. प्राकृत परंपरेंतील 'माग' हा शब्द विशिष्ट अर्थीं उपयोगांत येतो. 'सावजाचा माग काढणें,' 'त्या वस्तूचा मागच लागत नाहीं,' इत्यादि वाक्यांत 'माग' शब्दाऐवजी 'मार्ग' घातल्यास तो कानाला कसासाच लागेल. उलटपक्षीं 'मोक्ष साधनाचा मार्ग,' 'सरळ वागणें व खरें बोलणें हाच सज्जनांचा मार्ग आहे,' 'कसेंहि करून हें गाडें मार्गास लाविलें पाहिजे,' इत्यादि वाक्यांत 'माग' शब्द वापरतांच येणार नाहीं. दुसरें उदाहरण 'हृदय' या शब्दाचें. याचीं 'हृदय,' 'हिय्या,' 'ऱ्हदय,' 'ऱ्हुदय,' 'न्हिदय,' इत्यादि अनेक रूपें मराठींत कानीं पडतात. परंतु 'हृदय' हें शुद्ध संस्कृत रूप व 'हिय्या' हें प्राकृत परंपरेंतील रूप, हीं दोनच शिष्टसंमत असून, बाकीचीं केवळ अशिष्ट गणलीं जातात. शिवाय 'हिय्या' हा शब्द केवळ 'हिम्मत, धैर्य, धाडस' या अर्थीं योजण्यांत येतो, पण

---

१ कोंकणस्त, गृहस्त, अशीं खोडकर रूपें निष्काळजीपणानें आलेलीं आमच्या पाहण्यांत आहेत. उस्टे, कस्ट, पस्ट, ( स्पष्ट ), इत्यादि उच्चार कित्येक प्रांतांत शिष्ट समाजांतहि रूढ आहेत. बहुशः महाराष्ट्रांत तालव्य ष-चा उच्चार दंततालव्य श-सारखाच करण्याची प्रवृत्ति दिसते. मात्र लिहिण्यांत शिष्ट 'ष' पाहिजे असेल, तेथे 'ष' च लिहितात.

# म. सा. संमेलनांतून आजपर्यंत मंजूर झालेले ठराव

## १ महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

### नवीन रचना व इतर साहित्यसंस्थांची केंद्रसंस्था करणेबाबत

( १ ) वंगीय साहित्य-परिषदेचे नियम जरूर ते फेरफार करून महाराष्ट्र-साहित्य परिषदेस लागू करावे.

( २ ) हे नियम परिषदेचे सेक्रेटरी, बडोद्याच्या स्वागत-कमेटीचे व सहविचारणी सभेचे सेक्रेटरी व आजपर्यंतच्या परिषदांचे अध्यक्ष यांच्या कमेटीने तपासावे.

( ३ ) नियम तयार होतांच ते प्रसिद्ध करावे; व पुढील मे महिन्यांत ते मंजूर करून घ्यावे. हें काम मे महिन्याच्या आंत झालेंच पाहिजे.

( ४ ) ऐतिहासिक कागदपत्रें व जुन्या कवींची ऐतिहासिक काव्यें, यांचें प्रकाशन व संरक्षण, शास्त्रीय विषयांची परिभाषा, मराठी कोशाची सामुग्री इत्यादि कामें परिषदेस करावयाचीं आहेत. त्यासाठी पुष्कळ द्रव्यसहाय्य लागेल म्हणून द्रव्य-निधी ( फंड ) जमा करण्याचें काम हातीं घ्यावें.

( ५ ) साहित्य-परिषदेच्या कामाकरिता तूर्त २ हजार फंड उभारावा. हा फंड परिषदेच्या हवालीं करण्यांत यावा व परिषदेने सुव्यवस्थित रीतीने आपलें काम करावें ( बडोदें, १९०९ ).

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची कायमची रचना करण्यासंबंधाने बडोदें येथे नेमलेल्या कमिटीने जी योजना तयार केली आहे, तींत अवश्य ते फेरफार करून पुढील योजना तयार करण्यांत आली आहे. या योजनेप्रमाणे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची योजना तयार करण्यांत यावी ( अकोला, १९१२ ).

सर्व मराठी साहित्यसंस्थांची केंद्रसंस्था म्हणून महाराष्ट्र-साहित्य-परिषदेस मान्यता देण्यांत यावी व महाराष्ट्राबाहेर महाराष्ट्रवाङ्मय व संस्कृति कायम ठेवण्याच्या दृष्टीने ज्या अनेक संस्था अस्तित्वांत आल्या आहेत त्यांच्या अडचणी दूर करण्याकरिता त्या सर्व संस्था महाराष्ट्र-साहित्य-परिषदेस जोडल्या जाऊन त्यांस संघटित स्वरूप प्राप्त व्हावें असें या संमेलनाचें मत आहे ( बेळगांव, १९२९ ).

### परिषदेच्या शाखा, ग्रंथसंग्रह व ग्रंथकारांची नोंद

महाराष्ट्रांतील आणि त्याचप्रमाणे मराठी मातृभाषा असलेला लोकसमूह ज्या प्रांतांत किंवा एतद्देशीय संस्थानांत कायमची वस्ती करून राहिला आहे तेथे साहित्य-**परिषदेच्या पोट–संस्था** किंवा भगिनी-संस्था, प्रत्येक जिल्हानिहाय निदान एक तरी, अशा स्थापिल्या जाव्या, आणि प्रत्येकीच्या जोडीला एक एक महाराष्ट्र-ग्रंथसंग्रहालय असावें, असें या सभेचें मत आहे ( मुंबई, १९१५ ).

प्रत्येक साहित्य-संमेलनाच्या प्रसंगीं साहित्य-परिषदेमार्फत आलेल्या पूर्वीच्या संमेलनापासून तोपर्यंत घडलेल्या साहित्य-परिषदेच्या कामगिरीचा संकलित अहवाल जाहीर करण्यांत यावा. हें करतांना महाराष्ट्रांत ज्या निरनिराळ्या परिषदेच्या शाखा, अगर उपशाखा, सभा किंवा स्वतंत्र साहित्यसंस्था असतील त्यांना लिहून त्यांजकडून त्यांच्या कामाचे अहवाल आल्यास त्यांतीलहि सारांश जाहीर करावा अशी या सभेची शिफारस आहे ( बडोदें, १९२१ ).

प्रत्येक महत्त्वाचें ठिकाणीं शाखा-संस्था, सहकारी संस्था, किंवा संलग्न संस्था स्थापन करण्यांत याव्या व यासंबंधी कार्यकारी मंडळाने नियम करावे. (मुंबई, १९२६).

( अ ) महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यकारी मंडळाने महाराष्ट्रीय वस्तीच्या सर्व महत्त्वाच्या ठिकाणीं आपल्या शाखा-संस्था स्थापन करण्यास, त्याचप्रमाणे सहकारी व संलग्नसंस्था जोडून घेण्याचा झटून प्रयत्न करावा.

( आ ) महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यकारी मंडळाने मराठी ग्रंथकारांच्या व लेखकांच्या माहितीच्या नोंदीचें एक पुस्तक ठेवावें. त्यांत ग्रंथकर्त्यांचें संपूर्ण नाव, पत्ता, प्रसिद्ध केलेले ग्रंथ, तयार असलेले अप्रसिद्ध ग्रंथ इत्यादींविषयी संपूर्ण माहिती असावी. परिषदेला सदर्हू माहिती सर्व लेखकांनी अगत्यपूर्वक कळवावी अशी विनंती आहे ( पुणे, १९२७ ).

महाराष्ट्र-साहित्य-परिषद एक प्रकारें संमेलनाचे ठराव अमलांत आणणारें कार्यकारी मंडळ आहे, व या मंडळाला लेखनद्वारा व पत्रद्वारा सहाय्य करणें आवश्यक आहे, तरी साहित्यभक्तांनी साहित्य-परिषदेला हस्तेंपरहस्तें मदत करून ती अधिक कार्यक्षम करावी अशी या संमेलनाची विनंती आहे. ( मडगांव, १९३० )

संमेलनांत पास झालेले ठराव अमलांत आणण्याचें कार्य करण्याकरिता व साहित्यपरिषदेशीं सहकार्य करण्यासाठी व जेव्हा अवश्य वाटेल तेव्हा तें कार्य स्वतः करण्यासाठी हें संमेलन खालील गृहस्थांचें कार्यकारीमंडळ नेमीत आहे. सदर मंडळाने आपल्या कार्याचा अहवाल पुढील संमेलनास सादर करावा. (द. हैद्राबाद, १९३१)

## २ बोधभाषा

### मातृभाषेस उत्तेजन

( अ ) महिला विद्यापीठ, टिळक विद्यापीठ, समर्थविद्यालय, वैश्यविद्याश्रम ( सासवने ) या संस्थांत मराठी हें शिक्षणाचें माध्यम केलें आहे याबद्दल या संमेलनास संतोष वाटत आहे.

( आ ) मुंबई विद्यापीठांतील बी. ए. च्या अभ्यासक्रमांत मराठी ( देशी ) भाषेचा प्राविण्यशाखेंत ( Honours ) अवश्यमेव समावेश व्हावा.

( इ ) मुंबई-विद्यापीठाच्या प्रवेश-परीक्षेच्या अभ्यासक्रमांत मातृभाषा हा एक परीक्षेचा आवश्यक विषय असावा.

( ई ) मुंबई विद्यापीठांत बी. ए. खालील परीक्षांतील अभ्यासक्रमांत मातृभाषा हा एक आवश्यक विषय असावा.

( उ ) मातृभाषा या विषयांतील प्रश्नपत्रिका व उत्तरें त्याच भाषेंत असावीं.

( ए ) वरील 'अ' ते 'उ' यांत समाविष्ट झालेल्या तरतुदीप्रमाणे व्यवस्था उस्मानिआ, नागपूर व इतर विद्यापीठांतहि व्हावी ( पुणे, १९२७ ).

शिक्षणमाध्यम स्थानिक भाषा असावी

( अ ) मुंबई, नागपूर व उस्मानिया येथील विद्यापीठांत प्रवेश-परीक्षेपर्यंत सर्व इयत्तांत इंग्रजीशिवाय इतर सर्व विषयांची बोधभाषा ( माध्यम ) ही स्थानिक ( बहु-जनसमाजाची ) भाषाच असावी.

( आ ) प्रवेश-परीक्षेनंतरच्या अभ्यासक्रमांतहि स्थानिक भाषा हीच बोधभाषा म्हणून शक्य तेथे आजच स्वीकारावी.

( इ ) प्रश्नपत्रिका व उत्तरें बोधभाषेंतच असावीं ( पुणें, १९२७ ).

मराठी भाषा, बोधभाषा होणेंबाबत

मुंबई, नागपूर व उस्मानिया विश्वविद्यालयाच्या प्रवेश-परीक्षेपर्यंत इंग्रजी भाषे-खेरीज सर्व विषयांची बोधभाषा मराठी ( मातृभाषा ) असावी व प्रवेश-परीक्षेनंतरच्या अभ्यासक्रमांतहि बोधभाषा म्हणून शक्य तेथे आज तिचा प्रवेश व्हावा (मुंबई, १९२६).

दुय्यम शिक्षणाच्या सर्व विद्यालयांतून दिलें जाणारें शिक्षण देशी भाषेच्या द्वारे दिलें जावे असे या सभेचें मत आहे ( मुंबई, १९१५ ).

विश्वविद्यालयांत मराठी बोधभाषा असणेबाबत

मुंबइ, नागपूर व उस्मानिया या विश्वविद्यालयांच्या प्रवेश-परीक्षेपर्यंत इंग्रजी भाषेखेरीज सर्व विषयांची बोधभाषा ( Medium of Instruction ) मराठी असावी व प्रवेश-परीक्षेनंतरच्या अभ्यासक्रमांत शक्य तोवर तीच बोधभाषा असावी असें या समेलनाचें मत आहे.

## ३. महाराष्ट्र विद्यापीठ

सर्व विद्या मराठींत बद्धमूल होऊन पक्क्या रुजाव्या व वाढाव्या यासाठीं एक स्वतंत्र मराठी विद्यापीठ महाराष्ट्रांत असणें अगत्य आहे असें या सभेस वाटतें. या विद्या-पीठाचा हेतु व ध्येय परकीय भाषा सोडून सर्व विषयांचें अध्ययन अवलपासून अखेर-पर्यंत मराठीच्याच द्वारे व्हावें असें असावें. व त्यांत मराठी वाङ्मय, मराठी इतिहास, इत्यादि विषयांस अग्रस्थान राहून शिक्षणाची दृष्टि व्यापक परंतु मराठीच ठेवण्या-विषयीं कटाक्ष असावा. तसेंच मराठी विद्वानांचा व साहित्यसंस्थांचा परामर्ष घेणें व गौरव करणें इत्यादि विद्यापीठांचीं कार्ये या पीठाकडूनहि व्हावीत. अशा विद्यापीठाची सविस्तर योजना महाराष्ट्रसाहित्य परिषदेने तयार करावी ( बडोदें, १९२१ ).

महाराष्ट्र वाङ्मयास आपल्या सर्व परीक्षांच्या अभ्यासक्रमांत विशेष महत्त्व देणारी व महाराष्ट्र वाङ्मय अधिकाधिक संपन्न करण्याविषयी विस्तृत प्रयत्न करणारी आणि सर्व शिक्षण महाराष्ट्र भाषेंतूनच देण्याची व्यवस्था शक्य तितक्या त्वरेने घडवून आणण्याचें ध्येय धरणारी अशी युनिव्हर्सिटी ( विश्वविद्यालय ) मुंबई इलाख्यांतील सरकार, संस्थानाधिपति आणि श्रीमान् धनिक विद्वानांनी मिळून स्थापावी असें या सभेचें मत बडोदे येथील संमेलनांत पसार झालेल्या ठरावानुसार ही सभा पुनः प्रदर्शित करते ( मुंबई, १९२६ ).

मराठीस आपल्या सर्व परीक्षांच्या अभ्यासक्रमांत पहिलें मानाचें स्थळ देणारी, त्याचप्रमाणे महाराष्ट्र-वाङ्मय अधिकाधिक व्यापक, विवेचक, विस्तृत व संपन्न करण्याविषयीं झटून प्रयत्न करणारी आणि सर्व शिक्षण महाराष्ट्र भाषेतून देण्याची व्यवस्था शक्य तितक्या त्वरेने घडवून आणण्याचें ध्येय ठेवून चालणारी अशी विद्यापीठ संस्था मुंबई इलाख्यांतील सरकार, महाराष्ट्रीय, बृहन्महाराष्ट्रीय, संस्थानिक, श्रीमान् व विद्वज्जन यांनी मिळून शक्य तितक्या लवकर स्थापण्याचें श्रेय घ्यावें अशी या सभेची महाराष्ट्रास, सरकारास, संस्थानिकांस, धनिकांस व विद्वज्जनांस आग्रहाची विनंती आहे ( पुणे, १९२७ ).

महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र यासाठी कायद्याने मान्य होणारे ( Chartered ) असें महाराष्ट्र विश्वविद्यालय स्थापन व्हावें असें या संमेलनाचें मत आहे (बेळगांव, १९२९).

### वडतर्फ केलेल्या मराठी अध्यापकाबद्दल पुनः मागणी

मुंबई एल्फिन्स्टन कॉलेजांतील मराठी प्रोफेसराची जागा कमी करण्यांत आली आहे. ती ताबडतोब पुन्हा कायमची भरण्यांत यावी अशी या संमेलनाची मुंबई सरकारास आग्रहाची विनंती आहे ( बेळगांव, १९२९ ).

### ( देशी भाषास Modern Indian Languages हा शब्द वापरणेबाबत )

देशी भाषांस सरकारी युनिव्हर्सिट्यांनी Vernaculer नांवाने उल्लेखिण्याबद्दल Modern Indian Languages हा शब्द वापरावा अशी संमेलनाची सर्व युनिव्हर्सिट्यांस शिफारस आहे. प्रचलित शब्दांचा कोशांतील अर्थ खाली दिला आहे:— Vernacular ( Verna-Slave ) an uncultured vocabulary and dialect ( मुंबई, १९२६ )

### हिंदी विश्वविद्यालयांत म. सा. प. चा प्रतिनिधी घेण्याबाबत विनंती

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा एक एक प्रतिनिधी सर्व हिंदी विश्वविद्यालयांच्या अधिकारी मंडळांत असावा अशी या संमेलनाची त्या त्या प्रांतिक सरकारास विनंती आहे. ( बेळगांव, १९२९ )

## ४. विद्यापीठांतून मराठी

### विद्यापीठ व मराठी भाषा

आग्रा विद्यापीठाने बी. ए. साठी १९३३ पासून मराठी सुरू करण्याचें ठरविलें आहे. इंटरमीजिएटला मराठी सुरू होऊन दोन वर्षें झाल्याने यंदा इंटरमीजिएटमध्ये मराठी घेऊन पास होणाऱ्या विद्यार्थ्यांना यामुळे यंदाच्या वर्षापुरतेंच मराठी घेतां येत नाही. १९३३ ऐवजी १९३२ पासून मराठी सुरू केल्यास ही गैरसोय दूर होणार आहे. असें न झालें तर मात्र मराठी घेऊन बी. ए. ला बसूं इच्छिणारांची फार कुचंबणा होईल हें निर्विवाद आहे. तरी आग्रा विद्यापीठाने एवढी गैरसोय दूर करावी अशी हें संमेलन आग्रा विद्यापीठाधिकाऱ्यांस विनंती करीत आहे (मडगांव, १९३०).

### विद्यापीठांतील अभ्यासक्रम

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विद्यापीठांतून सुरू असलेल्या मराठी भाषेच्या अध्ययनांत एकसूत्रीपणा येणें इष्ट असल्यामुळे मॅट्रिकपासून एम्. ए. पर्यंतच्या परीक्षांचे मराठी विषयाचे अभ्यासक्रम व तदनुसार वाङ्मयांतील ग्रंथांची तपशीलवार विभागणी करण्यासाठी एक (खालील गृहस्थांचे) मंडळ निवडण्यांत यावें (मडगांव, १९३०).

त्याचप्रमाणे मंडळाला अधिक सभासद घेण्याचा अधिकार असावा व शक्य तोवर पत्रव्यवहाराने व अवश्य तेव्हा एकत्र जमून ह्या मंडळाने अभ्यासक्रम तयार करावा व निरनिराळ्या विद्यापीठांच्या उपयोगाकरिता तो साहित्यपत्रिकेंत प्रसिद्ध करण्यांत यावा (मडगांव, १९३०).

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विद्यापीठांतून सुरू असलेल्या मराठी भाषेच्या अध्ययनांत एकसूत्रीपणा येणें इष्ट असल्यामुळे मॅट्रिकपासून एम्. ए. पर्यंत परीक्षांचे मराठी विषयाचे अभ्यासक्रम व तदनुसार वाङ्मयांतील ग्रंथांची तपशीलवार विभागणी करण्यासाठी गतवर्षी (१५ वें संमेलनांत) एक मंडळ स्थापन करण्यांत आलें होतें. त्या मंडळाने अद्याप अहवाल सादर केला नाही; तरी त्या कार्याचें महत्त्व जाणून मंडळाने शक्य तितक्या लवकर अहवाल प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करावी; व मंडळाचे संयोजक (कन्व्हीनर) प्रो. शं. दा. पेंडसे यांस नेमले असून कमिटीच्या खर्चाकरिता २५ रु. मंजूर केले आहेत (द. हैद्राबाद, १९३१).

### मुंबई विद्यापीठ व मराठी

मुंबई युनिव्हर्सिटीने मॅट्रिकच्या परीक्षेस मराठी भाषा ठेवण्याची मुभा ठेविली आहे. परंतु त्यानंतर मराठी भाषेस बी. ए. च्या परीक्षेशिवाय अभ्यासक्रमांत स्थान नाही. त्यामुळे मॅट्रिकसाठी मराठी घेणारांची फारच कुचंबणा होते व मराठीचा अभ्यास व्हावा तसा होत नाही. सबब ही अडचण दूर करण्याबद्दल ह्या संमेलनाची युनिव्हर्सिटीस शिफारस आहे (मडगांव, १९३०).

### आग्रा विश्वविद्यालयांत मराठी विषय नेमला त्याबाबत आभारप्रदर्शन

ग्वाल्हेरच्या साहित्य-संमेलनांत झालेल्या ठरावान्वयें आग्रा विश्वविद्यालयांत बी. ए. साठी मराठी विषय ठेवण्यांत आला याबद्दल सदर विश्वविद्यालयाधिकाऱ्यांचे हें संमेलन आभार मानीत आहे ( बेळगांव, १९२९ ).

### विश्वविद्यालयांतील अभ्यासक्रमांत मराठीचा प्रवेश

मुंबई विश्वविद्यालयांतल्या एम्. ए. व मॅट्रिक या परिक्षांत मराठी भाषेचा समावेश झाला आहेच. इतर आर्ट्स् परीक्षांतहि मराठी भाषेचा समावेश व्हावा असें या सभेचें मत आहे. शिवाय मराठी भाषेंतून इतर विषयांचें शिक्षण देण्याचा व परीक्षा घेण्याचा उपक्रम विश्वविद्यालयानें करण्याची वेळ आली आहे असेंहि या सभेचें मत आहे ( बडोदें, १९०९ ).

( अ ) मुंबई, नागपूर, उस्मानिया विश्वविद्यालयांतील ( B A )च्या अभ्यासक्रमांत सन्मान शाखेंत ( Honours Course ) मराठीचा समावेश करावा.

( आ ) M A. परीक्षेस मराठी विषय घेऊन बसणाऱ्यास प्रबंध ( Thesis ) लिहून परीक्षेस बसण्याची मोकळीक असावी. सदरहू प्रबंध मराठींतच लिहिलेला असावा असा निर्बंध करावा.

( इ ) M A. परीक्षेसाठी लिहावयाचे इतर विषयांवरील प्रबंध मराठींतहि लिहिण्याची परवानगी असावी.

( ई ) प्रवेश, प्रथमवर्ष, ( F Y. A ) इंटर आर्टस् ( Inter Arts ) या परीक्षांच्या अभ्यासक्रमांत संस्कृत हा आवश्यक विषय ठेवून मराठी हाहि एक आवश्यक विषय ठेवावा ( बेळगांव, १९२९ ).

### सर्व विश्वविद्यालयांत मराठीचा समावेश व शिक्षणप्रदानाचें साधन.

सरकारी कायद्यानें सध्या अस्तित्वांत असलेल्या व पुढे अस्तित्वांत येऊं घातलेल्या विश्वविद्यालयांतील सर्व शिक्षणक्रमांत इतर भाषाप्रमाणेच मराठीचा समतेच्या व मान्यतेच्या दृष्टीनें समावेश करण्यांत यावा, व शिक्षण प्रदानाचें साधन या नात्यानेंहि त्याचा ऐच्छिक असला तर सरराहा उपयोग करण्याचें तत्त्व स्वीकारण्यांत यावें; हे सर्वथा अत्यंत आवश्य व इष्ट आहे, असें या परिषदेचें मत आहे (बडोदें १९२१).

( अ ) वरील भागांतील धोरणास अनुसरून विश्वविद्यालयांतील सर्व परीक्षासाठी नियत पुस्तकांसह एक अभ्यासक्रमाची योजना तयार करून ती विश्वविद्यालयाकडे धाडून देण्यासाठी (खालील गृहस्थांची) समिति नेमण्यांत यावी. (बडोदे १९२१)

( १ ) मुंबई विश्वविद्यालयांत बी. ए. च्या अभ्यासक्रमांत मराठी भाषेचा सन्मान शाखेंत ( Honours course ) त्वरित समावेश व्हावा, असें या संमेलनाचें मत आहे.

( २ ) मुंबई विश्वविद्यालयाच्या प्रवेश परीक्षेच्या अभ्यासक्रमांत मराठी मातृभाषा असणाऱ्यांस मराठी हा एक परीक्षेचा आवश्यक विषय असावा.

( ३ ) मुंबई युनिव्हर्सिटींतील बी. ए. खालच्या परीक्षांतील अभ्यासक्रमांत मराठीचा आवश्यक विषय म्हणून समावेश करण्यांत यावा.

( ४ ) मराठी भाषेंतील प्रश्नोत्तरांसाठी मराठी भाषेत उत्तरें देणें आवश्यक असावें.

( ५ ) वरील तत्त्वाप्रमाणे मराठी भाषेला नागपूर, उस्मानिया इ. इतर युनिव्हर्सिटींच्या अभ्यासक्रमांत योग्य स्थान दिलें जावें. ( मुंबई १९२६ ).

मराठी भाषेचा अभ्यासक्रम मुंबई, नागपूर, उस्मानिया, आग्रा मद्रास व म्हैसूर विद्यापीठास जोडलेल्या, महाविद्यालयाच्या प्रथम वर्षापासून एम्. ए. पर्यंत ठेवण्याकरिता वरील विद्यापीठास व अभ्यासनियंत्रक मंडळास ही सभा विनंती करीत आहे. विशेषतः मुंबई व नागपूर विद्यापीठांत पहिल्या दोन वर्षांच्या अभ्यासक्रमांत मराठीचा प्रवेश ऐच्छिक विषय म्हणून अद्यापि झाला नाही तो तावडतोब करावा अशी या सभेची सूचना आहे ( ग्वल्हेर, १९२८ ).

( अ ) मराठी भाषा शिकविण्याची व्यवस्था नागपूर येथील हिस्लॉप् व मॉरिस् कॉलेजांत केली म्हणून ही सभा समाधान व्यक्त करिते.

( आ ) उमरावती महाविद्यालयांतहि बहुतेक विद्यार्थी मराठी बोलणारेच असल्यामुळे मराठी शिकविण्याची तेथेहि व्यवस्था व्हावी अशी या सभेची शिक्षणाधिकाऱ्यांस आग्रहाची मागणी आहे,

( इ ) मुंबई येथील एल्फिन्स्टन महाविद्यालयांतील मराठी शिकविणाऱ्या अध्यापकाची जागा कमी करण्यांत आली ही शोचनीय गोष्ट असून त्या योगाने मुंबई विद्यापीठांतील मराठी शिक्षणाची फारच अडचण व कुचंबणा झाली आहे. तरी उपरोक्त महाविद्यालयांत मराठी शिक्षणाची पुन्हा योग्य व्यवस्था करावी अशी या सभेची शिक्षणाधिकाऱ्यांस आग्रहाची सूचना आहे.

( ई ) तसेच इंदूरच्या होळकर व ख्रिश्चन महाविद्यालयांत मराठी बोलणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या पुष्कळ असल्यामुळे तेथेहि मराठी शिकविण्याची व्यवस्था व्हावी अशी तेथील अधिकाऱ्यांस आग्रहाची विनंती आहे.

(उ) हें संमेलन ग्वाल्हेर येथील शिक्षणमंत्री यांस अशी प्रशस्ति आग्रहाने करीत आहे की, व्हिक्टोरिआ महाविद्यालयांत इंटर व बी ए. वर्गाकरिता मराठी हा विषय शक्य तितक्या लवकर चालू करण्याची व्यवस्था करावी ( ग्वाल्हेर, १९२८ ).

### कॉलेजांत मराठी शिक्षणाची सोय करण्याबाबत

गतवर्षी ग्वाल्हेरच्या संमेलनांत इंदुरास होळकर व ख्रिश्चन कॉलेजांत इंटरमिजिएटला मराठी शिक्षणाची व्यवस्था करण्याची विनंती करणारा ठराव पास झाला. सदर ठराव इंदूर महाराष्ट्र-साहित्य सभेने होळकर सरकारच्या निदर्शनास आणिला.

होळकर दरबारने इंदूरच्या महाराष्ट्र-साहित्य सभेच्या विनंतीस मान देऊन होळकर कॉलेजांत मराठी शिक्षणाची सोय केली त्याबद्दल हें संमेलन दरबारचें अभिनंदन करीत आहे. व इंदूर खिश्चन कॉलेजांतहि मराठीच्या शिक्षणाची सोय करावी अशी त्या कॉलेजच्या अधिकाऱ्यांस विनंती करीत आहे. त्याचप्रमाणे ग्वाल्हेर सरकारालाहि हें संमेलन अशी विनंती करीत आहे की, व्हिक्टोरिआ कॉलेज, ग्वाल्हेर, व माधव कॉलेज, उज्जैन यांत मराठी शिक्षणाची सोय सत्वर करण्यांत यावी ( बेळगांव, १९२९ ).

आग्रा विश्वविद्यालयाकडून ज्याअर्थी बी. ए. साठी मराठी विषय ठेवण्यांत आला, त्याअर्थी आता इंदूर व ग्वाल्हेर येथील दरबारांनी स्थानिक कॉलेजांतून बी. ए. साठी मराठी शिकविण्याची सोय करावी अशी हें संमेलन सदर दरबारास विनंती करीत आहे ( बेळगांव १९२९ ).

### दुय्यम व उच्च शिक्षणक्रमांत व देशी भाषांत मराठीचा समावेश

हल्लीचें यू. पी. बोर्ड, व पुढे होणाऱ्या मध्यहिंदुस्थान, राजपुताना व ग्वाल्हेर संयुक्तबोर्ड यांच्या परीक्षांना बसणाऱ्या विद्यार्थ्यांत मराठी बोलणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या बरीच मोठी असते. म्हणून ज्या विषयांतील प्रश्नांचीं उत्तरें देशी भाषेंतून देण्याची परवानगी या बोर्डाने ठेविली आहे. त्या विषयांत अशा महाराष्ट्र विद्यार्थ्यांना आपल्या मातृभाषेंतून [ मराठींतून ] प्रश्नांचीं उत्तरं लिहिण्याची परवानगी असावी अशी त्या बोर्डांना हें संमेलन विनंती करीत आहे [ ग्वाल्हेर, १९२८ ].

### दुय्यम व उच्च शिक्षणांत व देशी भाषांत मराठीचा समावेश

हल्ली यू. पी. बोर्डाच्या परीक्षांतून मराठी हा ऐच्छिक विषय घेण्याची सोय झाली आहे. परंतु कित्येक ठिकाणच्या महाविद्यालयांत मराठी बोलणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या बरीच असून मराठी शिकविण्याची योग्य सोय झाली नसल्याने कित्येक ठिकाणीं विद्यार्थ्यांची इच्छा असतांनाहि तो विषय घेतां येत नाही. यासाठी संमेलनाची अशी आग्रहाची सूचना आहे की, त्या त्या ठिकाणच्या विद्याधिकाऱ्यांनी मराठीचें योग्य शिक्षण देण्याची व्यवस्था करावी ( ग्वाल्हेर, १९१८ ).

### बाहेरील महाराष्ट्रीयांसाठी मराठी शाळा व त्या मुंबई, नागपूर विद्यापीठाशीं जोडण्याची आवश्यकता

महाराष्ट्रबाहेरील प्रांतांत ज्या ज्या ठिकाणीं मराठी मातृभाषा असलेल्या लोकांची विशेष वस्ती असेल, तेथे त्यांच्या मुलांच्या शिक्षणाची मराठींतून व्यवस्था त्या त्या प्रांतांच्या सरकारनी कांही नियमानुसार करावी अशी या सभेची विनंती आहे व तेथे असलेल्या मराठी हायस्कुलांना नागपूर, मुंबई अगर भावी महाराष्ट्र युनिव्हर्सिटीस जोडून घेण्याची परवानगी द्यावी व हें शक्य नसेल तर ज्या युनिव्हर्सिटीशीं त्यांचा संबंध असेल त्यांनी मराठी विद्यार्थ्यांची परीक्षा मराठींतूनच घेण्याची तजवीज करावी ( पुणें, १९२७ ).

### युनिव्हर्सिटी व देशी भाषा

युनिव्हर्सिटीच्या आर्टस् शाखेंतील सर्व परीक्षांच्या अभ्यासक्रमांत देशी भाषा हा विषय अवश्य विषयांपैकीं एक असावा असें या सभेचें मत आहे.(अकोला,१९१२)

हिंदुस्थानच्या शाळांतील व युनिव्हर्सिटीच्या आर्टस् शाखेच्या सर्व परीक्षांच्या अभ्यासक्रमांत देशी भाषा हा विषय 'अवश्य विषयां' पैकीं असून त्यांत इतर महत्वाच्या विषयांप्रमाणे परीक्षा युनिव्हर्सिटीनें देखील घ्याव्या असें या सभेचें मत आहे. (मुंबई, १९१५)

## ५ बाल वाङ्मय

### बालवाङ्मयाकडे लक्ष पुरविण्याबाबत

मुलांमुलींच्या शिक्षणाच्या कामीं उपयोगी पडेल असें विशिष्ट वाङ्मय तयार करण्याचा उपक्रम व्हावा असें या सभेचें मत आहे. (मुंबई, १९१५)

मुलांमुलींच्या शिक्षणास उपयोगी पडेल असे मराठी भाषेंतील बालवाङ्मय प्रसिद्ध करण्याकडे शिक्षण खातीं शिक्षण संस्था, व साहित्य संस्था यांनी विशेष लक्ष द्यावें अशी या संमेलनाची विनंती आहे (बेळगांव, १९२९).

मुलांमुलींच्या शिक्षणांत उपयोगी पडणारें वाङ्मय शिक्षणखातें, शिक्षणसंस्था, शिक्षणशास्त्रज्ञ व लेखक यांनी मराठींत तयार करण्याचा व्यापक प्रयत्न नेटानें करावा. (पुणें, १९२७)

मुलांमुलींच्या शिक्षणाच्या कामीं उपयोगी पडतील अशीं मनोरंजक व क्रमिक पुस्तकें शिक्षणसंस्था अगर खाजगी व्यक्ति यांनी तयार केल्यास त्यांस उत्तेजन म्हणून द्रव्यद्वारा मदत करण्यास साहित्य परिषदेनें तयार असावें. (मुंबई, १९२६)

मुलांमुलींकरिता शिक्षणाचें कामीं उपयोगी पडेल असें विशिष्ट वाङ्मय तयार करण्याचा शिक्षणखातीं व शिक्षणसंस्था यांनी मिळून विशेष नेटानें आणि व्यापक स्वरूपाचा प्रयत्न करावा.

महाराष्ट्रांतील सर्व शिक्षणखात्यांतर्फे तयार करण्यांत येणाऱ्या शिक्षणविषयक ग्रंथांसंबंधी मराठींतील प्रमुख शिक्षणविषयनिपुण व जनमतनिदर्शक गृहस्थांचा सल्ला व साहाय्य सरसहा घेण्यांत यावें.

## ६ आक्षिप्त वाङ्मय

### सरकारजमा झालेल्या ग्रंथाच्या पुनर्मुद्रणाबाबत

ज्याअर्थी सरकारने नेमलेल्या समीतीनें मुद्रण नियंत्रण कायदा रद्द करावा अशी सूचना केली आहे व ती प्रमाणे तो लवकरच रद्द होणार आहे त्याअर्थी त्या कायद्यान्वयें पूर्वी जप्त केलेल्या पुस्तकांवरील मुद्रण-प्रतिबंध तावडतोब दूर केला जावा. (बडोदें, १९२१)

बडोदें येथील साहित्य-संमेलनांत मंजूर झालेल्या ठरावाला अनुसरून ही सभा आपलें मत प्रदर्शित करिते की, सरकारांनी आक्षिप्त ठरविलेल्या पुस्तकांमध्ये आक्षेप घेण्यासारखें भाग कोणते आहेत, ते ठरविण्याविषयी सरकारांनी एक लोकप्रतिनिधींचे मंडळ नेमावें व तें मंडळ जे कांही भाग आक्षेप घेण्यासारखे आहेत असें ठरवील तेवढे गाळून पुस्तक पुनश्च छापून प्रसिद्ध करण्याला सरकारांनी परवानगी द्यावी. ( मुंबई, १९२६ )

### अश्लील वाङ्मयाचा निषेध

सांप्रत सदभिरुचीला विघातक असें आणि अश्लील स्वरूपाचेंहि वाङ्मय स्वैरपणें प्रसिद्ध होत आहे, हें पाहून या सभेस फार दुःख वाटतें. ह्या अनिष्ट प्रकाराला प्रतिबंधक उपायांनी आळा घालणें अवश्य आहे असें या सभेचें मत आहे- सर्व जबाबदार साहित्य-सेवक व साहित्य-संस्था ह्यांनी या प्रकाराकडे लक्ष पुरवावें, अशी विनंती आहे. या अनिष्ट वाङ्मयाचें लेखन, प्रकाशन व प्रसार करण्याचा ही सभा निषेध करीत असून सर्व मराठी वाचकवर्गांनी या वाङ्मयापासून अलिप्त रहावें अशी या सभेची विनंती आहे ( पुणें, १९२७ ).

सरकारजमा झालेल्या मराठी पुस्तकांतील वाङ्मयदृष्ट्या बहुमोल असलेल्या कांही निवडक पुस्तकांच्या पुनर्मुद्रणास सरकारी अनुज्ञा मिळावी याविषयी संमेलनाच्या वतीने मध्यप्रांत व मुंबई सरकारांस विनंती करण्यांत यावी.

प्रेस ॲक्टाने किंवा इतर एखाद्या कायद्याने सरकारने एखादें पुस्तक सरकार-जमा केलें असल्यास, त्या पुस्तकांतील आक्षिप्त भाग वगळून पुस्तक पुन्हा छापण्यास कोणी तयार असेल तर, सरकारने असे भाग दाखवून देऊन ते गाळून टाकण्याच्या शर्तींवर छापण्यास तरी परवानगी द्यावी असें या सभेचें मत आहे ( पुणें १९२७ ).

## ७. लिपी व शुद्धलेखन

### शुद्धलेखन सुधारणा

मराठी भाषेंतील शुद्धलेखनाचा प्रस्तुतचा घोंटाळा मोडून त्यास एकसूत्री निश्चित वळण लावणें अवश्य आहे. तरी महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने तज्ज्ञांचें एक पोटमंडळ नेमून त्याचा याविषयीचा अभिप्राय आणि सूचना पुढील संमेलनप्रसंगीं सादर कराव्या ( पुणें, १९२७ ).

हें संमेलन असा ठराव करितें की, शुद्धलेखनाविषयी प्रस्तुत जो वाद माजला आहे त्याचा निर्णय करण्याचा प्रयत्न करणें, हें संमेलनाचें व महाराष्ट्र-साहित्यपरिषदेचें काम असल्यामुळे व या प्रश्नाची इतउत्तर हयगय करणें भाषेच्या दृष्टीने अनिष्ट असल्यामुळे अखिल महाराष्ट्रापैकीं पुणें, मिरज अथवा सांगली, धुळे, उमरावती, नागपूर इत्यादि नगरीं जाऊन शुद्धलेखनाविषयी जाणत्यांचें सर्व साधकबाधक म्हणणें ऐकून घ्यावें व इतर शक्य तो पुरावा विचारांत घ्यावा व त्यावरून काढलेला निकाल वृत्तांत म्हणून पुढील वर्षाच्या संमेलनांत मांडावा.

वरील ठराव कार्यवाही करण्याकरिता साहित्य-परिषदेने मंडळाच्या सभासदांची निवडणूक करावी व व्ययाकरिता द्रव्य निश्चित करावें अशी या संमेलनाची परिषदेस विनंती आहे ( ग्वाल्हेर, १९२८ ).

### शुद्धलेखन मंडळ नेमण्याबाबत

शुद्धलेखनासंबंधी आतापर्यंत निरनिराळ्या विद्वानांनी प्रदर्शित केलेले विचार लक्षांत घेऊन व यानंतरही अनेक विद्वानांचे सहाय्य घेऊन आणखी दोन महिन्यांनी साहित्यपत्रिकेंत याविषयींचा आपला निर्णय जाहीर करण्याकरिता खालील गृहस्थांचें मंडळ नेमण्यात यावें.

### शुद्धलेखन मंडळ

( अ ) बेळगांव येथे गेल्या सालीं नेमलेल्या शुद्धलेखन मंडळाने पाठविलेल्या अहवालाच्या प्रती संमेलनाच्या व साहित्य-परिषदेच्या दप्तरीं ठेवण्यात याव्यात.

( आ ) वरील मंडळाने सदर अहवाल परिश्रमपूर्वक तयार केल्याबद्दल हें संमेलन, मंडळाचे अध्यक्ष, कार्यवाह, सभासद व साहाय्यक विद्वान् मंडळी ह्यांचे आभारी आहे ( मडगांव, १९३० ).

( १ ) शुद्धलेखन मंडळाचे निर्णय ह्या संमेलनाला मंजूर असून इतरत्र मान्यता मिळविण्यासाठी हे निर्णय वर्तमानपत्रकर्ते, वाङ्मयसंस्था, मुंबईसरकार, मध्यप्रांतसरकार, मराठी भाषेचीं देशी संस्थानें व लेखकवर्ग ह्या सर्वांस कळवून ज्यांना ते संमत असतील त्यांची संमति मंडळाकडे लेखी कळविण्यास त्यांस विनंती करावी. ( २ ) ह्या निर्णयावर कोणाकडून कांही सूचना किंवा आक्षेप आले तर त्यांचा विचार ह्याच चालू मंडळाने पुढे करून वृत्तांत व अखेरनिर्णय पुढील संमेलनास सादर करावा ( मडगांव, १९३० ).

### शुद्धलेखन व विरामचिन्हमंडळ

शुद्धलेखन मंडळाने केलेला रिपोर्ट व सूचना ह्या संमेलनाला मान्य असल्यावरून त्यांची अंमलबजावणी संमेलनाच्या एकंदर लिखाणांत व मुद्रणांत सुरू करण्यांत यावी अशी ह्या संमेलनाच्या कार्यकारी मंडळाला व साहित्य परिषदेला सूचना आहे ( मडगांव, १९३० ).

शुद्धलेखन मंडळाकडून निर्णय न केल्या गेलेल्या बाबींचा, त्याचप्रमाणे विरामचिन्हांबद्दलच्या प्रश्नांचा विचार करण्याकरिता खालील गृहस्थांचें मंडळ नेमण्यांत यावें व त्याला अधिक सभासद जोडून घेण्याचा अधिकार असावा. ह्या मंडळाचा रिपोर्ट पुढील संमेलन भरण्यापूर्वी निदान दोन महिने आधी प्रसिद्ध करण्यांत यावा (मडगांव, १९३०).

### मराठी लिपीची सुधारणा

छापण्याच्या कामीं अधिक सुलभता यावी म्हणून देवनागरी लिपीची सुधारणा तिचें सांप्रतचें स्वरूप विशेष विकृत न करितां होणे इष्ट आहे असें या सभेचें मत आहे. यासाठी या प्रश्नांचा सांगोपांग विचार करून योग्य त्या सुधारणा सुचविण्या-

करिता पुढील गृहस्थांचें एक मंडळ नेमण्यांत यावें. या मंडळाने आपला अभिप्राय सहा महिन्यांचे आत साहित्य-परिषदेकडे पाठवावा ( पुणें, १९२७ ).

पुणें येथील संमेलनांत लिपी-सुधारणेचा विचार करण्याकारिता जें मंडळ नेमण्यांत आलें होते त्या मंडळाने आपला अहवाल पुढील वर्षी भरणाऱ्या संमेलनापूर्वी निदान दोन महिने प्रसिद्ध करून संमेलनापुढे सादर करावा अशी त्याला ह्या संमेलनाची विनंती आहे ( मडगांव, १९३० ).

## ८. देवनागरी लिपी

### देवनागरी लिपीचा स्वीकार करणेबाबत विनंती

निरनिराळ्या प्रमुख भारतीय भाषांतील वाङ्मयाचा भिन्नभिन्न प्रांतास सुलभतेने आस्वाद घेतां यावा म्हणून सर्व हिंदी भाषांनी देवनागरी लिपीचा स्वीकार करावा अशी शिफारस सर्व साहित्य परिषदांस हें संमेलन करीत आहे ( बेळगांव, १९२९ ).

### देवनागरी लिपीचा पुरस्कार

निरनिराळ्या प्रमुख भारतीय भाषांतील वाङ्मयाचा भिन्नभिन्न प्रांतांत अधिकाधिक सुलभतेने प्रसार होण्याचा एक सुलभ उपाय म्हणून सर्व भारतीय भाषांतील मुद्रण देवनागरी लिपींत व्हावें अशी या संमेलनाची कळकळीची शिफारस आहे ( पुणें, १९२७ ).

### भारतीय भाषांतील मुद्रण देवनागरी लिपींत होणेंबद्दल

निरनिराळ्या प्रमुख भारतीय भाषांतील वाङ्मयाचा भिन्नभिन्न प्रांतांत अधिकाधिक सुलभतेने प्रसार होण्याचा एक उपाय म्हणून सर्व भारतीय भाषांतील मुद्रण देवनागरी लिपींत व्हावें अशी या संमेलनाची कळकळीची शिफारस आहे ( मुंबई, १९२६ ).

## ९. मोडी लिपी

मोडी लिपी ही पुरातन काळापासून चालत आलेली, लोकप्रिय आणि महाराष्ट्रांतील सर्व व्यवहारांत पूर्णपणें प्रचलित अशी असल्याकारणाने, ती मुंबई इलाख्यांतील बऱ्याच सरकारी ऑफिसांत वापरली जाऊं नये असा जो सरकारी हुकूम झाला आहे तो रद्द करावा अशी ह्या सभेची सरकारास नम्रपणें विनंती आहे. ह्यासंबंधी साहित्य-परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडून सरकारकडे अर्ज गेला त्यास प्रतिकूल उत्तर आलें. तथापि संमेलनाचे वतीने एक अर्ज सरकारकडे पाठवावा असें या सभेस इष्ट वाटतें. तरी तिचेतर्फे नवा अर्ज तयार करून धाडावा अशी विनंती आहे ( मुंबई, १९१५ ).

मोडी लिपी हें मराठी भाषा लिहिण्याचें फार सुलभ व उपयुक्त साधन असल्यामुळे ती चालू राहणें फार आवश्यक आहे. व ज्या ज्या ठिकाणी ती बंद झाली

असेल, त्या त्या ठिकाणीं तो पुन्हा सुरू व्हावा, व त्यासाठी जरूर तो प्रयत्न करण्यांत यावा ( बडोदें, १९२१ ).

ब्रिटिश सरकारच्या व कांही हिंदी संस्थानिकांच्या प्रयत्नांनी व लोकांच्या अनास्थेमुळे मोडीचा प्रसार हटत चालला आहे हें अनिष्ट असल्याकारणाने सर्वांनी मोडीचा उपयोग करणें जरूर आहे असें या सभेला वाटतें ( मुंबई, १९२६ ).

मोडी लिपीचा बचाव

हल्ली मोडीचा प्रसार सरकार व जनता यांच्या अनास्थेमुळे हटत चालला आहे, हें या सभेस अत्यंत अनिष्ट असें वाटतें. महाराष्ट्रीय शीघ्र लिपीचा सर्व बाजूंनी होणारा हा ऱ्हास सर्व प्रकारें थांबवावा असें या सभेचें मत आहे ( पुणें, १९२७ ).

मोडी लिपीचा प्रसार

मोडी लिपी व्यवहारांत जास्त सुलभ व उपयुक्त असल्याने ती प्रत्येकाने शिकावी व व्यवहारांत पुन्हा आणावी अशी या सभेची सर्व महाराष्ट्रास विनंती आहे; तसेंच मोडी लिपीच्या उपयोगास ज्या प्रांतांतून व संस्थानांतून मराठी भाषा बोलण्यांत येत आहे त्यांत मोडीच्या प्रसारास प्रतिबंधक असतील असे नियम रद्द करून सर्व प्रकारें उत्तेजन द्यावें अशी संमेलनाची प्रशस्ति आहे ( ग्वाल्हेर, १९२८ ).

नामशेष होत चाललेल्या मोडी लिपीस उत्तेजन

ब्रिटिश सरकारच्या कांही हिंदी संस्थानिकांच्या व लोकांच्या दुर्लक्षामुळे मोडी लिपीचा प्रसार कमी होत चालला आहे. ही गोष्ट अत्यंत अनिष्ट असून सर्वांनी मोडीच्या उपयोगास उत्तेजन द्यावें असें या संमेलनास वाटतें ( बेळगांव, १९२९ ).

## १० अभिनंदन, उत्तेजन, संमति इ.

निजाम-आभार प्रदर्शन

महाराष्ट्र साहित्य संमेलन हैद्राबाद शहरीं भरविण्यास दक्षिणाधिपती निजाम सरकार यांनी परवानगी देऊन हैद्राबादकर व बृहन्महाराष्ट्रीय साहित्यभक्त यांना परस्पर परिचय करून घेण्याची संधि दिली, याबद्दल हें संमेलन त्यांचें आभारी आहे. व त्यांना आयुरारोग्य प्राप्त व्हावें अशी प्रार्थना करीत आहे (दक्षिण हैद्राबाद १९३१)

धारकरांचे मराठीचें उत्तेजनार्थ अभिनंदन

धार दरबारने इंटर-कॉलेजिएट ( Inter-Collegiate ) स्कूल काढून त्याच्या अभ्यासक्रमांत मराठीच्या उत्तेजनासाठीं मराठीच्या अभ्यासाची व्यवस्था केली आहे याबद्दल हें साहित्य संमेलन दरबारचें अभिनंदन करीत आहे. या ठरावाची नकल दरबारकडे पाठवून देण्यांत यावी. ( मडगांव १९३० )

शिवभारत ग्रंथाबद्दल

श्रीशिवचरित्रावर समकालिन असा अपूर्व प्रकाश पाडणारा 'शिवभारत' हा

ग्रंथ श्री. दिवेकर यांनी परिश्रम करून व संशोधन करून प्रसिद्ध केल्याबद्दल या संमेलनास अत्यंत आनंद होत आहे (ग्वाल्हेर, १९२८).

### 'प्रतापगड युद्ध' ग्रंथाबद्दल अभिनंदन

'प्रतापगड युद्ध' हा ग्रंथ लिहून हिंदवी लष्करी इतिहासाचा नवीन उपक्रम कॅ. ग. वा. मोडक यांनी केला. याकरिता ही सभा त्यांचें सानंद अभिनंदन करीत आहे. या पुस्तकास सर्व महाराष्ट्रीयांनी उदार आश्रय देऊन हिंदवी लष्करी इतिहासाचें रूपाने आपल्या पूर्वजांचें स्मारक चिरतन करावें अशी सभेची विनंती आहे. (ग्वाल्हेर, १९२८)

### इंदूर व ग्वाल्हेर दरबारांचें अभिनंदन

ग्रंथकारांस उत्तेजन व आश्रय देण्याकरिता ग्वाल्हेर दरबारने प्रतिवर्षी पांच सहस्र रुपये देऊं केले आहेत. व त्याचा विनियोग करण्याचें काम येथील माधव मंडळावर सोपविलें आहे. याकरिता ही सभा दरबारचें अभिनंदन करीत आहे. त्याप्रमाणे इंदूर दरबारने ग्रंथोत्तेजनास पांच सहस्र रुपये मंजूर केले आहेत. त्यासाठी त्यांचेंहि ही सभा अभिनंदन करिते (ग्वाल्हेर, १९२८).

### राजवाडे संशोधन मंदिरांस मदत करणेबाबत

इतिहासाचार्य कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचा अपूर्व संग्रह सुरक्षित ठेवण्यासाठी व यथावकाश प्रकाशित करण्यासाठी धुळें येथे जें 'राजवाडे संशोधन मंदिर' व्हावयाचें आहे त्यास सर्व वाङ्मयभक्तांनी मदत करावी अशी या संमेलनाची आग्रहाची शिफारस आहे (बेळगांव, १९२९).

### राजवाडे-स्मारकाबद्दल संमति

कै. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या स्मारकासंबंधी प्रसिद्ध झालेली योजना या सभेस मान्य आहे. व त्या योजनेप्रमाणे उपरिनिर्दिष्ट स्मारकाला प्रत्येक महाराष्ट्रीयाने सर्वतोपरी साहाय्य करावें अशी या सभेची आग्रहपूर्वक विनंती आहे(ग्वाल्हेर, १९२८).

### संमेलन भरविल्याबद्दल राजघराण्याचें अभिनंदन

हें संमेलन प्रगतिप्रिय ग्वाल्हेर दरबारच्या कृपाछत्राखाली भरत आहे. म्हणून ही सभा श्रीमंत महाराज जयाजीराव शिंदे, उभयतां राजमाता व येथील राजसंस्था (कौन्सिल) यांचें सादर साभिनंदन करीत आहे. आणि हें संमेलन या राज्याची व राजघराण्याची अभिवृद्धि चिंतितें (ग्वाल्हेर, १९२८).

### ज्ञानकोशकारांचें अभिनंदन

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे रचनेसाठी एक लिमिटेड कंपनी स्थापून आरंभिलेला उद्योग आता पुरा झाला याबद्दल या सभेस फार संतोष वाटतो. आणि हें प्रचंड कार्य सिद्धीस नेल्याबद्दल कंपनीचे योजक व संस्थापक डॉ. केतकर यांचें व महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळाचें ही सभा अभिनंदन करिते.

ज्ञानकोशाच्या कार्यास मुंबई सरकार व मध्यप्रांत सरकार या दोन सरकारांनी मदत केली नाही याबद्दल ही सभा खेद व्यक्त करिते व अजूनहि या पुस्तकाच्या प्रती संपून जाण्यापूर्वी दोन्ही सरकारांनी या पुस्तकाच्या प्रतींचा संग्रह करावा [पुणें, १९२७].

### गायकवाड सरकाराबद्दल कृतज्ञता

श्रीमंत गायकवाड सरकार ह्यांनी संस्थानांतील देशी भाषांत लिहिलेल्या ग्रंथासाठी म्हणून २ लक्ष रुपयांची रक्कम वेगळी काढून ठेविली आहे. तींतून मराठी ग्रंथासाठी मदत दिली जाते, याविषयीं आणि श्रीमंत महाराजसाहेब यांनी या संमेलनांत केलेल्या भाषणांत दिलेल्या आश्वासनाबद्दल हें संमेलन कृतज्ञ आहे. पण मराठी भाषेची योग्यता, महत्त्व व गरजा इत्यादींकडे दृष्टी देतां सदर भाषेच्या उत्तेजनासाठी अधिक रकमेची जरूरी आहे. सबब अशी योग्य ती रक्कम निराळी काढून ठेवावी, व सदर रकमेचा विनियोग सहविचारणी सभेच्या आणि जरूर पडल्यास तिच्या व इतर तज्ज्ञांच्या समितीच्या सल्ल्याने व्हावा अशी या संमेलनाची श्रीमंत महाराजसाहेब यांना नम्रतापूर्वक विनंती आहे [बडोदें, १९२१].

### दोस्त राष्ट्रांना यशचिंतन व जर्मनीचा निषेध

लहान लहान राष्ट्रांना स्वतंत्रतेने राहण्याचा हक्क आहे, आणि राष्ट्रीय व्यवहारांत आश्वासनें, तहनामे आणि करार यांचें माहात्म्य अविच्छिन्न आहे, इत्यादि उदात्त तत्त्वें स्थापित करण्यासाठीच ग्रेटब्रिटन व त्यांचीं दोस्त राष्ट्रें हीं सांप्रतचें युरोप खंडांतील युद्ध चालवीत आहेत असें आपलें मत ही सभा नमूद करते, आणि त्यांस संपूर्ण यश येवो अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करिते, त्याचप्रमाणे सदरहू लढाईंत जर्मनी आणि आस्ट्रिआ या देशांनी निरपराधी मनुष्यांचे प्राण घेणें, गांवें आणि शहरें उद्ध्वस्त करणें, अपरिहार्य युद्धाची उग्रता कमी करण्यासाठीं मान्य गणिलेल्या धर्मयुद्धाचे निर्बंधाचा धिःकार करणें, आणि विशेषतः कलाकुशलतेची निवासस्थानें, देवालयें, विद्यालयें आणि सरस्वतीपीठें यांचा नाश करणें, इत्यादि जे मनुष्यजातीच्या संस्कृतीस काळिमा आणणारे अत्याचार करण्याचे प्रकार कायम ठेविले आहेत त्यांचा ही सभा तिरस्कारपूर्वक निषेध करिते. ब्रिटिश व दोस्त राष्ट्रांच्या आणि खास हिंदुस्थानांतून गेलेल्या रणक्षेत्रीं लढणाऱ्या शूर सैनिकांस, ‘ तुम्ही मनुष्य संस्कृतीचे रक्षणार्थ लढत आहां म्हणून ही सभा तुमचे अंतःकरणपूर्वक गौरव करिते, व तुम्हास यश येवो अशी परमेश्वरापाशी प्रार्थना करिते ’ असा निरोप ही सभा योग्य अधिकाऱ्यामार्फत धाडते [मुंबई, १९१५].

### गोवें येथे अधिवेशन होणेंबाबत

महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें पुढील अधिवेशन गोवें प्रांतांत भरवावें असें गोवें प्रांतांतील साहित्य भक्तांचें निमंत्रण आलें आहे, तें स्वीकारावें, अशी शिफारस हें संमेलन महाराष्ट्र साहित्य परिषदेस करीत आहे. तसेंच कोल्हापूर, धुळें, अंधेरी व मिरज यांजकडून आलेल्या निमंत्रणाबद्दल त्यांचे आभार मानीत आहे. (बेळगांव १९२९)

## ११ सरकार व मराठी साहित्य

[ अ ] मराठी भाषेचें उच्च शिक्षण देण्याचे बाबतींत निरनिराळ्या प्रांतांतील शिक्षणाधिकारी जे अक्षम्य दुर्लक्ष करीत आहेत त्याबद्दल ही सभा तीव्र नापसंती दर्शविते.

[ ब ] मुंबई इलाख्यांत देशी भाषांच्या अध्यापकांचे पगार निम्मे करण्यांत आले या गोष्टीचा ही सभा निषेध करते.

[ क ] निरनिराळ्या कायदेकौन्सिलांतील मराठी सभासदांना ही दुरवस्था दूर करण्याची खटपट करावी अशी या संमेलनाची विनंती आहे. ( द. हैद्राबाद १९३१).

### सरकारनें मराठी ग्रंथसंग्रहालय करावें

मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची एक प्रत सरकारने प्रकाशकाकडून अगर लेखकाकडून नियमाने घ्यावी आणि अशा पुस्तकांचा संग्रह एखाद्या मध्यवर्ती ग्रंथालयांत सार्वजनिक उपयोगासाठी ठेवण्यांत यावा. सदर संग्रह सर्वांस मोफत खुला रहावा [ पुणें, १९२७ ].

मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांच्या सरकारकडे येणाऱ्या प्रतींपैकी एक एक प्रत राखून ठेवून सरकारने एक मराठी ग्रंथसंग्रहालय सार्वजनिक उपयोगाकरिता चालवावें असें या संमेलनाचें मत आहे [ बेळगांव, १९२९ ].

### शाळाखात्यानें लोकसहकार्य मिळवावें

सरकारी शिक्षणखात्यामार्फत तयार होणारे शिक्षणोपयोगी मराठी ग्रंथ रचतांना प्रमुख महाराष्ट्रीय शिक्षणशास्त्रज्ञ व प्रमुख साहित्य सेवक त्याचप्रमाणे प्रमुख शिक्षण संस्था व वाङ्मय संस्था यांची सहकारिता नियमेंकरून मिळवावी [ पुणें, १९२७ ].

### पुस्तकांची निवड करण्यास स्वातंत्र्य

सरकारी निमंत्रणामुळे शिक्षणसंस्थांतून मराठी पुस्तकांची निवड करावयास व्यवस्थापकास स्वातंत्र्य नाही. या योगें पुष्कळ सरस मराठी वाङ्मय योग्य असूनहि विद्यार्थ्यांपुढे येत नाही. तरी वरील प्रकारचीं नियंत्रणें त्वरित दूर होणें अवश्य आहे, असें या सभेचें मत आहे [ पुणें, १९२७ ].

### पोस्टखातें आणि वाङ्मयविकास

पोस्टाने बुकपोस्टाचें दर दुप्पट करून व्हाल्युपेबल रजिस्टर करावें लागतें, असा नियम केल्यापासून लहानसान पुस्तकांचा पुस्तकांचे किंमतीपेक्षांहि टपालखर्च जास्त लागत असल्यामुळे पूर्वीप्रमाणे प्रसार होत नाही. तरी सरकारकडे या बाबतींत गाऱ्हाणें करून दाद मागावी; म्हणजे ग्रंथप्रसाराचे बाबतींतील पोस्टाची सध्या आलेली अडचण दूर होऊन ग्रंथप्रसाराचें काम पूर्वीप्रमाणे जोराने होईल [ पुणें, १९२७ ].

### वाङ्मयोत्तेजन कमी केल्याबद्दल शिक्षणाधिकाऱ्यांचा निषेध

यंदाच्या अंदाजपत्रकांत शिक्षणाधिकाऱ्यांनी वाङ्मयोत्तेजनासाठी पूर्वी ९००० रुपये ग्रँट होती ती कमी करून घेतली म्हणजे ६००० केली याबद्दल ही सभा नापसंती व्यक्त करते [ पुणें, १९२७ ].

### शाळांतील क्रमिक पुस्तकांस म. सा. प. ची संमती

सरकारी शाळांतून जीं क्रमिक पुस्तकें अभ्यासाकरिता तयार करण्यांत येतात व लावितात तीं महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या संमतीने व साह्याने तयार करावीत व नेमलीं जावींत. ( बेळगांव १९२९ )

## १२. देशी संस्थानें व बृहन्महाराष्ट्र

### निजाम सरकार व उस्मानिया विद्यापीठ

[ अ ] निजाम संस्थानांतील मराठवाड्यांत जुने मराठी हस्तलिखित ग्रंथ पुष्कळ आहेत. तरी या संस्थानाच्या निरनिराळ्या जिल्ह्यांतील विद्याव्यासंगी माणसांचें एक मंडळ योजून त्याने जुन्या ग्रंथांचा संग्रह करून तो सुरक्षित ठेवण्याचें व त्यांतील उपयुक्त तेवढें छापून प्रसिद्ध करण्याचें काम हातीं घ्यावें [ दक्षिण हैद्राबाद, १९३१ ].

[ आ ] येथील उस्मानिया युनिव्हर्सिटी कॉलेजांत यंदापासून संशोधनशाखा उघडली असून त्याकरिता दरमहा ७५ रुपयांची शिष्यवृत्ति दिली आहे, याबद्दल ही सभा युनिव्हर्सिटी कौन्सिलचें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे. व त्यांच्या संशोधन-शाखेस अशा संग्रहाचा फार उपयोग असल्यामुळे युनिव्हर्सिटी कौन्सिलने या कामास सढळ हाताने मदत करावी अशी ही सभा विनंती करीत आहे [दक्षिण हैद्राबाद, १९३१].

मराठी भाषेच्या अभिवृद्धीकरिता निजाम सरकारने पुढील सूचना अमलांत आणाव्या अशी या संमेलनाची विनंती आहे.

[ अ ] उस्मानिया विद्यापीठाच्या विद्यमाने मराठी भाषा व वाङ्मयाच्या विषयावर वेळोवेळीं तज्ज्ञांचीं व्याख्यानें करण्यांत यावीं.

[ आ ] हैद्राबाद संस्थानांतील मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्याकरिता एका तज्ज्ञाची नेमणूक करावी व मराठी विभागांत असलेल्या वाङ्मयाचें संशोधन व संकलन करून त्यांच्या संग्रहाची व त्यांपैकी निवडक ग्रंथांच्या प्रसिद्धीची व्यवस्था करावी.

[ इ ] हैद्राबाद स्टेट लायब्ररींत उर्दु, फारशी, अरबी व इंग्रजी ग्रंथांप्रमाणे मराठी ग्रंथांचाहि एक विभाग ठेवण्यांत यावा व अशीं सार्वजनिक मोफत ग्रंथालयें जिल्हानिहाय स्थापन करून त्या त्या जिल्ह्याच्या भाषेंतील ग्रंथांना प्राधान्य देण्यांत यावें [ द. हैद्राबाद, १९३१ ].

### निजाम सरकार व वृत्तपत्रें

निजाम इलाख्यांत 'ज्ञानप्रकाश'वरील बंदीचा हुकूम काढून घेतल्याबद्दल ही परिषद् संतोष व्यक्त करते व 'केसरी' वगैरे वर्तमानपत्रांवर असलेली बंदी काढून टाकण्याबद्दल ही परिषद् निजाम सर्कारास आग्रहाची विनंती करते; त्याचप्रमाणे

'हैद्राबाद व देशी संस्थानें' वगैरे उपयुक्त ग्रंथांवरील बंदीहि तात्बडतोब उठवावी असें सुचविते [ द. हैद्राबाद, १९३१ ].

### निजाम सरकार व मराठी भाषा

निजाम इलाख्यांतील मराठी विभागाच्या सर्व अदालतींची भाषा ब्रिटिश इलाख्यांत प्रचलित असलेल्या पद्धतीप्रमाणे मराठी असावी अशी या संमेलनाची विनंती आहे, व त्याचप्रमाणे पाटील, कुळकर्णी, तहशील व तालुकदारांच्या कचेरींतील दप्तरें मराठींत असावींत [ द. हैद्राबाद, १९३१ ]

### निजाम सरकार व शिक्षण

[ अ ] निजाम इलाख्यांतील मराठी विभागांत प्राथमिक शिक्षणाची सोय समाधानकारक नाही, तरी मराठी शिक्षणाच्या स्वतंत्र शाळा उघडून त्यांत मराठी मातृभाषा असणाऱ्या शिक्षकांसच नेमावें अशी या संमेलनाची विनंती आहे.

[ ब ] ज्याप्रमाणे उस्मानिया विद्यापीठाच्या दुय्यम शिक्षणाच्या शाळांतून सर्व शिक्षण उर्दु भाषेच्या द्वारा दिलें जातें, त्याचप्रमाणे तें मराठी विभागांत मराठी भाषेच्या द्वारा देण्याची व्यवस्था करण्यांत यावी [ द. हैद्राबाद, १९३१ ].

### निजाम सरकार व वाङ्मय

निजाम सरकारने कोणतीहि सभा परवानगीशिवाय भरवूं नये असा जो हुकूम काढला आहे, तो वाङ्मयात्मक चर्चेस व शिक्षणप्रसारास विघातक असल्यामुळे शक्य तितक्या लवकर रद्द करावा, अशी या संमेलनाची विनंती आहे [ द. हैद्राबाद, १९३१ ].

### निजाम सरकार व साहित्य

निजाम सरकारच्या शिक्षणखात्याने खाजगी शाळांसंबंधाने जो कायदा चालू केला आहे तो मराठीच्या प्रगतीस विघातक आणि महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांच्या शिक्षणक्रमांत अडथळा उत्पन्न करणारा असल्यामुळे हें संमेलन सदरहु कायद्याचा निषेध करितें; व निजाम सरकारने हा कायदा तात्बडतोब रद्द करावा अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे [ द. हैद्राबाद, १९३१ ].

### कानडी मराठी वादाबद्दल

हल्लीं कर्नाटकांत कानडी मराठीचा जो वाद उत्पन्न झाला आहे, तो सर्व दृष्टींनी अत्यंत अनिष्ट असून शक्य तितक्या लवकर मिटविला जाणे हें उभयपक्षींहि अत्यंत जरूरीचें आहे, असें या संमेलनाचें मत आहे. ( बेळगांव १९२९ )

### मराठी भाषा व मराठी संस्कृति यांची वाढ करण्याबाबत विनंति

हिंदुस्थानांतील कित्येक ठिकाणीं मराठी मातृभाषा असलेले लोकहि आपली मातृभाषा व संस्कृति विसरले आहेत व विसरत आहे ही गोष्ट अनिष्ट आहे. तरी ही आपत्ति दूर करण्यासाठी आपली मातृभाषा महाराष्ट्रीयांच्या अधिक प्रचारांत येईल अशी व्यवस्था प्रत्येक ठिकाणच्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनी करावी अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे. आणि ज्या ठिकाणीं मातृभाषेच्या प्रचाराला निष्कारणें प्रति-

बंध होत असेल त्या ठिकाणच्या लोकांनी त्या प्रतिबंधाचा परिहार करण्याचा प्रयत्न करावा, व त्यास अखिल महाराष्ट्रीयांनी साहाय्य करावें. तसेंच झांशी, सागर, अलाहाबाद, बनारस इत्यादि ठिकाणच्या मंडळींनी मराठी शाळा चालवून जी सेवा चालविली आहे त्याबद्दल हें संमेलन त्यांचें हार्दिक अभिनंदन करीत आहे. (ग्वाल्हेर, १९२८).

## दुर्मिळ ग्रंथांचें पुनर्मुद्रण

मराठी भाषेंतील दुर्मिळ पण उपयुक्त असें जे मुद्रित ग्रंथ उपलब्ध नाहीत व त्यांचें पुनर्मुद्रण होणें अवश्य आहे तसे ग्रंथ ज्या ज्या प्रकाशकांनी आजवर प्रसिद्ध केले आहेत, त्यांचें ही सभा अभिनंदन करिते. तसेंच अशा प्रकारचे प्रयत्न करण्याला प्रकाशकांना उत्तेजन मिळावें म्हणून सरकार, महाराष्ट्र–साहित्य–परिषद्, साहित्यप्रेमी धनिक, ग्रंथसंग्रहालयासारख्या संस्था यांनी सर्वतोपरी साहाय्य करावें अशी या सभेची शिफारस आहे. ( पुणें, १९२७ ).

## मराठी शास्त्रीय परिभाषा ठरविणें

मराठी शास्त्रीय परिभाषा ठरविणें इष्ट आहे म्हणून तज्ज्ञांचें एक मंडळ नेमावें असें या सभेचें मत आहे. ( ग्वाल्हेर, १९२८ ).

महाराष्ट्र वाङ्मयांत शास्त्रीय ग्रंथांची भर घालतांना योजावयाची परिभाषा पाश्चात्यांची जशीच्या तशी न घेतां शक्य तितकी स्वदेशीय असावी व तशी परिभाषा आज तयार नसल्यास संस्कृतादि प्राच्य भाषांची मदत घेऊन ती तयार करावी; मात्र सर्व हिंदुस्थानांत मिळून एकच परिभाषा प्रवर्तित होईल असा शक्य तितका प्रयत्न करावा. ( बडोदें, १९२१ ).

## मराठी बृहत्कोश

मराठी भाषेचा एक सर्वांगीण बृहत्कोश व्हावा असें या सभेचें मत आहे. व हें काम ज्ञानकोशांतील संपादक मंडळाने हातीं घ्यावें अशी या सभेची शिफारस आहे आणि मराठी साहित्य–परिषदेनेहि ह्या कार्यास सर्वप्रकारें साहाय्य द्यावें. (पुणें,१९२७)

मराठी भाषेचा विस्तार, महत्त्व व तिजमधील शब्दभांडार लक्षांत घेता, विशेषत: तिच्या वाढत्या अध्ययनाचीं व प्रगतीचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलेलीं आहेत. अशा वेळीं मूलरूपें, शब्दसिद्धि, समानार्थक शब्द, योजनादर्शक अवतरणें वगैरे सर्व अंगउपांगांनी पूर्ण असा व्यापक व विस्तृत मराठी शब्दांचा कोश अत्यंत अवश्य झालेला असून मराठी साहित्य परिषद्, इतर साहित्य सभा व महाराष्ट्रांतले लोक यांच्या सहकारितेने किंवा व्यक्तिस्फूर्तीने ही उणीव लवकरच भरून निघेल अशी या सभेस आशा वाटत आहे. ( बडोदें, १९२१ ).

## नवीन वाङ्मयाचें परीक्षण

वेळोवेळीं नवीन प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयाचें नि:पक्षपाताने परीक्षण करून त्यावर अधिकारयुक्त मंडळींचा अभिप्राय वेळोवेळीं प्रसिद्ध होणें अवश्य आहे, आणि

त्यासाठी साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळीने एक खास कमेटी नेमावी असें या सभेचें मत आहे. ( मुंबई, १९१५ ).

### द्रव्यनिधि जमविणें

सांगितलेलीं कामें आणि महाराष्ट्र वाङ्मयाच्या उन्नतीसाठी इष्ट असे अन्य तऱ्हेचे उपाय योजण्यास साहित्य परिषद् समर्थ व्हावी म्हणून द्रव्यनिधि जमा करणें अत्यावश्यक आहे. तरी या कामीं राजेरजवाडे व महाराष्ट्र भाषाभिमानी आणि इतर धनिक आणि उदारगृहस्थ यांनी सढळ हाताने साह्य द्यावें अशी हें संमेलन त्यांस विनंती करितें. ( मुंबई, १९१५ ).

### परिषदेपुढील कामें

साहित्य परिषदेने खालील कामें हातीं घ्यावीं असें या परिषदेचें मत आहे.

[ अ ] महाराष्ट्र भाषेचा ( जुन्या आणि नव्या ) सर्वांगपूर्ण कोश अधिकारयुक्त रीतीने सरकारच्या आश्रयाने तयार करविणें.

[ आ ] जुन्या महाराष्ट्र कवींचें संक्षिप्त चरित्र देऊन, त्यांच्या कवितांतील निवडक वेंचे घेऊन एक पुस्तकमाला तयार करणें.

[ इ ] आधुनिक काळांतील सुप्रसिद्ध ग्रंथकार व कवि परलोकवासी झाले आहेत त्यांचें संक्षिप्त चरित्र प्रसिद्ध करणें व त्यांच्या लेखांचा समग्र अथवा संक्षिप्त पुनरावृत्ति काढणें.

[ ई ] सर्व शिक्षण मातृभाषांतून दिलें जावें हें ध्येय उत्तम रीतीने साध्य होण्यासाठीं देशी भाषेंत उच्च शिक्षणास योग्य असे शास्त्रीय विषयावर ग्रंथ लिहून प्रसिद्ध करणें.

[ उ ] मराठी भाषेचा एक चांगला इतिहास तयार करविणें. मराठी भाषेची उन्नति आजपर्यंत कसकशी होत गेली, मराठी भाषेंत आजपर्यंत कोणकोणते ग्रंथ झाले. त्या त्या वेळीं समाजाची काय स्थिति होती व या ग्रंथांनी समाजाला कोणतें वळण लाविलें, याचें विस्तृत वर्णन त्यांत असावें. ( मुंबई, १९१५ ).

### महाराष्ट्र वाङ्मयाच्या वृद्धीसाठी एक समिती नेमण्याबाबत

महाराष्ट्र वाङ्मयाच्या वृद्धीचें कार्य इतउत्तर सुव्यवस्थित पायावर चालविलें जावें, यासाठी त्यास द्रव्य, विद्या व प्रकाशनसाधन या त्रयीची आवश्यकता आहे व म्हणून त्यांसाठी या तिघांचें एकीकरण ज्यांत उत्तम होऊं शकेल, अशी व्यवस्था करण्यासाठी, एक समीति महाराष्ट्र साहित्य परिषदेने नेमावी, व तिने महाराष्ट्रांतील वाङ्मय संस्थांच्या सहविचाराने ही योजना मुक्रर करावी. ( बडोदें, १९२१ )

### ग्रंथकारांचा बहुमान

ज्या प्रतिभासंपन्न महाराष्ट्र ग्रंथकारांनी आणि कवींनी वाङ्मयाची विशेष सेवा करून असाधारण कीर्ति मिळविली असेल, त्यांचा सार्वजनिक रीतीने बहुमान करण्याची कांही तरी सुसंघटित व्यवस्था असावी असें या सभेचें मत आहे. व यासंबंधी

काही तरी सयुक्तिक योजना साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळीने पुढील संमेलना-पुढे विचारार्थ मांडावी. ( मुंबई, १९१५ ).

### मराठींतील सर्वोत्कृष्ट ग्रंथाबद्दल पारितोषक

मराठी भाषेंत प्रतिवर्षी प्रसिद्ध झालेल्या व ज्यांची एक प्रत महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे पाठविली असेल अशा गद्यांत लिहिलेल्या आणि पद्यात्मक पुस्तकांपैकी प्रत्येकीं जें सर्वोत्कृष्ट ठरेल त्याच्या कर्त्यास महाराष्ट्र साहित्य परिषदेमार्फत गौरवदर्शक असें एक पारितोषक उचित स्वरूपाचें देण्यांत यावें. यासंबंधाची योग्य योजना परिषदेच्या कार्यकारी मंडळाने करावी. ( मुंबई, १९२६ ).

### सुधारणा

देशी वाङ्मयाची उन्नति, विद्येचा प्रसार आणि सामाजिक प्रगति ह्या सर्व दृष्टींनी विचार करिता खाली नमूद केलेल्या सुधारणा होणें इष्ट आहे.

[ अ ] सर्व देशी भाषा एकाच लिपींत लिहिण्याचा प्रकार प्रचारात सुरू व्हावा. ह्या कामाला देवनागरी लिपी सर्वथैव योग्य आहे.

[ आ ] कोणती तरी एकदेशी भाषा देशांतील सर्व प्रांतांतील शाळांत, इंग्रजी भाषा आणि त्या त्या प्रांतांची विशिष्ट भाषा याखेरीज तिसरी भाषा म्हणून, साधारण व्यवहारास उपयोगी पडेल इतकी तरी शिकविली जावी. या कामाला हिंदी भाषा योग्य आहे. ( मुंबई, १९१५ ).

### वाङ्मय-वार्षिक यादी आणि समालोचन

[ अ ] मराठीमध्ये दरसाल जें वाङ्मय प्रसिद्ध होतें त्याची यादी दरसाल प्रसिद्ध करावी.

[ आ ] त्याचप्रमाणे दरसाल प्रसिद्ध होणाऱ्या मराठी वाङ्मयाचें अधिकारी लेखकांकडून समालोचन यादीला जोडून प्रसिद्ध करावें.

पुढील वर्षांत प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयाचें समालोचन करण्याकरिता खालील गृहस्थांची कमेटी नेमली आहे. या वर्षांत जो ग्रंथ उत्कृष्ट ठरेल त्यास १०० रुपये पारितोषक द्यावें ( पुणें. १९२७ ).

### विविधज्ञान पुस्तकमालेसंबंधी

जगांत आज समजून घेण्यास योग्य अशा शेकडों विषयाचें ज्ञान अनेक देशांतून फैलावत आहे. पण त्या त्या परदेशी भाषा शिकणारांस म्हणजे एकंदर जनतेच्या मानाने फारच थोड्या व्यक्तींना या ज्ञानाचा लाभ मिळूं शकतो. स्वभाषा हें सर्व ज्ञान-मंदिरांत प्रवेश करण्याचें जनतेला सुलभ असें एकच द्वार असतें. याकरिता प्राचीना-पासून आधुनिकांतील आधुनिकापर्यंत सर्व प्रकारच्या ज्ञानसंग्रहाचा लाभ विषयवार व सुसंगत असा महाराष्ट्र जनतेस मिळावा, याकरिता सोप्या, लोकप्रिय पण प्रौढ अशा भाषेंत लिहिलेलीं, अल्प विस्तारांत मुख्य विषयाचें यथार्थ ज्ञान करून देणारीं, प्रमाण-बद्ध, सचित्र व बेताशीर किंमतीला मिळणारीं अशीं पुस्तकें स्वतंत्र ग्रंथमालेच्या रूपाने

तयार होणें अवश्य आहे. व या कामीं मराठी साहित्य परिषदेने मध्यवर्ती संस्था या नात्याने, इतर संस्था, विद्वान्, धार्मिक लोक व छापखानेवाले यांची सहानुभूति व सहकार्य मिळवून हा उद्योग हातीं घ्यावा, अशी या सभेची शिफारस आहे (बडोदें, १९२१).

**मराठी भाषेंतील ग्रंथांच्या प्रसिद्धी करणेंबाबत म. सा. प. स विनंती**

मराठी भाषेंत छापलेलीं बरीच उत्कृष्ट गद्यपद्य पुस्तकें अलीकडे दुर्मिळ झालेलीं आहेत. तरी महाराष्ट्र साहित्य परिषदेने अशा पुस्तकांची योग्य निवड करून तीं प्रसिद्ध करण्याची तजवीज करावी. (बडोदें, १९२१).

**अखिल महाराष्ट्रीय शारदा मंडळ**

प्रस्तुत संमेलनाच्या अध्यक्षांनी आपल्या भाषणांत २९ व्या व्याख्यामध्ये उल्लेख केलेल्या प्रकारचे मराठी भाषेची अभियुक्त सेवा केलेल्या पंडितांचे एक 'महाराष्ट्र शारदा मंडळ' अस्तित्वांत आणावें. या प्रश्नाचा सर्वांगिण विचार म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळांने करावा आणि त्यासंबंधी आपला अभिप्राय व शिफारसी परिषदेच्या विशिष्ट सभेपुढे सादर करावा (मुंबई, १९२६).

महाराष्ट्रीयांची वाङ्मयनिर्मिती आणि व्यासंग व सार्वत्रिक ज्ञानप्रसार हे हेतु शीघ्र सिद्धीस जाण्याकरिता एक सुव्यवस्थित व सर्वमान्य योजना करून ती कृतींत आणणारी एक मध्यवर्ती संस्था "अखिल महाराष्ट्रीय शारदा मंडळ" (Academy) स्थापण्यांत यावें असें या संमेलनाचें मत आहे. या संस्थेचें स्वरूप सामान्यतः श्री-माधव मराठी मंडळाने प्रसिद्ध केलेल्या योजनेंतील आराखड्याप्रमाणे असावें. वरील आराखड्याप्रमाणे तयार केलेली योजना प्रसिद्ध करून साहाय्य मिळविण्याचा प्रयत्न करण्यांत यावा आणि मंडळाची स्थापना करण्यांत येऊन कार्यास प्रारंभ व्हावा म्हणून हें संमेलन पुढील गृहस्थांचें मंडळ नेमीत आहे (ग्वाल्हेर, १९२८).

**पोर्तुगीज सरकार व मराठी भाषा**

गोमंतकांतील मराठी भाषेच्या उत्तेजनाप्रीत्यर्थ हें साहित्यसंमेलन पोर्तुगीज सरकारास खालील सूचना करीत असून त्या अमलांत येण्याची तजवीज सरकारमार्फत व्हावी अशी त्या सरकारास विनंती करीत आहे:—

(१) गोमंतकांत मराठी प्रकाशकांवर घातले गेलेले निर्बंध मराठी वाङ्मय विकासास प्रतिबंधक असल्यावरून ते दूर करण्याविषयी पोर्तुगीज सरकारास पुन्हा विनंती आहे.

(२) गोमंतकांतील अर्ध्याअधिक लोकांची मातृभाषा मराठी असल्यावरून त्यांचें प्राथमिक शिक्षण त्याच भाषेंतून होणें इष्ट आहे. प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत असावें असें पोर्तुगीज रिपब्लिकच्या राज्यघटनेंत स्पष्ट कलम आहे. सबब प्राथमिक मराठी शाळा सरकारनें स्थापन कराव्या.

(३) सांप्रत चालू असलेल्या सरकारी मराठी शाळांची पुनर्घटना जी (१९-

२४ चा क्रमांक १२३ चा डिप्लोम) कायद्यान्वयें करण्यांत आली आहे तिची अंमलबजावणी लवकर करण्यांत यावी.

( ४ ) लिसे व नॉसियानांतील मराठीचा कोर्स शिक्षकाच्या अभावी तूर्त बंद आहे तो फिरून चालू करण्यांत यावा.

( ५ ) पूर्वी ज्या ज्या कायद्यान्वयें सरकारी हुद्यांस अगर वकीलीच्या परीक्षांस लिसे यांतील मराठी कोर्साचा दाखला घेण्यांत येत होता, तोच दाखला फिरून घेण्यांत यावा.

( ६ ) प्रांतिक कायदे मंडळ, म्युनिसिपालिटया इ. मधील सभासदांच्या निवडणुकींत केवळ देशी भाषेचें ज्ञान हें मताधिकाराच्या पात्रतेचें गमक समजण्यांत यावें.

( ७ ) सरकारी वाचनालयांत मराठी वाचकांच्या सोयीसाठी, मराठी ग्रंथ, मासिकें व वृत्तपत्रें.

गोमांतकांत पोर्तुगीज व मराठी या उभय भाषांतील नियतकालिकांवर असलेल्या सामान्य निर्बंधाशिवाय मराठी नियतकालिकांना गव्हर्नरांची खास परवानगी मिळविण्याचा विशेष निर्बंध पाळावा लागतो. हा निर्बंध मराठी भाषेस अपमानास्पद व अडचणी उत्पन्न करणारा असल्याने तो दूर करण्याची शिफारस गोवा सरकारने पोर्तुगाल सरकारास करावी अशी या संमेलनाची गोव्याच्या गव्हर्नर जनरलांना विनंती आहे. तसेच आजच्या पोर्तुगीज सरकारने गोमांतकांतील पोर्तुगीज प्राथमिक शिक्षणाच्या केलेल्या योजनेस मराठी भाषेच्या शालेय शिक्षणास प्रतिबंधक अशीं जीं कलमें आहेत तीं काढून टाकून व गतवर्षी कायदेमंडळांत पास झालेल्या ठरावानुसार सरकारी मराठी शाळांच्या सुधारणा करून, नवीन मराठी शाळा उघडून आणि इतर रीतीने प्रोत्साहन देऊन मराठी भाषेच्या प्रसारास व अभ्यासास सहाय्य करावें अशी गोवें सरकारास विनंती आहे ( बेळगांव १९२९ ).

### बृहन्महाराष्ट्रीयांच्या मराठी शिक्षणाची सोय व त्याबाबत व्यवस्था

परप्रांतीय महाराष्ट्रीयांच्या ( बृहन्महाराष्ट्रीयांच्या ) मराठी शिक्षणाची सोय करण्याकरिता व त्यांच्या अडचणीची माहिती मिळविण्याकरिता साहित्य परिषदेनें प्रचारक नेमावें व त्यास मराठी पुस्तकें पुरवावीं आणि टिळक विद्यापीठाने पत्रव्यवहाराने व अन्य मार्गाने त्यांस मराठी शिकविण्याची व्यवस्था करावी अशी या संमेलनाची शिफारस आहे ( बेळगांव, १९२९ ).

महाराष्ट्राबाहेरील प्रांतात म्हणजे बृहन्महाराष्ट्रांत महाराष्ट्रीय लोकांना मराठी भाषेचें व मराठी भाषेंतून शिक्षण घेण्यासंबंधाने हल्लीं ठिकठिकाणीं अनेक अडचणी येतात. पुष्कळ ठिकाणीं त्यांस मराठींतून शिक्षण मिळत नाही. तें मिळण्यासाठी अशा ठिकाणीं त्या त्या अडचणी दूर करण्याची व त्यांना मराठीचें व मराठींतून शिक्षण देण्याची सरकारने व्यवस्था करावी अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे ( ग्वाल्हेर, १९२८ ).

### उत्तर हिंदुस्थानांत पूर्णपणें मराठी वृत्तपत्रकाची अवश्यकता

उत्तर हिंदुस्थानांत अनेक मोठमोठीं मराठी राज्यें असतांहि एकहि पूर्णपणें मराठी पत्र नाहीं; तरी ही उणीव उत्तर हिंदुस्थानांतील महाराष्ट्रीयांनी शक्य तितक्या लवकर भरून काढावी अशी या संमेलनाची अत्यंत आग्रहाची सूचना आहे. या कामीं उत्तर–हिंदुस्थानांतील मराठी संस्थानांनी अवश्य तो हातभार लावून आपल्या मातृभाषेची कळकळ व्यक्त करावी अशी या सभेची विनंती आहे (ग्वाल्हेर, १९२८).

### ग्वाल्हेर दरबारास मराठी शिक्षणाची वृद्धि करण्याबाबत विनंती

ग्वाल्हेर राज्यांत मराठीच्या शिक्षणाकडे अवश्य लक्ष पुरवून व शक्य ते प्रयत्न करून ही राजभाषा वृद्धिंगत करावी अशी या सभेची ग्वाल्हेर दरबारास सविनय विनंती आहे ( ग्वाल्हेर, १९२८ ).

प्रजावत्सल कै. माधवराव महाराज शिंदे यांच्या इच्छेनुरूप राज्याच्या मुख्य कार्यालयांतून ( कचेऱ्यांतून ) म्हणजे रेव्हेन्यू, फायनेन्स, खाजगी या खात्यांत राजभाषा मराठी चालू ठेविली आहे. याकरितां ही सभा येथील राजसंस्थेचें (कौन्सिलचें) अभिनंदन करिते व अशी नम्र विनंती करिते कीं, वरील खात्यासंबंधानें होणारे कायदेकानूहि मराठींतूनच प्रसिद्ध करावे ( ग्वाल्हेर, १९२८ ).

### शिंदेसरकारच्या वाङ्मयोत्तेजनाचें अभिनंदन

श्रीमंत अलिजाबहादर शिंदे सरकार यांच्या राज्यारोहण प्रसंगीं ग्रंथरचनेस उत्तेजन देण्यासाठीं श्रीमंत मातोश्री महाराणीसाहेब शिंदे व त्यांच्या मंत्रिमंडळानें पांच हजार रुपयांची वार्षिक देणगी जाहीर केली, याबद्दल ही सभा त्यांचें कृतज्ञतापूर्वक आभार मानते व विनंती करते कीं, या संबंधांत सत्वर ग्रंथोत्तेजक मंडळ्या स्थापन करून ग्रंथोत्तेजनाच्या कार्यास सत्वर आरंभ करावा ( पुणें, १९२७ ).

### निजामराज्यांत मराठीस प्रतिबंध

निजाम इलाख्यांतील मराठी प्रजेच्या प्राथमिक शिक्षणांत मराठीला गौण स्थान आहे. बऱ्याच मराठी वृत्तपत्रांना बंदी आहे. बोधभाषा म्हणूनहि मराठीचा उपयोग होत नाही. मराठींतून शिक्षण देणाऱ्या खासगी संस्थांच्या वाढीस अडथळा होत आहे. या प्रकारें मराठी प्रजेच्या मनाचा विकास होण्यास प्रतिबंध होत आहे. याबद्दल या सभेस दुःख होत असून हे प्रतिबंध दूर होण्याची निजामी प्रजा व निजामसरकार यांनी खटपट करावी ( पुणें, १९२७ ).

पोर्तुगालसरकारनें आपल्या वसाहतीकरितां म्हणून जो एक मुद्रणाचा कायदा अस्तित्वांत आणलेला आहे, त्यांतील कांही कलमें पोर्तुगीज–महाराष्ट्रांतील मराठी नियत कालिकांना मारक झालीं असल्यामुळे तीं शक्य तितक्या लवकर दूर करण्यांत यावीं, अशी ही संस्था गोव्याच्या सरकारास विनंती करीत आहे ( पुणें, १९२७ ).

# हिंदुस्थानांतील जातिसंस्था

( लेखकः— नारायण गोविंद चापेकर )

मुंबई विश्वविद्यालयांतील समाजशास्त्राचे अध्यापक डॉ. घुर्ये यांनी इंग्लिश भाषेंत हिंदुस्तानांतील जाती आणि वंश यांवर एक विचारपरिप्लुत व माहितीने भरलेला असा सुंदर ग्रंथ लिहिलेला नुकताच प्रसिद्ध झालेला आमच्या वाचनांत आला. त्यावरून या अत्यंत महत्त्वाच्या विषयावर थोडेशा निराळ्या दृष्टीने विचार करून लिहिण्याची कल्पना मनांत येऊन आम्ही प्रस्तुत लेख लिहिण्यास उद्युक्त झालों. मराठीमध्ये जातिसंस्थेवर शास्त्रीयदृष्ट्या विचार करून लिहिलेला ग्रंथ आमच्या पाहण्यांत नाही. जातिमूलक हिंदुसमाजाला अशा ग्रंथाची अवश्यकता भासूं नये ही दुःखाची गोष्ट होय. मराठींत तर ग्रंथ नाहीच परंतु संस्कृतांमध्येहि जातिविवेकासारखे कांही ग्रंथ असले तरी त्यांची मजल जातींची, कांही पौराणिक, कांही काल्पनिक, कांही वास्तविक अशी माहिती देण्यापलीकडे जात नाही.

इंग्रजी (Race) रेस ह्या शब्दाला अनुरूप असा शब्द मराठी अगर संस्कृत भाषेंत आढळत नाही. याचें कारण निरनिराळ्या जातींचें मूळ एक असूं शकेल ही कल्पना आमच्या लोकांच्या मनांत आलेली नव्हती. रेस ( Race ) या शब्दाचें भाषांतर वंश ह्या शब्दाने केलें जातें. परंतु संस्कृतांतील वंश शब्दाची कल्पना रेस ( Race ) ह्या शब्दाच्या कल्पनेहून अगदी भिन्न आहे. वंश, गोत्र, कुल हे जवळ जवळ समानार्थीच शब्द आहेत असें म्हणावयास हरकत नाही. तथापि ज्याअर्थी ह्यांपैकीच एक शब्द उचलून इंग्रजी रेस (Race) या अर्थाने वापरण्याचा प्रघात पडला आहे त्याअर्थी रेस (Race) या शब्दाच्या ऐवजी मराठींत वंश शब्द वापरणें क्रमप्राप्तच आहे.

जातिसंस्था हें हिंदुस्थानचें वैशिष्ट्य आहे. जगांत इतरत्र कोठेहि अशा प्रकारच्या जातींचें अस्तित्व दिसून येत नाही. जाति ही जन्मसिद्ध असते आणि हेंच जातीचें प्रमुख लक्षण होय. जन्मावरून मनुष्याचा सामाजिक व धार्मिक दर्जा निश्चित होतो. जन्मावरून अशा प्रकारचा दर्जा ठरविण्याची कल्पना एकदा का दृढमूल झाली म्हणजे आपल्या संघाच्या बाहेर विवाहसंबंध न करण्याचा नियम पाळणें भागच पडतें. कोणत्याहि पुरुषाचा कोणत्याहि स्त्रीबरोबर विवाहसंबंध घडल्यास तेथे जातीचें बीजच रुजणार नाही हें उघड आहे. वर्ण, जातीप्रमाणे जन्मसिद्ध असल्यामुळे वर्ण आणि जाति यांमध्ये तत्त्वतः भेद मानणें अशक्य आहे. स्मृतिकारांनी वर्णाची व्याप्ति वाढविल्यामुळे एका वर्णांत अनेक जातींचा समावेश होऊन जाति आणि पोटजाति हा एक निराळाच पोटभेद उत्पन्न झाला. ह्या दृष्टीने जिला हल्ली आपण पोटजात समजतों तिला शास्त्रीय विवेचनांत प्राधान्य देणें अवश्य आहे हें डॉ. घुर्ये यांचें प्रतिपादन आम्हांस सर्वथैव योग्य दिसतें. मी दुसऱ्या जातीचा एक भाग नसून माझी स्वतंत्र जात आहे असें जिला हल्ली पोटजात मानण्यांत येतें त्या जातींतील प्रत्येक माणसाला वाटत असतें. या पोटजातींचा प्रश्न मुख्यत्वेंकरून ब्राह्मण जातींतच उत्पन्न होतो. ब्राह्मणेतर जातींत ह्या पोटजातींचा प्रश्न फारसा उद्भवत नाही. याचें कारण ब्राह्मणांच्या वेदसंरक्षणांत आढळून येईल. ह्या सिद्धांताच्या स्पष्टीकरणार्थ आपण महाराष्ट्रांतील काही ब्राह्मण जातींचें उदाहरण घेऊं. कोकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे हे प्रांतिक भेद घ्या किंवा ऋग्वेदी, यजुर्वेदी, माध्यंदिन, काण्व, वगैरे शाखाभेद घ्या. या सर्व एका ब्राह्मण जातीच्या पोटजाती आहेत असें आपणांस निखालस म्हणतां येतें. कारण वेदाध्ययन हें जें ब्राह्मण्याचें मुख्य लक्षण

२८ प्र. ह. खाडिलकर, २९ सौ. सुलोचनाबाई हुदलीकर, ३० पां. वा. जोशी. ३१ के. ना. काळे, ३२ ना. गो. चापेकर, ३३ दि. वि. काळे, ३४ शि. का. ओक, ३५ गो. स. सरदेसाई, ३६ वा. गो. मायदेव, ३७ शं. के. कानेटकर, ३८ मा. त्रि. पटवर्धन, ३९ बा. मा. खुपेरकर, ४० के. आ. पाध्ये, ४१ य. दि. पेंढरकर, ४२ ग. श्री. दुपरीकर, ४३ कृ. पां. कुलकर्णी, ४४ श्री. रा. पारसनीस, ४५ वि. कृ. नेरुरकर, ४६ वि. ह. आपटे, ४७ ग. गं. जांभेकर, ४८ द. वि. अष्टेकर.

**मागील सभेचा अहवालः**—सभेच्या अध्यक्षस्थानीं परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत मा. वि. किबे हे होते. प्रथम चिटणीस श्री. कृ. पां. कुलकर्णी यांनी या सभेची सूचना व मागील सभेचा अहवाल वाचून दाखविला. अध्यक्षांनी रा. ब. पाध्ये यांच्या कडून आलेलें पत्र वाचलें. त्यांत ता. २० मार्च १९३२ च्या सभेचा अहवाल परिषदेच्या वृत्तांतवहींत लिहून ठेवण्याबद्दल, व ता. १६ आक्टोबरच्या सभेंतून श्री. किबे यांच्या मागून श्री. काणे अध्यक्षस्थानीं येण्यापूर्वी कांही सभासद उठून गेले याचीहि अहवालांत नोंद करण्याबद्दल, तसेंच निवडणुकीबद्दल त्यांनी लिहिलें होतें. २० मार्च १९३२ च्या सभेचा वृत्तांत वहींत नोंदल्याचें अध्यक्षांनी कळविलें व श्री. काणे यांना ता. १६ च्या सभेसंबंधी खुलासा करण्यास सांगितलें. श्री. काणे यांनी श्री. किबे यांच्या सांगण्यावरूनच व रीतसर निवडणूक झाल्यावर मी अध्यक्षपद स्वीकारलें अशा आशयाचा खुलासा केला. या ठिकाणीं श्री. किबे यांनी आपणच श्री. काणे यांना त्या दिवशीं सभेचें अध्यक्ष होण्याबद्दल विनंती केल्याची माहिती दिली. श्री. र. लु. जोशी यांनी सभेंतून कोणीहि विरोध म्हणून उठून गेला नव्हता असें खात्रीपूर्वक बजावलें; तेव्हां प्रो. द. वा. पोतदार यांनी रा. ब. पाध्ये यांच्या पत्राला हरकत घेतली. तथापि अध्यक्षांनी मागील सभेचा अहवाल मंजूरीकरितां घातला, व तो मंजूर झाला. फक्त प्रो. पोतदार हे तटस्थ राहिले.

**घटना-वृत्तांत व अहवालः**—यानंतर घटनाकमिटीच्या अहवालावर कोणी कोणी सह्या केल्या व कोणाच्या सूचना-दुरुस्त्या आल्या त्या श्री. दाते यांनी वाचून दाखविल्या. रा. हर्षे यांच्या सूचनेवरून प्रथम हा कमिटीचा अहवाल अध्यक्षांना सादर करून मग त्यांच्या सांगण्यावरून चिटणिसाकरितां श्री. दाते हे वृत्तांत वाचूं लागले. वृत्तांतातील शिफारसी-शेऱ्यांना श्री. ना. गो. चापेकर यांनी हरकत घेतली. कमिटी परिषदेचें कार्य तपासण्यासाठीं नव्हती तर कार्यकारीमंडळाच्या मदतीसाठीं दिली होती. कार्याध्यक्षांनी कामाकडे लक्ष दिलें नाहीं हें म्हणणें साफ चूक आहे. मुंबईस काम होत नाहीं ही तक्रार त्यांनी वेळोवेळीं केलेली होती. आपले स्वतःचे हिशोब ते दर पत्रिकेंत प्रसिद्ध करीत होते. अशा तऱ्हेचें श्री. चापेकर यांचें थोडेसें भाषण झाल्यानंतर श्री. काणे यांनी अहवालाचे अहवाल व शिफारसी, हिशोब, पत्रिका व घटना असे चार भाग करून ते क्रमशः चर्चेस घेण्याविषयीं सुचविलें. अहवालांतील अळतेकरकमिटी या नांवाऐवजीं हिशोबकमिटी हें नांव घालण्याविषयीं

श्री. रा. दा. देसाई यांची सूचना कबूल करण्यांत आली. नंतर कमिटीने परिषदेचा मागील कामाचा दिलेला अहवाल मंजूर करण्यांत आला.

**मागील हिशेबः**—यापुढे श्री. काणे यांनी कमिटीने दिलेला हिशेब मान्य करण्याविषयी सुचविलें. मागील १९२६ सालापासूनचे हिशेब तसेंच लोंबत न ठेवतां ते जमेस धरून १९३२ सालापासून नवीन जमाखर्च मांडावा. १९३१ मेअखेर परिषदेजवळ कांही शिल्लक नव्हती असें धरून चालावें असें श्री. काणे यांनी सांगून पुढील ठराव मांडलाः—

**ठरावः**—" १. हिशेबासंबंधाचा कमिटीचा अहवाल दप्तरीं दाखल करावा. २. १९२६ ते १९३१ मेअखेर परिषदेचा जमाखर्च ट्रस्टींकडे असलेल्या येणेंदेणें यांच्या हिशेबाखेरीज ऑडिटरांस दाखवून पास करून घेण्याच्या स्थितींत नाहीत. याबद्दल सभेस अतिशय खेद होत आहे. म्हणून हें काम असेंच रेंगाळत राहूं नये. म्हणून या अवधींतील सर्व हिशेब पुरे झाले व १९३१ मे अखेर ( ट्रस्टींकडे असलेला हिशेब वजा करून ) कांही शिल्लक राहिली नाही असें समजून पुढील हिशेब रीतसर ठेवण्याची व्यवस्था व्हावी. "

याला भा. वि. पटवर्धन, वकील यांनी अनुमोदन दिलें. या ठरावावर थोडीशी अनुकूल–विरुद्ध चर्चा झाली. त्यांत ट्रस्टडीड संबंधींहि माहिती विचारण्यांत व देण्यांत आली. अखेर अध्यक्षांनी हा ठराव मंजुरीस घालतां सर्वानुमतें पसार झाला.

यानंतर प्रो. रा. ग. हर्षे यांनी पुढील ठराव सभेपुढें मांडलाः—

**ठराव २**—" १९२६ ते १९३१ मे अखेरपर्यंतचे हिशेब ज्या चिटणिसांनी योग्यरीतीने ठेविलें नाहीत त्याबद्दल ही सभा त्यांचा तीव्र निषेध करिते.

प्रो. वाडेकर यांनी याला अनुमोदन दिल्यानंतर प्रो. मायदेव यावर विरुद्ध बोलले. चिटणिसांचा निषेध करूं नये. कारण ते निर्वेतन काम करीत असून आपल्या सवडीप्रमाणे सद्धेतूने संस्थेचा कारभार पहात असतात. असा ठराव होऊं लागल्यास कोणाला सार्वजनिक काम करण्यास उमेद राहील ? शिवाय या ठरावामुळे सर्वांवरच शिंतोडा उडतो. तेव्हा सभेने आपलें सौजन्य घालवूं नये. प्रो. पोतदार व रा. पटवर्धन वकील यांनी प्रो. मायदेवांना दुजोरा दिला. नंतर प्रो. हर्षे यांनी ठरावाच्या आवश्यकतेविषयीं उत्तरादाखल भाषण केल्यानंतर अध्यक्षांनी ठराव मंजुरीस घातला. तो (१८ अनुकूल ७ प्रतिकूल व चार तटस्थ अशा रीतीने) बहुमताने पसार झाला.

यापुढे प्रो. पोतदार यांनी ट्रस्टडीडसंबंधी पुढील ठराव मांडलाः—

**ठराव ३**:—' परिषदेचें ट्रस्टडीड परिषदेचे अध्यक्ष यांनी ट्रस्टीकडून मागवून त्याच्या प्रती छापून ६ महिन्यांचें आंत सभासदाकडे रवाना कराव्या.

या ठरावास प्रो. वाडेकर यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सर्वानुमतें मंजूर झाला.

यानंतर रा. जोग वकील यांनी पुढील ठराव मांडलाः—

'ट्रस्टी यांच्याकडून येण्यादेण्याचा हिशेब करून रीतसर वसुली करण्यासाठी व जरूर तर कोर्टात जाऊन त्यासंबंधी योग्य ती तजवीज करण्यासाठी परिषदेतर्फे कार्यकारी मंडळास सर्व अधिकार देण्यांत यावा. याबद्दलचा खर्च चालू खर्चांतून करण्यांत यावा.' याला रा. जोशी यांनी अनुमोदन दिलें. याबाबत अध्यक्षांनी रा. ब. पाध्ये यांच्याकडून आलेलें पत्र वाचून दाखविल्यामुळे हा ठराव नोंद करून परत घेण्यांत आला. यानंतर चिटणिसांनी हजर न राहणाऱ्या कांही सभासदांचीं पत्रें वाचून दाखविलीं. तसेंच रा. माडखोलकर यांच्याकडून पुढील संमेलन नागपुरास बोलाविण्यासंबंधी पत्र वाचण्यांत आलें. येवढें काम झाल्यानंतर बैठक दुसऱ्या दिवशीं सकाळीं ७॥ पर्यंत तहकूब करण्यांत आली.

ता. २८।१२।३२ रोजीं सकाळीं ७॥ वाजतां बैठक भरून प्रथम निवडणुकी-संबंधी चर्चा करण्यांत आली व निवडणुकी पत्रद्वारें कराव्या असें ठरलें. यानंतर श्री० काणे यांनी पहिल्या पुनर्घटना कमिटीच्या वृत्तांतांतील साहित्यपत्रिकेसंबंधी ठराव विचाराकरिता पुढे घेतले.

( अ ) साहित्यपत्रिकेसाठी वर्षाला ८०० रु० पेक्षा अधिक खर्च करूं नये.

( आ ) त्रैमासिकाचा पहिला अंक वार्षिकाच्या स्वरूपाचा सुमारें ८० पृष्ठांचा काढावा. त्यामध्ये त्या वर्षांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचा परिचायक आढावा, वाङ्मय संस्थांची माहिती, जगांतील वाङ्मयाचा ओघ कोणत्या दिशेनें चालला आहे, सभासदांची यादी, अहवाल वगैरे मजकूर असावा. इतर अंक सुमारें ५६ पृष्ठांचे असावेत.

( इ ) ( दुसरा घटना कमिटीचा वृत्तांत पा० १७ ) साहित्यपत्रिकेचा संपादक कार्यकारी मंडळानें आपणांमधून निवडावा.

( ई ) दुसरी घटना व नियम ४० मध्ये 'ढवळाढवळ करूं नये' याबद्दल "संपादकीय कामांत संपादकास पूर्ण स्वातंत्र्य राहील. आणि संपादकीय विभागांतील मजकुराबद्दल सर्व जबाबदारी त्याचेवर राहील." हा मजकूर घालावा.

हे साहित्यपत्रिकेसंबंधी ठराव सर्वानुमतें मंजूर करण्यांत आले.

पहिल्या पुनर्घटना कमिटीच्या वृत्तांतांतील "चालू वर्षापुरते पत्रिकेचे अंक सध्याच्या स्वरूपांत काढावे, पुढील वर्षाकरिता सभासदेतरांकडून वर्गणी घेऊं नये" हा पा० ९ वरील ९ वा ठराव गाळण्यांत आला.

यानंतर रा. दाते यांनी रा. वर्दे आणि अळतेकर यांच्याकडून आलेल्या भिन्न-मतपत्रिका वाचून दाखवून त्यांचा विचार करण्याविषयी सुचविलें.

परिषदेची घटना व नियम जे कमिटीने तयार केले होते त्यावर चर्चा होऊन ते नक्की करण्यांत आले. सभेने जी नवीन घटना मंजूर केली ती पत्रिकेंत स्वतंत्रपणें छापली आहेच. तेव्हा येथे ती देण्यांत आली नाही.

परिषदेची कचेरी पुण्यास असल्याबद्दलचा ठराव रजिस्ट्रारकडे पाठवून यापुढील सर्व व्यवहार पुणें–कचेरीमार्फत होतील असें कळविण्याविषयीं प्रो. पोतदार यांनी जी सूचना केली ती परिषदेस मान्य झाली.

**ठराव ४ था**:—"हैद्राबाद येथे (नियमाप्रमाणे भरावयाची) परिषदेची साधारण सभा भरली. तींत जें काम झालें तें रीतसर झालें असें ही सभा ठरवीत आहे."

हा ठराव प्रो. पोतदार यांनी निवडणुकीसंबंधी विचार चालला असतां हैद्राबादच्या परिषदसभेचा कायदेशीरपणा जर कांही राहिला असेल तर तो काढून टाकण्याकरिता मांडला. यास धारवाडचे रा. पटवर्धन वकील यांनी अनुमोदन दिल्यानंतर तो अध्यक्षांनी मतास घातला. तेव्हा हा ऐकमत्याने मंजूर करण्यांत आला. त्यानंतर चालू कार्यकारी मंडळाच्या अधिकारासंबंधी वाद निघाला. फक्त अध्यक्ष व कार्याध्यक्ष जुने आहेत त्यांना रा. ब. पाध्ये, अळेकरादि मंडळी मानीत असली पाहिजेत. तेव्हा त्यांच्याच नांवाने आतापर्यंत जसा कारभार चालला तसा चालावा की काय असा प्रश्न निघाला असतां श्री. ना. गो. चाफेकर यांनी सांगितलें की मी हैदराबाद संमेलनापूर्वी राजिनामा दिला असल्याने मी सुद्धा नवीनच कार्याध्यक्ष आहे. चिटणीस श्री. कुलकर्णी यांनी या वेळीं फार आवेशाचें भाषण करून असें बजाविलें की, अध्यक्ष व कार्याध्यक्ष यांनाच फक्त वेगळे काढून बाकीच्या सभासदांना अनधिकृत ठरवीत असाल तर ते अन्यायाचें होईल. आतापर्यंत जरी आम्ही अध्यक्ष व कार्याध्यक्ष यांच्याच नांवाने सर्व कारभार जाहीर करीत आलों तथापि आम्ही अनधिकृत केव्हाहि नव्हतों व नाही. सर्वच कार्यकारीमंडळ नवें आहे तेव्हा सबंधच्या सबंध मंडळाच्या अधिकाराचा विचार एकत्र करावा हें बरोबर होईल. यावर प्रो. मायदेव यांनी पुढील ठराव मांडला:—

**ठराव ५ वा**:—" नव्या निवडणुकी होईपर्यंत सध्या अस्तित्वांत असलेलें कार्यकारीमंडळ चालू रहावें " याला प्रोफेसर पोतदार यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा सर्वानुमतें मंजूर झाला.

यानंतर श्री. काणे यांनी घटना व नियम यासंबंधी चर्चा पुढे सुरू करून नांव, उद्देश व साधनें हीं पूर्वीच्या घटनेप्रमाणेच कायम आहेत असें मंजूर करून घेतलें. 'यापुढे निधिधारकांची निवडणूक करण्याचा प्रसंग आल्यास ती निवडणूक ५ वर्षांपुरती असावी' असेंहि मंजूर झालें.

या वेळीं पूर्वी रजिस्टर केलेली घटना रजिस्ट्रारकडून मागून घ्यावी असें ठरलें. नंतर शाखासभा परिषदेच्या सभासदांचे वर्ग, वयाची अट यासंबंधी घटनेंत दुरुस्त्या करण्यांत आल्या. या ठिकाणीं प्रो. पोतदार यांनी पुढील ठराव मांडला.

**ठराव ६ वा**:—'आज मंजूर केलेल्या ठरावांत व १८६० चा २१ वा कायदा यांतील बंधनकारक कलमें यांत विरोध उत्पन्न झाल्यास कायद्यांतील नियमां-

सच प्राधान्य द्यावें व त्याप्रमाणे आज मंजूर झालेल्या ठरावांत अवश्य ते फेरफार कार्यकारी मंडळाने करावे.' याला श्री. काणे यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सर्वानुमतें मंजूर झाला. यानंतर घटनेंतील नं. १६ व १९ हीं कलमें दुरुस्त होऊन बैठक दुसऱ्या दिवशीं रात्रीपर्यंत तहकूब करण्यांत आली.

ता. २९।१२।३२ रोजीं रात्रीं ९ वाजतां ३ री बैठक भरून घटनेवर चर्चा सुरू झाली. या वेळीं प्रोफेसर पोतदार यांनी पुढील ठराव मांडला.

**ठराव ७ वाः**—'कार्यकारी मंडळ, नियामक मंडळ व परिषद यांचीं वृत्तें वेळोवेळीं सभासदांस कळतील अशी व्यवस्था करण्यांत यावी.' याला श्री. काणे यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सर्वानुमतें मंजूर झाला.

यानंतर श्री. काणे यांनी पुढील ठराव मांडला.

**ठराव ८ वाः**—'या परिषदेंत मान्य झालेल्या नियमांपैकीं नियामक मंडळ व कार्यकारी मंडळ यासंबंधाने केलेल्या नियमांस अनुसरून ताबडतोब निवडणुकी कराव्या आणि बाकी सर्व नियमांचा अंमल १ एप्रिल १९३३ पासून व्हावा. येत्या निवडणुकीच्या संबंधाने नियमांच्या अर्था (Interpretation) विषयीं संशय उत्पन्न झाल्यास त्याचा निर्णय परिषदेचे अध्यक्ष यांनीं द्यावा व तो अखेरचा समजावा.' याला श्री. पटवर्धन वकील यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सर्वानुमतें मंजूर झाला. यापुढे प्रो. पोतदार यांनी पुढील ठराव मांडला.

**ठराव ९ वाः**—'कोल्हापूर येथे सांप्रत भरणारे साहित्यसंमेलन हे साहित्य-परिषदेच्या नियमांप्रमाणे हैद्राबाद येथे झालेल्या ठरावाप्रमाणे व व्यवस्थेप्रमाणेच भरत असून तें क्रमानेहि त्या संमेलनापुढीलच आहे. यासंबंधाने हैद्राबाद संमेलनाचे अध्यक्ष यांनी जो अनिष्ट वाद व चळवळ चालविली आहे तो या सभेस सर्वस्वी असंमत असून तिने कोणीही आपला गैरसमज करून घेऊं नये' अशी सर्वांस विनंती आहे. प्रो. पोतदार यांनी या ठरावाची आवश्यकता किती आहे हें सांगून संमेलनापुढेहि हा ठराव मांडण्यांत यावा असें सुचविलें. याला श्री. पां. बा. वकील यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा सर्वानुमतें मंजूर करण्यांत आला.

यानंतर बेळगांवचे श्री. जोग वकील यांनी पुढील ठराव सुचविला. 'मराठी भाषेंतील बरीचशीं प्रमुख मासिकें नियमित वेळीं निघत नसल्याकारणाने मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीस अडथळा येत आहे असें ही परिषद खेदपूर्वक नमूद करीत आहे व सर्व मासिकांच्या संपादकांना व व्यवस्थापकांना नियमितपणें अंक प्रसिद्ध करण्याबद्दल ही परिषद आग्रहाची विनंती करीत आहे.' थोडयाशा चर्चेनंतर हा ठराव रा. जोग यांनी परत घेतला.

यापुढे शेवटचा ठराव रा. हर्षे यांनी मांडला तो असाः—

ठराव १० वा—"एक पगारी नोकर, कचेरीकरता जागा, सादिलवार, टपाल वगैरे खर्च यांकरिता १ वर्षपर्यंत रु. ८०० मंजूर केले आहेत. हे रुपये वर्गणीच्या रूपाने कार्यकारी मंडळाने जमा करण्याची तजवीज करावी" याला प्रो. वाडेकर यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा सर्वानुमतें मंजूर करण्यांत आला. यानंतर सभेचें सर्व काम संपलें असें अध्यक्षांनी सांगून सभेंत सर्व गोष्टी व्यवस्थितपणें पार पडल्याबद्दल समाधान व्यक्त केलें.

श्री. ना. गो. चापेकर यांनी अध्यक्षांचे आभार मानल्यानंतर ही परिषदेची सभा आटोपली.

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## घटना

१. नावः—महाराष्ट्र–साहित्य–परिषद्.

२. परिषदेचें वर्षः—१ एप्रील ते ३१ मार्च असें मानलें जाईल.

३. परिषदेची कचेरीः—परिषदेचें कार्यालय पुणें येथे राहील. कार्यालयाची जागा बदलणें झाल्यास सर्व सभासदांची पत्रद्वारें मत मागवावीं. त्यानंतर परिषदेची साधारण सभा बोलावून त्या सभेंत हजर असलेल्या सभासदांच्या प्रत्यक्ष दिलेल्या व गैरहजर सभासदांच्या लेखी आलेल्या अशा दोन्हीं मिळून नोंदल्या गेलेल्या मतांपैकी बहुमतांनी ठरेल त्या ठिकाणीं कार्यालय ठेवावें.

४. उद्देशः—मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्ध्यर्थ प्रयत्न करणें, उपाय योजणें व इतर रीतीनें झटणे आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणें हे परिषदेचे प्रधान उद्देश आहेत.

५. साधनेंः—वरील उद्देश साधण्यासाठी खाली दिलेले उपाय आणि वेळोवेळीं योग्य व इष्ट वाटतील ते दुसरे उपाय योजिले जावे.

( अ ) मराठी ग्रंथकारांचें, प्रकाशकांचें आणि मराठी भाषेविषयी आस्था बाळगणारांचें होतां होई तो दरसाल संमेलन भरविणें.

( आ ) मराठी भाषेचें व्याकरण, इतिहास व कोश तयार करणें, आणि तसेंच सर्व विषयावर मराठी भाषेमध्यें चांगले ग्रंथ लिहवून प्रसिद्ध करणें, किंवा तत्प्रीत्यर्थ उत्तेजन व साहाय्य देणें आणि मराठी वाचकाना सर्व प्रकारचें ज्ञान सुलभ करविणें.

( इ ) शास्त्रीय विषयांची परिभाषा ठरविणें आणि इतर साहित्य-सभांच्या सहकारित्वाने पारिभाषिक कोश तयार करणें.

( ई ) प्राचीन काव्यें, इतिहास, महत्त्वाचे लेख आणि साहित्यविषयक ऐतिहासिक वस्तु यांचा संग्रह करणें आणि त्यांचें संशोधन व प्रकाशन करणें अगर करविणें.

( उ ) प्राचीन व अर्वाचीन मराठी ग्रंथकारांची माहिती मिळविणें व त्यांचीं चरित्रें प्रसिद्ध करणें.

( ऊ ) भाषाशास्त्राच्या पद्धतीने मराठी भाषेचें अध्ययन व संशोधन करविणें आणि त्याचा प्रसार करणें.

( ए ) देशी भाषा व साहित्य यांची हरएक प्रकारें उन्नति करण्यासाठी इतर साहित्य संस्थांशीं सहकारित्वाने कार्य करणें.

( ऐ ) सामान्यतः परिषदेचे उद्देश सिद्धीस नेण्याकरिता जरूर वाटतील त्या सर्व गोष्टी करणें.

## सभासद व त्यांचे हक्क

६. परिषदेचे सभासद पुढीलप्रमाणे ६ प्रकारचे असतील:—

१. उपकर्ते:—परिषदेस पाच हजार ( ५००० ) किंवा अधिक रुपये देणारे.

२. आश्रयदाते–परिषदेस एक हजार ( १००० ) किंवा अधिक रुपये देणारे.

३. साहाय्यक:—परिषदेस पांचशें ( ५०० ) किंवा अधिक रुपये देणारे.

४. हितचिंतक:—परिषदेस दीडशें ( १५० ) किंवा अधिक रुपये देणारे.

५. तहाहयात सभासद:—परिषदेस ५० किंवा अधिक रुपये देणारे.

६. साधारण सभासद:—वार्षिक वर्गणी रु. ३ किंवा अधिक रुपये देणारे.

७. सन्मान्य सभासद:—अलौकिक विद्वत्ता, अथवा मराठी भाषेची विशेष सेवा या गुणांसाठी परिषदेच्या साधारण सभेने सन्मानार्थ निवडलेले गृहस्थ अथवा स्त्रिया यांस परिषदेचे सन्मान्य सभासद समजावें.

८. सभासदांची नोंद व हक्क:—नवीन सभासद होऊं इच्छिणाऱ्या अठरा वर्षांवरील कोणाहि स्त्रीने अगर पुरुषाने ठरलेल्या नमुन्याप्रमाणे वर्गणीसह अर्ज करावा. त्यास कार्यकारी सभेची संमति मिळाल्यावर अशा नवीन उमेदवारांचीं नावें सभासदांच्या यादींत नोंदण्यांत येतील.

९. परिषदेच्या कोणत्याहि साधारण सभेंत अगर निवडणुकींत मत देण्याचा अधिकार जे सभासद नियमाप्रमाणे सभासद नोंदले गेले असून तीन महिन्यांचा अवधि गेला असेल त्यांसच राहील.

१०. एक वर्षाची वर्गणी ज्याची थकली असेल त्या सभासदास मत देण्याचा अधिकार राहणार नाही.

११. दोन वर्षांची वर्गणी ज्याची थकली असेल त्या सभासदाचें नांव पूर्वसूचना देऊन कार्यकारी मंडळाने पटावरून काढून टाकावें. अशा गृहस्थास पुन्हा सभासद होणें असल्यास मागील वर्गण्यांची सर्व बाकी त्याने आपल्या अर्जासोबत पाठविली पाहिजे.

१२. परिषदेचे दप्तर व कागदपत्र पाहणें झाल्यास ८ दिवस आगाऊ सूचना देऊन कार्याध्यक्षाचे परवानगीने कोणत्याहि सभासदास पाहता येईल.

## अधिकारी व अधिकारीमंडळें

१३. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अधिकारी:—एक अध्यक्ष व पांचपर्यंत उपाध्यक्ष हे परिषदेच्या सर्व सभासदांनीं दर तीन वर्षांनीं निवडावे.

१४. परिषदेचे निधिधारक ( ट्रस्टी ) कमींतकमी दोन व तीनहून अधिक नाहीत इतके असावेत. निधिधारकाची जागा रिकामी झाल्यास ती नियामक मंडळाच्या शिफारशीने कार्यकारी मंडळाने भरावी. नवीन ट्रस्टी नेमतांना त्याची मुदत पांच वर्षांची असावी.

१५. परिषदेचीं दोन अधिकारी मंडळें असावींत. ( १ ) नियामक मंडळ. ( २ ) कार्यकारी मंडळ.

१६. नियामक मंडळाचे सभासद पुढीलप्रमाणे राहतील.

( १ ) अधिकारपरत्वें६– १ अध्यक्ष, ५ उपाध्यक्ष (२) संलग्न व सहकारी संस्था–१० ( ३ ) स्वीकृत......१० ( ४ ) प्रादेशिक......५४

( १ ) मध्य महाराष्ट्रः—( पुणें १, सातारा १; नगर १, सोलापूर १; नाशिक १; पूर्व खानदेश १, पश्चिम खानदेश १, ठाणें १; कुलाबा १; रत्नागिरी १ मिळून दहा जिल्ह्यास ) ... ... १०
( २ ) पुणें शहर ... ... ३
( ३ ) मध्य महाराष्ट्रांतील संस्थानें (भोर, फलटण, औंध, अक्कलकोट, जव्हार इ.)...३
( ४ ) मुंबई व उपनगर ... ... ४
( ५ ) वऱ्हाड ( अकोला, यवतमाळ, बुलढाणा, उमरावती ) ... ४
( ६ ) नागपूर व मराठी मध्यप्रांत ( नागपूर, वर्धा, चांदा, भंडारा, बालाघाट ) ५
( ७ ) हैद्राबाद संस्थानातील मराठवाडा ... ... ४
( ८ ) दक्षिणी मराठी संस्थानें ( कोल्हापूर, मिरज, सांगली, बुधगांव, जत, कुरुंदवाड, मुधोळ, रामदुर्ग इ. ) ... ... ३
( ९ ) कर्नाटकांतील मराठी भाग व गोंवें–सावंतवाडी ( बेळगांव, धारवाड, विजापूर; कारवार, गोंवें–सावंतवाडी ) ... ... ४
( १० ) बडोदें; गुजराथ–काठेवाड; सिंध ( कराची, हैद्राबाद ) व राजपुताना ३
(११) इंदूर, धार–देवास, मध्य–हिंदुस्थान व राजपुताना (अजमेर, झांशी, जयपूर इ.); मराठी मध्यप्रात ( सागर, जबलपूर, खांडवा ) ... ४
( १२ ) ग्वाल्हेर, उत्तर हिंदुस्थान ( दिल्ली, आग्रा, लाहोर, रावळपिंडी ) २
( १३ ) संयुक्तप्रांत ( बनारस, लखनौ, प्रयाग, कानपूर ) ... २
( १४ ) बंगाल, बिहार व ओरिसा ... ... १
( १५ ) दक्षिण–हिंदुस्थान ( बंगलोर, म्हैसूर, सोंडूर, तंजावर, मद्रास ) २

एकूण सभासद ८० ५२

१७. कार्यकारी मंडळाचे १० सभासद पुढीलप्रमाणे असतील. ( अ ) कार्याध्यक्ष, ( आ ) खजिनदार, [ इ ] इतर आठ सभासद. हे सर्व नियमक मंडळाने आपल्यापैकी निवडावे.

१८. वरील निवडणुकी द्विवार्षिक असाव्यात व त्या साधारण सभेत व्हाव्या. या निवडणुकीबाबत गैरहजर सभासदांच्या पत्रद्वारें आलेल्या लेखी मतांच्या व प्रत्यक्ष हजर सभासदांच्या बहुमतानुसार निर्णय व्हावा. अध्यक्ष, उपाध्यक्ष व नियामक मंडळ यांच्या निवडणुकी मार्च महिन्यांत व्हाव्यात.

१९. निवडणुकींच्या आधी दोन महिने सभासदांची यादी छापून ती चिटणीसांनी सर्व सभासदांकडे पाठवावी व त्यांजकडून निरनिराळ्या निवडणुकीकरिता सूचितांचीं नांवे मागवावीं. निवडून आलेल्या उमेदवाराची सदर निवडणुकीस संमति नसेल तर त्याच्या खालोखाल मतें पडलीं असतील तो उमेदवार निवडून आला असें समजण्यांत येईल.

२०. निवडणुकीचे दिवसाचे आधी निदान २५ दिवस सूचितांचीं नांवें सूचक व अनुमोदक यांचे सहीने चिटणीसांकडे आलीं पाहिजेत. चिटणीसांनी प्रत्येक निवडणुकीच्या मतदानपत्रिका मतदाराकडे निवडणुकीच्या दिवसाचे निदान पंधरा दिवस आधी रवाना केल्या पाहिजेत.

## परिषदेच्या सभा

२१. परिषदेची सभा महाराष्ट्र साहित्य संमेलन त्या वर्षी जेथे भरेल तेथे संमेलनापूर्वी व्हावी. या सभेंत परिषदेच्या कामाचा वार्षिक अहवाल व तपासनीसांनी तपासलेले हिशेब सभासदांपुढे कार्यकारी मंडळाने मंजुरीकरिता मांडावेत.

२२. संमेलन एखादें वर्षी न भरल्यास परिषदेची वार्षिक सभा परिषदेच्या कार्यालयाचे ठिकाणीं अध्यक्षांनी अगर कार्यकारी मंडळाने नाताळचे सुट्टींत भरवावी.

२३. याशिवाय जरूर लागेल तेव्हा अध्यक्षानीं अगर कार्यकारी मंडळाने परिषदेची सभा बोलवावी.

२४. परिषदेचे उद्देश सिद्धीस नेण्याकरिता किंवा दुसऱ्या कोणत्याहि विशिष्ट कार्याकरिता जरूर वाटल्यास एक किंवा अनेक पोटकमिट्या किंवा विशिष्ट मंडळें नेमण्याचा अधिकार परिषदेच्या साधारण सभेस आहे.

२५. वार्षिक अहवाल व हिशेब वार्षिक सभेचे आधी निदान पंधरा दिवस चिटणीसांनी प्रत्येक सभासदांकडे पाठवावे. कोणाहि सभासदास अहवाल अथवा हिशेब यासंबंधी वार्षिक सभेंत ठराव मांडणें असल्यास त्याने ठरावाची लेखी सूचना सभेचे अगोदर सात दिवस कार्याध्यक्षांस पाठविली पाहिजे.

२६. परिषदेच्या मताधिकार असलेल्या २५ सभासदांनी मागणी केल्यास परिषदेची विशेष सभा अध्यक्षांनी बोलवावी. मागणीचें रीतसर पत्र त्यांस पोहोचल्यानंतर दोन महिन्यांचे आंत ही सभा अध्यक्षांनी बोलाविली पाहिजे न बोलाविली तर सदर मागणी करणाऱ्या सभासदांनी आपल्या सहीच्या निमंत्रणपत्राने सभा बोलवावी. अशा साधारण किंवा विशेष सभेंत निमंत्रणपत्रांत लिहिलेल्या व्यतिरिक्त दुसरें काम केलें जाणार नाही.

२७. परिषदेच्या आणि नियामक मंडळाच्या कोणत्याहि सभेची सूचना सभासदांस सभेच्या आधी निदान पंधरा दिवस चिटणीसांनी दिली पाहिजे.

२८. परिषदेच्या व नियामक मंडळाच्या कोणत्याहि सभेंत परिषदेचे अध्यक्ष हेच अध्यक्ष होतील. अध्यक्ष हजर नसल्यास हजर असलेल्या उपाध्यक्षांपैकी एका उपाध्यक्षास सभेचे अध्यक्ष म्हणून निवडावे. कोणीहि उपाध्यक्ष हजर नसल्यास सभेने आपला अध्यक्ष निवडावा.

## नियामकमंडळ

२९. नियामक मंडळाचीं कामें खालीलप्रमाणे आहेत.

( अ ) परिषदेच्या कामाचें सर्वसाधारण धोरण आखून कार्यकारी मंडळाला वार्षिक कार्याची दिशा दाखविणें.

( आ ) कार्यकारी मंडळाने तयार केलेलें अंदाजपत्रक योग्य वाटतील ते फेरफार करून मंजूर करणें.

( इ ) कार्यकारी मंडळाने तयार केलेला वार्षिक अहवाल व हिशेब योग्य फेरफारासह मंजूर करणें.

( ई ) वार्षिक सभेपुढे मांडावयाच्या प्रश्नांचा विचार करून कोणते प्रश्न ठेवावयाचे तें ठरविणें.

१०. नियामक मंडळाची वार्षिक सभा वर्षारंभापासून तीन महिन्यांचे आंत भरवावी. या सभेत कार्यकारी मंडळाने वार्षिक अंदाजपत्रक मंजुरीकरिता नियामक मंडळापुढे मांडलें पाहिजे. इतर वेळेस जरूरीप्रमाणे अध्यक्षांनीं नियामक मंडळाच्या सभा बोलवाव्या.

११. संमेलनांत मंजूर झालेले सर्व ठराव कार्यकारी मंडळाने नियामक मंडळापुढे विचारार्थ ठेवावेत.

## कार्यकारी मंडळ.

१२. कार्यकारी मंडळाने पुढील अधिकारी आपणांमधून निवडावे. [ अ ] साहित्य-पत्रिकासंपादक [ आ ] दोन चिटणीस.

१३. कार्यकारी मंडळाची कामें पुढीलप्रमाणे आहेत. [ अ ] दरवर्षी संमेलन भरविण्याची व्यवस्था करणें. [ आ ] साहित्यपत्रिका चालविणें. [ इ ] वार्षिक अहवाल व हिशेब तयार करून परिषदेच्या वार्षिक सभेपुढे मंजुरीकरिता मांडणें. [ ई ] नियामक मंडळाचे ठरावानुसार परिषदेचें कार्य चालविणें. [ उ ] परिषदेचे उद्देश सिद्धीस नेण्याकरिता आरंभीं नमूद केलेल्या साधनद्वारा हरतऱ्हेचे प्रयत्न करणें.

१४. कार्यकारी मंडळाची सभा दर तिमाहींत निदान एकदा व्हावी. कार्यकारी मंडळाच्या सभा कार्याध्यक्ष यांनी बोलवाव्या. कार्यकारी मंडळाच्या सभेत कार्याध्यक्ष हे अध्यक्ष होतील. ते हजर नसल्यास मंडळाने त्या सभेपुरता आपणांमधून अध्यक्ष निवडावा. कार्यकारी-मंडळाच्या कोणत्याहि सभेची सूचना चिटणीसांनी मंडळाच्या सभासदांस सभेचे आधी निदान सात दिवस दिली पाहिजे. कार्यकारी मंडळाच्या सभासदांनी लेखी मागणी केल्यास सात दिवसांची सूचना देऊन सभा बोलाविलीच पाहिजे.

१५. कार्यकारी मंडळाची सभा बोलाविण्यास सवड नसेल तेव्हा जरूरीचीं कामें सभासदांचे लेखी अभिप्राय मागवून करतां येतील.

## द्रव्यनिधि व मालमत्ता

१६. सर्व वर्गणी व इतर बाकी वसूल करावयाचें काम चिटणीस यांचें आहे. वसूल झालेली सर्व रकम चिटणीसांनी शक्य तितक्या लौकर खजिनदाराकडे रवाना केली पाहिजे. खर्चाकरिता चिटणीसांनी खजिनदाराकडून रकमा वेळोवेळीं मागून घ्याव्या व खजिनदाराने कार्यकारी मंडळाच्या ठरावाप्रमाणें त्या द्याव्यात. चिटणीसाजवळ किरकोळ खर्चाकरितां अनामत रकम असावी पण ती ५० रुपयापेक्षा जास्त असू नये.

१७. परिषदेच्या द्रव्यनिधीचे चार वर्ग असतील:—

( १ ) ट्रस्टींकडे असलेला पैसा.

( २ ) उपकर्ते आश्रयदाते साहाय्यक हितचिंतक व तहाहयात सभासद यांच्या देणग्या सदरहू रक्कम कायमनिधि म्हणून समजण्यांत येईल.

( ३ ) साधारण सभासद, संलग्न व सहकारी संस्था यांच्या वर्गण्या, किरकोळ देणग्या व इतर उत्पन्न, आणि

( ४ ) विशेष कार्यांकरिता दिलेल्या देणग्या, पारितोषकें वगैरे रकमा.

टीपः—यांपैकीं दुसऱ्या वर्गांतील रकमा कायमनिधींत जमा होतील. तिसऱ्या वर्गांतील रकमा व पहिल्या वर्गांतील रकमेवरील व्याज किंवा नफा खजिनदाराकडे भरून नित्य व नैमित्तिक खर्चाकडे लावण्यांत येईल. चवथ्या वर्गांतील रकमा होतां होईल तों दात्यांच्या इच्छेप्रमाणे व शर्तीप्रमाणे खर्च कराव्या. कोणत्याहि वर्षी जमा होणाऱ्या तहाहयात सभासदांच्या वर्गणीपैकीं निम्मे वर्गणीपर्यंतची रक्कम नियामक मंडळाला चालू खर्चासाठीं मंजूर करण्याचा अधिकार आहे.

३८. परिषदेकडे आलेल्या सर्व पैशांचा विनियोग अंदाजपत्रकाबरहुकूम करण्याचें काम कार्यकारी मंडळाचें आहे. कायम निधि व स्थावर मिळकत निधिधारकांच्या नांवें असावी व त्यांच्याच ताब्यांत रहावी. कायमनिधिव्यतिरिक्त सर्व पैसा खजिनदाराकडे रहावा. कायमनिधिवरील व्याज निधिधारकांनी सालीना खजिनदाराच्या स्वाधीन करावें. वसूल झालेल्या सर्व रकमा चिटणीसांनी वरील ३६ व्या नियमाला अनुसरून निधिधारक व खजिनदार यांचेकडे जमा कराव्या.

वार्षिक अहवाल व हिशेब तयार करण्याचे वेळेस निधिधारकांनी कायमनिधीचा वार्षिक हिशेब कार्यकारी मंडळास द्यावा.

३९. परिषदेच्या वार्षिक सभेंत दोन हिशेबतपासनीसांची नेमणूक करण्यांत यावी. हिशेबतपासनीसांनीं निधिधारक, खजिनदार व चिटणीस यांचे हिशेब तपासून वार्षिक सभेपुढे वार्षिक हिशोबाबरोबर मांडण्याकरिता आपला शेरा नमूद करून ठेवावा.

## साहित्यपत्रिका

४०. साहित्यपत्रिकेचा संपादक, कार्याध्यक्ष व दप्तरचें काम पत्करणारा चिटणीस यां खेरीज इतर कोणी तरी असावा. हा कार्यकारी मंडळाने आपणांतून निवडावा. साहित्यपरिषदेच्या कार्यासंबंधींचा मजकूर चिटणीसाकडून येईल तो संपादकाने पत्रिकेमध्ये दाखल केला पाहिजे. पत्रिकेच्या सर्वसामान्य धोरणासंबंधी कार्यकारी मंडळाचे ठराव संपादकावर बंधनकारक असतील; परंतु वाङ्मयविषयक संपादकीय कार्यांत संपादकाच्या कामांत तो स्वतंत्र आहे व त्याबद्दलची जबाबदारी त्याची राहील.

## संमेलनें व प्रदर्शनें

४१. महाराष्ट्र साहित्य परिषदेचें उद्दिष्ट कार्य उत्तम रीतीने व्हावें म्हणून ठिकठिकाणच्या लोकांमध्ये जागृति उत्पन्न करून भाषाविषयक प्रयत्न वाढविण्याकरिता दरसाल महाराष्ट्र-भाषा बोलणारांचीं संमेलनें, साहित्यविषयक ग्रंथांचीं व वस्तूंचीं प्रदर्शनें तसेंच साहित्यचर्चा करण्या-

करिता विशेष अधिवेशनें घडवून आणणें अवश्य आहे. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने किंवा परिषदेचे परवानगीने कोणत्या तरी संस्थेने असें संमेलन किंवा प्रदर्शन शक्य तर दरसाल भरवावें. असें न झाल्यास महाराष्ट्र-साहित्य परिषदेने भरवावें. अशीं संमेलनें किंवा प्रदर्शनें भरविण्याची सर्व जबाबदारी परिषदेची कचेरी असेल त्या गांवीं कार्यकारी सभेवर व इतरत्र त्या त्या ठिकाणच्या सभांवर राहील, व तत्प्रीत्यर्थ स्वागत मंडळी, स्थानिक चिटणीस वगैरे विशिष्ट कार्यकर्ते लोक नेमण्याचे कामहि त्या त्या सभांचें आहे.

४२. संमेलनाचें स्थल मुक्रर करणें व त्यासंबंधी इतर सर्व तजवीजी करणें हें काम कार्यकारी मंडळाचें आहे. साहित्य-परिषदेचे जे सभासद संमेलनास प्रतिनिधि म्हणून हजर राहतील, त्यांस प्रतिनिधित्वाबद्दल एक रुपयापेक्षा अधिक वर्गणी नसावी.

४३. महाराष्ट्र-साहित्य परिषदेचे व परिषदेने केलेल्या पोटनियमांन्वयें कार्यकारी मंडळाने नेमलेल्या इतर संस्थांचे सभासद व स्वागत मंडळाचे सर्व सभासद यांनाच आणि संमेलनाचे स्वागतमंडळ ठरवील त्या अटींवर प्रतिनिधि होणारांनाच फक्त त्या त्या संमेलनांत किंवा अधिवेशनांत प्रतिनिधि म्हणून येता येईल. इतर लोक प्रेक्षक किंवा निमंत्रित पाहुणे म्हणून येऊं शकतील. पण त्यांस भाषण करण्याचा किंवा मत देण्याचा अधिकार नाही.

४४. संमेलनाचा अध्यक्ष नेमावयाचा तो परिषदेच्या कार्यकारी मंडळाने सुचविलेल्या गृहस्थांपैकी एक स्वागतमंडळाने नेमावा.

## संलग्न व सहकारी संस्था

४५. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे उद्देश मान्य असणाऱ्या व परिषदेच्या कार्याशीं सहानुभूति असणाऱ्या अशा वाङ्मयविषयक संस्था अनुक्रमें (१) संलग्न संस्था किंवा (२) सहकारी संस्था म्हणून परिषदेशीं जोडून घेण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील. त्या दोन्ही तऱ्हेच्या सभांसंबंधी अटी, नियम वगैरे करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

४६. साहित्याच्या उन्नतीसाठी स्थापन झालेल्या ज्या संस्थांना महाराष्ट्र साहित्य परिषदेचे हेतु व नियम मान्य असतील व ज्यांचे हेतु परिषदेच्या हेतूंना विसंगत नसतील, अशा संस्थांना त्यांच्याकडून मागणी आल्यास त्यांस संलग्न संस्था म्हणून जोडून घेण्यांत येईल.

४७. संलग्न संस्थांनी नोंदणी फी ५ (पांच) रुपये परिषदेच्या निधीसाठी द्यावी व पुढे दरवर्षी एक रुपया फी द्यावी.

४८. प्रत्येक संलग्न संस्थेला परिषदेच्या उद्देशास अनुसरून कार्यकारी मंडळाला सूचना करण्याचा हक्क आहे व कार्यकारी मंडळाने त्यांचा विचार करून आपला निर्णय कळवावा.

४९. संलग्न संस्थांची अंतर्गत व्यवस्था व आर्थिकसंबंध याबद्दल महाराष्ट्र-साहित्य-परिषदेवर कोणत्याहि प्रकारची जबाबदारी नाही.

५०. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्याशीं सहानुभूति असणाऱ्या संस्था त्यांनी तशी इच्छा प्रदर्शित केल्यास, परिषदेशीं सहकारी संस्था म्हणून जोडून घेण्याचा व त्यासंबंधी अटी वगैरे ठरविण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

५१. संलग्न व सहकारी संस्था नोंदून घेण्याचा अधिकार महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यकारी मंडळास आहे. मात्र अशा संस्था कमी करण्याचा ठराव पुढील परिषदेच्या नियामक मंडळाच्या सभेपुढे मंजुरीसाठी ठेवला पाहिजे.

## किरकोळ

५२. महाराष्ट्र साहित्य-परिषदेचें दप्तर, पत्रव्यवहार व इतर सर्व कामें मराठींत चालतील.

५३. परिषदेच्या नियामक मंडळाच्या कार्यकारी सभेच्या व इतर विशिष्ट सभांच्या कामाची नोंद स्वतंत्र पुस्तकांत लिहून ती त्या त्या सभांच्या पुढील बैठकींत मंजूर झाली पाहिजे.

५४. परिषदेचें सर्व दप्तर, पत्रव्यवहार निरनिराळ्या सभांच्या वृत्तांतांचीं पुस्तकें हीं सर्व सुरक्षित व व्यवस्थित ठेवण्याची जबाबदारी चिटणिसांवर राहील.

५५. परिषदेच्या सभेस २०, नियामक मंडळाच्या सभेस १० अशी गणसंख्या असावी व कार्यकारी मंडळाच्या सभेस ४ अशी गणसंख्या असावी. कार्यकारी मंडळाच्या सभेस कार्याध्यक्ष व दोन चिटणीस ह्यांशिवाय एक तरी सभासद हजर असला पाहिजे. गणसंख्येच्या अभावीं तहकूब होऊन पुन्हा भरलेल्या सभेस गणसंख्येची जरूर नाही.

५६. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या घटनेंत फेरफार करणें झाल्यास परिषदेच्या वार्षिक सभेंत पूर्वसूचना देऊन किंवा त्यासाठी बोलाविलेल्या विशेष सभेंत हजर असलेल्या सभासदांच्या $\frac{3}{5}$ बहुमताने करता येईल. बाकी सर्व कामांचा बहुमताने निर्णय होईल. साधारण सभेंत $\frac{3}{5}$ बहुमताने जे ठराव पसार होतील त्यांस कोणत्याहि तऱ्हेने विरोध येईल असे ठराव ६ महिनेपर्यंत पुढे आणले जाऊं नयेत. परिषदेच्या उद्देशांत व नांवांत फेरफार करणें झाल्यास सन १८६० च्या २१ व्या कायद्यांतील नियमाप्रमाणे तो करावा.

५७. परिषदेचीं हरएक प्रकारचीं कामें होण्याकरिता परिषदेच्या नियमांना अविरुद्ध असे पोट नियम वेळोवेळीं लागतील तसे कार्यकारी मंडळाने करून परिषदेच्या पुढील साधारण सभेंत मंजूर करून घ्यावे.

५८. परिषदेने बक्षिसें दिलेले निबंध, लेख व पुस्तकें परिषदेच्या खर्चाने किंवा आश्रयाने छापलेले ग्रंथ व लेख आणि परिषदेतर्फे प्रसिद्ध होणारें मासिक किंवा ग्रंथमाला परिषदेच्या सभासदांस कार्यकारी मंडळ ठरवील त्याप्रमाणे सवलतीचे दराने मिळतील, व त्यांचें उत्पन्न येईल तें परिषदेच्या खजिन्यांत जमा होईल.

५९. परिषदेकडे आलेले लेख, ग्रंथ, वस्तू वगैरेवर परिषदेची मालकी राहून कार्यकारी सभा ठरवील तेथे त्याचा एकत्र संग्रह केला जाईल. व हा संग्रह सुरक्षित ठेवण्याची जबाबदारी कार्यकारी मंडळावर राहील. हा संग्रह परिषदेचे सर्व सभासदांस, आणि इतर लोकांस कार्यकारी मंडळ वेळोवेळीं ठरवील त्याप्रमाणे पहावयास सापडेल.

# १७ वें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन, कोल्हापूर

## मंजूर झालेले ठराव

१ हैद्राबाद येथे भरलेल्या संमेलनानंतर आजतागायत गल्या दीड वर्षांत पुढे निर्दिष्ट केलेले व इतर जे जे साहित्यसेवक व मराठीचे भक्त निधन पावले त्यांच्या निधनाने महाराष्ट्राची मोठी हानी झाली आहे, याबद्दल हें संमेलन खेद व्यक्त करीत आहे. १ लक्ष्मण गणेशशास्त्री लेले, २ केशवराव कोरटकर, ३ महादेव केशव काळे, ४ कवि कुमार यशोद, ५ विष्णुशास्त्री बापट, ६ गजानन चिंतामण देव, ७ नाट्यछटाकार दिवाकर, ८ शं. चिं. श्रीखंडे.

(या ठरावांत प्रथम दिवशीं नमूद केलेल्या यादींत कांही नावें चुकून राहिल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून दुसरे दिवशीं आरंभीं कै. आत्माराम मोरेश्वर पाठारे आदिकरून अनुल्लेखित दिवंगतांचा समावेश करण्यात आला.)

२ महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें कार्य सुव्यवस्थित होण्यासाठी कचेरीच्या कायम खर्चाची व्यवस्था होणें अवश्य आहे. याकरिता वार्षिक दोन हजार रुपये व्याजाच्या रूपाने मिळतील येवढा निधि शक्य तितक्या लवकर एकत्रित व्हावा म्हणून प्रत्येक महाराष्ट्रीयाने साहित्य-परिषदेस साहाय्य करावे अशी या संमेलनाची सर्वांना विनंती आहे.

३ मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाच्या दोन प्रति प्रकाशकांकडून घेण्यांत येतात. त्या प्रातिक मध्यवर्ती ग्रन्थसंग्रहालय स्थापून तेथेच उपयोग करून घेण्यासाठी ठेवण्यांत याव्या अशी सरकारास या संमेलनाची विनंती आहे.

४ महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाने नेमलेल्या शुद्धलेखन समितीने सुचविलेल्या व गोमन्तकांतील साहित्य-संमेलनाने मान्य केलेल्या सुधारणा आता केसरी पत्राने व नवभारत ग्रंथमालेने अमलांत आणल्या आहेत. त्यांना नागपूर विश्वविद्यालयाने मान्यता दिली आहे. ज्ञानप्रकाश, महाराष्ट्र वगैरे पत्रें, ग्रंथमाला व ग्रंथकार यांनीहि त्या अमलांत आणाव्या अशी त्यांना या साहित्य-संमेलनाची विनंती आहे. शुद्धलेखनसमितीने उरलेल्या वादग्रस्त प्रश्नांचा निकाल करण्याची आता निकड लावावी. मुंबईच्या विश्वविद्यालयाने शाळाधिकाऱ्यांना पत्रें पाठवून मतें मागविलीं त्यांतहि या सुधारणांना ९५ टक्केहून अधिक मतें अनुकूल पडल्यामुळे मराठीच्या अभ्यासक्रम-समितीने त्या सुधारणांना आता मान्यता द्यावी.

५ मराठी भाषेंतील अनेक ग्रंथ आक्षिप्त म्हणून सरकारजमा करण्यांत आले आहेत. त्यांतील वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाच्या ग्रंथांवरील निर्बंध दूर व्हावे अशी मुंबई सरकारास या संमेलनाची विनंती आहे. या कामीं जरूर तो सल्ला साहित्य-परिषदेने देऊन सदर निर्बंध दूर होतील अशी खटपट करावी, तसेंच मुंबई सरकाराने अशा ग्रंथांची यादी साहित्य-परिषदेकडे पाठवावी.

६ धुळें येथे कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचें स्मारक म्हणून उभारण्यात आलेल्या राजवाडे संशोधन मंदिरांत सुरक्षित ठेवण्यात आलेल्या राजवाड्यांनी तयार केलेल्या 'मराठी

धातुकोश ' या बहुमोल ग्रंथाच्या प्रसिद्धीकरणास मराठी भाषाभिमान्यांनी द्रव्यद्वारा यथाशक्ति मदत करावी, अशी हें संमेलन शिफारस करीत आहे.

७ महाराष्ट्रीयांसाठी म्हणजे मराठी ही ज्यांची मातृभाषा आहे त्या सर्व लोकांच्यासाठी, व्यापक दृष्टीच्या संशोधनप्रधान, आणि मराठींतून आपलें बहुतेक अध्ययन-अध्यापन करणाऱ्या अशा पहिल्या प्रतीच्या एका राजमान्य व सनदी विश्वविद्यालयाची महाराष्ट्राच्या केंद्रस्थानीं स्थापना करणें आता अत्यवश्य आहे असें या संमेलनास वाटतें.

या विश्वविद्यालयाची प्रास्ताविक स्थूल योजना करून तीस सार्वत्रिक सक्रिय सहानुभूति मिळविण्याचा उद्योग करण्यासाठी हें संमेलन पुढील सद्गृहस्थांची समिति नेमीत असून त्या समितीस स्वीय कार्य साधण्यासाठी अधिक सदस्य निवडून घेण्याचा अधिकार देत आहे.

या समितीने सध्या याच विषयात कार्य करीत असलेल्या इतर समितींशीं सहकार्य करावें.

१ श्रीमन्त सौ. राणीसाहेब सांगली, २ सरदार माधवरावसाहेब किबे, ३ रावबहादुर दत्तोबासाहेब भोसले, ४ दिवाणबहादुर अ. बा. लठ्ठे, ५ ना. भास्करराव जाधव, ६ रा. ना. गो. चापेकर, ७ ग. भा. रा. ताम्बे, ८ प्रो. ना. के. बेहेरे, ९ प्रो. शं. दा. पेण्डसे, १० प्रो. चिं. वि. जोशी, ११ डॉ. श्रीमती कमळाबाई देशपांडे, १२ रा. वामनराव नाईक, हैद्राबाद, १३ नामदार द. त्र्यं. बेळवी (बेळगांव). या समितीच्या खर्चाची जबाबदारी परिषदेने घ्यावी.

८ गोव्यांतील निम्म्याहून अधिक प्रजेची मातृभाषा मराठी असता व तदनुसार ती आपले धार्मिक, वाङ्मयात्मक, व्यापारविषयक आणि ग्रामसंस्था व देवस्थानें यांच्यासंबंधीचे व्यवहार त्याच भाषेंतून करीत असता, सरकारनें आजवर तिची अक्षम्य उपेक्षा केली आहे. आपल्या प्रजेच्या मातृभाषेच्या स्वातंत्र्यास व उत्कर्षास सर्व प्रकारें साहाय्य करणें सरकारचें कर्तव्य असल्याने या संमेलनाची गोवेंसरकारास अशी विनंती आहे की,

( १ ) त्याने मराठीस आपली मातृभाषा समजणाऱ्या लोकांकरिता प्राथमिक शिक्षण मराठींतून देण्याचा सार्वत्रिक उपक्रम होईल तितक्या लौकर करावा;

( २ ) मराठी भाषा जाणणारांचा काढून घेतलेला मताधिकार त्यांना पुन्हा देण्यांत यावा;

( ३ ) जन्म, मृत्यु इत्यादि गोष्टींच्या नोंदणीच्या कायद्यांत मराठी लिहिणारांची सही घेत नाहीं, ती घेतली जावी;

( ४ ) मराठी भाषेंतून नियतकालिक काढावयाचें झाल्यास गव्हर्नर-इन-कौन्सिलची खास परवानगी घ्यावी लागते, ती घ्यावी लागूं नये; आणि

( ५ ) सक्तीच्या लष्करी शिक्षणाच्या कायद्यांत पोर्तुगीज जाणणारांना जे हक्क दिले आहेत, ते मराठी जाणणारांनाहि देण्यांत यावे.

९ पुढील गृहस्थांच्या व्याकरण-समितीने प्रचलित व्याकरणांतील मतभेदाचे प्रश्न विचारांत घेऊन त्या बाबतींत व समितीपुढे येणाऱ्या अन्य बाबतींत आपला साधारण निर्णय एक वर्षाच्या आत प्रसिद्ध करावा, व पुढील संमेलनाने त्याचा विचार करावा. १ श्री. य. रा. दाते, २ श्री. कृ. पां. कुलकर्णी, ३ गो. पां. पावशे, ४ रा. सा. ना. गो. चापेकर, ५ श्री. बा. कृ. भावे, ६ श्री. श्री. ना. बनहट्टी, ७ श्री. राजारामपंत देसाई. ८ श्री दि. धों. परांजपे.

१० आरबी, फार्सी, उर्दू, कानडी वगैरे परभाषांतील उत्कृष्ट वाङ्मय मराठींत भाषांतरित झाल्यास त्याच्या प्रकाशनास हिंदु, मुसलमान वगैरे धनिक लोकांनी व संस्थानिकांनी आर्थिक साहाय्य करावें अशी हें संमेलन शिफारस करीत आहे.

११ श्रीमन्त सरकार सयाजीराव गायकवाड यांनी आपल्या भाषणांत सुचविल्याप्रमाणें यापुढे सर्व महाराष्ट्रीय व इतर प्रांतांतील वाङ्मय नागरी लिपींतच छापलें जावें, म्हणजे अखिल हिंदी संस्कृति व भाषा यांच्या एकीकरणाचें कार्य सुकर होईल. यासाठी हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांच्या मुख्य व जबाबदार संस्थांस नागरी लिपीचा मुद्रणांत उपयोग करण्यास विनंती करण्यांत यावी.

१२ पेशवे-दप्तरांतील निवडक पत्रव्यवहाराचें जें गेल्या चार वर्षांत प्रकाशन झालें आहे त्या योगाने मराठी भाषेंत व महाराष्ट्राच्या इतिहासाच्या साधनांत फार मोठी भर पडली आहे. या कार्याबद्दल या संमेलनास संतोष होत असून हें कार्य पार पाडण्यास मुंबईसरकार व बडोदें, इंदूर, धार, सोंडूर, औंध, फलटण, इचलकरंजी, विशाळगड सावंतवाडी वगैरे संस्थानांचे अधिपति यानी जें साहाय्य केलें आहे, त्याबद्दल या सर्वांचे आभार मानण्याची हें संमेलन संधि घेत आहे. हें महत्त्वाचें दप्तर योग्य अटींवर अभ्यासकांस खुलें झालें पाहिजे असें या सभेचें मत आहे; आणि या उपक्रमाचें अनुकरण मराठी संस्थानांनी करावें अशी त्यांस या संमेलनाची विनंती आहे.

१३ डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीसारख्या पुणें, इंदूर, बडोदें वगैरे ठिकाणीं ग्रंथोत्तेजनाचें कार्य करणाऱ्या ज्या ज्या संस्था आहेत, त्यांनी सहविचार व सहकार्य करून ग्रंथोत्तेजनाचें काम करावें, म्हणजे ग्रंथोत्तेजनास व्यापक, व्यवस्थित व प्रगतिपर असें स्वरूप येईल असें या संमेलनाचें मत आहे.

१४ पोस्टखात्याने बुकपोस्टाचे दर दुप्पट केले आणि व्हॅल्युपेअेबल हें रजिस्टर केलें पाहिजे असा नियम केला. यामुळे कित्येकदा टपालखर्च पुस्तकाच्या किंमतीहूनहि अधिक होतो. हे निर्बन्ध ग्रंथप्रसारास व पर्यायाने शिक्षणाच्या प्रसारास जाचक होत असल्यामुळे सरकाराने या बाबतींत पूर्वीच्या सवलती पुनः चालू कराव्यात अशी या संमेलनाची हिंदुस्थानसरकारास विनंती आहे.

१५ निजाम इलाख्यामध्ये केवळ मराठी मातृभाषा असणारे सहा जिल्हे व अर्धमराठी चार जिल्हे असतांहि मराठी शाळा चालविणें, कोर्टदरबारांत मराठींतून व्यवहार करणें, दस्तऐवज मराठींत लिहिणें, नोंदणें इत्यादि अनेक गोष्टींवर जे निर्बंध आहेत व उर्दूस जें प्राधान्य दिलें जात आहे, त्यामुळे प्रजेचे अनेक प्रकारें नुकसान होत आहे. तरी या बाबतींत मराठीस प्राधान्य मिळेल अशी तजवीज निजाम सरकाराने करून जनतेची ही अडचण दूर करावी अशी या संमेलनाची विनंती आहे.

१६ बृहन्महाराष्ट्रापैकी दक्षिणमहाराष्ट्र, कर्नाटक व मद्रास इत्यादि दक्षिणेकडील भागांत राहणाऱ्या महाराष्ट्रीयांस मराठी भाषेची जोपासना करण्याची तीव्र इच्छा असल्यामुळे त्यांनी जीं 'महाराष्ट्रमंडळें' स्थापन केलीं आहेत त्यांस त्यांचा मराठीचा अभ्यास वाढविण्यासाठी शक्य तें साहाय्य करण्यांत यावें अशी या संमेलनाची शिफारस आहे.

१७ साहित्यप्रकाशन व साहित्यप्रसार करण्यासाठी एखादी सहकारी संस्था स्थापन करण्याकरिता श्री. गो. कृ. देवधर, श्री. य. रा. दाते, श्री. रा. ना. राजाश व श्रीयुत भिडे व श्री. देवरूखकर यांचें एक मंडळ नेमावें व या मंडळास अधिक सभासद स्वीकृत करून घेण्याचा अधिकार असावा.

१८ खाली दिलेलें व त्याच प्रकारचें कार्य करण्यासाठी हिंदुस्थानांतील प्रमुख साहित्य–परिषदांच्या निवडक प्रतिनिधींची " भारत–साहित्य परिषद् " ( Academy ) स्थापन करावी.

( अ ) वेंचक पुस्तकांची वेगळाल्या भाषांत भाषांतरें करणें व परस्पर परिचय वाढविण्यास मदत करणें.

( आ ) सर्व भारतीय भाषांस मान्य अशा पारिभाषिक संज्ञा ठरविणें.

( इ ) राष्ट्रभाषा विशेषतः राष्ट्रलिपी पसंत करून छपाईचीं सुधारलेलीं यंत्रें मोठ्या प्रमाणावर तयार करण्यास मदत करणें, वगैरे.

वरील परिषदेची स्थापना करण्याच्या खटपटीसाठी पांच गृहस्थांची एक समिती नेमण्यांत यावी व तींत ( १ ) सरदार माधवरावसाहेब किबे, ( २ ) श्री. दत्तात्रेय व्यंकटेश पै, ( ३ ) डॉ. खांडेकर, इंदूर, ( ४ ) श्री. श्री. दा. सातवळेकर, ( ५ ) रा. शंकरराव दाते, असावेत व जरूर पडल्यास या समितीस अधिक सभासद स्वीकृत करून घेण्याचा अधिकार असावा, असें ही सभा ठरविते.

१९ साहित्य हा समाजाच्या जीवनाचा आदर्श आहे. परंतु महाराष्ट्रांतील शेतकरी आणि कामकरी यांच्या भावनांना पोषक अशी वाङ्मयनिर्मिति आतापर्यंत फारच कमी झाली आहे, म्हणून यापुढे या वर्गाच्या हिताला पोषक असें वाङ्मय निर्माण करण्याला हें संमेलन साहित्यभक्तांना शिफारस करीत आहे.

२० हैद्राबाद-संमेलनांत निवडण्यांत आलेल्या कार्यकारी-मंडळाच्या कार्याबद्दल हें संमेलन आभार व्यक्त करीत असून, त्याकडे असलेले कागदपत्र आपल्या हवालीं करून घेऊन हैद्राबाद संमेलनांत घेतलेल्या ठरावांपैकी ज्यांची अंमलबजावणी झाली नाही ते ठराव व या संमेलनाने घेतलेले ठराव अमलांत आणण्याचें कार्य साहित्य परिषदेने करावें.

२१ महाराष्ट्र–साहित्य–परिषदेने मराठी साहित्यपरीक्षा घेणें, त्यांचा अभ्यासक्रम ठरविणें व पदव्या देणें इत्यादि कार्यें करण्यासाठी एक योजना करावी असें ही सभा सुचविते.

२२ मराठी प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करावें आणि दुय्यम शिक्षणहि देशी भाषांतून देण्याचा उपक्रम करावा अशी या संमेलनाची मुंबई–सरकार व महाराष्ट्रांतील संस्थानिक यांना आग्रहाची विनंती आहे.

२३ मुंबई इलाख्यांतील कारवार व बेळगांव या दोन जिल्ह्यांमध्ये मिळून ज्या लोकांची मातृभाषा मराठी आहे अशा लोकांच्या सोयीसाठी मराठीच्या शिक्षणाची व कोर्टांतील व कचेरींतील कामें मराठींतून करण्याची व्यवस्था करावी अशी मुंबई–सरकारास या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

---

# श्री. सरदार मा. वि. किबे यांचें १७ व्या साहित्यसंमेलनांतील समारोपाचें भाषण

'क्व सूर्यप्रभवो वंशः क्व चाल्पविषया मतिः'

'या राजकीय थाटाच्या झालेल्या संमेलनाचा समारोप श्री. सयाजीराव महाराज गायकवाड सरकार यांच्या हातून व्हावयास पाहिजे होता; परंतु आपला नम्र सेवक तें कार्य यथामति संपन्न करीत आहे.

संमेलनाच्या स्थापनेपासून ५० वर्षांनंतर भरलेलें हें १७ वें अथवा १८ वें संमेलन अनेक दृष्टींनी अपूर्व झालें यांत शंका नाही. राजाश्रयाखाली व राजांनी आपल्या भाषणानें सुरू केलेलें हें ४ थें संमेलन होय व त्याप्रमाणेंच हें ४ थ्या राजधानींत संपन्न झालें. त्यांत महाराष्ट्रांत स्वराज्याच्या राजधानींत तें भरविण्याचा हा प्रथमच सुयोग होय.

श्रीमंत छत्रपति महाराज सरकार यांनीं आपल्या अमृत वाणीनें या अधिवेशनाची प्राणप्रतिष्ठा केली. श्रीमंतांची विद्याभिरुचि व त्याकरितां चालू असलेले त्यांचे अविरत प्रयत्न व स्वभावप्रेम हें त्यांच्या भाषणांत जागोजाग दृष्टीस पडलें. या अधिवेशनाची सर्व प्रकारें काळजी वाहणारे त्यांचे ॲक्टिंग प्राइम मिनिस्टर यांनीं आपल्या सुविचारपरिप्लुत भाषणांत कोल्हापूरची प्राचीन महती सांगून या नगरीचें अर्वाचीन बौद्धिक अग्रेसरत्व वर्णिलें. त्यांनीं केलेल्या बहुमोल सूचना परिणत स्वरूपांत आम्ही आणाव्या व त्या प्रयत्नांत त्यांचें साहाय्य मिळेल.

श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड हे जरी स्वतः अनिवार्य कारणामुळे प्रत्यक्ष येऊं शकले नाहींत, तरी त्यांचे परिपक्व विचार सुललित भाषेंत वाचावयास मिळाले. त्यामुळे त्यांच्या आकस्मिक कारणामुळे न येण्यानें झालेली तीव्र निराशा कांहीं अंशानें भरून निघाली. श्रीमंतांचा दीर्घ व्यासंग, जगाच्या विस्तृत व प्रत्यक्ष परिचयामुळे प्राप्त झालेला अनुभव, अभिजात मनौदार्य, राज्यकार्यधुरीणत्व, सर्वांगीण उन्नतीविषयीं कळकळ व प्रयत्नसातत्य या सर्वांचा निष्कर्ष त्यांच्या भाषणांत दृग्गोचर होत आहे. संमेलनास इतकें महत्त्वाचें भाषण लाभलें यांत त्याचा मोठा गौरव झाला आहे. हें भाषण राजकर्त्यांलाच काय, पण विख्यात विद्वानांसहि शोभणारें झालें. श्रीमंत महाराजांस दीर्घायुष्य व अविच्छिन्न आरोग्य असो हीच परमेश्वराजवळ प्रार्थना आहे.

संमेलनाच्या अधिवेशनांत आपण अनेक ठराव पास केलेत व चर्चा केली. त्यामुळे श्रेष्ठ प्रकारचा विचारविनिमय होऊन कार्यास उत्तेजन व डोक्यास चालना

मिळेल यांत संशय नाही. या अधिवेशनावर असा एक आक्षेप घेण्यांत येतो की, तेथे ठराव होतात पण त्यांची अंमलबजावणी होत नाही. आक्षेप खोटा नाही. पण एकतर विचारास चालना मिळते व जसें सुपीक जमिनीवर बीज पडल्याने तें उगवतें व फोफावतेंहि, त्याप्रमाणे या विचारांस मूर्त स्वरूपहि प्राप्त होतें. अद्याप तें संघटित स्वरूपांत होण्याची परिस्थिति प्राप्त झाली नाही, ही मात्र दुःखाची गोष्ट आहे; पण ही स्थिति सुधारण्याचीं चिन्हें याच संमेलनांत दिसूं लागलीं आहेत, हाहि त्याचा एक विशेष आहे. या प्रसंगाने कविवर्य भास्करराव तांबे यांचें ज्ञानप्रद व परिपक्व विचार ऐकावयास मिळाले हा अनेक लाभांपैकी एक श्रेष्ठ लाभ होय. ग्रंथप्रकाशनासंबंधी श्री. यंदे यांनी अनुभविक व अत्यंत उपयुक्त सूचना केल्या आहेत. वस्तुतः उपसंमेलनें भरविण्याचा जो उपक्रम येथे केला गेला त्या योगाने अनेक तज्ज्ञांचे सिद्धान्त विशद रीतीने आपणांस ऐकावयास सांपडले. अतएव हा उपक्रम सर्व प्रकारें अभिनंदनीय व अनुकरणीय आहे. संमेलनाचा मुख्य हेतु महाराष्ट्र भाषेची अभिवृद्धि व विकास होणें हा होय. या संमेलनाच्या योगाने जी अभिनवग्रंथसंपत्ति बाहेर पडली, ती पठनीय व विचारणीय आहे. या करवीर प्रांतांतील अनेक दिवंगत व हयात असलेल्या अनेक विद्वानांचा परिचय स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांच्या व्याख्यानद्वाराहि झाला. पुढे हीच परंपरा कायम ठेवण्याविषयी विद्यमान लेखकांस व होतकरू विद्यार्थ्यांस या योगाने निःसंशय प्रोत्साहन व उत्तेजन येईल व त्या योगाने मातृभाषेची वृद्धिच होईल; परंतु अत्यंत उत्साहवर्धक अशी जी घटना वाटते ती ही की, संमेलनारंभक छत्रपति महाराज, स्वागताध्यक्ष, राज्यधुरावाहक व अध्यक्ष विद्वद्वर्य श्री व सरस्वतीकृपाप्रसाद श्रीमंत महाराज गायकवाड सरकार व सर्वांच्या भाषणांत मातृभाषेच्या भरणपोषणाची जी महाराष्ट्र परिषद् ती त्या नृपतींच्या प्रेरणेनेच स्थापन झाली. तिच्याकडून अधिक कार्य होण्याची उत्कट इच्छा व तिला कार्यक्षम करण्याची सिद्धता श्री. रियासतकार सरदेसाई यांनी आपल्या कळकळीच्या व अनुभविक भाषणांत या परिषदेच्या किंचित्कार्य किंवा अकार्यतेसंबंधी जीं कारणें सांगितलीं त्यांचा सूज्ञांकडून विचार होईलच. श्री. वरेरकर यांनी म्हटल्याप्रमाणे परिषदेची स्थिति जर एखाद्या देशी राज्यांतील निर्धन फर्स्टक्लास सरदारासारखी असली तर तो दोष कोणाचा ? ज्या महाराष्ट्रीयांत कर्णभोजासारखे अधिपति आहेत, दधीचि ऋषींसारखे स्वार्थत्यागी पुरुष आहेत, त्या महाराष्ट्रांत परिषदेसारख्या उपयुक्तच काय, पण अवश्यक संस्थेची दुःस्थिति का असावी ? ज्या महाराष्ट्रीय जनतेने अनेक महाविद्यालयें चालविलीं आहेत, जिने विद्वानांचा पुरवठा सर्व भारतवर्षभर केला आहे, जिच्यांत दिगंत कीर्तिमान् राजकारणी मनुष्य जन्मास आले त्या महाराष्ट्राची या संस्थेविषयी इतकी अनास्था का ? या संमेलनाच्या कार्यकर्तृत्वामुळे महाराष्ट्र जागा होईल अशी आशा करूं या व त्यायोगें ही संस्था पुष्ट होवो. तिच्या कार्यक्षमतेविषयी मग शंकाच नको. अनेक विश्वविद्यालयांतून मराठीस सन्माननीय प्रवेश मिळाला आहे.

अमरकीर्ति न्यायमूर्ती रानडे यांच्या प्रयत्नास फळ आलें आहे. अनेक प्रयत्नानी स्त्रियांकरिता चाललेली विश्वविद्यालयासारखी संस्था आपलें कार्य निरलसपणें संकटांस न जुमानतां, करीत आहे; परंतु स्त्री व पुरुष यांचा समावेश करणारें निदान एक तरी विश्वविद्यालय स्थापन करण्याचा ठराव आपण केला आहे, तो मुळासच हात घालणारा आहे. त्याप्रमाणें हिंदी भाषेंतल्याप्रमाणे मराठी परीक्षा घेण्याचा क्रम सुचविला आहे तो अंमलांत आणला गेल्यास तो धन व बुद्धिप्रद होईल हें अनुभवसिद्ध आहे.

फक्त एकच अनिवार्य अनपेक्षित घटना खेरीजकरून हें संमेलन सर्व प्रकारें अत्यंत सुखकर व थाटाचें झालें असें म्हणण्यांत मुळीच अतिशयोक्ति नाही. याचें सर्व श्रेय कार्यकर्त्यांस आहे.

सरस्वतीचा महोत्सव स्वराज्याच्या केंद्रांत व्हावा तसाच झाला. त्याचा परिणामहि मूर्तस्वरूपांत असाच गोड होईल अशी आशा आहे. या घटनेबद्दल आपण सर्वांनी कृतज्ञता प्रदर्शित केली ती पूर्णपणें व्यक्त करणेंहि अशक्यप्राय गोष्ट आहे. हें यश संपादण्यांत थोरापासून लहानापर्यंत सर्वांनी मेहनत केल्याचें उघड दिसत आहे. कोल्हापुरच्या प्राचीन राजवंशाचे "श्रीमहालक्ष्मीलब्धवरप्रसाद:" हें ब्रिरुद असे. त्यास प्रस्तुत 'श्रीसरस्वतीकंठाभरण' ही उपाधि लावल्यास अन्वर्थकच होईल.

यंदाचें संमेलन १८ वें धरल्यास आता त्यास प्रौढदशा प्राप्त झाली आहे. यंदाचा महोत्सव त्याचा निदर्शकच झाला. यापुढील संमेलनांत कांही भरीव कामगिरी केल्याचें महाराष्ट्र साहित्य परिषद् निवेदन करील असा भरंवसा वाटतो. संमेलनासमोर तिचा वार्षिक अहवाल सादर करण्याचें निश्चित झालें आहे.

संमेलनाच्या यशस्वितेचें आणखी एक लक्षण असें आहे की, यंदा दोन दोन ठिकाणांहून अधिवेशनाकरिता निमंत्रणें आलीं आहेत. याचा आणखी एक अर्थ असा की, पुढील दोन वर्षांची काळजी दूर झाली. त्यास सरस्वतीचा प्रसाद बऱ्याच मोठ्या प्रमाणांत दरवर्षी लाभतोच. यंदा तेंहि "महालक्ष्मीलब्धवरप्रसाद" होवो.

---

# कोल्हापूर साहित्यसंमेलन व साहित्यपरिषद् यांच्या अधिवेशनासंबंधी कांही विचार

इ. स. १९३१ च्या उन्हाळ्याच्या सुटींत हैद्राबादेस जे सोळावें साहित्यसंमेलन झालें, त्यानंतर साहित्यपरिषद व संमेलन यासंबंधी इतक्या घडामोडी झाल्या कीं त्या लक्षांत घेतां गेल्या नाताळांतलें (ता. २७।२८।२९ डिसेंबर १९३२) कोल्हापुरचें सतरावें संमेलन व साहित्य-परिषदेची वार्षिक बैठक हीं प्रत्यक्षपणें यशस्वी रीतीनें पार पडेपर्यंत सर्वांसच त्यांबद्दल एक प्रकारची काळजी वाटत होती. पण आता प्रत्यक्ष घडलेल्या इतिहासाने ही काळजी दूर केल्याने सगळयाच मागील घडामोडींकडे वळून पाहणें जरा मनोरंजक होईल असें वाटतें. या लेखांत संमेलन व परिषद् यांच्या कोल्हापुरच्या अधिवेशनासंबंधी कांही सिंहावलोकनात्मक परंतु वैयक्तिक विचार व मतें प्रदर्शित करण्याचें योजिलें आहे. पैकीं प्रथमतः संमेलन व नंतर परिषद असा क्रम स्वीकारला आहे.

निजामनगरींतील संमेलनप्रसंगीं पुढील संमेलन सांगलीस व्हावें असें ठरलें होतें व खुद्द हैद्राबादेच्या संमेलनांत जे ठराव पास झाले त्यांची अंमलबजावणी करण्याकरिता डॉ० केतकर (त्या संमेलनाचे अध्यक्ष) यांचे अध्यक्षतेखालीं एक समितीहि नेमण्यांत आली होती. पण चमत्कार असा कीं, या दोनहि बाबतींत पुढे बऱ्याच भानगडी उपस्थित झाल्या व त्यायोगाने कोल्हापूरच्या सतराव्या संमेलनाच्या मार्गांत विघ्नेंहि बरींच येत होतीं. तशांत साहित्य-परिषदेच्या अंतर्गत कारभाराच्या बाबतींत उपस्थित झालेल्या वादाची भर पडून—एरवीं आनंद व शांति यांचेंच प्राधान्य असल्याबद्दल कीर्ति असलेल्या— साहित्यक्षेत्रांत बरीच रणधुमाळी माजून राहिल्यास नवल नाही. पण तो सगळा इतिहास येथे निवेदन करण्याचा माझा इरादा नाही व त्यास योग्य असें हें स्थळहि नाहीं. तूर्त एवढेंच सांगणें बरें कीं या इतिहासाच्या दृष्टीने कोल्हापुरच्या साहित्य संमेलनाकडे बघितल्यास हें एक अपूर्व संमेलन होऊन गेलें यांत शंका राहत नाही. 'सांगली कीं कोल्हापूर?' वा वाद सर्वमान्य सामोपचाराने मिटला. डॉ. केतकरांनी हैद्राबादेच्या समितीच्या नांवावर दिलेल्या धमक्या व नोटिसा यांचीहि योग्य ती वजावाट लागली, आणि परिषदेंतील मतभेदहि निदान संमेलनापुरते तरी मिटले. आणि हा सर्व इतिहास एवढ्या थोड्या अवधींत घडून आला कीं, तो केवळ करवीरनगरीसाठींच एखाद्या दैवी अदृश्य शक्तीने मुद्दाम घडवून आणिला असें एखाद्या श्रद्धाळु माणसाने सहज म्हणावें! परंतु श्रद्धेचा भाग सोडून दिला तरी इतक्या सर्व अडचणींतून कोल्हापुरास संमेलन भरावें व तें निरपवादपणें यशस्वी व्हावें हें अपूर्व नाही असें कोण म्हणेल?

खुद्द कोल्हापूर या स्थळाच्या दृष्टीने बघितलें तरी संमेलनाचें अपूर्वत्व कबूल करावें लागेल. इंदूर, ग्वाल्हेर, बडोदें या मराठी संस्थानांत संमेलनाचीं आजवर अधिवेशनें झालीं आहेत. पण कोल्हापुरचें तसें नाहीं. आजवर संमेलन तेथें कधींहि भरलें नव्हतें. कोल्हापूर ही 'राजव्यवहारकोश' करविणाऱ्या थोरल्या छत्रपतींच्या वंशजांची राजधानी. परंतु, योगायोग म्हणा किंवा काळाचा महिमा म्हणा, छत्रपतींच्या या स्वराज्यांत मराठी भाषेचा हा सोहळा आजवर घडला नव्हता. आणि आताहि हें संमेलन कोल्हापुरीं झालें तें करवीरकर छत्रपतींच्या सहानुभूतीने व मदतीनेच होय, हें खरें असलें तरी वास्तविक पाहतां कोल्हापुरच्या स्थानिक साहित्यिकांनीच तें घडवून आणिलें असून त्यास छत्रपतींच्या अंतरींच्या प्रेरणेचा विषय होण्याचें भाग्य लाभलेलें नव्हतें. आणि हें या संमेलनप्रसंगीं उपस्थित असलेल्या साहित्यिकांच्या लक्ष्यांत आल्यावाचून राहिलें नसेल! तरीपण मराठी साहित्य-संमेलनास यंदा आनुषंगिकरीत्या कां होईना कोल्हापुरच्या छत्रपतींच्या दरबारी इतमामाचें वैभव प्राप्त झालें व त्या वैभवानिशीं स्वतः छत्रपतींनीहि संमेलनास शोभा आणिली ही गोष्ट अपूर्व होय.

कोल्हापुरीं संमेलन कधी भरलें नव्हतें तें भरण्याचें ठरलें, व त्यास छत्रपतींची सहानुभूति पण मिळाली. तरीपण ग्रंथिज्वरासारख्या दैवी आपत्तीमुळे संमेलन कसें काय यशस्वी होतें याचीहि काळजी संमेलनाच्या आमंत्रकांस व हितचिंतकांस वाटत होती. दूरदूरच्या साहित्यिकांस बोलाविलेलें, आणि तशांत कोणाच्या जिवास अपाय झाल्यास ती मोठीच जबाबदारी होती. पण ईश्वरी कृपेने तीहि काळजी दूर होऊन संमेलन कसलाहि दैवी अपघात न होतां पार पडलें हीहि गोष्ट संमेलनाचें अपूर्वत्वच दर्शविते.

कोल्हापुरच्या संमेलनाच्या अपूर्वत्वाचा सर्वांत महत्त्वाचा विशेष सांगण्याचें राखून ठेविलें आहे. तो विशेष म्हणजे संमेलनाचे नियोजित अध्यक्ष बडोद्याचे महाराज श्री. सयाजीराव गायकवाड हे होत. आजवर श्री. इचलकरंजीकर किंवा श्री. मिरजकर यांसारखे राजपुरुष संमेलनास अध्यक्ष म्हणून लाभले होते; नाहीं असें नाही. परंतु बडोद्याचे महाराज हे त्यांच्या ठिकाणीं श्री आणि सरस्वती यांचा जो अनन्यसाधारण संगम झाला आहे त्यायोगाने सर्वच राजपुरुषांचे मुकुटमणि शोभणारे असल्यामुळे त्यांचे अध्यक्षत्व संमेलनास लाभणें ही खरोखरच अपूर्व गोष्ट होय. मराठी साहित्याच्या उत्कर्षासाठी त्यांच्याइतका आस्थापूर्वक उद्योग करणारा राज्यकर्ता विरळा. आणि या दृष्टीने साहित्यिकांनी संमेलनाचें अध्यक्षपद त्यांस अर्पण करून आपली कृतज्ञताबुद्धि दाखविली हें योग्यच झालें हें उघड आहे. किंबहुना, अध्यक्षपदाने महाराजांचा विशेष सन्मान झाला असें नसून महाराजांनीच अध्यक्षपद भूषवून त्याचा सन्मान केला असेंहि म्हणतां येण्यासारखें आहे. तेव्हा हाहि कोल्हापुरच्या संमेलनाच्या अपूर्वाईचाच विशेष गणिला पाहिजे.

खुद्द संमेलनाचें साद्यंत इतिवृत्त येथे कथन करण्याचा उद्देश नाही. परंतु काांही गोष्टींचे उल्लेख येथे करितों.

संमेलनास आलेल्या प्रतिनिधींची सोय कोल्हापूरकर मंडळींनी एकंदरीने पाहतां उत्तमच राखिली होती असें कृतज्ञपणें म्हणावयास पाहिजे. गांवांत साथीचा उपद्रव आणि म्हणून कोल्हापुरकरांनी भलती जबाबदारी नको यासाठी प्रतिनिधींस गांवाबाहेरच उतरविण्याचें ठरविलें. ही गोष्ट व्यवस्थापकांच्या दृष्टीने अत्यंत त्रासाची होती, तरी प्रतिनिधींच्या दृष्टीने ती एका अर्थी इष्टापत्तीच होती. कारण त्यामुळे प्रतिनिधींस गांवाबाहेर राजेरजवाड्यांच्या स्वच्छ, प्रशस्त, हवाशीर व सुखसोयींनी युक्त अशा बंगल्यांतून रहावयास सापडलें! पण त्यामुळे बिचाऱ्या स्वयंसेवकांची प्रतिनिधींची मिजास राखतांना फार तारांबळ उडे. गांवापासून बऱ्याच अंतरावर असणाऱ्या या वेगवेगळ्या बंगल्यांतून वेगवेगळ्या ठिकाणांहून आलेल्या व वेगवेगळ्या प्रकृतीच्या व स्वभावाच्या प्रतिनिधींची व्यवस्था व मर्जी राखणें एवढें एकच ध्येय त्यांनी चार दिवस आपणांपुढे ठेविलें होतें. आणि तें ध्येय कृतींत आणितांना त्यांनी शारीरिक व मानसिक कष्ट किती केले असतील याची कल्पनाहि करवत नाही! या बाबतींत रा. बा. रा. कोलटकर यांचे बाहेरगांवच्या प्रतिनिधींवर खरोखर उपकार आहेत. त्यांनी संमेलनासाठी तयार केलेल्या स्वयंसेवकचमूंत सेवाधर्माची वृत्ति इतकी बाणलेली दिसली की त्याबद्दल त्यांस द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील. भोजनादिकांच्या बाबतींतील व्यवस्थेबद्दलहि रा. सा. भोंसले यांचे आभार मानले पाहिजेत.

खुद्द संमेलनाच्या अधिवेशनाकरिता गांवाबाहेरच अर्बिन म्यूझियमच्या आवारांत भव्य मांडव घालण्यांत आला होता व त्यांत ध्वनिक्षेपक यंत्रांची योजना करण्यांत आल्यामुळे श्रोतृवृंदाची फारच चांगली सोय झाली होती. मला वाटतें ध्वनिक्षेपकांची योजना यापुढील संमेलनांतहि कायम राखण्यांत येईल तर बरें होईल. कोल्हापुरास संमेलनास एवढा जनसंमर्द लोटला होता; पण कोणतेंहि भाषण किंवा कवितागायन सुरू झालें कीं श्रोतृसमाज कसा चित्रासारखा तटस्थ राही. याचें सर्व श्रेय या यंत्रांच्या योजनेसच दिलें पाहिजे हें उघड आहे.

सभेची एकंदर व्यवस्था बरी होती. परंतु संमेलनाचा एकंदरींत कार्यक्रम पाहिला तर असें दिसे की, एकंदर त्या तीनचार दिवसांत सभांची फारच गर्दी झाली! कोल्हापुरकरांनी आपल्या संमेलनांत कांही नावीन्य आणण्यासाठी उपसंमेलनांची योजना करून ग्रंथकार, कवि व प्रकाशक यांची वेगळीं संमेलनें भरविलीं होतीं. कल्पना ठीक आहे. पण त्याप्रमाणे कार्यक्रम आखण्यास पुरेसा वेळ संमेलनप्रसंगीं मिळणें शक्य नाही हें उघड आहे. यामुळे झालें काय तर या सर्व उपसंमेलनांत एक एक स्थानिक स्वागताध्यक्ष व एक एक परस्थ अध्यक्ष यांच्या भाषणांशिवाय चर्चा, ठराव, असे आवश्यक व इष्ट ते प्रकार फारसे झालेच नाहीत व होऊंहि शकले नसते! आणि मग हीं उपसंमेलनें भरविण्याची, शोभा सोडून दिली तरी, उपयुक्तता ती काय

राहिलो ! या सभासंमेलनांच्या गर्दीमुळे मला तर वाटते कोल्हापुरीं सर्वच सभांस हजर राहूं शकलेली सर्वसाक्षी चित्रगुप्ताशिवाय कोणीहि व्यक्ति नसेल !

उपसंमेलनाबद्दल प्रश्न निघाला म्हणून त्यासंबंधींचेहि झालेले माझे बरेवाईट ग्रह येथे सांगतों. ग्रंथकारांच्या उपसंमेलनाचे स्वागताध्यक्ष प्रो. द. सी. पंगु यांचें भाषण लहानच पण माहितीने भरलेलें व औचित्ययुक्त असें होतें, तर त्याचे अध्यक्ष रा. सा. गो. स. सरदेसाई यांचें भाषण बहुतांशी टाकाऊ व प्रसंगाशीं अगदी असंबद्ध असेंच झाल्याचें बहुतेक श्रोते सांगतील. ग्रंथकारांच्या उपसंमेलनाच्या अध्यक्षांचें भाषण करावयाचें तर त्यांत ग्रंथकारांची सद्यःस्थिति, त्यांच्या अडचणी व त्यांचें निवारण, त्यांचीं कर्तव्यें इत्यादिकांसंबंधी कांही उपयुक्त व प्रसंगानुसार विवेचन करण्याचें सोडून देऊन रावसाहेबांनी आपल्या स्वतःच्या साहित्य-परिषदेच्या चिटणिशीचा इतिहास व पेशवे दप्तराचें स्वतः केलेल्या संशोधनाचें वृत्त यांच्या कथनांतच आपलें बहुतेक भाषण आटपिलें ! मला तरी त्यांचें भाषण ऐकून विस्मय वाटला ! कवि-संमेलनाची गोष्ट मात्र सुदैवाने तशी नव्हती. स्वागताध्यक्ष रा. सुमंत कवि यांचें भाषण प्रारंभीं निष्कारण शिवराळ झालेलें असलें तरी त्यांनी आपल्या भाषणाच्या उत्तरार्धांत काव्यकलेचें स्वानुभवावरून जें विवेचन केलें तें बऱ्याच दृष्टींनी महत्त्वाचें व संस्मरणीय ठरेल. पण त्याहिपेक्षा कविसंमेलनाचे अध्यक्ष कविवर्य भास्करराव तांबे यांचें भाषण तत्त्वचर्चेच्या दृष्टीने अधिक सूक्ष्मगामी व उच्च दर्जाचें असें झालें. काव्याचें अथवा कोणत्याहि ललित-कलेचें असें कांही एक वेगळें तत्त्वज्ञान अथवा उपपत्ति आहे या गोष्टीची जाणीव आम्हांपैकी ज्या अल्पसंख्य कलावंत कवींस असलेली दिसते त्यांत कविवर्य तांबे यांची गणना प्रामुख्यानेच करावी लागेल यांत शंका नाही. कोल्हापुरच्या कवि-संमेलनांतील त्यांचें भाषण रा. तात्यासाहेब केळकरांच्या बडोद्याच्या साहित्य-संमेलनां-तील अध्यक्षीय भाषणाइतकेंच कवींच्या जगांत गाजत राहील असा विश्वास वाटतो. प्रकाशकांच्या संमेलनाबद्दल मात्र विशेष असें कांही लिहिण्यासारखें नाही. त्याचे स्वागताध्यक्ष डॉ. बाळकृष्ण व अध्यक्ष रा. यंदे या दोघांचीहि भाषणें यथातथाच होतीं. परंतु त्यांतहि कांही विचारप्रवर्तक मुद्दे येऊन गेले हें नमूद करावयास पाहिजे. तसेंच ग्रंथ व नियतकालिकें यांचें प्रदर्शन उघडण्याच्या वेळीं वऱ्हाडचे शिक्षणमंत्री डॉ. पंजाबराव देशमुख यांनी केलेलें भाषणहि कांही दृष्टींनी उपयुक्त होतें. असो.

आता खुद्द साहित्य-संमेलनाकडे वळूं. श्री. बडोद्याचे महाराजांच्या अध्यक्षपदाची अपूर्वाई वर वर्णिलीच आहे. परंतु कर्मधर्मसंयोगाने श्री. महाराज कोल्हापुरीं येऊं शकले नाहीत. त्यामुळे बऱ्याच साहित्यिकांचा विरस झाला ही गोष्ट खरी आहे. तरी-पण महाराजांनी आपल्या खास प्रतिनिधीबरोबर आपलें भाषण व संदेश हीं पाठविलीं होतीं. श्री. महाराजांच्या जागीं दुसरा कामचलाऊ अध्यक्ष निवडण्यासंबंधी कोल्हापुरी जीं स्थानिक व परस्थ साहित्यिकांचीं खलबतें झालीं त्यासंबंधी येथे कांही न लिहिणेंच बरें. एवढें खरें की या बाबतींत स्थानिक मंडळींनी परस्थांबद्दल व परस्थांनी स्थानिकां-

बद्दल अशी परस्पर जी संशयवृत्ति सकारण वा अकारण धारण केली होती ती पाहून कित्येक साहित्यकांस संमेलनांत बखेडा माजतो की काय अशी खरोखर धास्ती वाटत होती. पण संमेलनाचें तारूं याही संकटांतून निभावलें आणि हेंहि एक कोल्हापुरच्या संमेलनाचें अपूर्वत्वच होय. या खलबतांतून एक तडजोड निघाली व तीप्रमाणे श्री. सरदार मा. वि. किबेसाहेब हे संमेलनाचे कामचलाऊ अध्यक्ष निवडिले गेले. या तडजोडीचें श्रेय माझ्या माहितीप्रमाणें बहुतांशी मुंबईचे प्रो. पां. वा. काणे यांसच दिलें पाहिजे.

संमेलनास पहिल्या दिवशीं श्री. छत्रपति सरकार आपल्या दरबारी वैभवासह उपस्थित होते व त्यांनी केलेलें प्रास्ताविक भाषण मामुली स्वरूपाचें असलें तरी त्यांच्या आगमनाने संमेलनास बरीच शोभा आली व संस्थानाबाहेर राहणाऱ्या साहित्यकांस तो खराज्यांतील देखावा एक कौतुकाचा विषय झाला यांत शंका नाही. संमेलनाचे स्वागताध्यक्ष कोल्हापुरचे प्राईम मिनिस्टर रा. सा. दत्तोबा भोंसले यांचें भाषण मात्र माहिती व विचार या दोन्हीहि दृष्टींनी अभिनंदनीय असें झालें. मिनिस्टरसाहेबांनी संमेलनास श्री. छत्रपतींची सहानुभूति व मदत मिळवून दिली याहि कामगिरीबद्दल साहित्यक त्यांचे ऋणी राहतील.

संमेलनांत बडोद्याचे राजप्रतिनिधि रा. सा. माने पाटील यांनी श्री. बडोद्याचे महाराज यांचें भाषण वाचून दाखवलें. मुळांत भाषणच पहिल्या प्रतीचें होतें. होतें लहानच; पण त्यांतील बहुश्रुतता, सूक्ष्म व्यासंग, हितकर दूरदृष्टि, साहित्याच्या अभिवृद्धीबद्दलची तळमळ, सद्यःकालीन वाङ्मयाबद्दलचें सूचक मतप्रदर्शन, विधायक सूचना, इत्यादि गुणांमुळे हें भाषण संमेलनाच्या इतिहासांत चिरकाल राहील असेंच झालें आहे असें म्हणण्यास बिलकूल प्रत्यवाय नाही. शिवाय रा. माने पाटील यांनी हें भाषण समेलनांत खणखणीत वाणीने वाचल्यामुळे तें अत्यंत परिणामकारी झालें यांत शंका नाही.

संमेलनाचे कामचलाऊ अध्यक्ष सरदार किबेसाहेब यांस संमेलनाच्या प्रारंभीचें आपलें अध्यक्षीय भाषण तयार करण्यास अगदींच वेळ न मिळाल्याने त्यांनी तें संमेलनाच्या उपसंहाराकरिता राखून ठेविलें हें योग्यच केलें. एकंदरीने कोल्हापुरचा मुक्काम सरदारसाहेबांना विशेष जाणवला असला पाहिजे यांत शंका नाही. सभासंमेलनांस हजर राहणें, राजेरजवाडयांच्या मुलाखती घेणें, संस्थांस भेटी देणें, इत्यादिकांचा त्यांस बराच त्रास झाला असला पाहिजे. संमेलन, विषयनियामक समिति, साहित्यपरिषद्, इत्यादिकांच्या बैठकींत अध्यक्षांच्या खुर्चीवर बसून दिवसरात्र सारखें अवधानाने व जबाबदारीने काम करणें एवढी एकच गोष्ट घेतली तरी ती सुद्धा फारच थोडयांस शक्य होईल. पण हें काम सरदारसाहेबांनी केवळ कर्तव्यबुद्धीने आणि एकंदरीने पाहतां अभिनंदनीय रीतीने पार पाडलें यांत शंका नाही. अध्यक्षांचें कामच असें की, त्यांत लोकांस दुखविण्याचें हटकून नशिबीं येतें; परंतु हीहि आपत्ति एरवीं शांत व मन-

मिळाऊ स्वभावाच्या सरदारसाहेबांनी केवळ कर्तव्यासाठीं सहन केली! साहित्यपरिषदेच्या सभेंत व खुद्द संमेलनांतहि जे कांहीं असे प्रसंग घडले त्या वेळीं सरदारसाहेबांस बराच मनस्ताप झाला असेल हें उघड आहे.

संमेलनांत जे उणेपुरे वीस पंचवीस ठराव पास झाले आहेत ते याच अंकांत वेगळे छापले असल्याने त्यांची जंत्री अथवा कलमवार विवेचन देऊन येथे जागा अडवीत नाहीं. कांहीं महत्त्वाच्या ठरावाबद्दल मात्र चारदोन शब्द लिहितों. खुद्द महाराष्ट्र, गोमांतक, निजामइलाखा किंवा कर्नाटक–कारवार वगैरे भागांतील मराठीभाष लोकांच्या ज्या गैरसोयी किंवा तक्रारी आहेत त्यांबद्दलचे त्या त्या सरकारांस केलेल्या विनंतीच्या स्वरूपाचे व इतर कंठाळी किंवा मामुली स्वरूपाचे म्हणजे कोणत्याहि गोष्टीबद्दल केवळ सदिच्छा व्यक्त करणारे ठराव सोडून दिल्यास माझ्या मताप्रमाणे गेल्या संमेलनांत दोनच महत्त्वाचे ठराव झाले. एक साहित्यपरिषदेबद्दलचा व दुसरा महाराष्ट्र विद्यापीठासंबंधीचा. पैकी विद्यापीठासंबंधीचा ठराव हा केवळ आमच्या साहित्यकांच्या पोकळ उत्साहाचें द्योतक होय असें माझें वैयक्तिक मत आहे. या ठरावाबद्दल संमेलनाच्या आधीपासूनच आमचे कांहीं साहित्यक डरकाळ्या फोडीत होते व हा ठराव केवळ पास झाल्यानेच सर्व कार्यभाग होणारा आहे अशा अभिनिवेशाने व उत्साहाने बोलतलिहीत होते. पण याचपैकीं कांहीं साहित्यकांनी ठरावावर लांब लांब व वक्तृत्वपूर्ण भाषणें ठोकूनहि विद्यापीठासंबंधी कांहीं योजना व प्रचार करण्यासाठीं जी समिति नेमण्यांत आली आहे त्यांतून, आपणांवर प्रत्यक्ष कामाची जबाबदारी नको म्हणून, आपलीं स्वतःचीं नांवें वगळून घेतलीं, व प्रत्यक्ष कामाच्या व खर्चाच्या जबाबदारीचें घोंगडें साहित्यपरिषदेच्या गळ्यांत अडकवून, हे साहित्यक आपण स्वतः मोकळे झाले! वस्तुस्थिति अशी की, महाराष्ट्र विद्यापीठासारख्या योजना संमेलनाच्या आंवाक्याबाहेरच्या आहेत. आणि साहित्यपरिषदेच्या कक्षेंत हें कार्य येत असलें तरी तें करण्यास परिषदेजवळ आजच्या क्षणीं तरी मनुष्यबळ व द्रव्यबळ यांचा पूर्ण अभावच आहे.

आणि याच दृष्टीने संमेलनांत पास झालेल्या साहित्यपरिषदेबद्दलच्या ठरावाचे मी मनःपूर्वक स्वागत करितों. किंबहुना, साहित्यकार्याच्या दृष्टीने अगदीं अवश्यक व परिणामीं सर्व दृष्टींनी हितकर असा हा एकच ठराव आहे. परिषदेच्या हलाखीच्या स्थितीबद्दल नव्याने लिहिण्याचें कारण नाहीं. इतर प्रांतांतील साहित्यपरिषदा या आपला द्रव्यसंचय व उत्साही कार्यकर्ते यांच्या बळावर किती तरी उपयुक्त कार्य करीत आहेत! त्या तुलनेने आम्हांस शरमेने मान खालीच घालावी लागते. आमच्या परिषदेसाठीं एखादी कचेरीची जागा व एकाद दुसरा कारकून एवढीं साधनें बाळगण्यासहि पुरेसा पैसा आमच्याजवळ नाहीं. आणि अशा स्थितींत परिषदेच्या गळ्यांत 'ही योजना करा,' 'ती योजना पार पाडा,' 'अमका निधि जमा करा,' 'तमक्या ठरावाची अंमलबजावणी करा,'—अशीं फुकट कामें बांधण्यास मात्र संमेलनांतील जो तो साहित्यक तयार! यावरून आमची खऱ्या कार्याबद्दलची तळमळ किती बेगडी व वर म्हटल्याप्रमाणे

केवळ पोकळ उत्साहाची द्योतक आहे हें दिसून येईल! तेव्हां साहित्याचें सार्वजनिक स्वरूपाचें कांहीं खरेंखुरें कार्य घडावें अशी इच्छा असल्यास संमेलनांत पास झालेल्या परिषद्विषयक ठरावांतील विनंतीस मान देणें, हेंच प्रत्येकाचें कर्तव्य होय असें मला वाटतें. परिषदेच्या स्वतःच्या कचेरीच्या खर्चासाठी कांहीं कायमनिधीची योजना परिषदेने सर्वांच्या आधी हातीं घ्यावी अशी माझी परिषदेस सूचना आहे. आणि ही योजना पूर्ण होईपर्यंत विद्यापीठाची योजना जरा मागे ठेविली तरी हरकत नाहीं. आणि नाही तरी ती मागेच पडून राहणार! शिवाय विद्यापीठाचें काम इतर अधिक कार्यक्षम मंडळी करताहेतच कीं! निदान परिषदेने तरी हे घोंगडें इतक्यांतच आपल्या गळ्यांत घेऊं नये!

संमेलनांत अश्लील वाङ्मयाबद्दल एक ठराव पुण्याचे रा. कृष्णराव मराठे यांच्या प्रेरणेनें आला होता व तो उपऱ्या संमेलनांत औंधचे पंडित सातवळेकर यांनी मांडला. त्यावर त्यांचें स्वतःचें भाषण चांगलेंच झालें, व सौ० गिरिजाबाई केळकर व श्री० सोनुताई काळे यांनींहि ठरावावर विचारी भाषणें केलीं. परंतु हा ठराव संमेलनांत टिकला नाही व चहूंकडचा विरोध लक्षांत घेऊन पंडित सातवळेकरांनी शेवटी तो परतहि घेतला. या ठरावाबाबत संमेलनांत प्रत्यक्ष घडलेल्या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या तर मन चिंताकुल झाल्याशिवाय रहात नाही. अलीकडे नवविचाराच्या अथवा कलेच्या नांवाखाली वाङ्मयांत असदभिरुचीस पोषक व समाजस्वास्थ्यास अपायकारक असे जे प्रकार होऊं लागले आहेत त्याचा केवळ शाब्दिक निषेध करण्यासहि बऱ्याच मंडळींचा संमेलनांत जो विरोध दिसला त्यावरून आमच्या समाजांतील तरुण पिढी कोणत्या मानसिक वातावरणांत वावरत आहे हें स्पष्टपणें प्रत्ययाला आलें! पण याविषयीं जास्त लिहिण्याचें हें स्थळ नव्हे.

असो. संमेलनासंबंधीचे हे स्फुट विचार मूळ कल्पनेपेक्षा अधिक लांबत चालले, तेव्हां आता आटोपतें घेतों. संमेलनांत पास झालेल्या ठरावांपैकी विशेष उल्लेखाकरिता दोनच ठराव मी निवडिले म्हणून त्यांशिवाय इतर ठराव अगदीं बिनमहत्त्वाचे आहेत अशांतला भाग नाहीं. त्यांतहि कांहीं ठराव चांगले आहेत. उदाहरणार्थ, श्री. सयाजीरावांच्या सूचनेस अनुसरून केलेला नागरी लिपींत सर्वच भारतीय वाङ्मय छापण्याबद्दलचा ठराव, किंवा ग्रंथोत्तेजक संस्थांच्या सहकार्याबद्दलचा ठराव, इत्यादि. माझें म्हणणें इतकेंच कीं, हे सर्व ठराव आपापल्या परीने चांगले असले तरी 'अर्जंट' स्वरूपाचा असा एकच ठराव आहे व तो म्हणजे परिषदेबद्दलचा. आणि एवढ्यापुरता तरी याबद्दल कोणाचा मतभेद होणार नाहीं अशी आशा आहे.

उपऱ्या संमेलनांत भाषणें पुष्कळच झालीं; व त्यासंबंधी बरेंच लिहिण्यासारखें असलें तरी येथे विशेष भाषणांचा मात्र उल्लेख करितों. मला वाटतें सर्वांत उत्तम भाषण म्हणजे प्रो. पोतदारांचें विद्यापीठाच्या ठरावावरील. पं. सातवळेकरांचें त्यांच्या परत घेतलेल्या अश्लील वाङ्मयावरील ठरावासंबंधांत केलेलें भाषणहि विचारप्रवर्तक होतें.

परंतु आकाराने तर लहान, तरी परिणामाच्या दृष्टीने गौरवच करावें असें भाषण झालें ना. जाधवरावांचें. शुद्धलेखनसमितीच्या शिफारशींबद्दल जो एक अनुकूल ठराव संमेलनांत पास झाला त्याचें सर्वस्वी श्रेय त्यांसच दिलें पाहिजे यांत शंका नाही. त्या वेळचा एक क्षण असा होता की, शुद्धलेखनासारखा शास्त्रीय विषय, कोंकणस्थ व देशस्थ यांची संस्कृति यांसारखे ज्ञातिविशिष्ट व म्हणून अत्यंत गैरलागू प्रश्नांच्या रूळावर नेण्याचा एका वक्त्याने प्रयत्न केल्यामुळे समितीने इतके कष्ट करून केलेलें कार्य फुकट जातें की काय असा संदेह उत्पन्न झाला होता; आणि समितीचे चिटणीस रा. कृ. पां. कुलकर्णी यांनी आपलें हृदयस्पर्शी वक्तृत्व गाजविल्यानंतरहि तो संदेह नाहीसा झाला असें म्हणवत नव्हतें. अशा प्रसंगीं रा जाधवरावांनी आपल्या भाषणाने केवळ यक्षिणीची कांडीच फिरविली ! आणि ठराव बहुमताने पास झाला ! ! संमेलनांतील वक्त्यांत तीन स्त्रियाहि होत्या व त्या तिघींचीहि भाषणें चांगलीं झालीं. या स्त्रिया म्हणजे सौ. कमलाबाईसाहेब किबे, सौ. गिरिजाबाई केळकर व श्री. सोनुताई काळे.

सरदार किब्यांचें संमेलनाच्या शेवटीं जें समारोपात्मक भाषण झालें तें चांगलें झालें. कोल्हापुरच्या मुक्कामांतील एवढ्या गर्दींत त्यांनी इतकें विचारप्रवर्तक व उपयुक्त भाषण तयार केलें याबद्दल त्यांचें अभिनंदन करण्यास हवें. या बाबतींत त्यांच्या विद्वान् पत्नी सौ. कमलाबाईसाहेब यांचें त्यांस साहजिकच साहाय्य झालें असेल.

संमेलनांत मधून मधून काव्यगायनाचीहि लयलूट चाले व त्यायोगें श्रोत्यांचा बौद्धिक श्रमपरिहार होई. अलीकडे काव्यगायनांत नाणावलेल्या बहुतेक लहानमोठ्या कवींनी संमेलनांत व विशेष प्रसंगीं काव्यगायन करून संमेलनांतील साहित्यकांस काव्यानंदांत यथेच्छ डुंबूं दिलें याबद्दल या कवींचे उपकार मानिले पाहिजेत. कवींपैकी रा. केशवकुमार यांच्या कविता त्यांतील विनोद व विडंबन या गुणांमुळे, व कु. संजीवनी मराठे यांच्या कविता त्यांच्या कंठमाधुर्यामुळे श्रोत्यांस विशेष आवडल्या. प्रतिनिधींच्या कँपांतहि वऱ्हाडकडील रा. जोशी यांच्या गायनाने बरेच साहित्यिक मोहित झाले होते असें दिसलें.

असो. कोल्हापुरच्या संमेलनास निरपवाद यश प्राप्त झालें याबद्दल कोल्हापुरकरांचें हार्दिक अभिनंदन केलें पाहिजे. संमेलनाचा अथपासून इतिपर्यंतचा आंतला इतिहास ज्यांना माहीत आहे त्यांना विचारल्यास आपणांस असें आढळून येईल की, हें संमेलन केवळ एका व्यक्तीच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षेचें दृश्यफळ आहे. या व्यक्तीच्या मनांत ही संमेलनाची कल्पना भरल्यापासून तिने तिच्या पूर्ततेसाठी अविश्रांत खटपट सुरू केली. एकीकडे कोल्हापुरच्या स्थानिक जनतेची व सरकारची सहानुभूति व सहकार्य मिळविणें, व दुसरीकडे परिषदेंतील मतामतांच्या गलबल्यांतून कोल्हापूर संमेलनासाठीं निर्विवाद व पक्षभेदातीत अशा प्रकारची परवानगी मिळविणें अशीं दोन जिकीरीचीं कामें तर प्रथमतः या व्यक्तीपुढे होतींच. परंतु याहिपुढील संमेलनाच्या प्रत्यक्ष व्यवस्थेचें दैव-

प्राप्त प्रतिकूल परिस्थितींतील कार्यहि याच व्यक्तीने आपल्या अंगावर घेतलें होतें. ही तीनहि प्रकारची जबाबदारी या व्यक्तीने योग्य रीतीने पार पाडली याबद्दल या व्यक्तीचें मी हार्दिक अभिनंदन करितों. ही व्यक्ति म्हणजे कोल्हापुरचे एक धनाढ्य सराफ पण जिल्हाळ्याचे साहित्यप्रेमी रा. गोविंद शिवराम उपळेकर हे होत! आणि कोल्हापुरचे प्रसिद्ध कायदेपंडित ॲडव्होकेट शंकरराव दाभोळकर यांसहि संमेलनाचे प्रमुख कार्यकर्ते म्हणून त्यांच्याच जोडीला बसविलें पाहिजे यांत शंका नाही. किंबहुना, माझे मित्र रा. कृ. पां. कुलकर्णी यांनी उघड्या संमेलनांत शेवटीं विनोदाने म्हटल्या-प्रमाणे ('Messrs. Dabholkar and Upalokar have been the long and short of the whole Sammelan!) संमेलनांतील सर्व लहानमोठ्या व्यवस्थापकीय कर्तब-गारीचें श्रेय शेवटीं या दोघांसच देणें योग्य होईल!

* * *

संमेलनासंबंधीचें हें पर्यालोचन संपल्यानंतर आतां मूळ बेताप्रमाणे परिषदेकडे वळलें पाहिजे. कारण, गेल्या नाताळांत कोल्हापुरीं संमेलनप्रसंगीं नियमाप्रमाणे परि-षदेचीहि सभा भरली होती. परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत सरदार गंगाधरराव विनायक किबेसाहेब हे श्री० इचलकरंजीकरांच्या बंगल्यांत उतरले असल्याने परिषदेच्या सभेची अधिवेशनेंहि तेथेच एका प्रशस्त दिवाणखान्यांत होत असत. दिवाणखान्यां-तील प्रमुख स्थानीं लोडाशीं परिषदेचे सरदारी अध्यक्ष, त्यांच्या आजुबाजूस परिषदेची अधिकारी मंडळी, मागील बाजूस श्रीमंत सौ० कमलाबाईसाहेब किबे, इत्यादि स्त्रिया, आणि समोर व सभोंवार गालिच्याच्या बैठकीवर परिषदेचे इतर सभासद, असा तो देखावा पेशव्यांच्या राजवटींतील दरबारासारखा मोठा मजेदार दिसे. खुर्च्याटेबलांचा बडिवार नाहीं, की इतर कोणताहि साहेबी थाट किंवा नियंत्रण नाही. मराठींत बोल-ण्यास पूर्ण मुभा, किंबहुना शक्य तों शुद्ध मराठी बोलण्याचाच ज्याचा त्याचा अट्टा-हास. असें तें परिषदेच्या सभेंत सर्वत्र मराठमय वातावरण पसरलें होतें.

परिषदेच्या कोल्हापुरीं भरलेल्या सभेंत झालेल्या कार्याचें महत्त्व नीटपणें आक-लन व्हावें यासाठी परिषदेचा अलीकडील इतिहास स्थूलपणें लक्ष्यांत घेतला पाहिजे. परिषदेस स्थापन होऊन उणेंपुरें पाव शतक लोटलें आहे. परंतु खेदाची गोष्ट अशी की, तिच्या हातून म्हणण्यासारखी भरीव कामगिरी अद्याप फार थोडी झाली आहे. गेल्या कांही वर्षांत मात्र म्हणजे परिषदेच्या कार्याचीं सूत्रें रा. सा. चापेकरांच्या हातीं गेल्यापासून परिषदेची कांही हालचाल चालू झाली असल्याचें दिसत आहे. विशेषतः अलीकडे म्हणजे निजाम हैद्राबादेस साहित्य-संमेलन झाल्यापासून वर्तमानपत्री वादा-मुळे परिषदेच्या कारभाराकडे सर्वांचें लक्ष्य वेधलें आहे. परिषदेच्या हैद्राबादीं झालेल्या निवडणुकी परिषदेच्या कांही सदस्यांस कायद्याच्या दृष्टीने नापसंत असल्यामुळे त्यांना त्याबद्दल तीव्र असंतोष वाटत होता. संमेलनप्रसंगी परिषदेची वार्षिक बैठक भरावी असा परिषदेच्या घटनेंतच नियम असला तरी हैद्राबादच्या सभेची सूचना (की, ज्या

सभेंत परिषदेच्या घटनेंत नियामक-मंडळाचा समावेश व अधिकारीवर्गाची नवीन निवडणूक अशीं महत्त्वाचीं कामें उरकण्यांत आलीं) सभासदांस रीतसर पोंचली नव्हती आणि याच कारणास्तव या सभेंत घडलेलें कार्य बेकायदा ठरविण्यांत यावें अशी त्यांची इच्छा होती. हें काम कायदेशीर आहे असा परिषदेचे अध्यक्ष सरदार किबेसाहेब यांनी निर्णय दिला तरी निदान शिस्तीकरिताहि तो मान्य करण्याचें त्यांच्या मनांत येईना. अशा परिस्थितींत व नियमाप्रमाणे परिषदेची विशेष साधारण सभा बोलाविण्याची मागणी करूनहि ही मागणी केलेली सभा त्यांना मान्य असलेल्या मुदतींत भरत नाहीं असें पाहून या मंडळींनी ता. २० मार्च १९३२ इसवी रोजीं परिषदेची म्हणून आपली एक वेगळी सभा भरविली व त्यांत कांही ठराव पास केले.

यानंतर थोड्याच दिवसांनी म्हणजे २७ मार्च रोजीं परिषदेची अधिकृत सभा भरून त्यांत दोन्ही पक्षांचा समेट झाला. आणि याच सभेंत, कोल्हापुरीं नुकत्याच झालेल्या परिषदेच्या सभेंतील महत्त्वाच्या कार्याचें मूळ बीज सापडेल. घटना, मागील हिशेब, निवडणुकी, पत्रिका वगैरे परिषदेच्या कारभारांतील वादग्रस्त प्रश्नांचा विचार करून त्याबद्दल विधायक सूचना करण्यासाठीं या २७ मार्चच्या सभेंत दोन्ही पक्षांची एक संमिश्र समिति नेमण्यांत आली. या समितीचें काम पुण्यास झालें व तिचा अहवाल तयार झाल्यानंतर पुनश्च परिषदेची विशेष साधारण सभा ता. १६ आक्टोबर १९३२ इसवी रोजीं मुंबईस भरली. ही सभा भरण्यापूर्वी मध्यंतरी संमेलनाबद्दलचा 'सांगली की कोल्हापूर' हा वाद वर्तमानपत्रांतून बराच चर्चिला गेला असून त्याबाबत पाध्ये-चापेकर यांची कांही जाहीर पत्रापत्रीहि झाली होती. परंतु खुद्द सभेंत तरी सुदैवाने ऐकमत्य होईल असें वाटलें होतें. पण तीहि अपेक्षा खोटी ठरली. सभेचा साद्यंत इतिहास कथन करण्याचा हेतु नाहीं. परंतु एवढें तरी नमूद करण्यास हवें कीं, या सभेंत पूर्वीच्या समितीचा अहवाल पुनश्च समितीकडे पाठविण्यांत येऊन घटनेचें काम अधिक निर्दोष व्हावें असें तीस सुचविण्यांत आलें! आणि विशेष महत्त्वाची गोष्ट अशी कीं, 'सांगली की कोल्हापूर' हा संमेलनाबाबतचा वाद अथवा हैद्राबादेस झालेली परिषदेच्या कार्यकारी मंडळीची कांहींच्या मतें विवाद्य असलेली निवडणूक या दोन्हींबद्दल या सभेत स्पष्ट ठराव झाले व त्यांअन्वयें कार्याध्यक्षांनी संमेलनाबाबत कोल्हापूरकर साहित्यिकांस नियमाप्रमाणे आधीच दिलेली परवानगी व हैद्राबादची कार्यकारी मंडळाची निवडणूक हीं दोन्हीं बहुमताने कायम करण्यांत आलीं! याच सभेंत मध्यंतरी परिषदेचे अध्यक्ष सरदार किबेसाहेब हे अन्य कार्यासाठी सभागृहांतून निघून गेले असतां त्यांनीच आपल्या जागीं नियुक्त केलेले अध्यक्ष प्रो. पां. वा. काणे यांनी जें प्रसंगावधान व सभापतित्वाबाबत कौशल्य दाखविलें तें विशेष उल्लेखनीय होतें यांत शंका नाहीं!

घटनेच्या कामाकरिता समितीचा अहवाल समितीकडे पुनश्च परत आल्यानंतर समितीने हिशोब वगैरेंचें काम आधी आटोपून घेतलें व केवळ घटनेच्या कामाकरिता प्रि० गाडगीळ इत्यादि पांच अधिक मंडळी स्वीकृत केली व त्यांच्या

मदतीने परिषदेच्या घटनेचा जवळजवळ नवीनच असा एक खर्डा तयार केला. घटनेसारखे विषय वारंवार चर्चेस आणावयाचे नसतात, आणि परिषदेच्या घटनेची बाब गेल्या चारपांच वर्षांत तीनचार वेळांतरी पुनःपुनः पिंजून निघून तिचे पुनःपुनः नवीन खर्डे तयार झालेले असल्यामुळे व हे सर्व खर्डे आपआपल्या परीने कमीजास्त असमाधानकारकच असल्याने परिषदेच्या घटनेचा हा प्रश्न कायमचा पण समाधानकारक रीतीने निकालांत निघावा असें सर्वांसच वाटत होतें. यामुळे कोल्हापुरच्या परिषदेच्या सभेंत प्रि० गाडगीळांसारख्या घटनाशास्त्रांतील पारंगताने सुचविलेल्या घटनेचें काय होतें इकडे सर्वांचेंच लक्ष्य लागून राहिल्यास नवल नाही.

कोल्हापुरच्या परिषदेच्या सभेचें याच दृष्टीने मला स्वतःला महत्त्व वाटतें. समितीच्या अहवालांपैकी हिशेबाची बाब निरुपाय म्हणून एकदांची निकालांत काढण्याचें ठरलें हें फार चांगलें झालें. पत्रिकेची कांही योजना ठरली. पण या सर्वांपेक्षा महत्त्वाची बाब म्हणजे घटनेची होय हें उघड होय. या घटनेची कलमवार चर्चा झाली. या चर्चेचे वेळीं स्वतः प्रि. गाडगीळ हजर नव्हते. तरीपण समितीने तयार केलेल्या घटनांतील वेगवेगळ्या कलमांबद्दल समितीतर्फे योग्य ते खुलासे रा. य. रा. दाते यांनी केल्यामुळे परिषदेचा घटनाविषयक विचार बराच सुकर झाला यांत शंका नाही. शिवाय या चर्चेच्या वेळीं प्रो. पां. वा. काणे ( मुंबई ), प्रो. द. वा. पोतदार ( पुणें ), रा. ग. स. जोग ( बेळगाव ), रा. भा. रा. पटवर्धन ( धारवाड ), रा. पां. वा. जोशी ( हैद्राबाद ), प्रो. शं. दा. पेंडसे ( नागपूर ) इत्यादि परिषदेच्या ठिकठिकाणच्या आधारस्तंभांनी मोठ्या हौसेने चर्चेत भाग घेऊन आपल्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा परिषदेस दिला हीहि गोष्ट कमी महत्त्वाची नाही. किंबहुना ही ठिकठिकाणची मंडळी परिषदेच्या कारभारांत आत्मीय भावनेने लक्ष्य घालतात आणि केवळ परिषदेच्या हिताच्या दृष्टीने चर्चा करून एकमताने तत्त्वें ठरवितात व तपशिलाच्या बाबतींत एकमेकाशीं देवाणघेवाण करण्यास तयार होतात हें कोल्हापुरच्या परिषदेच्या सभेंत दिसलेलें दृश्य मोठें परिणामकारी होतें याबद्दल दुमत होईल असें वाटत नाही. अशा या चर्चेतून तावून सुलाखून निघालेली परिषदेची घटना बहुतांशी निर्दोष, असल्यास नवल काय ! ही घटना याच अंकांत दुसरीकडे छापिली असल्याने तीबद्दल जास्त लिहून अधिक जागा अडवीत नाही.

पण कोल्हापुरच्या परिषदेच्या सभेचें मुख्य महत्त्व तीस या घटनाविषयक कार्यामुळे प्राप्त झालें असलें तरी या सभेंत या वार्षिक प्रसंगाने असेंहि इतर पुष्कळ कार्य झालें की त्याहि योगाने या सभेस बरेंच महत्त्व प्राप्त व्हावें, या इतर कार्याबद्दलचें श्रेय बहुतांशी प्रो. द. वा. पोतदार यांस दिलें पाहिजे. मध्यंतरी मुंबईस झालेल्या परिषदेच्या सभा प्रो. पोतदार ह्यांस मान्य नसल्याने कोल्हापुरची परिषदेची सभा त्यांच्या दृष्टीने हैद्राबादच्या सभेपुढचीच होय ! आणि याच दृष्टीने कोल्हापुरास त्यांनी स्वतःचे अनेक ठराव परिषदेंत मांडून व मांडवून पास करून घेतले ! परिषदेच्या ट्रस्टडीडच्या

प्रसिद्धीबद्दलचा ठराव, हैद्राबादच्या सभेंतील कामाच्या कायदेशीरपणाबद्दलचा ठराव, प्रस्तुत कार्यकारी मंडळ चालू रहाण्याबद्दलचा ठराव, कोल्हापुरचें संमेलन हैद्राबादच्या पुढचें म्हणजे सत्रावेंच असल्याबद्दलचा व डॉ. केतकरांचा म्हणून त्यांच्या याबाबत विरुद्ध चळवळीबद्दल निषेध करण्याबद्दलचा ठराव, इत्यादि ठराव प्रत्यक्ष व अप्रत्यक्षरीत्या प्रो. पोतदारांच्याच जाज्वल्य तत्त्वनिष्ठेचें द्योतक होत असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होईल असें वाटत नाही. प्रो. पोतदारांच्या परिषदेवरील निर्व्याज भक्तीस द्यावे तेवढे धन्यवाद अपुरेच पडतील असें मला वाटतें. कारण, या सर्व प्रो. पोतदारांच्या प्रेरणेने पास झालेल्या ठरावांचा एकत्र विचार केल्यास, रीतसरपणाच्या सबबीवर परिषद व संमेलन यांच्या बाबतींत जे अनेक मतभेद अलीकडे विनाकारण निर्माण करण्यांत आले होते त्या सर्वांचेंच संपूर्ण आणि, कार्यापेक्षा रीतसरपणाचें विशेष स्तोम माजविणाऱ्यांच्याहि दृष्टीने, निरपवाद असें निरसन झाल्यासारखें झालें आहे यांत शंका नाही.

परिषदेच्या कोल्हापुरच्या सभेंत आणखीहि एक वेगळ्या उल्लेखास योग्य असा ठराव झाला आणि तो म्हणजे इ. स. १९२६–१९३१ पर्यंतच्या परिषदेच्या हिशेबांची व दफ्तराची अक्षम्य हेळसांड करणाऱ्या चिटणिसांबद्दल तीव्र निषेध व्यक्त करणारा ठराव होय. परिषदेचे चिटणीस परिषदेचे पगारी नोकर नसतात आणि त्यांस त्यांचीं स्वतःचीं अशीं महत्त्वाचीं कामें असतात. या गोष्टी खऱ्या असल्या तरी एकदां परिषदेचें काम पत्करलें म्हणजे तें नीटपणें करणें हें कोणाचेंहि कर्तव्यच होय. बरें, काम झालें नाही तर निदान त्याबद्दल खेद तरी वाटण्यास पाहिजे. परंतु ठरावविषय चिटणीसांस तोहि वाटल्याचें दिसत नव्हतें. बिचाऱ्या परिषदेच्या समितीने यांना शक्य ती माहिती व खुलासे पुरविण्याबद्दल रजिस्टर्ड पत्रांनी विनंत्या कराव्या, आणि यांनी या विनंतीस अनुसरून समितीस साहाय्य करण्याचें तर राहोच, परंतु केवळ विनंतीची पोंच देण्याइतकेंहि परिषदेबाबत सौजन्य दाखवूं नये यापेक्षा आमच्या सार्वजनिक कामांतील बेजबाबदारपणाचा पुरावा तो कोणता? परिषदेच्या या माजी अधिकाऱ्यांच्या अव्यवस्थेबद्दल परिषदेने निषेधाचा ठराव केला यांत मला तरी गैर कांहीहि वाटत नाही.

खुद्द साहित्यसंमेलनांतहि परिषदेच्या दृष्टीने इष्ट अशा एकदोन गोष्टी घडून आल्या. एकतर कोल्हापुरीं साहित्यसंमेलन घडून येण्याने संमेलनास परिषदेच्या कार्यकारी मंडळाची परवानगी अवश्यक असते, व संमेलनें घडवून आणण्याची जबाबदारीहि याच मंडळावर आहे, पूर्वीच्या संमेलनाचे अध्यक्ष अगर त्यांनी नेमलेलें मंडळ यांचा त्यांत कांही संबंध येत नाही ही गोष्ट अगदी स्पष्टपणें सर्वांच्या नजरेस आली. शिवाय, कोणत्याहि संमेलनप्रसंगीं पुढील संमेलनासाठी येणारीं निमंत्रणें केवळ मामुली दृष्टीने संमेलनापुढे ठेवण्यांत आलीं तरी त्यांचा विचार करून त्यांतील एखादें निमंत्रण स्वीकारण्याची जबाबदारी व कर्तव्य हींहि परिषदेच्याच अखत्यारांतलीं कामें होत

हेंहि कोल्हापुरीं सर्वांच्या निदर्शनास आलें. कोल्हापुरच्या संमेलनांत शेवटीं बडोदें व नागपूर येथील आमंत्रणें रीतसर दिलीं गेलीं व त्यांचा विचार करून परिषदेने नागपूरच्या आमंत्रणाचा स्वीकार केला. संमेलन व परिषद् यांच्या परस्परसंबंधाच्या बाबतींत इतके दिवस जी परंपरा केवळ अजाणतां अनुसरण्यांत येत असे तीस आता जाणूनबुजून मान्यता देण्यांत आली होहि परिषदेच्या दृष्टीने महत्त्वाची अशीच गोष्ट घडली यांत शंका नाहीं. संमेलन व परिषद् यांचे परस्परसंबंध याहीपेक्षा अधिक निश्चित व्हावयास पाहिजेत आणि दिवसेंदिवस ते तसे होत जातील असा संभवहि दिसत आहे.

असो. एकंदरींत परिषदेच्या कोल्हापुरच्या सभेंत बरेंच भरीव कार्य झालें आहे. आता नवीन निवडणुकी होऊन परिषदेची नवीन घटनाहि अमलांत येईल; आणि परिषदेच्या कचेरीच्या आर्थिक व्यवस्थेबद्दलहि एक ठराव पास झाला आहे, त्याप्रमाणे परिषदेचें काम परिषदेच्या नवीन कचेरीमार्फत अधिक उत्साहाने व कार्यक्षमतेने होऊं लागेल व एकंदरीने परिषदेला चांगले दिवस येतील अशीच कोणीहि झालें तरी आशा बाळगणार व प्रार्थना करणार !

देविदास दत्तात्रेय वाडेकर

# प्रथमा, मध्यमा व उत्तमा परीक्षा आणि त्यांचा अभ्यासक्रम
# ( योजना )

पुढे दिलेला अभ्यासक्रम कौशिकाश्रमांतील ( दादिया ) श्री. शेंडे, एम्. ए. यांच्याकडून, ददियाच्या मध्यप्रांतीय गुरुकुलाचे सुपरिंटेंडेंट श्री. भा. मा. वाईकर, जमीदार, यांजमार्फत परिषदेकडे मान्यतेसाठी आलेला आहे. श्री. शेंडे यांची विनंती अशी की, ' साहित्यांत ( मराठी ) प्रथमा, मध्यमा आणि उत्तमा परीक्षांची किती अवश्यकता आहे हें वैदर्भसाहित्य-सम्मेलनाच्या वृत्तपत्रावरून कळलें असेलच. या परीक्षेच्या संबंधी सर्व कार्य रा. भय्यासाहेब वाईकर हे शिरावर घ्यावयास तयारच आहेत. त्यांनी जबाबदारी घेतली म्हणजे पर्यायाने ती आमच्या संस्थेचीच जबाबदारी होऊन बसेल. आपण फक्त तशा परीक्षा सुरू करण्याची Authority Note ( प्रशस्तीपत्र ) दिली की, इतर सर्व कामें आम्ही करून घेऊं. आम्ही जाहिरातीच्या छपाईपासून तो परीक्षक नेमणें आणि प्रश्नपत्रिका तपासण्यापर्यंतचे सारे काम करून घेऊं. आणि मुलाने मिळविलेल्या गुणाचे तक्ते आपणाकडे पाठवूं. विनंती एवढीच की आपल्यासारखे किंवा तात्यासाहेब केळकर यांच्यासारखे सर्वमान्य यांची मुलांना दिल्या जाणाऱ्या प्रशस्तिपत्रावर सही असली तर या प्रशस्तिपत्रांना अखिल महाराष्ट्रांत मान्यता मिळेल. (१) येथील मान्य पुढारी लोकनायक बापुजी अणे आणि रा. दादासाहेब खापर्डे यांची सही या प्रशस्तिपत्रावर मिळवून घेण्याचें आम्ही अभिवचन देतों. तसेंच आपण आपली सही देण्यास कबूल झालांत तरी आम्ही तात्यासाहेब केळकर यांची देखील सही मिळवून घेवूं. (२) परीक्षकमंडळांत प्रो. बेहरे, प्रो. पेंडसे, व इतर विश्वविद्यालयांतील मान्य पदवीधर ( M. A. ) व्यक्तींचीच योजना करूं. ( ३ ) अभ्यासक्रम आम्ही आपल्या मंजुरीकरिता आपणाकडे पाठवीतच आहोंत. ( ४ ) व जेणेंकरून प्रशस्तिपत्राच्या सहींचा कोणताच दुरुपयोग होऊं शकणार नाही किंवा अन्यायाला जागा राहणार नाही अशी सर्व व्यवस्था करण्याचें आम्ही अभिवचन देतों. प्रार्थना एवढीच आपणास ही योजना पसंत असल्यास तावडतोब संमति देण्याची कृपा करावी. '

मुंबई व ग्वाल्हेर येथे भरलेल्या संमेलनांत अशा तऱ्हेच्या परीक्षा घेऊन परिषदेच्या संमतीने पदव्या द्याव्यात असें ठरलेंहि होतें. त्याला पुन्हा चालना या योजनेने मिळणार आहे. तरी या योजनेसंबंधी सर्व सभासदांनी आपलें मत लवकर कळविण्याचें व्हावें.

**ना. गो. चापेकर**
कार्याध्यक्ष, म. सा. परिषद्.

## अभ्यासक्रम

(१) प्रथमा परीक्षा (प्रवेश परीक्षा)

(२) विषय— अवश्यक ४, ऐच्छिक २, एकूण ६ (सहा).

१०० (अ) गद्यः— १ चिपळूणकर, आगरकर व टिळक यांचे लेख प्रत्येकी सुमारें पृष्ठ ५० व चाणक्यनीति.

१०० (ब) पद्यः—(१) मोरोपंत सभापर्व, रामविजय (श्रीधर कृत) अ० दोन
(२) दासबोध समास दोन (!)
(३) तुकारामगाथा शंभर अभंग (?)
(४) भावकुसुमाञ्जलि दहा कविता (!)
(५) अभिनव–काव्यमाला दहा कविता (!)

१०० (अ) नाटकः—(१) तोतयाचें बंड (केळकर)

१०० (ब) अलंकारः—(१) शब्दालंकार, अनुप्रास, यमक, श्लेष.
(२) अर्थालंकार, उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, संदेह भ्रांति आणि दृष्टांत.
(३) रसाचीं नांवें व त्याचा परिचय.
(४) वृत्तदर्पण.

२०० (अ) ऐच्छिकः—(कोणतेहि दोन निवडून घेणें)
(१) नेनेकृत शासनपद्धति or बेहेरेकृत. १८५७
(२) तिहास–मराठे व इंग्रज, न. चिं. केळकरकृत.
(३) दासबोध ओव्या २५, मनाचे श्लोक २५, तुकाराम वगैरेंचे अभंग २५
ज्ञानेश्वरी ओव्या २५, पाठान्तर (सार्थ) एकूण १००
(४) कृषीशास्त्र–तेजशंकर कोचककृत.
(५) गृहकृत्य Indian Home Nursing. (Thacker&Co.)
(६) ग्रामसंघटन व स्थानिक स्वराज्य. गांवगाडा-अत्रेकृत.
(७) English (a) Lambs Tales from Shakespeare (10 Tales) or
(b) Ten tales for Indian students 70 marks
Poetry (b) Gitanjali 'Tagore' the scholar, day is done and Toys (Anthology of Verses) 30 marks

——————————— प्रत्येक प्रश्न पत्रिकेला गुण १००

एकूण गुण ६००

(२) मध्यमा परीक्षा (विशारद)

१०० (अ) गद्यः—१ गड आला पण सिंह गेला. २ केसरींतील निवडक निबंध १० व अडीचशें वर्षांपूर्वीचें महाराष्ट्र.

१०० (ब) पद्य: — (१) ज्ञानेश्वराची प्रभावळ, ( कर्मयोग, पान ५१ ते ११८; भक्तियोग पान १७९ ते २२६ ). संतमंडळाचे अभंग पान २७१–२९२

(२) दासबोधाची प्रस्तावना. (३) केकावली. (४) केशवसुत, गोविंदाग्रज कविता २० ( प्रत्येकीं दहा )

१०० नाटक:— (३) कीचकवध ( खाडीलकर ) आणि पुण्यप्रभाव अथवा राजसंन्यास ( गडकरी ).

१०० (अ) राजकारण:— राजनीतिशास्त्रपरिचय ( जावडेकर )

अलंकार:— अलंकार-मंजूषा ( कु. बाळूबाई अनंत खरे, बी. ए. )

२०० (ब) ऐच्छिक:— ( कोणतेहि दोन )

(१) इंग्लंडचा इतिहास.

(२) भाषाशास्त्र–मराठी भाषेची शब्दसिद्धि ( भिडे ) ( माधवराव अणे यांचे लेख )

(३) बागायतीची पूर्ण माहिती

(४) गायनशास्त्र आणि गायनकला. } बाजाच्या पेटीचा शिक्षक (भातखण्डे), हिन्दुस्थानी संगीत पद्धती. ताल–दादरा, एकताल, त्रिताल, झपताल, तेवरा आणि बोल व मात्रा. राग-भैरव, पूर्वी, काफी, असावरी, तोडी, पिलू.

(५) शिवणकाम—

(६) सहकार्य—

(७) English Prose (1) Trial and Death of Socrates and
(2) New High School Prose by Armour 60

Poetry (1) Othello........................ 40

( Essay writing )

एकूण गुण ६००

## (३) उत्तमा परीक्षा ( साहित्यरत्न)

१०० (अ) गद्य:— (१) मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, (पोतदार).

(२) शापित महाराष्ट्र ( सहकारी कृष्ण )

(३) साक्रेटिसचें चरित्र ( कृष्णशास्त्री चिपळूणकर )

(४) दहा निवडक लेख.

१०० (अ) पद्य:— (१) ज्ञानेश्वरी अध्याय २, १२, १५ व १८
(२) एकनाथी भागवत अ० १२, १३, १४.
(३) मुक्तेश्वर व वामन—नवनीतांतील संपूर्ण.
(४) मुकुंदराज—सार्थ परमामृत.
(५) आनंदगीत भाग १ ला } पोपटपंची, गोविंद कवि.
शशिमोहन

१०० (अ) नाटक:— परिवर्तन (कोल्हटकर), शिवसंभव (खरे)
एक प्रहसन

१०० (ब) अर्थशास्त्र:— कौटिल्य

अलंकारशास्त्र:— काव्यप्रकाश.

१०० (अ) निबंध:—(Essay writing)

२०० (ब) आणि (१) गृहिणीजीवन, भाग दुसरा, खण्ड १ ला. (डॉ. चि. ल. मुळे.)
(२) पंधरा लघुकथा (आधुनिक लेखक) मासिकांतील, व पंधरा निवडक कविता (मासिकांतील), एक कादंबरी.
(३) देशी जमाखर्चाची पद्धत—जमाखर्चाची देशी पद्धत (दातार.)—जमाखर्चाकरितां धडे, ह. श्री. घारे.
(४) लेखन व वक्तृत्व—वृत्तपत्र व लेखनकला. (वा. गो. आपटे), वक्तृत्वशास्त्र—के.सी.ठाकरे. अर्ध्या तासाचें

टीप भाषण देणें.(विषय एक दिवस पूर्वी सुचविण्यात येईल.)
(५) बिगकाम.
(६) हिन्दी ग्रामिक अर्थशास्त्र—शेतकरी संघ व सहकारी संस्था, (काळे व कर्वे) भारतीय अर्थशास्त्र.

(7) Prcso (1) Silas Marner. 50
(2) My Experiment with Truths.
Poetry (1) Macbeth or Othello ……… 50
(2) Shelley, Keats, Byron and Wordsworth.
(partrliculars to be determined).

टीप:—(१) उत्तमा परीक्षेंत एक पेपर (निबंध) जास्त ठेवण्यात आला आहे असें दिसून येईल.

टीप:—(२) ऐच्छिक विषय नेमतांना मुलींना उपयुक्त व कृषीची अभिरुचि वाढविणारे विषय मुद्दाम घातले आहेत. वरील परीक्षा मुलींना उपयुक्त व्हाव्यात अशी आमची इच्छा आहे व भारत हा कृषिप्रधान देश आहे. फेरबदल करतांना वरील धोरण लक्षांत घेतल्यास आम्ही फार आभारी होऊं.

# महाराष्ट्र–साहित्य–परिषद्

# पुनर्घटना कमिटीचा वृत्तांत व अहवाल

महाराष्ट्र-साहित्य परिषदेच्या तारीख २७ मार्च १९३२ रोजीं भरलेल्या साधारण-सभेमध्ये नेमलेल्या कमिटीच्या कांही सभा होऊन तिचा वृत्तांत तारीख १६ आक्टोबर १९३२ रोजीं भरलेल्या सभेपुढे मांडण्यांत आला होता. त्यावर त्या सभेंत पुढे दिल्याप्रमाणे ठराव करण्यांत आला.

"तारीख २७ मार्च १९३२ रोजीं परिषदेच्या सभेने नेमिलेल्या कमेटीने त्यास करावयास सांगितलेल्या सर्व गोष्टींचा विचार करून आपला संपूर्ण अहवाल व परिषदेची नवीन घटना ही तारीख १ डिसेंबरच्या आंत परिषदेच्या अध्यक्षांस सादर करावी व त्या सर्वांचा विचार संमेलनाच्या आधी परिषदेची सभा संमेलनाच्या ठिकाणीं भरवून तींत व्हावा. या कमिटीस कामासाठी अधिक समासद स्वीकृत ( कोऑप्ट ) करण्याचा अधिकार आहे."

सदरहू ठराव आमचेकडे २३ आक्टोबर रोजीं दाखल झाला. त्यानंतर कमिटीची सभा तारीख १३ नोव्हेंबर रोजीं बोलाविण्यात आली.

त्या सभेची व त्यानंतर भरलेल्या सभांची हकीकत पुढे दिली आहे.

तसेच त्या कमिटीने तयार केलेला अहवाल, नवीन घटना व तिने केलेल्या इतर शिफारसी पुढे नमूद केल्या आहेत.

य. रा. दाते<br>
कृ. पां. कुलकर्णी<br>
चिटणीस

या कमिटीची निमंत्रणाप्रमाणे सभा तारीख १३।११।३२ रोजीं दुपारी २–३० वाजतां महाराष्ट्र-शब्दकोश कचेरीमध्ये भरली. त्यावेळीं १ रा. य. रा दाते, २ प्रो. मा. दा. आळतेकर, ३ ग. मा. कुरुळकर, ४ श्री. म. वर्दे, ५ कृ. पां. कुलकर्णी, ६ चिं. ग. कर्वे, ७ ग. गं. जांभेकर इतके समासद हजर होते.

१ प्रथम रा. कुलकर्णी यांनी सुचविलें व डॉ. कुरुळकर यांनी अनुमोदन दिलें की, प्रो. आळतेकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें. त्याप्रमाणे प्रो. आळतेकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारल्यावर चिटणीसांनी पुढील गृहस्थांकडून आलेल्या सूचना वाचून दाखविल्या. रा. कृ. पां. कुलकर्णी, डा. ग. पाध्ये श्री. मा. नि. किबे, प्रो. पां. वा. काणे, ना. गो. चापेकर, प्रो. मा. ल. पाटणकर, प्रो. पोतदार. यानंतर पुढे दिल्याप्रमाणे क्रमाने निरनिराळ्या मुद्यांवर चर्चा करावी असें ठरलें. १ परिषदेच्या कामकाजाचा व हिशोबाचा अहवाल, २ सभेच्या कचेरीची योजना, ३ साहित्य-पत्रिकेसंबंधी विचार, ४ रा. जांभेकर यांनी अधिक समासद नेमून घेण्याविषयीं आणलेल्या सूचनेचा विचार.

यानंतर निरनिराळ्या मुद्यांवर विचार होऊन पुढील गोष्टी निश्चित ठरल्या. अहवालाचा मसूदा निश्चित करण्यात आला. तो स्वतंत्र पुढे दिला आहे.

घटनेंतील नियम ७ ए हा व टीप ट्रस्ट-डीडमध्यें पाहून जरूर तर त्यांत योग्य तो फेरफार करावा. रा. वर्दे यांनी ट्रस्ट-डीड पाहून यासंबंधीं काय तें कळवावें.

नियम ८. कार्याध्यक्ष, त्रैमासिक संपादक, कार्यकारी मंडळाने निवडावा हें अधिक चालावें. निधिधारक कार्यकारी मंडळाचा सभासद नसावा.

यानंतर प्रि. ध. रा. गाडगीळ, प्रो. वाडेकर, प्रो. हर्षे, रा. खानोलकर, रा. काळे यांस सभासद म्हणून स्वीकृत करून घेतलें.

प्रो. आळतेकर, दाते, कुलकर्णी, गाडगीळ, खानोलकर यांची सबकमिटी नेमावी. तिची रविवारीं दुपारीं २० तारखेस १॥ वाजतां सभा बोलवावी.

नियम ७।८।९ याखेरीज इतर नियमांत फेरफार करण्यासंबंधी अगर इतर नियमासंबंधी कांही सूचना आल्यास त्यांचा विचार या सबकमिटीने करून त्याप्रमाणे नियमांच्या भागांत फेरफार करून रिपोर्ट तयार करावा.

कचेरीसंबंधीचें कमिटीचें मत घटनेमध्ये नमूद केलें आहे.

याप्रमाणें तारीख १३ रोजीं भरलेल्या बैठकींत काम झालें. वरील ठराव घटनेचा विचार करतांना लक्षांत घेण्यांत आले होते.

य. रा दाते
कृ. पां. कुलकर्णी

वर उल्लेखिलेल्या सभासदांकडून आलेल्या सूचनाः—

१ कृ. पां. कुलकर्णी

खालील सभासद कमिटींत सामील करून घ्यावे.

१ प्रि. ध. रा. गाडगीळ
२ प्रो. दे. द. वाडेकर
३ प्रो. रा. ग. हर्षे
४ गं. दे. खानोलकर
५ के. ना. काळे

२ दा. ग. पाध्ये

१ सभा १९ तारखेपर्यंत तहकूब करावी. व १९ व २० तारखांस भरवावी.

२ ट्रस्टी, कार्याध्यक्ष, चिटणीस रा. फाटक व ओगले यांस त्यांचे तपासलेले हिशोब दाखल करावयास सांगावें.

ऑडिटरने तपासल्याशिवाय कोणतेहि हिशोब पास करण्याची शिफारस करूं नये.

३ कमिटीचा अहवाल निदान पांच दिवस अवधि देऊन सभासदांकडे सल्लांकरिता पाठवावा.

३ मा. वि. किबे.

१ सभेची कचेरी पुण्यासच असावी. परंतु एक चिटणीस व खजिनदार मुंबईचे असावेत.

२ महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या स्वरूपांत सुधारणा व्हावी. (अ) मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयाचा तींत परामर्ष घेतला जावा. व हिंदुस्थानांतील प्रतिष्ठित भाषा म्हणजे गुजराती, बंगाली, तामिल, तेलगु, कानडी, हिंदी यांतील नियत कालिकांचाहि समाचार तींत घेतला जावा. याकरितां मुख्य संपादक एक राहून बडोदें, बनारस, बेळगांव, बंगलोर, दक्षिण हैदराबाद, मद्रास व कलकत्ता येथील महाराष्ट्रीय विद्वानांचें मंडळ असावें.

३ पत्रिका षाण्मासिक करावी. तींत दर सहा महिन्यांनी किंवा वर्षाने एक मरीव ग्रंथ यावा.

४ पां. वा. काणे

१ ऑडिटरची सही घेऊन हिशोब पुरे करून घ्यावे. १९३१अखेर अमुक शिल्लक आहे असें समजावें

२ कचेरी पुणें येथे असावी.

दुसऱ्या कोणी पांच वर्षे ती घेऊन सोडणार नाही असें अभिवचन दिल्यास त्यांचेकडे द्यावी.

कचेरी बदलणें झाल्यास जोड कार्डें पाठवून त्यांतील $\frac{१}{५}$ किंवा $\frac{१}{४}$ मतांनीच बदलतां यावी.

३ साहित्यपत्रिकेचा संपादक एकच असावा. सध्याचा बदलणें झाल्यास १ वर्षापुरती तात्पुरती नेमणूक करून पुढे कायम करावी. पत्रिकेचे अंक ३ किंवा ४ काढावे ( एका वर्षांत ). एका अंकात साहित्य संस्थांच्या हकीकती, वर्षांतील पुस्तकांचें निरीक्षण, व उत्तमांचा परिचय हे विषय असावे. बाकीच्या अंकांत भाषेच्या व माहितीच्या दृष्टीने श्रेष्ठ दर्जाचें लिखाण असावें. निवळ फोकलोअर व गाणीं यांची भरती नसावी.

५ ना. गो. चाफेकर

१ कचेरी पुण्यासच असावी.

२ पगारी चिटणीस नेमावा.

३ दरमहा १०० रुपये कचेरी खर्च ठेवावा.

४ साहित्य पत्रिका कायम ठेवावी.

५ नेमणुका ( पत्रिकेच्या संपादकासुद्धा ) लेखी मतें घेऊन कराव्या.

६ अहवाल तयार करण्याचें काम दोन इसमांवर सोंपवावें.

६ भा. ल. पाटणकर:—

१ साहित्य परिषदेची कचेरी ठाण्यास असावी.

२ निवडणुकी-सभासदांची यादी प्रसिद्ध करावी. नंतर अर्ज लेखी मतं मागवून दरसाल कराव्या. वर्ष १ जानेवारी ते डिसेंबर अखेर अगर चैत्र ते फाल्गुन धरावें.

वर लिहिल्याप्रमाणे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पुनर्घटना कामटांने तारीख १३ रोजीं नेमलेल्या पोट-कमिटीची सभा रविवार तारीख २० नोव्हेंबर रोजीं शब्दकोश कचेरींत १-३० वाजता भरली त्यावेळीं पुढील सभासद हजर होते.

रा. ध. रा, गाडगीळ ( अध्यक्ष ), रा. य. रा. दाते, रा. कृ. पां. कुलकर्णी. प्रो. आळतेकर यांचे-कडून येण्यास सवड नाहीं म्हणून पत्र आलें होतें तें वाचून दाखविलें. प्रि. पाध्ये यांजकडून आलेलें पत्र पुढे ठेवलें. प्रो. वाडेकर, जांभेकर, हर्षे, यांचीं पत्रें वाचलीं त्यावरुन असें ठरविण्यांत आलें कीं, राहिलेल्या सर्व कामांचा विचार करून अखेरचा अहवाल मंजूर करण्याकरिता सर्व कमिटींच्या ( नवीन-सुद्धा ) सभासदांची सभा तारीख २७।११।३२ रोजीं दुपारीं २-३० वाजतां बोलवावी व तीपुढे सर्व अहवाल मांडावा.

त्याप्रमाणे सर्व कमिटीची सभा तारीख २७ नोव्हेंबर रोजीं बोलाविण्यांत आली.

त्याप्रमाणे रविवार तारीख २७।११।३२ रोजीं दुपारीं २-३० वाजता महाराष्ट्र शब्दकोशाच्या कचेरींत सर्व कमिटीच्या सभासदांची सभा भरली. त्यावेळीं पुढील सभासद हजर होते. रा. य. रा. दाते, रा. ध. रा. गाडगीळ, रा. कृ. पां. कुलकर्णी, रा. ग. गं. जांभेकर, रा. के. ना. काळे, रा. दे. द वाडेकर, रा. रा. ग. हर्षे, रा. गं. दे. खानोलकर. रा. जांभेकर यांच्या सूचनेप्रमाणे व प्रो. वाडेकर यांनी दिलेल्या अनुमोदनाप्रमाणे या सभेचें अध्यक्षस्थान रा. गाडगीळ यांनीं स्वीकारलें. रा. आळतेकर, रा. परुळकर, रा. वर्दे यांचीं पत्रें वाचून दाखविण्यांत आलीं.

मागील ता. १३।११।३२ रोजीं झालेल्या सभेमध्यें ठरल्याप्रमाणे तयार केलेला अहवाल वाचून दाखविण्यांत आला.

त्यानंतर साहित्य परिषदेची घटना व नियम यांची चर्चा होऊन जुन्या घटनेऐवजी शेवटीं परि-शिष्टांत दिलेली घटना मान्य करण्यांत यावी व तशा साधारण सभेस शिफारस करावी असें ठरलें.

साहित्य परिषदेची कचेरी पुणें येथे असावी असें घटनेमध्ये नमूद करण्यांत आलें आहे. त्याप्रमाणे साधारण सभेस शिफारस करावी असें ठरलें.

## अहवाल व शिफारशी

### १ परिषदेच्या कामकाजाचा अहवाल—

**( अ ) वर्गणीदार व सभासद**—परिषदेच्या दप्तरासंबंधीं जे कागद उपलब्ध आहेत त्यावरून १९२७, १९२८, १९२९, १९३० व १९३१ या सालीं प्रत्येकीं किती सभासदांकडून वर्गणी आली व १९३१ अखेर पटावर असलेले सभासद किती यांची संख्या दाखविणारा तक्ता ( परिशिष्ट १ यांत ) दिला आहे. हा हैदराबाद संमेलनानंतर कार्याध्यक्ष यांजकडून जे कागद चिटणीस यांजकडे आले त्यांवरून तयार केला आहे. याखेरीज जास्त माहिती उपलब्ध नाही.

**( आ ) संस्थेच्या कार्यकारी मंडळाने केलेलीं इतर कामें**—१ संमेलनें भरविणें—१९२६ सालीं मुंबईस साहित्य परिषदेमार्फत ११ वें संमेलन भरल्यानंतर बारावें संमेलन १९२७ सालीं पुणें येथें, १९२८ सालीं तेरावें संमेलन ग्वाल्हेर येथें, १९२९ सालीं चवदावें संमेलन बेळगांव येथें, व १९३० सालीं पधरावें संमेलन मडगांव-गोंव येथे व १९३१ सालीं सोळावें संमेलन दक्षिण हैद्राबाद या ठिकाणीं, याप्रमाणें सालोसाल संमेलनें भरत आलीं आहेत. या कामीं जरूर ते पत्रव्यवहार, अध्यक्षांसंबंधीं सूचना वगैरे काम परिषदेने केलीं आहेत. या संमेलनांपैकीं बेळगांव येथील चवदाव्या संमेलनापर्यंत अहवाल स्थानिक स्वागत मंडळानी व कार्यकारांनीं प्रसिद्ध केले आहेत. गोंवें व हैदराबाद येथील संमेलनांचे अहवाल अद्यापि प्रसिद्ध झालेले नाहीत.

**( इ ) साधारण सभा**—सभांच्या कामांचें वृत्त नमूद करावयाचें पुस्तक ( प्रोसीडिंग बुक ) १९३१ मे अखेरपर्यंतचें सध्याच्या चिटणीसांकडे आलेलें नाहीं. या बाबतींत सभेचे अधिकारी, कार्याध्यक्ष, चिटणीस रा. फाटक व रा. ओगले यांस रजिस्टर्ड पत्रें पाठवून विचारणा केली होती. विशेषत: रा. ब. पाध्ये यांच्या सांगण्यावरून रा. फाटक यांच्या पत्रांत ही गोष्ट नमूद केली होती. परंतु त्यांचेकडून या बाबतींत कांही माहिती मिळाली नाहीं. कार्याध्यक्षांनी आपणाजवळ कांही कागदपत्र नाहीत असें कळविलें. तेव्हां अधिकृत अहवाल तयार करण्याचें मुख्य साधन कमिटीस उपलब्ध झालें नाही. अशा परिस्थितींत योग्य प्रकारचा अधिकृत अहवाल कमिटीस करतां येणें शक्य नाहीं. साहित्य पत्रिकेच्या पहिल्या अंकापासून ( १९२८ एप्रिल, चैत्र शुद्ध प्रतिपदा शके १८५० ) साहित्य पत्रिकेच्या अंकांत सभांचे म्हणून जे अहवाल प्रसिद्ध झाले आहेत त्यांवरून तेवढ्या काळांतील माहिती पुढे दिली आहे ( परिशिष्ट २ ).

या माहितीचा वास्तविकपणा ज्या साधनांवरून ती तयार करण्यांत आली त्यांच्या वास्तविकपणावर अवलंबून आहे.

**( ई ) पोटमंडळांकडून झालेली कामगिरी—१ कोशकमिटी**—पुणें येथे बारावें साहित्य संमेलन भरलें त्यावेळीं जी साहित्य परिषदेची सभा भरली होती तींत मराठी भाषेच्या बृहत्-कोशाची योजना करण्याकरिता एक कमिटी नेमली होती तिचे रा. य. रा. दाते हे चिटणीस होते. त्यांच्या सांगण्यावरून असें कळतें की, त्यांनी त्या कमिटीची एक सभा मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत बोलाविली होती परंतु त्या सभेस त्यांचेखेरीज दुसरा कोणीहि सभासद हजर नसल्यामुळे त्या सभेंत कांही काम होऊं शकलें नाही. पुढे त्यांनी एक योजना तयार करून छापून कमिटीच्या सभासदांकडे पाठविली होती व ती ग्वाल्हेर येथे भरलेल्या साहित्य परिषदेच्या सभेपुढे मांडली होती व तेथे ती मान्य करण्यांत आली होती.

सध्या महाराष्ट्रकोश मंडळाकडून तयार होत असलेला महाराष्ट्र शब्दकोश त्या योजनेप्रमाणेच होत आहे.

**२ लिपि कमिटी**—पुणें येथील संमेलनप्रसंगींच एक 'लिपि-सुधारणा मंडळ' म्हणून कमिटी नेमिली होती. तिचेहि चिटणीस रा. य. रा. दाते असून अध्यक्ष न. चिं. केळकर हे होते. यांनी कांही सभा भरवुन एक अहवाल बेळगाव येथील संमेलनांत व दुसरा दक्षिण हैदराबाद येथील संमेलनांत मांडला होता.

**३ शुद्धलेखन कमिटी**—ग्वाल्हेर येथे भरलेल्या संमेलनांत व पुन्हा बेळगांव येथे भरलेल्या संमेलनांत ही कमिटी नेमिली होती तिचे चिटणीस रा. कृ. पां. कुलकर्णी हे असून त्यांनी आपला अहवाल बेळगांव गांवें येथे व दक्षिण हैदराबाद येथे संमेलनापुढे मांडला होता. यांच्या कामाचें वृत्त साहित्य-पत्रिकेमध्येहि प्रसिद्ध झालें आहे. शुद्धलेखन मंडळाचे नव निर्णय नागपूर युनिव्हर्सिटी, ना. दा. ठा. विद्यालय वगैरे संस्थांनी मंजूर केले आहेत. आतापर्यंत सुमारें २५–३० पुस्तकें ह्या नव्या निर्णयांप्रमाणे छापिलीं गेलीं. केसरीनेहि नव्या नियमाप्रमाणे छापण्याचा उपक्रम केला आहे.

**४ आळतेकर कमिटी**—ही कमिटी साहित्य परिषदेचे हिशोब तपासून अहवाल सादर करण्याकरिता नेमिली होती. तिने आपला अहवाल ता. ९-१०-१९३० रोजीं सादर केला होता.

**५ इतर कामें –भोजराज प्राइझ**—देवास दरबारामार्फत दरवर्षी प्रसिद्ध झालेल्या मराठी पुस्तकांतील उत्तम पुस्तकास दिलें जाणारें 'भोजराज प्राइझ' पदक महाराष्ट्र साहित्य संमेलनप्रसंगीं अध्यक्षांचे हस्तें दिलें जावें असें भोजराज प्राइझ कमिटीच्या विनंतीवरून ठरविण्यांत आलें.

**६ ग्रंथप्रकाशन**––साहित्य पत्रिका सुरू झाल्यानंतर पूर्वी जीं पुस्तकें साहित्य परिषदेमार्फत मोबदला देऊन ग्रंथकारांकडुन लिहवुन घेतलीं होतीं त्यांच्या छपाईचें काम मागें पडलें होतें. त्यासंबंधी कमिटीच्या शिफारसीचा ठराव नं. ८ व ९ यामध्ये ( पृ. ९ ) नमूद केला आहे.

## २ हिशोब

१ इ. स. १९२६ ते १९३१ अखेर परिषदेच्या सामान्य व ट्रस्ट फंडाचा संपूर्ण हिशोब.

परिषदेच्या ट्रस्ट फंडाचा ३१ डिसेंबर १९२६ अखेरचा हिशोब ऑडिटरने तपासलेला रा. ब. पाध्ये यांनी दाखल केला आहे. (तक्ता नं. १) तो मान्य करण्यांत यावा. १९२७ ते १९३१ डिसेंबर अखेरचा ट्रस्ट-फंडाचा हिशोब रा. ब. पाध्ये यांनी तयार करून दिला आहे ( तक्ता नं. २ ). तो ऑडिटरकडून तपासलेला नाही. तरी तो ऑडिटर यांजकडून तपासून आणून घ्यावा. ऑडिटर यांनी तपासल्यानंतर मान्य करावा.

३ परिषदेच्या सामान्य पैशासंबंधीचे हिशोब बरोबर तयार केलेले आढळत नाहीत व ते तयार करण्यास सध्या कागदपत्रांचें साहाय्यहि नाही. १९२६ साली भरलेल्या साहित्य-संमेलनाचे जे हिशोब रा. फाटक व रायकर यांनी तयार करून छापले ते ऑडिटरकडून तपासले गेले नाहीत. त्या खर्चाच्या बाबींस आधारादाखल पावत्या वगैरे होत्या की नाही हें समजण्यास साधन नाही. किरकोळ खर्च, तपशील न सांपडत असलेली रक्कम इत्यादि बाबींसंबधी कांहीच विधान करतां येत नाही. यासंबंधी कार्याध्यक्षाचा कांही शेरा नाही.

ज्या परिस्थितींत व जे कागदपत्र व साधनें आम्हांस मिळालीं त्यांवरून हे तयार केले आहेत. हे हिशोब ऑडिटर पुढे ठेवून पास करून घेण्याच्या स्थितींत नाहीत व .१९२६ ते एप्रिल १९३१ अखेर पर्यंतच्या कारकीर्दीत जे अधिकारी असतील त्यांनी या गोष्टीकडे लक्ष दिलें नाही. या हिशोबावरून १९३१ एप्रिल अखेर रु. ६८१२८६ शिल्लक होती. यापलीकडे निश्चित असें कांही सांगतां येत नाही.

ही शिल्लक सुद्धा यापुढील चिटणीसांकडे आल्याचें दिसत नाही. व ती पुढील हिशोबांत दाखल केलेली नाही.

१ आळतेकर कमिटीने १९२७ ते १९३० पर्यंतच्या हिशोबासंबंधीं पुढें दिल्याप्रमाणें शेरे आपल्या अहवालांत नमूद करून ठेवले आहेत. "१९२७ सालाबद्दल हिशोबाचे कसलेही कागद आम्हाला मिळाले नाहींत. फक्त रा. दाते यांच्या कांही सह्या असलेल्या नं. २०१।३०० पर्यंतच्या पावत्यांचें पुस्तक आमचेकडे आलें आहे. त्यांत नं. २०१ ची पावती ता. ३-४-१९२७ सालची आहे. ही वर्गणी प्रो. द. वा. पोतदार यांच्याकडून ३ रुपये आलेली दिसते. व ती चालू सालासाठी म्हटलेली आहे म्हणून १९२७ ची असावी. या पावतीवर वसूल करणाराची सही नाही. हे ३ रुपये आमचेपुढे असलेल्या कागदांत कोठेहि जमा केलेले नाहींत.

चिटणीस रा. फाटक यांच्या सांगण्याप्रमाणे १९२७ सालीं सभासदांकडून वर्गणी बहुतेक वसूल झाली नव्हती.

नं. १ ते २०० पर्यंतचीं पावती पुस्तकें आम्हाला मिळालीं नाहीत व ती संस्थेच्या पूर्वीच्या किंवा आताच्या कोणत्याहि अधिकाऱ्याकडे मिळत नाहींत. तेव्हां या सालची जमा काय हें सांगतां येणें अशक्य आहे. म्हणून रा. फाटक जे सांगतात तें स्थूल मानाने गृहीत धरल्याखेरीज गत्यंतर नाही.

जमेप्रमाणे सालमजकुरी खर्चाचें टिपणहि आम्हास मिळालें नाहीं. तथापि या सालीं ११ व्या साहित्य-संमेलनाचा अहवाल नाशीक येथे रा. ब. पाध्ये यांनी छापून प्रसिद्ध केला. त्याचें बिल काय झालें तें आम्हास मिळालेलें नाहीं. रिपोर्टाचे आकारावरून व त्याच्या १००० प्रती छापल्या होत्या असे समजून छपाईचा खर्च ५०० रुपयाहून अधिक झाला नसावा असें वाटतें. या वर्षी इतर कांही खर्च झाला नसला तरी स्टेशनरी व टपाल खर्च कांही झाला असावा. त्यासंबंधीं माहिती आम्हास मिळालेली नाही. परंतु असा खर्च ५० रुपयांहून अधिक झाला नसावा. तेव्हा स्थूलमानाने १९२७ सालची परीस्थिति पुढील प्रमाणेः—

| जमा | | नांवें | |
|---|---|---|---|
| रु. आ. पै | तपशील | रु. आ पै | तपशील |
| १८१५५-१५- | १९२६ साल अखेरची शिल्लक | ५००-०-० | अहवाल छपाई |
| | | ५०-०-० | स्टेशनरी व पोस्टेज |
| ३-०-० | रा. दाते यांच पावती पुस्तकावरून जमा | ५५०-०-० | |
| १८१४-५-४ | | १२६४-४-४ | शिल्लक |

हे बहुतेक आकडे स्थूलमानाचे आहेत.

आम्ही लिहिलेल्या हकीकतींत संस्थेच्या अधिकाऱ्यांनी शक्य असल्यास भर घालून हे सर्व हिशेब ऑडिटरकडून रीतसर तपासून घ्यावेत आणि तीन वर्षेपर्यंत साचलेले हे हिशेबाचें काम हातावेगळें करावें. गेल्या दोन वर्षांत त्रैमासिकाच्या छपाईमुळे संस्थेकडे जमा झाल्यापैकी बहुतेक रकम खर्च झाली. आणि त्यामुळे चालू खर्चासंबंधींसुद्धा संस्थेची ओढाताण झालेली दिसते. तेव्हा संस्थेच्या खर्चाची बाजू जमेच्या अनुरोधाने असण्यासाठी संस्थेचें उत्पन्न तरी बरेंच वाढलें पाहिजे किंवा छपाईचा खर्च कमी झाला पाहिजे असें वाटतें."

या सर्व वर्षांत हिशोबाकरिता सभा भरवावयाच्या त्या भरवल्या नाहीत. हिशोबहि रीतसर मांडलेले नाहीत. हिशोब तयार करून घेण्याकरिता कमिटी नेमावी लागते ही गोष्टहि वरील स्थितीचें द्योतक आहे. आणि त्या कमिटीने ता. ९।१०।३० रोजीं सही करून पाठविलेल्या रिपोर्टांत केलेल्या सूचना अमलांत आणण्याची कांहीहि तजवीज झालेली नाही. फक्त त्रैमासिक चाललें होतें. याखेरीज इतर सर्व कार्ये बंदच पडल्यासारखीं झालीं होतीं. ही कमिटी नेमल्यापासून सध्याच्या चिटणीसांनी ज्याप्रमाणे कमिटीच्या कामास मदत केली त्याप्रमाणे ज्या काळासंबंधी विचार करण्याकरिता ही कमिटी नेमिली आहे त्या काळच्या कार्याध्यक्षांनी व चिटणीसांनी बहुतेक कसलीहि मदत केली नाही ही गोष्ट मोठ्या खेदाने नमूद करणें भाग आहे आणि सभेचें दप्तर सुद्धा कोठें आहे याचा पत्ता लागत नाही; प्रोसिडिंग-बुक आळतेकर कमिटीने पाहिलें होतें परंतु ते सुद्धा आता मिळत नाही या सर्व गोष्टींवरून या काळांत झालेल्या कारभाराबद्दल जो निष्कर्ष निघतो तो तेव्हाच्या अधिकारी मंडळीस भूषणावह नाही.

**साहित्यपत्रिका:—**

साहित्य-पत्रिकेचें स्वरूप व आकार वगैरे बाबतींत ह्या कमिटीच्या शिफारसी ठराव नं. ६ व ७ मध्ये नमूद केल्या आहेत ( पृ. ९). तसेंच पुढील नियम घटनेमध्यें सामील करावे.

साहित्य-पत्रिकेचा संपादक, कार्याध्यक्ष व दप्तरचें काम करणारा चिटणीस याखेरीज इतर कोणी तरी असावा. त्यास कार्यकारी मंडळांत स्थान असावें हें घटना नियम ८ मध्ये नमूद केलें आहे तेथे ही टीप जास्त जोडावी. हा संपादक कार्यकारी मंडळाने आपणांमधून निवडावा.

साहित्य परिषदेच्या कार्यासंबंधींचा मजकूर चिटणीसाकडून येईल तो संपादकाने पत्रिकेमध्ये दाखल केला पाहिजे. त्रैमासिकाच्या सर्व सामान्य धोरणासंबंधी कार्यकारी मंडळीचे ठराव संपादकावर बंधनकारक असतील. परंतु वाङ्मयविषयक संपादकीय कार्यांत त्रैमासिक संपादकाच्या कामांत इतरांनी कोणी ढवळाढवळ करूं नये.

**४ साहित्य परिषदेची घटना:**—साहित्य परिषदेची घटना दुरुस्त करून व फेरफार करून पुढे दिली आहे त्याप्रमाणे मंजूर करावी.

**५ परिषदेची कचेरी:**—परिषदेची कचेरी पुणें येथे असावी वगैरे घटनेमध्ये नमूद केलें आहे त्याप्रमाणे व्यवस्था करावी.

## परिशिष्ट १

## सभासदांची संख्या

म. सा. परिषदेच्या सभासदांची संख्या वर्गवारी खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| तहहयात सभासद | ३४ |
| सामान्य सभासद | २२९ |
| | २६३ |

ह्या संख्येंत वर्गणीदारांची संख्या घातली नाही. सभासदांची वर्षवार विभागणी करणें फार कठीण आहे. व तें केलें तरी त्यासंबंधी खात्री देतां येणार नाही.

